सुवाङ्मयेन गीतेन युवतीनां च लीलया । यस्य न द्रवते चित्तं सवै मुक्तोऽथवापशुः ॥

सरसवाङ्मयरत्नमालेचें २५ वें रत्न.

( वंग कथानकाधारें )





# राजसंसार!

अथवा

# शहाजादा खुसरू.

लेखक व प्रकाशक,

तात्या नेमिनाथ पांगळ,

प्रोप्रायटर—सरसवाङ्मयप्रसारक मंडळी,

नं० ४ चर्नीरोड, गिरगांव—मुंबई.

मुद्रक,

रा. रा. लक्ष्मण भाऊ कोकाटे, मालक—हनुमान प्रेस,

७२१, सदाशिव पेठ, पुणें.



इ. स. १९१९ चा फेब्रुवारीचा अंक. | किं. दोन रुपये. | वर्ष ५ वें आवृत्ति १ ली.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



भगवत्कृपेनें मालेस प्रस्तुत चवथें वर्ष संपून पांचवें लागत आहे. त्या दृष्टीनें हें २५ वें रत्न गेलें फेब्रुवारींत व आज २८ वें रत्न प्रसिद्ध व्हावयास हवें होतें पण केवळ छापखान्याच्या दिरंगाईमुळें हें २५ वें रत्न आगष्ट अखेर तयार होऊन सप्टेंबरमध्यें वाचकांच्या हातीं पडणार! पुस्तकांची आगाऊ तयारी असतांहि केवळ "प्रेस"च्या अव्यवस्थितपणें काम करण्याच्या प्रकारा-मुळें आमचा असा नाइलाज होत आहे, त्याबद्दल वाचक, नाराज न होतील अशी आशा आहे! दिरंगाईप्रमाणें प्रस्तुत महर्गताहि बेसुमार वाढली असल्यामुळें, लढाईच्या वेळीं वाढलेल्या छपाईच्या भावापेक्षां, आतां लढाई बंद असूनहि, ते भाव सवाई दीडीनें वाढले आहेत. कागदाचे भाव अद्यापि उतरण्यास प्रारंभ झाला आहे तरी महर्गता व वाढते छपाईचे भाव, यामुळें, व वर्गणीदारांचा असावा तितका भरणा नसल्यानें पुस्तकांच्या किंमतींत नाइलाजास्तव गेले खेपेपासून थोडी वाढ करावी लागली आहे; पण आतां यापुढं मात्र अधिक वाढ करण्यांत येणार नाहीं असें आम्हीं आमच्या ग्राहकांना आश्वासनपूर्वक निवेदन करतों. एवढेंच नव्हे, तर महर्गता, छपाईचे व कागदाचे भाव कमी झाले तर किंमतींहि कमी करूं किंवा ग्लेज कागद वापरूं आजपर्यंत महायुद्धासारख्या बिकट महर्गतेच्या काळांत ज्या आश्रयदात्यां आधार दिला त्यांची ही माला आभारी असून, त्यांनीं अशीच सतत मालेवर कृपादृष्टी ठेवावी व हस्तेंपरहस्तें नूतन ग्राहक पाठऊन मालेस साह्य करीत जावें अशी त्यांना आमची विनंती आहे. शेवटीं केलेल्या सूचना लक्षांत घ्याव्यात.

प्रस्तुतच्या रत्नांत **शाहाजादा खुसरू उर्फ राजसंसार** आणि **पातिव्रत्याची कसोटी**, असे दोन ग्रंथ समाविष्ट केले आहेत. पैकीं राजसंसार ही ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध बंगकादंबरीकार श्रीयुत बाबू हरीसधन मुकर्जी यांच्या "खुसरू" नामक उत्कृष्ट कादंबरीचें मराठी प्रतिबिंब असून त्यांत अकबर, सेलीम व खुसरू या राजपुरुषांच्या संसाराचें कांहीं अल्पसें चरित्रच ग्रथित केलें असल्यामुळें या कादंबरीस **राजसंसार** असें सुंदर नांव मुद्दाम दिलें आहे.

संसारात प्रत्येकास महत्वाकांक्षा असते की, आपण राजा व्हावें, चैन भोगावी; पण राजा होण्यात खऱ्या सुखाचा किती लेश आहे व त्या त्या व्यक्तींना किती खरी चैन भोगायाला सांपडते याचा विचार केला तर राजवाड्यापेक्षां झोंपडीच बरी असेंच कित्येक विचारी माणसास वाटेल! प्रत्यक्ष मरणसमयीं नातू भेटायाला आला असतां सम्राट् अकबर त्याला कैदेची शिक्षा ती काय करतात; व भावी सम्राज्ञी जोधाबाई मुलांकरितां जहागीर मागत असतां सम्राट् त्याचा कसा विपर्यास करतात; तसेंच सम्राज्ञी पदारूढ होणारी जोधाबाई पुत्रप्रेमानें विव्हल होऊन जीव काय देते आणि शाहाजादा खुसरूस त्याची राज्यतृष्णा मृतप्राय व्हावी म्हणून त्याला अंधत्व काय भोगावें लागतें, या सर्व अनेक गोष्टींचा सूक्ष्मपणें विचार केल्यास, राजसंसारापेक्षां **गरीबांचा संसार** बरा असेंच ज्ञात्यास वाटल्यावांचून राहत नाहीं. कैसर व झार यांचीं आजकालचीं राजसंसार चित्रें पाहिलीं तर नको नको हा राजसंसार! असेंच कोणासहि वाटेल!!! असो.

शाहाजादा खुसरू विषयलंपट होता व त्यामुळें त्याला शासनहि कडक प्रकारचें मिळालें. केवळ अंधत्वावरच त्याच्या शासनाची इतिश्री झाली नाहीं. तर पुढें सेलीमनें नूरजहानशीं पुनर्विवाह केल्यावर, नूरजहाननें त्याचा (त्याला राज्यपद कायदेशीर पद्धतीनें न मिळावें म्हणून) खून करविला असेहि इतिहासकारांनी म्हटलें आहे. असो. साराश हरीतधन बाबूनीं ही कादंबरी फारच उत्कृष्ट लिहिली आहे. व त्याचें गुजराथींत झालेल्या भाषांतरामुळें हें कथानक मराठींत आणण्यास आम्हास पुष्कळच मदत झाली.

दुसरें-**पातिव्रत्याची कसोटी**, हें कथानक सौ. **जानकीबाई देसाई** यांच्या हृदयंगम लेखणींतून बाहेर पडलें असल्यामुळें त्यांच्या हृदयंगमत्वाबद्दल व उदात्तपणाबद्दल विशेष लिहिणेंच नको. गृहलक्ष्मी, प्रेमळ युवत, ताजमहाल, सौभाग्य तिलक वगैरे कथानकें परिचित असणाऱ्या रसिकांना हेंहि कथानक निःसंशय विशेष आदरणीय वाटेल! या कथानकद्वयांनीं युक्त असें हें रत्न आमच्या वाचकांस आवडेल अशी आशा आहे. नूतन मौहेक मिळवून देण्याविषयीं सर्वांना विनंती करून आम्ही वाचकांची रजा घेतों.

गिरगांव मुंबई ता. २९-८-१९. ] **तात्या नेमिनाथ पांगळ.**

# अर्पणपत्रिका.

---:*:---

ज्यांनीं ललितकलेपैकीं, नष्टांश होत चाललेल्या
'गायनकलेस' चैतन्य प्राप्त करून देण्यासाठीं
व तिचा भरतखंडभर प्रसार करण्यासाठीं
अहर्निश स्वार्थ त्यागपूर्वक परिश्रम
घेतले; तसेंच धर्मास गायनाची
जोड देऊन क्रूर व अधर्मी
लोकांच्या हृदयांतही धार्मि-
कतेचा ओलावा निर्माण
केला, ते आमचे

सन्माननीय व कर्तृत्ववान् मित्र

**श्रीमान् पं० विष्णु दिगंबर पलुस्कर,**

**संस्थापक व चालक-गांधर्व महाविद्यालय, मुंबई**

यांना, सरसवाङ्मयरत्नमालेचें हें २५ वें रत्न,
अत्यंत प्रेमपूर्वक अर्पण करित आहोंत.

तात्या नेमिनाथ पांगळ.

सौ० सरस्वतीबाई

# शहाजादा खुसरू.

## प्रकरण १ लें.



### ' सुंदरी तूं कोण आहेस '!!

" दुर्जयसिंह ! "

" युवराज, आज्ञा व्हावी ! "

" चुप-चुप! युवराज म्हणूं नकोस. या भयंकर गुहेला वेढून टाकणाऱ्या ह्या मूकपाषाणांनादेखील कान आहेत, आणि त्यांना चलनवलन करण्याची शक्ति आहे असें समज. तसेंच आणखी हेंहि मनांत समजून अस, कीं, लपून राहणाऱ्या गुप्त शत्रूची श्रवणशक्ति फारच तीव्र असते. "

"समजलों; पण आतां सरकारचा काय हुकूम आहे ?"

" दुर्जयसिंह ! तुझी म्यानांतील तरवार बाहेर काढ ! "

" हां. ही काढली. "

" आतां हिच्या या लखलखणाऱ्या धारेवर हात ठेवून प्रतिज्ञा कर. "

" प्रतिज्ञा कसली करूं, तें आधीं समजलें पाहिजे सरकार ! "

" पण तूं प्रथमच प्रतिज्ञाबद्ध झाला आहेस कीं, ' कोणताही प्रश्न न करतां मी आपला हुकूम मान्य करीन ह्मणून ! ' मग आतां असें का बरें ? "

" आतां ती प्रतिज्ञा पालन करणें अशक्य आहे. कारण कार्याबद्दल संशयितपणा उत्पन्न झाला आहे. "

" कसा ? "

" अजूनहि आपल्या मनांत काय आहे तें मला चांगलेंसें समजलें नाहीं. यापूर्वी मी निराळेंच कांहीं समजत होतों आणि आतां निराळाच संशय येत आहे. तेव्हां स्पष्ट काय तें– "

" पण आतां तरी माझ्या मनांत काय आहे, हें तूं कसें समजलास दुर्जय ? "

" हो! समजलों तर काय झालें? "

" तर मग चट्‌कन् सांगून टाक पाहूं ? "

" महाराज मानसिंह यांचा खून करावा असें तुम्हांला वाटत आहे ना?"

" होय ! अगदीं बरोबर "

" पण पूर्वी मला वाटलें होतें, कीं, शहाजादा सलीम यांचा खून करण्याचें आपल्या मनांत असावें ! "

" तेंहि खरेंच; पण आतां तो बेत मीं बदलला आहे. दुर्जय ! माझी आई मला केविल वाणीनें म्हणाली, ' मुलाना बाप हा स्वर्गांतील देवाप्रमाणें पूज्य आहे. तेव्हां त्याच्या रक्तानें हात विटाळून पापी होऊं नये. पितृहत्या हा कधीं न जाणारा कलंक आहे. तो हजारों प्रलयकालांनींहि धुतला जात नाहीं.' या तिच्या सांगण्यावरून मीं तो खुनाचा बेत रहित केला "

" आणि मातुलहत्त्येचा कलंक धुतला जातो वाटतें ? "

" पितृहत्त्येपेक्षां मातुलहत्या करावयाला कांहीं हरकत नाहीं. "

" पण हें बोलणें महाराज मानसिंहाच्या लाडक्या भाच्याला चांगलेंसें शोभत नाहीं. "

" शोभो अथवा न शोभो, विचार करण्याचें काम तुझें नव्हे. तूं मला साहाय्य करायला तयार आहेस कीं नाहीं, हेंच मला आतां समजलें पाहिजे. हें काम केलेंस तर मी तुला रोख कांहीं बक्षीस देईन; माझ्या गळ्यांतील हा मोत्यांचा कंठासुद्धां बक्षीस देईन. "

" नाहीं. असले शेंकडों कंठे आणि लाखों मोहरा घेऊनही मी हें काम करणार नाहीं. फार काय, संपूर्ण भरतखंडाचें राज्य जरी मला कुणीं देऊं केलें तरीहि मी हें काम करणार नाहीं. मी राजा मानसिंह यांचा विश्वासू अंगरक्षक असून त्यांचा एकनिष्ठ सेवक आहे, महाराजांनीं अनेकवार मला भयंकर प्राणसंकटांतून वांचविलें आहे, आणि अम्बरराजदरबाराच्या अन्नानें हा देह पोसला आहे. अर्थातच मी तें काम करूं शकणार नाहीं. शिवाय गुप्त खून करणें म्हणजे फारच मुडदाडपणाचें काम होय. तें काम करणारा मनुष्य नीच असतो. अभिजात शूरवंशजाकडून हें काम होणार नाहीं. "

" पण शहाजादा सेलीम यांचा खून करायला तूं तयार झाला होतास ना ! "

" त्याला निराळें कारण होतें "

" तें कारण मला समजेल का दुर्जय ? "

" ऐका ! एके दिवशीं आमा राजप्रासादांत युवराजसाहेबांनीं, सर्वांदेखत एका क्षुल्लक चुकीबद्दल माझा भयंकर अपमान केला होता. रजपूत वीर आपला अपमान कधींहि विसरत नाहींत हें आपण जाणत असालच. मला त्या अपमानाबद्दलचा सूड अशा रीतीनें उगवायचा होता. "

" बस्स–अगदीं बोलूं नकोस. माझ्यानें आतां ज्यास्त ऐकवत नाहीं. माझें म्हणणें तुला मान्य नाहीं, आणि माझा गुप्त हेतु तर तूं समजून चुकलास; तेव्हां आतां मी तुला आपला शत्रु मानणार ! "

" हरकत नाहीं. मला शत्रु माना ! "

" पण तसें मानून स्वस्थ न बसतां तुलाच आधीं पुढें पाठवून पुढील अवघड कार्याला मुहूर्त करतों. कारण तुला आतां जिवंत ठेवतां येणें अशक्य आहे. तुझ्या रक्तानें हा अंधार गुहा आतां लाल होणार. दुर्जय ! युद्ध करायाला तुझी तयारी नसेल तर शस्त्रत्याग करून माझ्या स्वाधीन हो ! तुला आतां मोकळा ठेवतां नये. तसें नको असेल तर मरायाला तयार हो "

" मरण म्हणजे रजपूत वीरांच्या हातचा मळ आहे. त्यांना मरणाबद्दल काहींच वाटत नाहीं; पण मुकाट्यानें मात्र मृत्यूला आलिंगन देणें हें आमच्यांत पाप समजतात. मी मरणाला तयार आहें, आणि माझें शस्त्रही तयार आहे. या देहांत प्राण असेपर्यंत हें शस्त्र मी कुणालाहि देणार नाहीं. होऊं द्याच तर एकदां सामर्थ्याची परीक्षा. युवराज ! "

" तर मग देवाची प्रार्थना करून मृत्यूसाठीं तयार हो ! कारण आतां तूं वांचत नाहींस. अल्लाशपथ तूं आतां वांचत नाहींस; पण अजूनही विचार कर. माझ्या म्हणण्याला रुकार देशील तर अजूनही वांचशील. "

" नको तें अमंगल वांचणें–शूराला रणांतच मरण योग्य. माझा निश्चय झाला. मी आपलें कोणतेंहि म्हणणें ऐकायला तयार नाहीं ! "

" तर मग द्वंद्वाला तयार हो ! "

" आहेच. आपलीच वाट पहात आहें. "

कोशमुक्त करालजिव्हा तरवार हातांत घेऊन रणधवल वीरदर्पानें आपल्या प्रतिस्पर्ध्यासमोर येऊन उभा राहिला. त्या गुहेंतील अल्पजीवी दीपिकेच्या क्षीण प्रकाशांतहि तें तीक्ष्ण शस्त्र चमकलें, आणि आकाशांत होणाऱ्या भीषण विद्युत्स्फुरणाचा भास झाला. दोघांनींहि एकमेकांला तरवारीची सलामी दिली. द्वंद्वाला सुरवात झाली. तरवारींचा खणखणाट आणि त्या धाडशी वीरांचे हुंकार यांवांचून तिथें दुसरा कसलाहि शब्द ऐकूं येईना. एकमेकांचे आघात चुकविण्यांतच आपलें युद्धकौशल्य खर्ची न घालतां चुकवून दुसऱ्याला ना मोहरम कसा करतां येईल इकडे त्यांचें लक्ष वेधलें, आणि तसे प्रयत्न सुरू झाले, पण या प्रयत्नांत दुर्जयसिंह अपेक्षी टरून खुस्रूच्या तरवारीनें त्याच्या तरवारीचे मधोमध दोन दोन तुकडे केले, व ते तुकडे क्षणक्षणत बाजूच्या दगडांवर आपटले. दुर्जय खट्टू झाला.

पण त्याच्यासारखा अविचारी तोच असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. कारण अजूनही तो खांबासारखा उभाच होता. आतां तरी त्यानें खुश्रूशीं तडजोड करावी कीं नाहीं; पण कुर्रेबाज रजपुतांचा ताठाच मोठा विलक्षण होता. असो. दुर्जय निशस्त्र झाला असें पाहून खुश्रूनें तरी आपला हात आवरावयाचा; पण तोही रागानें आंधळा झालेला असल्यामुळें त्या शस्त्रहीन दुर्जयावरही त्यानें आपली घातकी तरवार उगारली. तरी पण दुर्जय भ्याला नाहीं. तो रिकाम्या हातांनींच छाती पुढें काढून दोन पावलें पुढें सरला आणि तिरस्कारानें हंसून म्हणाला, " खुश्रू ! आम्ही रजपूतवीर मृत्यूला आमचें खेळणें समजतों बरें का. पण--'

खुश्रूनें वरमून आपली तरवार मागें घेतली आणि गंभीर स्वरानें म्हटलें, " पण काय ? "

दुर्जय तिरस्कारपूर्ण नजरेनें त्याच्याकडे पहात तीव्र स्वरानें म्हणाला, " लवकरच ज्याला भारतवर्षाच्या साम्राज्यसिंहासनावर अधिष्ठित व्हावयाचें आहे, जो सम्राट् या महाथोर नांवानें लवकरच विभूषित होऊं पहात आहे त्याच्या हृदयांत इतका क्षुद्रपणा असावा काय ? "

" हां दुर्जय ! शुद्धीवर आहेस का तूं ? सांग, माझा क्षुद्रपणा तुला कुठें आढळला ? " खुश्रू क्रुद्ध होऊन कर्कश स्वरानें म्हणाला.

" सांगायचें काय ? माझी तरवार मोडलेली आहे हें तुला दिसत नाहीं

काय ? मातृवंशाकडून रजपुतांचें रक्त आपल्या अंगांत खेळत आहे, मग अशा वेळीं निःशस्त्र प्रतिस्पर्ध्यावर शस्त्र चालविणें हा न्याय आहे वाटतें ? धडधडीत अन्याय करायला सरसावणारा क्षुद्र नव्हे तर काय ? " दुर्जयसिंह तिरस्कारानें म्हणाला.

" समजलों. तूं आपल्या जिवाला भितो आहेस, आणि वाक्चातुर्यानें मला फसविण्याचा तुझा विचार आहे. पण तुला जिवंत ठेविल्यानें माझा घात होईल. मीं न कळतां तुझ्यावर विश्वास ठेविला आणि तुला माझें सगळें हृद्गत सांगितलें; पण तूं विश्वासाला योग्य नाहींस असें मला कळून आलें असल्यामुळें तुला जिवंत ठेवणें अशक्य आहे. तुला जिवंत ठेवल्यास आजचा सर्व प्रकार सर्व राज्यभर होईल. छे. तें कांहीं नाहीं ही संधि वायां जाऊं द्यायची नाहीं. तुझी तरवार मोडली हें एका अर्थी बरेंच झालें. "— असें म्हणून युवराज खुश्रूनें दुर्जयसिंहाचा वध करण्यासाठीं पुन्हां आपली पल्लेदार तरवार उगारली. आतां तिचा आघात बसणार तोंच एक अत्यंत सुंदर रमणी त्या ठिकाणीं अकस्मात् आली आणि तिनें डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तोंच खुश्रूचें मनगट आपल्या दोन्ही हातांनीं गच्च दाबून धरलें. त्या सुकुमार सौंदर्यशालिनीचें तें सामर्थ्य व तें प्रसंगावधान पाहून खुश्रू थक्क झाला आणि मनांत म्हणाला, " सौंदर्यदेवते ! तुझा हा कुसुमकोमल, सुख-स्पर्शमय आणि सुंदर हात किती बरें सामर्थ्यसम्पन्न आहे ! तुझ्या कोमल बाहूंत इतकी शक्ति असेल असें कुणाला तरी वाटेल का ? रजपूतवीरापेक्षां रजपूतस्त्रिया ज्यास्त शूर आहेत खऱ्या " या वेळीं त्याला आपल्या आईची आठवण झाली व मनश्चक्षूंसमोर तिची मूर्ति त्याला दिसूं लागली.

शाहाजादा खुश्रू आपल्याशींच विचार करण्यांत गढून गेला आहे असें त्या रमणीच्या लक्षांत येतांच त्या असिम सौंदर्यशालिनी सुंदरीनें आपल्या कमरेला लटकणारी तरवार चटकन् दुर्जयसिंहासमोर धरली आणि स्मित हास्य करीत ती त्याला म्हणाली, " हं दुर्जयसिंह, आतां तुमची पाळी आहे. या तरवारीनें या राजकुलकलंक शाहाजाद्याचें मस्तक आतांच धडावेगळें करा. अशी संधी पुन्हां येणार नाहीं. मोगलांचें साम्राज्य अशानें तरी निर्द्वंद्व होवो ! "

खरोखरच सुंदरीच्या हस्तस्पर्शामुळें शाहाजाद्याचें, या चाललेल्या कोणत्याही गोष्टीकडे, लक्ष नव्हतें. त्या तरुणीच्या दिव्य मृदु स्पर्शानें व साम-

र्यानें तो मुग्धच झाला होता. असलें दिव्य, पवित्र आणि सतेज लावण्य त्याला बरेच दिवस कुठें पहायला मिळालें नव्हतें म्हटलें तरी चालेल. त्या लावण्यदर्शनानें त्याचा राग कुठच्या कुठें पार नाहींसा झाला. तो ती परिस्थिति व कालहि विसरला म्हटलें तरी चालेल.

तिचे ते कृष्णतारकामय सतेज नेत्र, पृष्ठभागावर अस्ताव्यस्त पसरलेला सुंदर कुंतलभार, भालप्रदेशावर मोत्याप्रमाणें चकाकणारे घर्मबिन्दु आणि तेजस्वी नेत्रांत खेळणारें विजयी हास्य पाहून खुश्रू वेडा झाला. आपल्या शौर्याबद्दलचा तिचा अभिमान आणि एक प्रकारचा बेफिकीरपणा हा तिच्या मुद्रेवर मूर्तिमंत दिसत असून पुष्पस्पर्शमय सुकोमल करांतील तिची दानवी शक्ति अनुभवायला मिळत असल्यामुळें तो अगदीं गुंगच झाला. इतकेंच नव्हे तर आपण नन्दनवनांत उभे असून एका स्वर्गीय अप्सरेचा नवनीत सदृश हात आपल्या हातांत धरला आहे व ती आपणाकडे प्रेमानें पहात आहे असें- हि त्याला वाटलें.

तो विस्मयविमुग्धमनानें तिच्याकडे पाहूं लागला. त्याचे नेत्र तिच्या स्वरूपावर जणुं काय अगदीं खिळून गेल्याप्रमाणें दिसत होते. पलघडीला तिचें सौंदर्य वाढत आहे असाच त्याला भास होऊं लागला, व तो स्वतःला पूर्णपणें विसरला. आपण अंधारांतून दिव्य प्रकाशांत आलों असून स्वर्गांतील सर्व क्रीडास्थलांचें शिरोरत्न असें जें नन्दनवन त्यांत आपण एका अपूर्व सौंदर्यशालिनीला पहात आहों; पण ती कोण आहे त्याची बरोबर ओळख पटत नसल्यामुळें, तिला तसा प्रश्न विचारून त्या गंभीर शांततेचा भंग करणें भाग आहे; असा त्यानें मनाशीं विचार ठरविला व त्या उच्छृंखल मनस्तरंगांत त्यानें त्या रमणीला उद्देशून "सुंदरी तूं कोण आहेस?" असा प्रश्नही केला.

# प्रकरण २ रें.

—:०:—

## ' तूं किती रे दुर्दैवी ! '

शद्दाजाद्यावर आपल्या स्वरूपाचा इतका परिणाम झालेला पाहून त्या रमणीला समाधान झालेंसें दिसलें. ती आपल्या तेजस्वी नेत्रांनीं कांहीं वेळ त्याच्याकडे पहात राहिली व नंतर मंदस्मित करीत धीर स्वरानें म्हणाली, " मी कोण ? युवराज, राजस्थानांतील रमणींचा परिचय त्यांच्याकडे नुसतें पाहूनच झाला पाहिजे."

कुमार चकित होऊन म्हणाला, " होय. असें असेल खरें ! कारण मला स्वतःच त्याचा अनुभव आहे. माझा हात धरायला इतर रमणींना धीरच झाला नसता, पण सुंदरी, या दुर्जयाच्या जीवनरक्षणाबद्दल तुझी इतकी धडपड कां बरें ? "

" कुमार असा प्रश्न आपण विचारूं नये. राजस्थानच्या रमणी, आपल्या स्वतःच्या प्रेमसर्वस्वासाठीं काय करतील हें सांगवत नाहीं. मी यांची वाग्दत्तवधू आहे. अर्थात् माझ्या प्रेमस्थानाचें रक्षण करणें हें अशा वेळीं माझें कर्तव्य नाहीं काय ? दुर्जयसिंह म्हणजे माझ्या हृदयाकाशांतील निष्कलंक चन्द्रमा आहेत. आणखी जास्त तें काय सांगूं महाराज ! ! " तरुणी उद्गारली.

त्यानें तितक्याच तीव्रस्वरानें दुर्जयला उलट प्रश्न केला, " काय झालें दुर्जय ? "

" मध्यरात्र झाली. आतां दोघांपैकीं एकाचा निकाल लागणें अत्यंत जरूर आहे. तुला, झालेल्या प्रकाराचा विसर पडला काय ! " दुर्जयनें प्रश्न केला.

" कशाचा निकाल लावायचा दुर्जय ? "

" एका रजपुत वीराची तरवार मोडून तूं त्याचा अपमान केला आहेस, आणि या अपमानाचा सूड घ्यायला तो वीर फारच उत्सुक झाला आहे. तेव्हां त्याचा निकाल नको का लावायाला ?"

"पौर्णिमेसारख्या सुरसुंदरीचें सौभाग्यधन हिरावून घेऊन तिचें हृदय विदीर्ण करण्यासाठीं या खुस्रूची तरवार केव्हांहि पुढें सरणार नाहीं. तिच्या अश्रूंचा मार्ग मोकळा करणें मला पसंत नाहीं दुर्जय !"

"कुमार ! मी तें तुझें रडगाणें ऐकायला तयार नाहीं. या पाषाणालाहि कान आहेत म्हणून तूंच मघां सांगितलें आहेसना ? अर्थात् या दुर्जयसिंहाला आपल्या पराजयाचा कलंक धुवून टाकणें भाग आहे." दुर्जयसिंह निश्चय-पूर्वक म्हणाला.

"नको. ज्यास्त सांगूं नकोस. तुझ्या या देवदुर्लभ-सौंदर्याला व शौर्याला पाहून मी दुर्जयसिंहाला क्षमा करतों" पण खुस्रूचे हे शब्द दुर्जय-सिंहाला सहन झाले नाहींत. तो जखमी व्याघ्राप्रमाणें गर्जना करून गंभीरस्व-रानें म्हणाला, "प्रियतमे तूं इथें कां आलीस ! जा-निघून जा [illegible] म-णीला पुढें करून मी माझें संरक्षण करूं इच्छित नाहीं."

पौर्णिमा--आलेली तरुणी-- ही तितक्याच दृढ आणि गंभीर स्वरानें उत्तरली, "आपण माझें सर्वस्व आहांत; आणि आपण कराल तीं [illegible] मला मानणें भाग आहे; पण या नीचवृत्तीच्या शत्रूच्या हातीं अशा निःसहाय्या-वस्थेंत आपणाला सोडून मी जाणार नाहीं. राजस्थानच्या रमणींचें शौर्य किती असतें तें एकदा याला पाहूं द्याच म्हणजे हा येथील कोणाही स्त्रियेच्या अगर त्याच्या सौभाग्यदेवतेच्या वाटेला जाण्याचें साहस करणार नाहीं." असें म्हणून तिनें दुर्जयसिंहाच्या तरवारीचे मोडलेले दोन्ही तुकडे हातांत घेतले आणि गंभीरस्वरानें तिनें कुमाराला हांक मारली. "कुमार खुस्रू !"

खुस्रू हा अजून तिच्या दिव्य लावण्यसुधाप्राशनांतच गुंग झाला होता-ती काय बोलते आणि काय करते इकडे त्याचें लक्षच नव्हतें. विस्मयविव्हल-हृदयानें व अनिमिष नेत्रांनीं त्या सौंदर्यराशीकडे तो पहातच होता. कांहीं वेळानें तो तन्मय होऊन मनांत म्हणाला, "धन्य धन्य हा दुर्जयसिंह ! असलें देवदुर्लभ रत्न ज्याला प्राप्त झालें तो खरोखरच धन्य होय !!"

कुमाराचें आपल्या बोलण्याकडे लक्ष नाहीं असें पाहून पौर्णिमा पुन्हां तीव्र स्वरानें म्हणाली. "कुमार ! आपली तरवार सांवरून घ्या. मी वीरकन्या असून भावी वीरपत्नी आहे. दुर्जयसिंहानीं तुमचा जो अपराध केला असेल तो मीं केला असें माना आणि आतां आपलें रक्षण करा. माझ्या हातांतील हा तीक्ष्ण

खंजीर आपल्या जीवनसर्वस्वाला धक्का लावणाऱ्याचें रक्तपान केल्यावांचून स्वस्थ बसणार नाहीं." बोलतां बोलतां ती रमणी आरक्त झाली व तिच्या हातांत एक तीक्ष्ण खंजीर चमकला. कुमाराला तर तिच्या डोळ्यांकडेहि पहावेना. तो मोठ्या संकटांत पडला. तिच्यावर तरवार चालवावी तरी कठीण व न चालवावी तरीहि पंचाईतच. आपण स्वस्थ राहिल्यास ही काय करील याचा नेम नाहीं. कांहीं वेळ विचार केल्यावर त्याला एक युक्ति सुचली व तो हास्यपूर्वक तिला म्हणाला, "सुंदरी ? तूं माझा पराभव केलास असेंच मी समजतों. मला आतां तुझ्यावर विजय मिळविण्याची इच्छा नाहीं. पहा, हा मी निघालों."

असें सांगून कुमार खुसू, गुहेच्या तोंडाकडे वळला. इतक्यांत दुर्जयसिंहानें त्याचा रस्ता रोखून धरला आणि म्हटलें, "कुठें निघालास ? या निर्जन गुहेंतील हें प्रशस्त आंगण व हे पाषाण रक्तपानासाठीं तान्हेलेले आहेत. त्यांची निराशा करावयाची नाहीं. आधीं, या शोणितपिपासू पाषाणांची क्षुधा निवारण कर. मला ही मोडकी तरवारच पुरे आहे. माझें आयुष्य असेल तर हीच माझें संरक्षण करील. जा, पौर्णिमे जा. रजपूत बायकांच्या नांवाला निष्कारण कलंक लावूं नकोस. बायकांनीं त्यांचें संरक्षण करण्याइतके ते निर्बळ झालेले नाहींत. मी जर तुला पूज्य वाटत असेन आणि माझ्यावर जर तुझें अढळ प्रेम असेल तर माझ्या नांवाचा सन्मान, तुझ्या प्रेमापेक्षां मोलाचा आहे असें मान, आणि इथून निघून जा. माझ्याकडे पाहूं नकोस."

दुर्जयसिंहाचें शौर्य पौर्णिमा जाणत नव्हती असें नाहीं, अर्थात या त्याच्या बोलण्यावर ती कांहींच बोलली नाहीं. हंसाप्रमाणें मंद मंद पावलें टाकीत ती निघून निघून गेली; पण गुहेंतून बाहेर पडेपर्यंत ती सारखी दुर्जयकडे पहात होती. तें तिचें आपल्यावरील प्रेम पाहून दुर्जय मनांत म्हणाला, "जा. माझ्या हृदयदेवते, जा ! मी तुझ्याकडे कधीं अनादरानें पाहिलें असेल तर त्याची मला क्षमा कर ! आज मला तुझें हृदय जितकें पहावयाला मिळालें तितकें मीं कधींच पाहिलें नाहीं. अहाहा ! तुझ्या बाबतींत मी भाग्यवान् आहें ! आज कुमार खुसूच्या तरवारीपासून जर या विशाल वक्षःस्थलाचें मी रक्षण करूं शकलों, तर तें प्रथम तुझ्याच आलिंगनानें पवित्र करीन !"

इकडे खुस्रूचें मनही कांहीं स्वस्थ नव्हतें. तो त्या सुंदरीच्या स्वरूप-चिंतनांतच मग्न झाला होता. मोंगल सम्राटाच्या जनानखान्यांत सुस्वरूप रमणींना कांहीं तोटा नव्हता; पण त्या ठिकाणची अत्यंत सौंदर्यशालिनी रमणीहि पौर्णिमेची दासी शोभली असती. तिचें शौर्यमय सौंदर्य तेथील एकही रमणींत आढळणारें नव्हतें, आणि तिच्यासारखें सदभिमानी हृदय तर तिथें मुळींच दिसलें नसतें. नाहीं म्हणायला कुमार खुस्रूची आई मात्र पौर्णिमेपेक्षा कांकणभर ज्यास्तच होती. व तिच्यावर खुस्रूची श्रद्धाहि पण तशीच होती; तरी पण आई म्हणून पौर्णिमेकडे पहायला तो तयार नव्हता. तिजकडची त्याची दृष्टि कांहीं निराळीच होती. अस्तु.

कुमार खुस्रू स्तब्ध होता. तसाच दुर्जयहि स्तब्ध होता. कोणाच्याहि तोंडून शब्द निघेना. जणुं काय त्या शांततेचा भंग प्रथम कोणी करावा याबद्दल ते विचारच ठरवीत असावेत. कांहीं असलें तरी दोघांच्याहि विचारांचा विषय एकच होता; पण त्यांची स्थिति व विचारांचे मार्ग मात्र निरनिराळे होते. बराच वेळ याच स्थितींत गेला.

यावेळीं दोनप्रहर रात्र होऊन गेली होती. ज्या मशालीच्या प्रकाशानें त्या गुहेचा तो अंतर्भाग अजूनपर्यंत प्रकाशित होत होता ती मशाल आतां क्रमशः निर्वाणाला जाऊं पहात होती. भुकेलेला अग्नी, प्रचंडवेगानें तिच्या स्नेहरसाचें शोषण करीत असल्यामुळें ती जळून जळून जळणार तरी 'कशी' आणि किती वेळ! मरणोन्मुख झालेल्या रोग्याच्या चेहेऱ्यावरील तेज ज्याप्रमाणें हळू हळू कमी होत असतें त्याप्रमाणें या मशालीचें ज्वलनसामर्थ्यहि कमी झाल्यावरोबर तिची ज्योत क्रमशः प्रभाहीन होऊं लागली होती.

याचवेळीं अकस्मात मूकव्रताचा भंग करून दुर्जय ओरडला, "कुमार खुस्रू!"

यावेळीं कुमाराचें मन एका अपरिचित स्वप्नराज्यांत प्रवेश करून एका अनिर्वचनीय व अव्यक्त सुखाच्या उत्साहांत भटकत होतें—वेगवान नदीच्या प्रवाहांत सांपडलेल्या तृणाप्रमाणें इतस्ततः फिरत होतें—पण याचवेळीं दुर्जयच्या आरोळीनें त्याला आव्हाहन केल्यामुळें त्याच्या उद्भ्रांत हृदयांत वस्तुस्थितीच्या ज्ञानाचा पूर्णसंचार झाला, आणि स्वप्नाचा सगळा मोह एका क्षणांत अदृश्य झाला.

" तुझा पराभव केव्हां झाला दुर्जय ? "

" पराभव नाहीं झाला तरी, तरवार मोडणाऱ्याला रजपुतवीर कोणतें प्रायश्चित्त देतात तें तुला समजलें पाहिजे. मोगलवंशाकडून थोडा सुद्धां अपमान सहन करून घ्यायला आम्हीं तयार नाहीं. "

" अं:अरे तुं एक नसशील, पण किती झालें तरी तुम्ही रजपूत आमचे मांडलीक आहां. तुमच्या सर्वश्रेष्ठ म्हणविणाऱ्या प्रतापसिंहाच्या तरवारीचा बडेजाव माझ्याच अजोबांनीं नाहींसा केला. तुमचा गडगडणारा कीर्तिदुंदुभी फोडून टाकण्याचें श्रेय ज्यानीं घेतलें ते माझे आजोबा—अकबरशहा—आज हयात आहेत हयात समजलास ? "

नाहीं कुमार ! अजोबांना तें केव्हांहि साध्य झालें नाहीं व साध्य झालें नसतें. ते हयात आहेत हें त्यांचें शौर्य नसून तसें त्यांना व तुझ्यासारख्या त्यांच्या अत्यंत लाडक्या नातवाला फक्त वाटत आहे.वास्तविक हें यश राजा मानसिंह यांनाच आहे. त्यांनीं आम्हां रजपुतांशीं द्रोह केला नसता तर दिल्लीचें तक्त व **हिंदुस्तानचें साम्राज्य** तुम्हांला केव्हांहि लाभलें नसतें; इतकेंच नव्हे, तर मोगलवंशाचें नांवही राहिलें नसतें. स्वत:च्या लोकांचा द्रोह करण्याचें पातक मानसिंहांच्या हातून घडलें आणि हें मी त्यांच्या हाताखालचा नोकर असूनही सांगायला कमी करणार नाहीं. कारण त्यांच्या नावाला लागलेला हा घोर कलंक यावच्चंद्रदिवाकरौ धुतला जाणें अशक्य आहे. या बाबतींत प्रत्येक रजपुतवीर त्यांची निंदाच करील !"

"नाहीं. दुर्जय, तुं म्हणतोस तसें नाहीं. मी जरी पितृद्रोही असलों, व त्यांना त्यांच्या हक्कापासून दूर करण्याच्या खटपटींत असलों तरी त्यांचा पराक्रम मला विसरतां येणार नाहीं. माझे वडील—"

" या तुझ्या नव्या वादाचाहि मी निकाल लावायला तयार आहे. तुझें म्हणणें कीं, ' शहाजादा सेलीम यानें महाराणा प्रतापसिंह यांचा पराभव केला, ' पण मी अगदीं स्पष्ट सांगतों राजा मानसिंह यांनीं जर तुम्हांला साहाय्य केलें नसतें तर आमच्या एका केसालाही धक्का लावण्याचें सामर्थ्य तुमच्यांत नव्हतें. आज जें सिंहासन तुम्ही उपभोगीत आहां तें राजा मानसिंह यांच्या पराक्रमाचें स्मारक आहे. हा पराक्रम शहाजादा सेलीम याचा नसून मानसिंहाचा आहे. "

दुर्जयच्या या भाषणानें कुमार खुस्रु पुन्हां क्रुद्ध झाला. पूर्वीचा आवेश त्याच्या आंगांत संचारला व त्यानें आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून म्हटलें, " दुर्जय ! सावध हो. शहाजाद्यांची–माझ्या वडिलांची–माझ्यासमोर निंदा करायला तुला कांहींच शरम वाटत नाहीं का ? शहाजाद्यांची निंदा करणारा कोणीहि असो, मी त्याला जिवंत ठेवणार नाहीं. कारण त्याला देहांत-शासनच योग्य !"

कुमाराच्या या बोलण्यावर दुर्जयसिंह तिरस्कारपूर्ण हास्य करून म्हणाला, " कुमार खुश्रु, आपली पितृभक्ति अगदीं वरिष्ठ प्रतीची आहे, पण त्यांचा खून करायलाही तुम्ही तयार झाला–"

पण दुर्जयचे पुढील शब्द त्यांच्या तोंडांतच राहिले. कारण तितक्यांत कोणींसें धीरगंभीर स्वरानें म्हटलें, "दुर्जय ! तुझा उद्धटपणा पुरे कर. राजकुमारा ! तूं किती रे दुर्दैवी ! ! "

---

# प्रकरण ३ रें.

---:*:---

## क्षमा.

त्या चेतनाहीन, शब्दविहीन, आणि पाषाणराजीपरिवेष्टित गुहेंत ते आकस्मिक निघालेले गंभीर शब्द पुनः पुन्हां प्रतिध्वनित होऊं लागले, व त्यामुळें पुष्कळ माणसांच्या तोंडून तेच ते शब्द फिरून म्हटले जात आहेत असें कुमाराला वाटलें.–' तूं कितीरे दुर्दैवी ' हे शब्द ऐकून तर त्याचें मस्तकच भ्रमिष्ट होण्याची वेळ आली. कारण ते शब्द त्याच्या अगदीं परिचयाचे होते.

ती स्तिमित आणि अर्धवट विझत चाललेली मशाल जणुं काय कुमाराची थट्टा करण्याकरितांच कीं काय अकस्मात् मोठी झाली आणि लागलीच तिनें पूर्वीपेक्षांहि हीनतेज धारण केलें, कारण स्नेहरसाचा परिपोष होईनासा झाल्यामुळें तिला आपलें तेज कायम ठेवतां येणें शक्य नव्हतें.

प्रकाशांतून घोर अंधारांत परिणत होऊं घातलेली ती निश्चल गुहा जणुं काय आपलें भीषण तोंड पसरून आपणाला खायलाच येत आहे, कीं

काय, असेंच कुमाराला वाटूं लागलें. अर्धवट अंधारांत नवीन आलेली भीमकाय व्यक्ति आणि तिच्या तोंडचे ते गंभीर शब्द या दोहोंपासूनहि कुमाराचें हृदय थरारलें आणि प्रतिध्वनीनें तर आपल्या कानठळया बसतात कीं काय असें त्याला वाटूं लागलें. कारण ते तिरस्कारपूर्ण कठोर शब्द ज्याच्या तोंडून आले होते, त्या व्यक्तीला त्यानें केव्हांच ओळखलें होतें.

आणि त्यामुळें पितृद्रोही कुमार खुश्रु, भारतवर्षाच्या साम्राज्याचा भावी सम्राट् आणि रजपुतांचा पाहुणा मंत्रमुग्धवत, निश्चल आणि निस्तब्ध असा उभा राहिला. जणुं काय आपल्या जीवनशक्तीचाच लोप झाला, असें त्याला वाटलें. तो उद्भ्रान्तनेत्रांनीं टक लावून त्या नवीन आलेल्या व्यक्तीकडे पाहात होता आणि तोंडांतून शब्द उमटेना. त्यामुळें त्या अर्धवट प्रकाशांत तो–स्वतःसुंदर असूनही–प्रेताप्रमाणें दिसूं लागला. त्याच्या तोंडावरचें तेज अकस्मात् नाहींसेंच झालें; पण या त्याच्या स्थितीमुळें आलेली व्यक्ती थोडीच स्वस्थ बसणार ! ! ती त्याच्या समोर आली आणि गंभीरस्वरानें उद्गारली,
"खुश्रु ! काय आहे हा प्रकार !"

इतकें झालें तरी कुमाराच्या तोंडून उत्तर निघेना. ते शब्द प्रलयकालच्या गडगडाटाप्रमाणें त्याला वाटले व त्यामुळें त्याचें वीरहृदय, वाऱ्यानें हालणाऱ्या तृणाप्रमाणें थरथर कांपूं लागलें.

प्रश्न करणाऱ्या व्यक्तीनें कांहीं वेळ वाट पाहून पुन्हा गंभीर स्वरानें म्हटलें, "कुमार खुश्रू ! सम्राट् अकबर यांचा वंश उज्ज्वल करणारा कुलदीपक तूंच काय ! माझ्या मृत्यूसाठीं तूं कां बरें इतका उतावळा झालास ? खरोखरच तूं दुर्दैवी आहेस आणि त्यामुळें तुला माणसाची परीक्षा होत नाहीं. तुझ्यासाठीं मी सर्वस्वाचा त्याग करायलाही तयार असतांना तूं माझ्यावरच उठावेंस म्हणजे केवढें आश्चर्य ! ! ऐश्वर्य, मान, मर्यादा आणि साम्राज्याचीं सूत्रें हातांत असतांही मी तीं केवळ तुझ्यासाठीं सोडून द्यायला तयार झालों; पण या माझ्या आत्मत्यागाबद्दल उपकार अगर आभार मानणें बाजूलाच राहून तूं माझ्या मरणाची इच्छा करूं लागलास काय ? कुमार, या विशाल हृदयांत उत्तप्त रुधिरप्रवाह जर तुला आवडत असेल किंवा या अनुतापमय जीवनाच्या जीवनीशक्तीच्या आकर्षणानें तुझी इष्टकार्यसिद्धि होत असेल–जर तुझी स्वार्थपूर्ती होत असेल–तर तसें करण्याला तुला मी

हरकत करणार नाहीं. कारण या समुष्ण शोणितधारा, तुझ्यासाठींच या हृद्-यांत सांठविल्या आहेत." आलेला मनुष्य कांहीं वेळ थांबून पुन्हां गंभीरस्व-रानें बोलूं लागला. खुश्रु तुझ्या कल्याणाचा प्रयत्न करण्यानेंच मी सम्राट् अकबराच्या रोषास पात्र झालों. तुझ्या बापालाही—शहाजादा सेलीम याला-मी डोळ्यांत कणाप्रमाणें टोंचूं लागलों आहें. मला तो चांगल्या दृष्टीनें पाहात नाहीं. आणि तूं, तूं तर माझ्या रक्तालाच तान्हेलेला दिसत आहेस!! कुमार, माझ्या रक्तपानावांचून जर तुझें कार्य होण्यासारखेंच नसेल तर राजा मानसिंह आपलें हृदय तुझ्यापुढें मोकळें करून सांगत आहे कीं, राजकुमारा! ये, आणि आपली इच्छा तृप्त कर. माझ्या रुधिरयज्ञानें तरी तुझी इष्ट सिद्धि होऊं दे."

राजा मानसिंहाचें हें हृदयाला घरें पाडणारें, तीव्र तिरस्कारमय पण कळकळीचें भाषण ऐकून कुमार खुश्रू अगदीं ओशाळून गेला. त्याचें सर्वांग कांपूं लागलें. कारण त्याच्या गत आयुष्यांत असा प्रसंग कधींच आला नव्हता· व त्यामुळें त्याच्या तोंडून शब्दच उमटेना.

बराच वेळ झाला तरी कुमार कांहीं बोलत नाहीं असें पाहून मानसिंह पुन्हा बोलूं लागला, "माझ्या लाडक्या खुश्रु! ये स्तब्ध का? तुझ्या कार्य-सिद्धीमध्यें येणारा हा कांटा तुला वाटत असेल तर काढून टाक. माझ्या हृदयांतील शोणित प्रवाहानें तुझ्या सिंहासन प्राप्तीमध्यें येणाऱ्या सगळ्या अ-डचणी जर वाहून जात असतील तर माझें हें रक्त दान करायला मी आनं-तयार आहें. तुझ्या आईला जरी मी याच आंगाखांद्यावर खेळवून वाढविलें आहे, तरी तिच्याशीं देवाची शपथ घेऊन मी प्रतिज्ञाबद्ध झालों आहे कीं, मी जिवंत असेपर्यंत तुझ्या मुलाचें—माझ्या भाचाचें—कुमार खुश्रूचें—तुझें-कल्याण करण्यासाठींच प्राणापलीकडे झटेन, मग त्यांत माझा प्राण गेला तरी हरकत नाहीं! मी माझा स्वतःचा फायदा विसरून तुझ्यासाठीं मरणही पत्क-रीन; पण माझ्या लाडक्या जोधाबाईला संतुष्ट करीन." तेव्हां खुश्रू, तूंच असा पुढें ये. मारेकरी घालण्याचें कारण नाहीं. ही माझीच तरवार घे आणि ती अगदीं सावकाश या माझ्या हृदयांत खुपस. कारण तुझ्या अडचणी दूर करून तुला कल्याणाचा मार्ग दाखवावा हाच या हृदयाचा उद्देश आहे." यानंतर अमात्यांनीं आपली रत्नखचित तरवार कोषमुक्त केली आणि ती पुढें करून

म्हणाले, "ही पहा तरवार! जिच्या तेजानें ही सुद्गुहा प्रकाशित झाली ती ही माझी असिलता, तुझ्या आजोबानें मी चितोडावर मिळविलेल्या विजयाबद्दल मला बक्षिस दिलेली आहे. हें विजयाचें स्मारक आहे. माझ्या स्वतःच्या ज्ञातिद्रोहाचें हे पिशाच आहे. कुमार! मी रजपुतांशीं बेइमान होऊन त्या श्रेष्ठ दुर्गाचा पाडाव केला आणि मोगल वंशाची गादी निष्कंटक केली, पण आतां त्याबद्दल पश्चात्ताप करण्याची वेळ आली आहे. ही तरवार म्हणजे मला आतां माझ्या या कलंकाचें चिन्ह वाटूं लागल्यामुळें भारभूत झाली आहे आणि जिनें मीं माझ्याच लोकांना शत्रुप्रमाणें मानून कापून काढण्यांत विजय मिळविला, आनंद मानला, आणि मानधन झालों, तीच आतां माझ्यानें हातांतही धरवत नाहीं. घे. तीच तरवार आज मी माझ्या हातानें उचलून तुझ्याकडे देत आहे. खुश्रु, ज्या कार्यासाठीं मी स्वतः तयार आहें तें कार्य करण्यासाठीं दुर्जयसिंहाची योजना कशाला चेर करतोस?"

दुर्जयसिंह विस्मयविमुग्ध मनानें मानसिंहाचें तें भाषण ऐकत उभा होताच. या भाषणाचें पर्यवसान आतां कशांत होणार याचा अद्याप कांहींच अंदाज करतां येत नव्हता, पण आलेल्या भाषणाच्या ओघांत महाराजांनीं जेव्हां आपली तरवार कुमारापुढें ठेविली व आत्मरक्षणाचा शेवटचा उपायहि नाहींसा करून टाकला, तेव्हां मात्र दुर्जयसिंहाला स्वस्थ बसवेना. तो झटकन पुढें झाला. आणि मन्दस्वरानें म्हणाला, "हें काय करीत आहां स्वामी! आपण आपल्या तरवारीचा त्याग आणि तोहि जिवावर उठलेल्या शत्रूच्या समोर करावयाचा? हें गैर नव्हे काय?"

दुर्जयसिंहाला बोलतांना पाहून महाराजांचे नेत्र लाल झाले. त्यांनीं रोषयुक्त नजरेनें त्याच्याकडे पाहून म्हटलें. "दुर्जय! दूर उभा राहा. तूं आपली पायरी विसरलास. माझ्या हुकुमाबाहेर तुला बोलण्याचें कारण नाहीं हें लक्षांत ठेव. थोड्या वेळापूर्वी माझ्या लाडक्या भाच्यावर तूं शस्त्र उगारलें होतेंस! कुमाराला ठार मारण्याचा तुझा इरादा होता. तूं हा लहान तोंडीं मोठा घांस घेतलास. जा. गुहेंतून बाहेर जा. तुझें इथें कारण नाहीं. आतां एक क्षणभर जरी उभा राहिलास तरी मी तुला माझा शत्रु मानून कुमार जें करूं शकला नाहीं तें मी करीन. मी आड उभा राहून झालेला सगळा प्रकार पाहिला आहे."

आपला अशा तऱ्हेनें अपमान झालेला पाहून एक शब्दही न बोलतां अगदीं निस्तेज चेहेऱ्यानें दुर्जयसिंह त्या गुहेंतून बाहेर पडला. जातांना त्यानें महाराजांना उद्देशून मनांत म्हटलें, " महाराज ! माझा असा कां बरें तिरस्कार करतां ! ! मी आपला दासानुदास आहे. आपल्या कल्याणाचेंच मी सतत चिंतन करीत असतों. आजपर्यंत मी आपल्या तरवारीचें सामर्थ्य पाहात आलों, पण आतां समजलें कीं, आपल्या हृदयांत वात्सल्य प्रेमही ओतप्रोत भरलेलें आहे. नाहीं तर ज्या खुस्रूनें, आपला खून करण्याचें कारस्थान रचलें होतें त्याला त्याच्या सर्व अपराधांची क्षमा करून आपण इतकें प्रेमच दाखविलें नसतें; पण धनीसाहेब ! माझ्यावर मात्र आपण निष्कारण रागावलांत ! हा आपला सेवक, प्रेमाला पात्र झालेला दुर्जय अविचारी नाहीं. त्याची स्वामिभक्ति श्रेष्ठ आहे. आपल्या स्वामीचा घात करणाऱ्याला जिवें मारावें व प्रभूचें आयुष्य वाढवावें ह्मणूनच हा एकनिष्ठ सेवक धडपडत होता. नाहीं तर कुमारावर शस्त्र उचालण्याचें मला काय बरें कारण ? "

मंत्रौषधीनें रुद्धवीर्य केलेल्या भुजंगाप्रमाणें मनांतल्या मनांत तळमळत व वरील प्रकारचे विचार करीत दुर्जयसिंह त्या गुहेपासून बराच लांब निघून गेला, पण पुन्हां त्याच्या मनांत कांहीं येऊन तो दरवाजाशीं आला व तिथेंच थबकून उभा राहिला.

इकडे कुमार खुस्रू तर अगदीं मूढच झाला होता. त्याला आतां आपण काय उत्तर द्यावें तेंच सुचेना. इतकेंच नव्हे तर चालला आहे हा प्रकार बरा कीं वाईट याचाही त्याला अंदाज करतां येईना. आपलें सर्व कारस्थान महाराजांना–मामांना–समजलें, अर्थात जो काय प्रसंग येईल तो भोगणें भाग आहे, असा एकवार त्याच्या मनांत विचार येई, पण मानसिंहाच्या या बोलण्याची संगती मात्र त्याला नीटशी लावतां येईना. मात्र आपण केलेल्या कृत्याबद्दल त्याला आतां पश्चाताप वाटूं लागला होता.

त्याचे विशाल व तेजस्वी नेत्र अश्रुपूर्ण झाले. त्याच्या हृदयांत मोठी खळबळ उडाली. पूर्वीचे सगळे आततायी पणाचे विचार आतां कुठच्या कुठेंच गेले. त्याला त्याबद्दल आतां कांहीं आठवेना सुद्धां. मात्र मानसिंहाच्या भाषणानें त्याचें नैसर्गिक कोमल अन्तःकरण विरघून गेलें आणि तो अश्रु-

मोचन करूं लागला, जमिनीवर पडणारे त्याचे ते उष्ण अश्रु मानसिंहाच्याहि नजरेला पडले.

तो समजला, कुमाराला आपल्या कृतकर्माचा पश्चात्ताप होत असावा त्याचें मत्सरपूर्ण कठोर अन्तःकरण आतां स्नेहपूर्ण झाल्याचें त्याचे अश्रुच सांगत होते. महाराजांना समाधान वाटलें. व आतां उपेक्षा करून उपयोग नाहीं असें ठरवून त्यांनीं कुमाराला आपल्या हृदयाशीं धरून त्यांनीं प्रेमभरानें त्याचें चुम्बन घेतलें. आतां तर कुमाराला रडण्याचा अनिवारच हुंदका आला त्यानें आपले डोळे पुशीत पुशीत महाराजांचे पाय धरले आणि त्यांच्यावर डोकीं ठेवून तो रडत रडत म्हणाला, " मामासाहेब ! मला क्षमा करा. मी अत्यंत नीच आणि पापी आहे. राजस्थानांतील एका पवित्र स्त्रीच्या उद्‌. येऊन मीं तिला व्यर्थ यातना दिल्या. हाय ! मी केवढा अविचार करी-तों चरे !! मामा ! मला आपण क्षमा केली काय ! "

महाराजांनीं कुमाराचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन स्नेहयुक्त पण धीर गंभीर स्वरानें म्हटलें, " कुमार ! खरोखरच तूं दुर्दैवी आहेस ! तुझ्या भीषण भविष्य कालाची छायाहि अजून तुला दिसली नाहीं. खुस्रू ! तुझ्या अदृष्टाकाशांत काळेकभिन्न मेघ इतस्ततः संचरत आहेत याची तुला कल्पना तरी आहे का ? छे. तुला तें कांहींच समजणें शक्य नाहीं. माझ्या हृदयांत तुझ्याबद्दल किती आशा आणि स्नेह आहे, याचीहि तुला कल्पना नाहीं. कसें समजणार ! मोंगल साम्राज्याचें सध्याचें दरबार म्हणजे एक चक्रव्यूहच झाला आहे. आणि त्या चक्रव्यूहांतून मीं तुझें शक्य तितक्या तऱ्हांनीं संरक्षण करीत आहें;पण पुढें काय आहे कुणाला माहीत ! जोधाबाईच्या–माझ्या बहिणी-च्या–दीनवदनाकडे पाहून माझें हृदय भरून येतें, आणि तिच्यासाठीं मीं तुला पाठीशीं घालूं पहात आहें. माझें सर्वस्वहि मी पाण्यांत बुडवायला तयार झालों आहे; पण मूढ मनाच्या खुसरू ! तूं तें कांहीं मनात न आणतां माझ्या रुधिर-पानासाठीं तोंड उघडून बसला आहेस. आज नाहीं तर थोड्याच दिवसांत तुला माझी परीक्षा होईल आणि माझा आश्रय नसता तर तुझें काय झालें असतें तेंहि दिसून येईल. पण नको. ती परिक्षेची वेळ यावी अशी माझी इच्छा नाहीं. कारण माझ्या बाबतींत तूं अविश्वासू व्हावेस असें मुळीं माझें वर्त-नच आहे. चितोडचा पाडाव करण्याला व महाराणा प्रतापसिंह यांचा मोड

करण्याला मी मोंगलवंशाचा हस्तक झालों त्याचवेळीं मी माझें इमान घालवून बसलों. आतां तें आजन्म मला मिळवितां येणार नाहीं. खुस्रू ! नाहीं बाबा, तुझा यांत कांहींहि दोष नाहीं. मीं तुला पूर्ण क्षमा केली आहे. ये. माझ्या बरोबर ये. मी असेपर्यंत तुझ्या केसालाहि धक्का लावण्याची कुणाची छाती नाहीं."

खुस्रू मनांत म्हणाला, "काय ही देवसुलभ उदारता ! अभिमानी, प्रतिहिंसापरायण, आणि ममताहीन राजा मानसिंह यांच्या हृदयांत इतकी उदारता आणि इतकें प्रेम असेल असें मला स्वप्नांतही वाटलें नाहीं. स्नेहपूर्ण हृदय क्षमाशील असतें हें मला माहीत आहे, पण ममतेला आणि क्षमेलाहि कांहीं सीमा असेल कीं नाहीं ! ! मामाला ठार मारायला जो भाचा तयार झाला त्याच्यावर दया आणि क्षमा करणें म्हणजे केवढी उदारता ! ! "

कुमाराच्यानें पुढें विचार करवेना. तो अश्रुपूर्ण नेत्रांनीं मामाकडे पहात केविलवाण्या स्वरानें म्हणाला, "महाराज ! मी आपल्या बरोबर आतां कुठें येऊं ! मला येण्याला आतां कोणती जागा मोकळी आहे ! माझ्या आईला– आपल्या भगिनीला–मी हें माझें अपराधी तोंड कसें दाखवूं ? नको. या नराधमावर आपण इतकें प्रेम करतां पण त्या प्रेमाला तो पात्र नाहीं आणि त्याला तो राजवाडाहि नको. माझा सूड उगवायचा सोडून आपण अशी मला क्षमा कां बरें करतां ? क्षत्रिय केव्हांही आपल्या शत्रूला क्षमा करीत नाहीं. मग मला आपण कां बरें इतकी क्षमा दाखवितां ? "

महाराज, किंचित् हंसून म्हणाले, "मी तुला कां क्षमा करीत आहें तें मागाहून समजेल; पण आतां तूं मला कांहींही न विचारतां माझ्या मागून ये पाहूं ! " मानसिंह चालूं लागला.

नाइलाज होऊन कुमार खुस्रू, मानसिंहाच्या मागून निघाला. गुहेंतून बाहेर पडल्यावर एक लहानसा पहाड लागत असे तो उतरून ते किल्ल्यांत आले व राजवाड्याकडे जाऊं लागले. यावेळीं आकाश स्वच्छ असून चंद्राचा प्रकाश सर्व जगाला अमृताचें स्नान घालीत होता. त्या सुधाधवल प्रकाशांत अंबरप्रासादाचें शिखर चमकलेलें पाहून कुमाराची छाती धडधडूं लागली. त्याच्या डोळ्यांपुढें अंधार दिसूं लागला व आपल्यापुढें आतां कोणतें ताट वाढून ठेविलें आहे त्याची त्याला कल्पना झाली. प्रासादाच्या दरवाजाशीं

येईपर्यंत मामाभाच्यांत काहीं भाषण झालें नाहीं. कारण दोघेहि आपापल्या विचारांतच गढून गेले होते, आणि त्यांचे विचारही विभिन्न मार्गांचे होते. अर्थात बोलण्याचा प्रसंगच आला नाहीं.

दरवाजांत येतांच पहारेकऱ्याची नजर महाराजांच्या नजरेला भिडली. अकस्मात् आणि एवढ्या मोठ्या रात्रीं महाराजांना तेथें आलेले पहातांच तो चमकला व त्याला आश्चर्य वाटलें, पण दुसऱ्याच क्षणीं तो अधोमुख झाला व त्यानें आपली तरवारहि खालीं करून नमन केलें. थोड्याच वेळांत लोखंडी दरवाजा उघडला गेला, व दोघेहि मामाभाचे आंत आले. नंतर एका विशिष्ट महालाच्या तोंडाशीं येतांच अमात्य स्नेहमय स्वरानें म्हणाले, "कुमार ! जा. तुझी प्रेमळ माता आपल्या एकुलत्या एक लाडक्या मुलाची वाट पहात बसली आहे. जा. तिला भेट आणि आनंदित कर. मी उद्यां सकाळीं पुन्हां तुला भेटेन."

कुमार कांहीं बोलणार होता; पण त्याला बोलायला वेळ न देतां अमात्य चटकन् दुसरीकडे निघून गेले. अर्थात् हताश, शंकित व निरुत्साही झालेल्या खुसूला न बोलतां अन्तःपुराकडे वळणें भाग पडलें; पण तो अन्तःपुरच्या दरवाजाशीं जातांच थबकला. कारण आंत त्याची प्रेमळ माता डाव्या हातावर कपाळ ठेवून पांढरी शुभ्र शय्या असलेल्या पलंगावर सचिंतपणें अश्रुविसर्जन करीत बसली होती. ती आपली प्रेमळ मातृमूर्ति पहातांच कुमाराला काय वाटलें असेल त्याची वाचकांनींच कल्पना करावी !

---

## प्रकरण ४ थें.

—:o:—

### "कां बरें मी तुझी आई झालें बाळ !"

महालाचा दरवाजा उघडा होता आणि प्रकाशही स्वच्छ होता त्यामुळें जोधाबाईनें कुमाराला चटकन् ओळखलें. तिनें आपले डोळे पुसले आणि तीव्रस्वरानें म्हटलें, "खुसू ! ये. आंत ये." आईनें आपणाला ही जी हांक मारली ती प्रेमाची नसून रागाची व तिरस्काराची आहे हें कुमारानें ओळ-

खलें. आईची हांक मुलाला जितकी चांगली ओळखतां येते तितकी ती कुणा-लाही ओळखतां येत नाहीं.

आईनें हांक मारली अर्थात् आंत गेल्यावांचून गतीच नाहीं असें मनांत आणून कुमार आपल्या थरारणाऱ्या हृदयासह आंत गेला आणि अगदीं मन्द स्वरानें म्हणाला, आई ! अजून तूं झोंपली नाहींस ? ''

तो आपल्या मुलाचा प्रश्न ऐकून जोधाबाई तिरस्कारपूर्ण स्वरानें म्हणाली, '' तुझ्यासारख्या सद्गुणी मुलाच्या आईला झोंप आणि स्वस्थता मिळेल असें तुला वाटतें का खुसू ? कुमार तुझा राजकुलांत जन्म व्हावयाला नको होता. तूं अत्यंत नीच वृत्तीच्या अशा कोणत्यातरी हीन कुलांत जन्माला आलास तर बरें झालें असतें. कल्पना केली असतांहि सहन होणार नाहीं असलीं नीच आणि घातकी कृत्यें करण्याची तूं तयारी करूं लागलास आणि तीहि या वयांत माझ्या जवळ असतांना ? म्हणजे तुला म्हणावें तरी काय आतां खुसू ? ''

आईच्या या तिरस्कारयुक्त बोलण्यामुळें कुमाराच्या अन्तःकरणांत पुन्हां प्रचंड खळबळ उडून गेली. त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. कांहीं वेळानें त्यानें आपले डोळे पुसले आणि तो अनुतापविदग्ध स्वरानें म्हणाला, '' आई ! तूंहि मला असें बोलून दूर लोटूं लागलीस ना ? मला पहातांच बाबांच्या तळपायांची आग मस्तकाला जाते, मामाच्या तर रोषाला पात्र झालोंच आणि आई—आई तूंहि मला असें बोलावेंस ना ? माझें कोणीच नाहीं आणि मी कुणालाच नको तर ! ! आई तुम्हीं सर्वांनींच असें केल्यावर मी कुठें जाऊं बरें ? राजकुलांत जन्माला येणें हा एक भयंकर गुन्हाच आहे असें मला वाटतें ! ''

जोधाबाई कम्पितस्वरानें म्हणाली, '' हतभागी पोरा ! तूं माझ्या उदरीं येऊन माझ्या वैधव्याचीं कारस्थानें रचावींस काय ? मामाचाही खून करावयाला तुझे हात सज्ज व्हावे काय ? खरोखर, तुझे अपराध क्षमा करण्याला योग्य नाहींत. ''

पश्चात्ताप युक्त स्वरानें कुमार म्हणाला, '' चुकून झालेल्या गोष्टीला क्षमा नाहीं का करायची आई ! ''

" तूं मुलगा म्हणून मीं तुला पहिल्या अपराधाबद्दल क्षमा केली असें मानलें, पण आज दुजयसिंहा बरोबर जें तुझें भाषण चाललें होतें त्याचा काय अर्थ ?"

" आई ! ! तीहि माझी चूक झाली. मी अविचारानें कांहीं तरी करीत होतों; पण आतां माझे डोळे उघडले आहेत; ते ' का ' ' कसें ' याचें मला उत्तर देतां येणार नाहीं. "

" समजलें. तुला आतां कांहींच बोलायला तोंड नाहीं, कारण आपल्या पक्षाचें समर्थन करण्याला जे डावपेंच पाहिजे असतात त्यांचाही तुझ्यांत अभावच आहे; पण वेड्या मनुष्यानें एकाद्या घराला अग्नी लावला तरी तें घर पेट घेतें. मग सांग बरें तुझा अपराध किती भयंकर आहे तें ? आज तूं आपल्या मामाचा खून करण्याबद्दल मारेकऱ्याची योजना करीत होतास नाहीं का ? "

" खोटें कशाला बोलूं ? मी तसा प्रयत्न करीत होतों खरा; पण तें तुला कसें समजलें ?

" तो प्रश्न विचारण्याचा तुला अधिकार नाहीं; पण हें भयंकर पापीकृत्य करायला तूं कां बरें प्रवृत्त झालास ? "

तें मला बरोबरसें सांगतां येणार नाहीं. माझ्या उतावळ्या आणि अविचारी स्वभावाचा हा एक दोष आहे. शिवाय मोंगलवंश आणि रजपूत यांचें जन्मादारभ्य वैर आहे हें तुला माहीतच आहे. "

" तें कांहीं असलें तरी तुला असें करतां येत नाहीं. ज्या महाराजांनीं तुझ्यासाठीं आपल्या सर्व सौख्यावर लाथ मारली व प्रत्यक्ष सम्राटाशींहि फटकून वागायला कमी केलें नाहीं, त्या तुझ्या मामावर तूं शस्त्र धरावेंस म्हणजे किती बरें लाजिरवाणी गोष्ट आहे ? एवढ्या प्रचंड साम्राज्यांत मानसिंहावांचून तुझ्या संरक्षणाचा प्रयत्न करणारा दुसरा कोणीहि नसता केवळ नीच लोकांच्या चिथावणीनें कांहींही विचार न करतां त्याला मारायला तूं तयार व्हावें हें योग्य का ? "

" आई ! आई, मला क्षमा कर. मी खरोखरच दुर्दैवी आहे. माझ्यामुळें तुला, बाबांना आणि मामाला या तिघांनाही त्रास होत आहे. आई मला आज्ञा दे. मी फिरून दिल्लीला जातों. मी इथें राहून तुला आनंद देण्या-

ऐवजीं त्रास मात्र दिला. क्षमा कर. मी आतां हा असाच आजोबांकडे जातों आणि त्यांना सांगतों, महाराज! मी अत्यंत त्रासदायक मनुष्य आहे. माझ्या इतका नराधम दुसरा कोणीहि नसेल. मी माझा अपराध कबूल करतों. मी आपल्या कुमारांचा, युवराजांचा 'प्रत्यक्ष माझ्या वडलांचा' खून आणि तोहि केवळ राज्यप्राप्तीसाठीं–करायला तयार झालों होतों. इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष आपल्या मित्राचा–महाराज मानसिंहाचा माझ्या मामांचाहि घात करण्याच्या विचारांत होतों तेव्हां साम्राट्! मला योग्य तें शासन करा. आई, मी असें आजोबांना सांगतों. माझ्या हातून झालेल्या अपराधाबद्दल मला आतां पश्चात्ताप होत आहे; आणि शिक्षेवांचून पश्चात्तापाचें शांतवनही होणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर या घटकेपासून आतां मला कुणालाहि तोंड दाखविण्याची लाज वाटूं लागली आहे. आई! खरोखरच मी जन्माला आलों नसतों तर बरें झालें असतें."

बोलतां बोलतां कुमाराच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, तो वारंवार हुंदके देऊं लागला आणि केविलवाण्यासारखा इकडेतिकडे पाहूं लागला. जणुं काय आतां आपलें असें कोणीहि राहिलें नसून आपण अगदीं निराश्रित आणि अनाथ असें झालों आहों असें त्याला वाटलें, जोधाबाई किती झाली तरी स्त्री होती, कुमाराची आई होती आणि प्रेमळ राणी होती. आपल्या मुलाची ती तशी झालेली दीन स्थिति पाहून कोणती माता स्वस्थ राहील? मुलगा कितीहि अपराध करो, पण आईला त्याचें काय? तो दुःखी पाहून तिचें हृदय विरघळायचेंच. यावेळींहि तसेंच झालें. कुमाराचे ते अश्रू आणि त्याचें तें दीनवाणें तोंड पाहून तिचें अन्तःकरण विरघळलें. कुसन्तानापेक्षां निसन्तान बरें असें जरी तिला पूर्वी वाटत होतें तरी आतां ते तिचे सगळे विचार पार कुठच्याकुठें नाहींसे झाले. मुलाच्या डोळ्यांतून वाहाणाऱ्या अश्रुधारा पाहून तिचें हृदयकाठिण्य, विराग, तिरस्कार सगळें कांहीं वत्सलतेच्या प्रबल तुफानांत सांपडून गवताच्या काडीप्रमाणें कुठच्याकुठें निघून गेलें, आणि तिच्याही नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. ती चटकन् पुढें झाली आणि कुमाराचे डोळे पुसून सद्गदीत स्वरानें म्हणाली, "कुमार खुश्रू! नको, नको. रडूं नको. तुझ्या या अश्रूंपेक्षां मला साम्राज्यसिंहासन ज्यास्त नाहीं. तुझ्यापुढें मला सगळें जग तुच्छ आहे, मग यःकश्चित् सिंहा-

मनाची ती मातबरी काय! नाहीं बाळ, तुझा मी आतां केव्हांहि तिरस्कार करणार नाहीं. मीं तुझे सगळे अपराध क्षमा केले आहेत. आतां अगदीं वाईट वाटून घेऊं नकोस."

आईच्या त्या चार प्रेमळ शब्दांनीं कुमाराचें तप्तहृदय शांत झालें. त्यानें तिच्या पायांवर डोकें ठेविलें, आणि अश्रूंनीं तो तिच्या पायांना स्नान घालूं लागला. कधींहि वाटलें नसेल इतकें आज त्याला समाधान वाटत होतें.

बराच वेळ अशा स्थितींत गेल्यावर जोधाबाईनें कुमाराचा हात धरून त्याला आपल्या जवळ घेतलें आणि एक मर्मभेदक दीर्घ सुस्कारा सोडून गहिंवरून म्हटलें, "हाय हाय!! खुश्रु या राजकुलांत जन्माला येऊन तुला कधीं तरी सुख वाटलें काय? तुझा तगळा जन्मच त्रासांत दुःखांत जावा असा तर ईश्वरी संकेत नसेल? कुणीं सांगावें; पण कां बरें मी तुझी आई झालें बाळ!"

---

# प्रकरण ५ वें.

---:o:--

## कठोर प्रतिज्ञा.

फाल्गुन महिन्यांतील पौर्णिमेचा दिवस संपून रात्रीला सुरवात झाली होती. अम्बरच्या पूर्वेकडे दिसणाऱ्या पहाडाच्या गगनचुम्बित शिखरापासून अम्बरप्रासादापर्यंत चोंहोंकडे दिसणारी वसुंधरा "शुभ्र ज्योत्स्ना पुलकित" झालेली स्पष्ट दिसत होती. अनन्तनीलाकाश, शशांकाची समुज्ज्वल कांती हृद्यामध्यें धारण करून जणुं काय अभिमानानें फुगून गेलें आहे कीं काय असें दिसत होतें. पहाडाच्या शिखरावर असलेल्या एका घनदाट पालवींच्या तमालवृक्षाखालील काळोखांत आपलें आंग लपवून एक धीट कोल्हा आपला सूर क्रमाक्रमानें पंचमांत चढवून ओरडत होता, आणि तो सूर क्रमाक्रमानें प्रतिध्वनित होत होत दशदिशांना पसरून विलीन होत होता.

अम्बर महाराज मानसिंह यांनीं, आग्रा येथें साम्राज्याधिपतीनीं स्थापन केलेल्या 'गुलाबबागे' प्रमाणें आपल्या वाड्याशेजारीं एक अप्रतीम 'गुलाब

बाग' निर्माण केली होती. सध्यां वसंतऋतूचें नुकतेंच साम्राज्य स्थापन होऊं लागलें होतें तरी बागेंतील वासन्तीमलयपरिचुम्बित गुलाबकुंजांतून येणारा अत्यंत मधुर आणि मुग्ध करणारा सुगन्ध चोहोंकडे दरवळत होता. चंद्रप्रकाशानें उद्भ्रान्त चित्त झालेले, व कुसुमगंधानें मूढ बनलेले चारदोन निर्लज्ज भृंगे अजूनही स्तब्ध निशीथ कालाचा फायदा घेऊन अर्धप्रस्फुटित गुलाबांचा बहार लुटण्यासाठीं त्यांच्या मुखारविंदावर रुंजी घालीत आपल्या रसिकतेची ओळख करून देत होते, पण आपल्या या वर्तनानें आपला लोचटपणा व्यक्त होत आहे, हें त्यांच्या गांवींहि नव्हतें. कारण तितका विचार करण्या इतकी त्यांची विवेकशक्ति त्यावेळीं जागृत नव्हती.

च्यूतमुकुल सुवासानें पहाडावरील निर्जन, पण मनोरम स्थळें नववसंताच्या विलासमंदिराप्रमाणें शोभत होतीं. मृदुमलयसमीरणाच्या स्पर्शानें डहाळांपासून सुटणारे च्यूतकलिका रेणू, चंद्रिकाधौत श्यामल दूर्वाराशीवर पडून सरससुगन्धानें दिग्वलय उद्भ्रांत करीत होते, आणि त्यामुळें पर्वतवासी कालकूट वीष धारण करणारे भुजंगसुद्धां आनंदानें डुलत होते.

आकाशांत षोडशकलापूर्ण चंद्र, पृथ्वीवर वसंताचा झालेला पूर्ण विकास, पुष्पांचा नवविभुक्त सुवास हरण करण्यांत मलयानिल दाखवीत असलेली तस्करवृत्ति, कोकिलेच्या पंचमरागालापानें निनादित होणारा धराप्रांत वगैरे प्रकार एकत्र झाल्यामुळें एका स्वर्गतुल्य अभिनव देशाचाच भास होत होता, आणि यांत भर घालण्यासाठींच झणून कीं काय नकळे, गिरिनदीचें नृत्य व गायन तालसुरावर चाललें होतें.

आम्बर येथें फाल्गुन पौर्णिमेचा आज केवढातरी उत्साह चालला होता. राधागोविंदजीच्या मंदिरांत स्त्रीपुरुषांची गर्दी उसळली होती आणि मधून मधून थट्टा मस्करीमुळें उठणारे हास्यतरंगहि प्रतिध्वनित होत होते. सर्वांच्या चेहेऱ्यांवर एक प्रकारचा उत्साह खेळत असून तेवढ्या वेळा पुरता तरी निदान प्रत्येकाला आपल्या दुःखाचा पूर्ण विसर पडलेला दिसत होता. जणुं काय दुःखाला हद्दपार करण्याचाच त्यांचा विचार चालला असावा; पण गरीब बिचारे मनुष्य प्राणी !! वेड्यांना सुखदुःखाची मुळीं कल्पनाच नाहीं तिथें ते त्याला हद्दपार तरी कसें करणार?

पण कांहीं असो. आजच्या रात्रींचा तो देखावा फारच नयनाभिराम होता यांत संशय नाहीं. त्या सुखाच्या रात्रीं, त्या पौर्णिमेच्या रजतधाराचुम्बित निसर्ग सौंदर्यांत, नवदूर्वादल आणि किसलय राजी पददलित करीत व राधाकृष्णांचें गीत गात स्त्रीपुरुषांचा समुदाय देवळाकडे चालला होता. हंसगामिनी तरुणींच्या लीला पदविक्षपानें तालावर वाजणारे नुपूर गुलाबबागेंतील भ्रमरांच्या प्रेममय गुंजारवाला मागें लोटीत होते. तरुणींच्या नूपुरनिनादापुढें भ्रमरांचें गुणगुणणें कुणालाच ऐकूं येत नव्हतें. सर्वांना आनन्द झाला होता, आणि ताज्या पण सुवासिक पुष्पमाला घेऊन स्त्रिया पुरुष मुलें झाडून सारीं माणसें मंदिरांत जा ये करीत होतीं.

अम्बरच्या देवमंदिरांत इतकी गर्दी लोटली होती, पण जवळच्या पहाडावरील सगळे मार्ग तितकेच जनशून्य व स्तब्ध दिसत होते. उलट जसजशी रात्र वाढूं लागली तसतशी पदपथावरील भीषणता मात्र वाढत चालली. मध्यरात्रीच्या सुमारास तर हें स्तब्धतेचें साम्राज्य ज्यास्तच गंभीर आणि भयानक होऊन गेलें.

अम्बरवासी स्त्रीपुरुष राधागोविंदजींच्या मंदिरांत गेल्यानंतर त्यांनीं पिचकारींत गुलाबपाणी घेऊन त्यानें मूर्तीला स्नान घातलें आणि अबीर गुलाल वाहिला, व कांहीं वेळ गायन करून बरोबर आणलेल्या मोठमोठ्या व उत्तम पुष्पांच्या माला त्यांनीं त्याच्या गळ्यांत घातल्या. तसेंच आपापल्या मानसीक हेतूंचा उच्चार करून त्यांनीं राधागोविंदजीला नमस्कार केला. नमस्कार करून होतांच पुरोहितानें त्यांना तीर्थप्रसाद दिला व तो घेऊन सर्व मंडळी त्या दिवसाचें माहात्म्य सुस्वर कंठानें गात गात घराकडे निघाली. हा प्रकार झाल्यानंतर थोड्याच वेळांत सगळे राजपथ जलशून्य व निर्जन झाले हें सांगावयास नकोच. राधागोविंदजींचें मंदिरही थोडयाच वेळांत निर्मनुष्य झालें.

उत्तर रात्र सुरू झाली. चंद्र, आकाश मध्यावरून पुढें चालूं लागला. रस्त्यावर, नांव घेण्यालाही मनुष्य उरलें नाहीं. जवळच्या सरोवरांत उसळणाऱ्या मृदुतरंगांवर मात्र चंद्राचें प्रतिबिंब पडून हांसत, डोलत व कांपत जलविहार करीत होतें. केव्हां तें प्रतिबिंब स्थिर होई तर केव्हां ज्यास्तच हालूं लागे. पहाडावर यथेच्छ विहार करणारे कांहीं रात्रींचर वनपशू त्या निर्जनतेचा फायदा घेऊन सरोवरावर आले व तें चंद्रबिंबनृत्य पाहून सचकित दृष्टीनें इकडे

तिकडे पहात पुन्हां गर्द झाडीत जाऊन लपले.

या निस्तब्ध निशीथ कालीं सरोवराच्या पूर्वेकडील वनवीथिकेंत एक वीर पुरुष कसलासा विचार करीत इकडून तिकडे फिरत होता. त्याच्या त्या प्रत्येक वीर गंभीर पद्विक्षेपाची तऱ्हा पाहून कोणाही प्रेक्षकाला तो कसल्या-तरी गहन विचारांत गढून गेलेला असावा असेंच वाटलें असतें.

पण थोड्याच वेळांत त्या निर्जन वाटणाऱ्या ठिकाणीं एक रमणी आली. तिनें अर्धवट बुरखा घेतला होता. ती वीर पुरुषाजवळ येतांच थबकून उभी राहिली आणि मृदु स्वरानें म्हणाली, "दुर्जयसिंह, रात्र किती झाली असेल बरें?"

या आकस्मित प्रश्नानें तो वीरपुरुष–दुर्जयसिंह–चमकला आणि त्यानें मागें पाहिलें; पण तो विस्मित झाला नाहीं. त्यानें विनाशपूर्ण असा एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हटलें, "पौर्णिमे! रात्र किती झाली हें मला समजत का नाहीं?" तो आणखी पुढें बोलणार होता, पण थांबला. पण थोडा वेळ गेल्यानंतर तो रुद्ध स्वरानें म्हणाला, "आज पौर्णिमा आहे; पण आज मी तुझा अखेरचाच निरोप घ्यावला आलों आहे. मला प्रेमानें निरोप दे–" पुन्हां तो थांबला. कारण गहिंवर आल्यामुळें त्याच्या तोंडून शब्द उमटेना. त्याची ती स्थिति पाहून मंदाकिनीला आश्चर्य वाटलें. ती अगदीं त्याच्याजवळ गेली आणि धीर स्वरानें म्हणाली, "का बरं असं! आपणाला आज इतकं का वाईट वाटतं? आपल्या नेत्रांत कधीं न दिसणारे अश्रू मला दिसत आहेत."

दुर्जयच्या गालांवरून वाहाणारे अश्रुबिन्दु चांदण्यांत चमकले व एक-दोन बिंदु मंदाकिनीच्या तोंडावरही पडले. ती चमकल्यासारखी झाली. तिला या मूकरुदनाचा अर्थच समजेना, पण तिला दुःख झालें खरें! कारण दुर्जय म्हणजे तिच्या प्राणाचाहि प्राण होता. आपल्या दुर्जयसिंहापेक्षां जगांत कोणी श्रेष्ठ आहे असें तिला वाटतच नव्हतें. आणि अशा आपल्या प्रियकराच्या नेत्रांत अश्रू पाहून तिला काय बरें वाटलें असेल?

ती त्याच्या हृदयावर आपलें मस्तक ठेवून सद्गदीत स्वरानें म्हणाली, "नाथ! हृदयेश्वर! समग्र विश्वापेक्षांहि आपण मला प्रिय आहां. आपल्याशि-वाय माझें अस्तित्व व्यर्थ आहे. मग का बरं आपल्या नेत्रांत हे अश्रू? मला आपण कांहीं म्हटलं, माझा तिरस्कार केला तरी आपण मला प्रियच आहां.

माझें सर्वस्व आपल्यावांचून कोणी नाहीं. ही यावेळीं हंसत असलेली वसुंधरा, प्रलयाच्या तोंडीं सांपडून नाहींशी झाली तरी हरकत नाहीं, ईश्वराचें अस्तित्व विलुप्त झालें तरी चालेल, अनन्त विश्वाची भयंकर उलटापालट झाली तरी मी तिकडे लक्ष देणार नाहीं. आकाश जमिनीला मिळालें तरीहि मी तिकडे लक्ष देणार नाहीं. कारण माझा त्यांत नफा तोटा कांहीं नाहीं; पण नाथ ! आपल्या नेत्रांत आलेले अश्रू पाहून मात्र मला क्षणभरही स्वस्थ राहावत नाहीं. सांगायचं गडे, आपणाला काय वाटतं ? "

दुर्जयसिंह आवेगपूर्ण स्वरानें म्हणाला, " पौर्णिमे ! इतके दिवस मीं तुला चांगलें ओळखलें नव्हतें. प्रसंगावांचून मनुष्याची परीक्षा होत नाहीं असें म्हणतात, तें कांहीं खोटें नव्हे. तुझ्या उदात्त, प्रेमळ आणि निष्ठावान् हृदयाची मला चांगलीच परिक्षा झाली आहे. मीं तुझ्याकडे आजपर्यंत जितक्या आदरयुक्त नजरेनें पहावयाला पाहिजे होतें तितक्या आदरयुक्त नजरेनें पहात नव्हतों. पण आतां मी तुझ्याकडे अत्यंत आदरयुक्त प्रेमानेंच पाहीन; पण हाय ! मी आतां तुझा शेवटचाच निरोप घेणार आहें. ईश्वरानें ही मोठीच विचित्र वेळ आणली ! "

मंदाकिनी कांहींशी साशंकित; पण तीव्रस्वरानें म्हणाली, " कां बरं असं म्हणायचं ? दुर्जयसिंहासारख्यांनीं असे उद्गार कां काढले ? आमची ताटातूट करण्याचं कुणाला तरी साध्य आहे का ? नाथ ! माझ्या समोरून माझी देवमूर्ती दूर लोटण्याचें धाडस कोण बरं करीत आहे ? की स्वतः त्या मूर्तीलाच माझा कंटाळा आला ? "

दुर्जयसिंह खिन्नतेनें म्हणाला," नाहीं माझ्या लाडके ! तुला सोडून जावेंसें मला कधींहि वाटलें नसतें; महाराज मानासिंहांनीं मला हद्दपारीची शिक्षा दिली आहे. आणि उद्यां सूर्योदयाच्या आंत मला इथून गेलें पाहिजे. जर त्यानंतर मी येथें कुणाला आढळलों तर मला आजन्म कैदेंत ठेवण्यांत येईल असाहि आदेश जाहीर झाला आहे. "

" समजलें, हें कां आणि कसें झालें हें मला समजलं. कारण मला समजणार नाहीं असं काय आहे ! पण नाथ ! ही दासी आपल्याबरोबर रानावनांत राहायला येण्याला तयार असतांना आपण या हद्दपारीबद्दल इतकें

दुःख कां करावें बरं ? या जगावर आम्हांला राहायला कोंठें जागा मिळ-णार नाहीं असं थोडंच आहे ! हें शापित राजस्थान सोडून आपण जाऊंच गडे ! "

"नाहीं मी ही माझी जन्मभूमी सोडणार नाहीं, अपराधावांचून झालेली शिक्षाहि भोगणार नाहीं. माझं काय होणार असेल तें होऊं दे." दुर्जयसिंह निश्चयपूर्ण स्वरानें म्हणाला.

या त्याच्या बोलण्याचा अर्थ तिला समजेना. ती अस्वस्थ झाली. तिनें आपल्या अकलेप्रमाणें पुष्कळ विचार केला, पण या बोलण्याचा अर्थ तिला लावतां येईना. एकदां तिनें शशिकरोज्ज्वल नीलाकाशाकडे दृष्टी फेंकली आणि एकवार पहाडाच्या शिखरावरील गर्द झाडांतील गुहेकडेहि पाहिलें; पण तिला कशाचाच उलगडा होईना. शेवटीं तिनें एक दीर्घ सुस्कारा सोडून दुर्जयसिंहाकडे पहात म्हटलें, "नाथ ! आपण हा देश सोडून जाऊंच गडे ! मालव देशांत माझी मावशी राहाते तिकडे जाऊं आणि सुखानं राहूं बरं ? आपण असा अविचार करून कांहींतरी निश्चय करूं नये गडे ! ज्या ठिकाणीं न्याय नाहीं त्या ठिकाणीं राहून काय उपयोग ? या वेळीं जन्मभूमीचा त्याग-च केला पाहिजे."

यावर दुर्जयसिंह एक दीर्घनिश्वास सोडून म्हणाला, "वेडे ! तूं काय बोलत आहेस हें ! आपण कुठें गेलों तरी मानसिंहाच्या तीक्ष्ण दृष्टीला आपण चुकवूं शकणार नाहीं. आज साम्राज्यसत्ता त्यांच्या हातांत आहे. ते काय पाहिजे तें करूं शकतील. तेव्हां आपण कुठेंहि गेलों तरी एकच."

"होय असं आहे खरं ! पण आतां माझं कसं होईल ? माझं सर्वस्व निघून गेल्यावर माझे प्राण राहातील का ? प्राण नाहीं तर देहाची काय शोभा ? आणि देहाला ठेवून तरी काय करायचंय् ? आपल्या सुंदर मूर्तीचें ध्यान आणि सान्निध्य हेंच जिचें ध्येय आणि जीवन, ती आपल्याला सोडून कशी बरं राहील ? आमचा विवाह झाला न झाला तोंच आमचा वियोग करण्यांत अमात्यांना कोणता बरं लाभ होणार ? नाथ ! मला आपण टाकून जाऊं नये. मी असतांना आपलं अनिष्ट कोणीहि करणार नाहीं. मी भुके-लेल्या वाघिणीप्रमाणें आपल्या शत्रूवर तुटून पडेन. इतकेंच नव्हेतर महारा-जांच्या क्रोधाला बळी पडून जर आपण आजन्म बंदिवान् झालांत, तरी मी

आपणाबरोबर तो कारागृहवासहि भोगीन; पण आपण माझा त्याग करूं नये. " पौर्णिमा अगदीं विनवणीच्या स्वरानें म्हणाली.

दुर्जयसिंह मूढ होऊन, त्या चंद्रप्रकाशविद्योत निशीथकालीं अभिसारिकेच्या वेषानें आलेल्या आपल्या नवपरिणित तरुण व सौंदर्यशालिनी प्रेमळ पत्नीकडे पहात राहिला. तो तिचें सौंदर्य दर घडीला ज्यास्त ज्यास्तच वाढत आहे असें त्याला वाटूं लागलें. आपली प्रियपत्नी इतकी सुंदर आहे असें त्याला केव्हांच वाटलें नव्हतें. तिचें भाषण, तिचे हावभाव आणि तिचा मधुर स्वर हे सगळेंच त्याला नवीन आणि आल्हादकारक वाटूं लागलें. एकदां त्याला वाटलें कीं 'तिला आपल्या बरोबर न्यावें;' पण दुसऱ्याच क्षणीं त्याला आपल्या निश्चयाची आठवण झाली, कारण त्यानें गुप्तपणें अभ्यरांतच राहण्याचा विचार केला होता. अर्थात् गुप्तपणें राहावयाचें म्हणजे पत्नीला बरोबर घेतां येणार नाहीं व तिचा बाप आजारी असून तो घटका पळें मोजीत बिछान्यावर पडलेला आहे, आणि या मुलीखेरीज त्याला दुसरें स्वतःचें असें कोणीहि मनुष्य नाहीं अर्थात तिला नेतां येणें अशक्य ' हे विचार मनांत येतांच त्यानें आपलें मन कठोर केलें. भविष्यकालीन सुखाकडे नजर देऊन दिवस कंठावयाचें त्यानें ठरविलें, व मानसिंहाचें मन पुन्हां सुप्रसन्न करून घेण्यासाठीं आपणाला इथेंच गुप्त रीतीनें राहाणें जरूर आहे, असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें. तेव्हां त्यानें पत्नीच्या बाबतींत आपला निश्चय कायमच केला.

आपल्या मनांत चाललेल्या विचारांची नीट संगती जुळल्यावर एक दीर्घ निःश्वास सोडून तो आपल्या तरुण पत्नीला म्हणाला, " पौर्णिमे! मला तूं आतां निरोप दे. माझी पुन्हां भेट होणें न होणें आतां ईश्वरी कृपेवर अवलंबून आहे. तूं ज्यास्त दुःख करूं नकोस आणि मलाहि घोटाळ्यांत घालूं नकोस. तुझें दिव्यप्रेम सोडून आजच मला जावें लागत आहे याबद्दल वाईट वाटतें; पण त्याला इलाज नाहीं. होणारें कधींहि टळत नसतें. कधींना कधीं मी महाराजांना प्रसन्न करूं शकलों तर ते मला शिक्षेची माफी देतील आणि तसें झालें म्हणजे मी तुला भेटेन. नाहींतर आज आतां आपली भेट होत आहे हीच शेवटची समज. लाडके! तुझा निरोप घेतांना मला कितीं दुःख वाटत आहे, हें मी कसें सांगूं? माझ्या हृदयाला यावेळीं होणाऱ्या वेदना सांगण्या-

सारख्या नाहींत. तुलाहि तसेंच वाटत असलें पाहिजे; पण विवेकानें मनाला शांत कर." दुर्जयसिंह पुढें बोलू शकला नाहीं. कारण त्याला यावेळीं इतका गहिंवर आला कीं, त्याच्यानें एक शब्दहि उच्चारवेना.

पण पौर्णिमेची स्थिती त्याच्या उलट होती. ती राजवाड्यावर चमकणाऱ्या कळसाकडे पाहात तीव्रस्वरानें म्हणाली, " नाथ जावं आपण ! मी आपणाला निरोप देते. मलाहि आतां धाडशीच बनलं पाहिजे. माझ्या सुखांत विष कालविणाऱ्या कुमार खुसरूचा सूड घेतल्यावांचून मी आतां स्वस्थ बसणार नाहीं. मी आज माझें हृदय पाषाणासारखें कठीण करून आपणाला निरोप देत आहे; पण खुसरूचा नाश केल्यावांचून मी केव्हांहि स्वस्थ बसणार नाहीं. राजा मानसिंगही माझ्या हातून सुटतील असें आपण समजूं नये. माझ्या सुखाच्या आड येणाऱ्या प्रत्येकाचा मी अगदीं घट्ट मनानें सूड घेईन. आज जें मी आपलें हृदय दगडासारखें करीत आहें तें या दोघांचा नाश झाल्यावर आपली भेट होईपर्यंत तसेंच राहील. तोंपर्यंत माझ्या हृदयांत कोमळ विचारांचा वाससुद्धां येणार नाहीं. नाथ! आपण असं आश्चर्यानें माझ्याकडे पाहूं नये. हा गगनविहारी चंद्र, आपल्या हृदयावर पाषाणाचें चिलखत चढविलेला हा पहाड, ही निर्मळ रजनी आणि हे तरंगयुक्त पवित्र सरोवर यांना साक्ष ठेवून व आपल्या पायांची शपथ घेऊन मी सांगतें कीं, माझ्या या दोन शत्रूंचा निःपात झाल्यावांचुन मी केव्हांहि विश्रांती घेणार नाहीं. "

आपल्या पत्नीचें हें बोलणें ऐकून दुर्जय इतका चकित झाला, कीं, त्याला काय बोलावें हेंच सुचेना तो तिच्या संबंधाच्या विचारांत इतका गढून गेला, कीं, आपण आहों कुठें व आपली सध्यांची स्थिति काय आहे, हेंहि तो विसरला. बराच वेळ अशा स्थितींत गेल्यावर तो भानावर आला आणि प्रेमळ स्वरानें म्हणाला, " पौर्णिमे ! ये लाडके आपण–"

पण पौर्णिमा तिथें होती कुठें ? ती तिथून केव्हांच अदृश्य झाली होती. त्याचेच ते अर्धवट शब्द त्या शांत आणि निस्तब्ध निशीथकालीं प्रतिध्वनित झालेलें मात्र त्याला पुनः ऐकूं आले. त्यानें सभोंवार पाहिलें व इकडे शोधलेंहि पण त्याला त्याची पत्नी दिसली नाहीं, ती गेली ती गेलीच. त्याच्या मनांत आलें होतें कीं, ' आपल्या पत्नीच्या विचाराप्रमाणें आपण तिच्यासह

कुठें तरी लांब निघून जाऊं आणि गरिबींतच कां होईना पण सुखासमाधानानें राहूं; पण हा विचार त्याला पुष्कळच उशिरा सुचला. ती निघून गेल्यानंतर या विचारांचा काय उपयोग! बिचारा दुर्जय अन्धकारपूर्ण हृदयानें पहाडाकडे निघाला. तो यावेळीं शुद्धीवरच नव्हता.

---

# प्रकरण ६ वें.

—:०:—

## प्रयाण.

"आई! मी जातों. मला निरोप दे."

"कां बरें असें म्हणतोस कुमार! झाल्यागेल्या गोष्टींचा विचार करून मनाला असें वाईट वाटू देणें बरें नव्हे, महाराजांनीं तुझे सगळे अपराध तुला क्षमा केले आहेत."

"पण आई, मी क्षमा कुठें मागत आहे? मी क्षमा मागण्याला योग्य नाहीं; मग न मागतां मिळालेली ही क्षमा मला कशी बरें सहन होईल? मला अशी क्षमा घेण्याला संकोच वाटतो आई. यापेक्षां शिक्षा बरी! मी आणखी एकदोन घटकांनीं हा अंबरचा राजवाडा सोडणार."

"पण तूं जाणार कुठें बाळ? अम्म्याला का?"

"नाहीं."

"तर मग कुठें?" जोधाबाईनें अत्यंत उत्सुकतेनें प्रश्न केला.

"जिकडे हे दोन डोळे वाट दाखवितील व हे पाय नेतील तिकडे जावयाचें. मला जाण्याला व उमें राहाण्याला योग्य अशी जागा कुठें आहे बरें! मी बाबांकडे पण नको, ते मला शत्रूप्रमाणें पहातात. त्यामुळें आग्रा येथें जाऊन त्यांना त्रास देण्यांत अर्थ नाहीं व मला त्यांचें तें तिरस्कारयुक्त पहाणें सहनही होणार नाहीं."

"आपण आग्रा येथेंच जाऊं चल. मीहि तुझ्याबरोबर येतें. माझें हें स्नेहमय हृदय, तुला एकाद्या दुर्भेद्य दुर्गाप्रमाणें सर्व शत्रूंपासून तुझें संरक्षण करण्याला तयार आहे. तुझ्यासाठीं मी हजारों वज्रांचे आघातहि सहन करीन.

कारण अत्यंत क्षुद्रशक्ति पक्षीणही आपल्या मुलांचें संरक्षण करूं शकते, मग मी इतकी श्रेष्ठ दर्जाची व उच्च प्रतीचा अधिकार प्राप्त असलेली स्त्री तुझें रक्षण कां करूं शकणार नाहीं ! ”

“ आई ? पण माझ्यासाठीं तूं आपलें सगळें सुख कां बरें नाहींसें करतेस ! नको. माझ्यासाठीं तूं त्रास करून घेऊं नकोस. माझेंच काय व्हायचें असेल तें होऊं दे ” कुमार एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाला.

“ बाळ ! मला कसचें आतां सुख ! मला कोण सुखी करणार ! मला आतां खरें सुख व्हायचें तुझ्यापासूनच ! माझें सगळें सुख दुःख काय तो आतां तूंच. सगळ्या आशा आणि आनंद तुझ्यामुळेंच. या आयुष्यांत मला आतां दुसरी कशाचीही आशा राहिलेली नाहीं. अंबरच्या महाराजांची मी मुलगी असून भारतसम्राट् अकबरची सून आहे. मी एके दिवशीं सम्राज्ञी होईन म्हणून बाबांनीं मला तिथें दिली; पण तें सुखस्वप्न आतां संपलें. तें स्वप्नच ठरलें—” बोलतां बोलतां जोधाबाईचे नेत्र अश्रुभाराक्रान्त झाले.

कुमारालाहि तिचे ते अश्रु पाहून वाईट वाटलें. तो कळकळीच्या स्वरानें म्हणाला, “ आई ! या गोष्टींचा विचार करण्यांत आतां काय अर्थ ! निष्कारण मनाला त्रास व्हायचा. तूं शांत हो. जें झालें तें कांहीं आतां फिरून येत नाहीं, आणि होणारें कांहीं चुकवितां येणार नाहीं; पण आई मी मात्र स्पष्ट सांगतों, कीं, हें तोंड मी कांहीं आतां मामांना दाखविणार नाहीं. आतां उजाडायला थोडा अवकाश आहे, आणि कालपासून झोप नसल्यामुळें मला कसेंसेंच होत आहे. तेव्हां महाराज येण्यापूर्वीच तूं प्रसन्न मनानें मला तेवढा निरोप दे म्हणजे मी कुठें तरी जाऊन पडतों. ”

आपल्या मुलाचें हें निर्वाणीचें बोलणें ऐकून जोधाबाईनें थोडावेळ कसलासा विचार केला आणि नंतर ती स्नेहपूर्ण स्वरानें म्हणाली, “कुमार ! तुझ्या मनांतून आतां पुढें काय करायचें आहे ? ”

माझी तुला अशी आज्ञा आहे—मानलीस तर—तूं अविचारानें करूं पहात असलेलीं हीं घातक कृत्यें आतां सोडून दे. तूं मुलगा आहेस अर्थात् तुझ्या हातून कितीहि अपराध झाले तरी तुझे वडील तुला क्षमाच करतील व त्याच्याकडून क्षमा मिळविण्याचा तुला अधिकार आहे. त्याचें मनापासून तुझ्यावर प्रेम आहे. तेव्हां तूं जर लीनपणानें त्यांच्याशीं वागून आपलें वर्तन

सुधारशील तर केव्हांहि त्यांच्या रोषास तूं पात्र होणार नाहींस. चल. मीहि तुझ्याबरोबर त्यांच्याकडे येतें ! ”

“ तूं पुन्हां तिकडे जाशील ? ”

“ होय ! मला जावसं वाटतं ! ”

“ कां बरं ! आई ? तूं आपला अपमान विसरून कां बरं तिकडे जायला तयार होतेस ? ”

“ बाळ ! तुझ्यासाठीं मी काय पाहिजे तें करीन ! ”

“ आई ! राजस्थानच्या स्त्रिया इतक्या कच्च्या दिलाच्या नसतात. तूं तिथून निघतांना केलेली प्रतिज्ञा विसरलीस काय ! नको. माझ्यासाठीं तूं आपणाला इतकी हीनता आणूं नकोस. ”

“ कुमार ! कसली प्रतिज्ञा आणि कसला अपमान घेऊन बसलास ! पतिपत्नींत कसली प्रतिज्ञा आणि कसला अपमान ! माझा वंशजात अभिमान जागृत झाला आणि मीं त्यावेळीं तसें केलें; पण तो माझा अविचार होता. तुझी होत असलेली अवहेलना पाहून मला राग आला होता खरा; पण पतीवर पत्नी कधीं तरी रागवूं शकेल का ! ”

“ आई ! तूं तें सगळें विसरलीस का आतां ? ”

“ होय ! बाळ, मी मागील सगळें आतां विसरलें ! ”

“ आई ! इतक्या लवकर तूं तो प्रसंग विसरशील असें मला वाटलें नव्हतें. ‘ तूं माझ्या समोर आतां येऊं नकोस ! ’ हे बाबांचे निष्ठुर शब्द मला अजूनहि स्पष्ट ऐकूं येत आहेत. तूं ते कशी विसरलीस आई ! ! ” कुमार खुप्त रागानें थरथर कांपत म्हणाला. त्याला आपल्या बापाचा राग आला होता.

“ एकदां सांगितलं ना, कीं, पतिपत्नींमध्यें केव्हांच कांहीं आड येऊं शकत नाहीं म्हणून ? दुसरें दृष्टीनें पाहिलें तरी तिकडचे आम्ही प्रजा आहों. सम्राटांची मी सून असून आज सर्व आर्यस्थानांत त्यांचा भयंकर दरारा आहे. तुझ्या वडलांवर जरी मी रागावलें असलें तरी सासऱ्यावर माझा कोणत्याही तऱ्हेनें राग नाहीं. शिवाय पत्नीचा राग आणि अभिमान धुक्या-प्रमाणें असतो. पतिरूपी सूर्य दर्शनानें तो नाहींसा झालाच पाहिजे. मी माझ्या प्रियकराचा वियोग ज्यास्त दिवस सहन करूं शकणार नाहीं. ”

"बाबांनीं तुला तिकडे येण्याबद्दल विनंति केली आहे वाटतें!"

"विनंति नव्हे बाळ, हुकूम केला आहे!" जोधाबाई गंभीर स्वरानें म्हणाली.

"कुठें आहे त्यांचें आदेश पत्र?"

"हें पहा." असें म्हणून जोधानें एक पत्र खुश्रूच्या हातांत दिलें. पत्रावरील हस्ताक्षर पहातांच कुमारानें ओळखलें. तें सेलीमचेंच पत्र होतें.

खुश्रू कांहीं वेळ स्तब्ध राहून नंतर मन्द स्वरानें म्हणाला, "आई! मींहि आतां माझा बेत फिरविला आहे. मी आतां तुझ्याबरोबरच येतों. मी जर स्वतः अपराध करून बाबांच्या रोषाला पात्र झालों आहें तर मला त्यांची क्षमा मागूनच तो अपराध सुधारला पाहिजे आणि असें केलें तरच मला ते प्रेमळ दृष्टीनें पहातील; आणि कदाचित त्यांनीं माझ्यावर दया नच केली, तरी हरकत नाहीं. काय व्हायचें असेल तें होऊं दे. चल! मी तुझा रक्षक बनूनच तुझ्याबरोबर येतों!"

मुलाच्या हृदयांत इतक्या लवकर सुविचार उत्पन्न झालेला पाहून जोधाबाईला समाधान वाटलें. ती, गंभीरपणाणें म्हणाली, "तुला माझ्यासंबंधानें कांहींच तजवीज करण्याचें कारण नाहीं. कारण ज्या दासीनें मला हें पत्र दिलें तिनें सांगितलें कीं, मला घेऊन जाण्यासाठीं तिकडून शंभर घोडेस्वार आले असून ते किल्ल्यांतच उतरले आहेत."

असो. आईचें व मुलाचें आपल्या भावी प्रवासासंबंधानें आणखी बराच वेळ बोलणें झालें. त्याचा बराचसा संबंध भावीकालाकडे होता. अर्थात त्याचा या ठिकाणीं उल्लेख करण्याचें कारण नाहीं. ओघाओघानें ते वाचकांना समजणारच आहे.

कुमार खुसरूनें संकोचामुळें त्यादिवशीं सकाळीं मानसिंहाची भेट घेतली नाहीं. तो तोंड लपवूनच होता; पण महाराजांच्या लक्षांत एकंदर प्रकार यायला फारसा विलंब लागला नाहीं.

कुमाराला जें कांहीं सांगायचें होतें तें त्यांनीं पूर्व रात्रीं सांगितलेंच होतें. आतां फक्त त्यांना आपल्या बहिणीला–जोधेला–भेटण्याची आवश्यकता वाटत होती; आणि त्याकरतां ते सूर्योदय होतांच तिच्याकडे आले.

वडील भावाला धाकट्या बहिणीनें द्यावयाचा योग्य तो मान दिल्या-

नंतर मानसिंह प्रेमळ स्वरानें तिला म्हणाले, "कुमार कुठें आहे? मला सकाळींच तो भेटावयाचा!! कां बरें भेटला नाहीं?"

जोधबाई एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाली, "गेल्या रात्रीं आपल्या हातून झालेल्या अपराधाबद्दल तो फारच संकोचित झाला आहे. दादा! तुला तो आपलें कलंकयुक्त तोंड कसें बरें दाखवील? त्यानें तशी जागा ठेविली आहे का! दादा! आतां एथें राहायला तो योग्य नाहीं. मी त्याला माझ्याच बरोबर नेतें."

आपल्या बहिणीचें बोलणें मानसिंहांना आवडलें नाहीं. व त्याचवेळीं कुमाराला त्यांनींच अंबर येथेंच ठेवण्याबद्दल तिला पुष्कळ प्रकारांनीं सांगून पाहिलें; पण जोधानें आपल्या भावाचे सगळे युक्तिवाद खोडून काढून 'कुमाराला आपण बरोबर घेऊन जाणारच' असें त्याला निक्षून सांगितलें. अर्थात महाराजांना कुमाराच्या राहण्याबद्दल मुळींच आशा राहिली नाहीं.

मोंगल साम्राज्याचा आधार म्हणून मानल्या जाणाऱ्या मानसिंहांना धाकट्या बहिणीनें केलेल्या अपमानाबद्दल राग आला, व मनांतल्या मनांत ते तिच्यावर खूप जळफळलेहि. त्यांच्या चेहेऱ्यावर त्यांचे ते मनोविकार स्पष्ट दिसले सुद्धां; पण आपला राग, ते, शब्दांनीं व्यक्त न करतां एक दीर्घ सुस्कारा सोडून गंभीर स्वरानें म्हणाले, "जोधाबाई! तूं आजच्या इतका हट्टीपणा कधींहि दाखविला नव्हतास. ताई! मनुष्यप्राणी हा कर्मानें चालविलेलें एक यंत्र आहे. वाईट मार्गानें अथवा चांगल्या मार्गानें नेणें हें कृतकर्मांच्या आधीन आहे. अभिमानी मनुष्य कठोरपणानें कर्मप्रवाहाला बाजूला सारून चालूं लागतो. पण त्याला अकस्मात असा मोठा धक्का बसतांच कीं तो मार्गे हटतो. आज काल सेलीमाला आपल्या कर्तृत्वशक्तीचा बराच अभिमान वाटूं लागला असून तो त्याच दिमाखाच्या दृष्टीनें युवराज-सेलीम हा, तुझ्याकडे, प्रत्यक्ष आपल्या पत्नीकडे व मुलाकडे पहात आहे. तुम्हां दोघांबद्दलही त्याच्या मनांत बिलकुल आदर नाहीं. अन्तःपुरांतील इतर विलासिनींच्या व कार्यसाधू लोकांच्या हातांत तो पुरा सांपडला असूनहि आपण स्वतंत्र आहों असें त्याला वाटत आहे. अशा स्थितींत तुमचें त्यांना कितीसें अगत्य असेल बरें? शिवाय तुमच्यावर त्याचा राग असण्याचें कारण तुम्हीं दोघेंहि सम्राट् अकबर याला फार प्रिय आहां हें होय. तुम्हां दोघां-

वरील युवराजांचा हा अविश्वास आणि विद्वेष स्वार्थामुळेंच उत्पन्न झाला आहे आणि याचें बीजारोपण करण्याचें कार्य सम्राट् अकबर यांनीं आपल्या हातानें केलें आहे. मीहि या नसत्या मायाभ्रमांत सांपडून तूर्तच्या तुमच्या-वरील संकटांतच सांपडलों आहें; पण याचा परिणाम आतां काय होईल हे मात्र मला सांगतां येणार नाहीं. या मोंगलसाम्राज्य संस्थापनेसाठीं अनेक लहान मोठ्या राज्यांचा मीं उच्छेद केला आहे; पण या कर्मभोगाचा उच्छेद करण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं. कुमार खुस्रू अत्यंत चंचल बुद्धीचा, अविचारी, चैनींत व आळसांत दिवस घालविणारा व अक्कल तर मुळींच नाहीं असा आहे; पण त्याला योग्य मार्गानें परिचालित करण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नाहीं. सामर्थ्य असेल; पण त्याचा सद्व्यवहार कसा करावा, व त्याची योजना कोणत्या ठिकाणीं करावी हें चातुर्य नाहीं. अभिमान पुष्कळ आहे; पण त्याला आवश्यक असलेल्या विचारांचा व मर्यादेचा मागमूसही नाहीं; अशा तऱ्हेची त्याची स्थिती आज असल्यामुळें व त्याच्या आजोबाच्या अत्यंत लाडामुळें याचा परिणाम काय होईल हें माझ्यानें आज कांहींच सांगवत नाहीं; पण तूं नेहेमीं सावध राहा. कर्मभोग केव्हांहि सुटणें शक्य नाहीं."

पलंगाच्या एका खुराला टेंकून जोधाबाई आपल्या भावाचें हें भाषण लक्षपूर्वक ऐकत होती. या भाषणांतील कुमाराचें गुणवर्णन ऐकून तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या व चेहेरा खिन्न झाला. मानसिंहांना काय उत्तर द्यावें, हें तिला बराच वेळ सुचेना. तरी पण कांहीं बोलणें भाग आहे असें वाटून तिनें आपले डोळे पुसून म्हटलें, "जर कर्मच प्रबल असेल, मनुष्य जर त्याच्या प्रबल सामर्थ्याला मुळींच आडवूं शकणार नसेल, आणि दादा, तुझ्या सारख्या कर्मवीरांनाहि जर कर्मप्रवाहाला अडथळा करणें अशक्य वाटत असेल; असीम प्रतापशाली सम्राट् अकबरही जर या कर्मसूत्रानें बांधलेले असतील तर मीं एक सामान्य स्त्री, कसला सावधपणा ठेवणार ! मी सुदैवानें अथवा दुर्दैवानें त्या कर्मशक्तीच्या ताब्यांत सांपडूनच आज मोगल सम्राटाची सून झाल्यें आहें; पण हाही माझ्या परमपूज्य वडलांचा अथवा राजा मानसिंह यांचा कर्मभोग नसेल कशावरून ? आर्यस्त्रिया आणि त्यांतूनही राजस्थानच्या रमणी, सर्वश्रेष्ठ अशी एकच गोष्ट करूं शकतील

आणि ती ह्मणजे श्रद्धापूर्वक पतिसेवा होय. कारण पतिसेवा हा स्त्रीचा महा-धर्म असल्याचें आम्हां रजपुत स्त्रियांना बाळकडूच पाजलेलें असतें. मुलाचें लालन पालन करणें हें आईचें कर्तव्य असतें. तसेंच तें माझें आहे, हें सांगावयास नकोच. मला माझ्या प्राणापेक्षांहि प्रिय असलेला एकुलता एक पुत्र खुसरू ज्या योगानें भ्रष्टमार्गाला लागणार नाहीं, आणि मुद्दाम होऊन संकटांत उडी घेणार नाहीं, तेंच मला प्रथम पाहिलें पाहिजे. कारण मुलाच्या बाबतींत प्रत्येक आईचें हें कर्तव्यच असतें. तेव्हां दादा, मला माझें कर्तव्य करूं दे!"

जोधाचें हें बोलणें फारच हृदयस्पर्शी व अभिमानपूर्ण होतें. आपल्या लाडक्या बहिणीच्या तोंडचे उद्गार ऐकून राजा मानसिंहाच्या हृदयाला जबरदस्त धक्का बसला. त्यांतून जोधेचे सुंदर नेत्र अश्रूंनीं पूर्ण आहेत हें पाहून तर ते बरेच विरघळले. कांहींवेळ याच स्थितींत गेल्यावर ते तिला समजाविण्याच्या हेतूनें म्हणाले. "ताई! माझ्या स्पष्ट बोलण्याबद्दल तूं मनाला इतकें वाईट वाटूं देऊं नकोस! माझा स्वभाव तुला माहीत नाहीं का? ताई! माझ्या लाडक्या जोधाबाई! माझ्या ज्ञातिद्रोहाच्या व राजद्रोहाच्या पापाबद्दलचें प्रायश्चित्त आज तुला अशा रीतीनें भोगावें लागत असल्याचें पाहून मला अत्यंत दुःख वाटतें ग! सेलिमाची संशयवृत्ति आतां वाढत्या प्रमाणावर असून तो माझ्याकडे सुद्धां साशंकपणानें पाहूं लागला आहे, याचें कारण इतकेंच, कीं, त्याचे वडील म्हणजे सम्राट् अकबर यांचें नातवावर-कुमार खुश्रू याच्यावर-फार प्रेम आहे. आजोबाचें नातवावर प्रेम असणें हा जगाचा नियमच आहे! मग याबद्दल त्यांना इतकें वैषम्य वाटावें याचें आश्चर्य नव्हे काय? दुसरें, कुमाराचा सासरा खानसाहेब याच्या बाबतींत सम्राटांच्या मनांत बरीच आदरबुद्धि वागत असल्यामुळें त्यांनीं त्यांना सेना-पतीची जागा दिली आहे. पण याचा अर्थ सेलिमनें असा केला कीं, राजा मानसिंह, खानसाहेबांच्या साहाय्यानें आपल्या अप्रबुद्ध भाचाला हाताशीं धरून आपल्या सिंहासनप्राप्तींत अडथळा आणील, आणि माझ्याकडे त्यांची विशेष करडी नजर असण्याचें कारणहि हेंच; पण जोधा! मी माझ्या बहिणीचें राज्यपद हिरावून घेईन का? सेलिमाचें आणि माझें जरी मोठेंसें नातें नसलें तरी तूं-माझी लाडकी बहीण-त्यांची पत्नी आहेस हें तरी त्यानें विसरावयाचें

नव्हतें, पण भवितव्यता कशी चुकणार ? नवी राणी नूरजहान हिनें त्याच्या मनांत येऊं नये ते विचार आणून दिल्यामुळें तो तुझ्यावर क्रुद्ध झाला आहे व कुमाराकडे संशयित मुद्रेनें पहात आहे व माझ्यावर आणि सेनापतींवर तर त्याची फारच करडी नजर आहे. तेव्हां माझें असें मत होतें, कीं, कुमार खुसरू याला कांहीं दिवस सेलिमाच्या विषारी नजरेपासून दूर ठेवणेंच कल्याणकारक होईल. बरें पण जोधा ! तूं त्यांच्याजवळ जाण्यासाठीं इतकी उतावीळ कां होतेस ? तुला आतां तिथें थोडातरी मान मिळेल का ! नूरजहानपुढें तुझें तेज फिकें पडेल आणि पदोपदीं अपमान होऊं लागला म्हणजे तुला अत्यंत दुःख होईल. मग ताई, तिकडे जाण्याचा इतका हट्ट कां बरें धरतेस ?"

जोधबाई कांहीं वेळ कसलासा विचार करून मन्द स्वरानें म्हणाली, "त्यांनीं मला आणण्यासाठीं लोक व शिबिका पाठविली आहे. तसेंच माझी वाट पहात ते अलाहाबादेजवळ तंबूहि ठोकून राहिले आहेत, तेव्हां मला गेलेच पाहिजे. आणि अशा नाजुक प्रसंगीं तर मुळींच राहणार नाहीं! तेव्हां मी जाणार हें ठरलेंच. कुमारामुळें माझ्यावर आधीं तिकडचा बराच राग आहे आणि त्यांतच मी हे लोक परत पाठवून मुलासह जर इथें राहिलें तर सम्राटाचें अन्तःपुर मला कायमचेंच मुकलें, असेंच मानावें लागेल !"

"हें जर तुला माहीत होतें तर तिकडच्या सगळ्या मंडळीवर रागावून तूं कां आलीस बरें ताई !" मानसिह किंचित् तीव्र स्वरानें म्हणाले.

"राजस्थानच्या रमणींचा स्वभावसुलभ अभिमान जागृत होऊन माझ्या हातून होऊं नये तो अपराध घडला. रागाच्या भरांत मी अविचारानें वागलें: पण एकवार झालेला अपराध न सुधारतां जर मी त्याची तीव्रता सारखी वाढवीतच राहिलें तर तो एक अपराधच होईल ?"

"हो तेंहि खरेंच. ताई, तूं आपल्या नवऱ्याकडे जा. मी त्याला हरकत करीत नाहीं; पण–पण या तुझ्या जाण्यांत मला 'पण' आणि 'परंतु' म्हणावें लागत आहे याबद्दल वाईट वाटतें.'

हें ऐकतांच जोधा उत्सुकतेनें म्हणाली. "कां बरं दादा, तुला तसं म्हणावंसं वाटतं ?"

"तुला तें सांगणें जरूर आहेच. असें पहा, सम्राट अकबर–तुझा सासरा–सध्यां फत्तेपूर येथें विश्रांति घेत बसला आहे; पण लवकरच तो

आग्रा येथें येईल, सध्यां त्याची प्रकृति बिघडली आहे. मग ती वृद्धापणामुळें असो, अथवा अन्य कांहीं कारणांनीं असो, पण त्याची अस्वस्थता सारखी वाढत आहे. तेव्हां शहाजाद्याला इथें ठेवावेंसें तुला वाटत नसेल तर तो आपल्या आजोबाकडे तरी राहूं दे; आणि तूं शक्य तितक्या लवकर अलाहाबादेला जा. मीं विचार करून पाहिला तों तुझेंच बोलणें मला सयुक्तिक वाटूं लागलें आहे. कुमाराला या धामधुमीच्या वेळीं इथें ठेवणें त्याच्या कल्याणाच्या दृष्टीनें इष्ट नाहीं. सम्राट्‌चा निराळा हुकूम मला आला असल्यामुळें मी आतां लवकरच फत्तेपूर शिक्रीला जाईन. तिथून त्यांच्याबरोबर कदाचित् मला आग्रा येथेंही जावें लागेल. त्यानंतर काय होणार आहे तें ईश्वरालाच माहीत. "क्षेत्रे कर्म विधीयते" असें शास्त्रकारांचें मत आहे. तेव्हां त्या त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणेंच मला वागणें भाग आहे."

जोधाबाई, भावाच्या या भाषणाचा विचार करूं लागली; पण थोड्याच वेळांत तिला कसलासा संशय आल्यावरून ती संदिग्ध स्वरानें म्हणाली, "कुमार खुसरू फत्तेपूर शिक्री येथें आपल्या आजोबाजवळ राहिला, तर त्याच्या वडलांना कांहीं संशय येणार नाहीं का ?"

"सम्राट् जोंपर्यंत विद्यमान आहेत तोंपर्यंत शहाजाद्यांनीं जरी कांहीं केलें तरी कुमाराच्या केंसालाहि धक्का लागणार नाहीं. बापाजवळ राहून अनादर, राग, उपेक्षा, वगैरे सहन करण्यापेक्षां त्याला आजोबाजवळच विशेष सुख त्याला होईल; आणि भावी उत्कर्षापेक्षां आजोबाचेंच प्रेम संपादन करणें इष्ट व अत्यंतावश्यक आहे."

जोधानें एकवार मर्मभेदक दृष्टीनें मानसिंहाच्या तोंडाकडे पाहिलें व पुन्हां ती अधोमुख झाली. कारण या वेळीं तिच्या अन्तरंगांतून तिला कोणी सुचवीत होतें कीं, "जोधा ! फार सावधपणानें पाऊल टाक. या वेळीं कुमाराच्या बाबतींत विचार करणें तो फारच जबाबदारीनें करावा लागेल. अम्बर कुमारी ! सावध हो. खुसरूच्या अदृष्टाकाशांत सध्यां मेघसंचार होत आहे, लवकरच वादळ होईल आणि त्या वादळाच्या वावटळींत काय होईल कुणाला माहीत !" राजा मानसिंहाचा सगळा जन्म मुत्सद्देगिरींतच गेलेला असल्यामुळें जोधाबाईच्या मनांत या वेळीं कसली खळबळ उडाली आहे, हें त्यांनीं ओळखलें व तिच्या त्या मर्मभेदक दृष्टीचाहि अर्थ ते समजले. ते म्हणाले,

"जोधाबाई ! तूंहि मला अविश्वासू मानावेंस नाहीं काय ! मानसिंहा ! भोग आतां आपल्या फितुरीचीं फळें ! ! प्रत्यक्ष बहीणहि तुझ्या बाबतींत संशयित ना ! "

वडील भावाचें हें कळवळ्याचें बोलणें ऐकून आपल्या वर्तनाची जोधा-बाईला थोडीशी लाज वाटली. तिचे गुलाबपुष्पाप्रमाणें मनोहर दिसणारे गाल किंचित् आरक्त झाले. तरी पण थोड्याच वेळांत तिनें आपल्या मनाला आवरलें आणि गंभीरपणानें म्हटलें, "दादा ! तुमच्यांत आणि माझ्यांत कुमाराच्या भावी स्थितीबद्दल जो विवाद होऊं पहात आहे तो, कुमाराचें, समक्ष मत घेतल्यावर नाहींसा होईल नाहीं का ? त्याला एकवार या बाबतींत विचारून तरी पाहूं ! तो कांहीं आतां लहान नाहीं. त्याला स्वत:चें बरें वाईट कळत आहे. तेव्हां या बाबतींत त्याचा स्वत:चा हेतु काय आहे, हें समजाऊन घेतलेलें बरें. "

राजा मानसिंह कांहींसे उपेक्षापूर्ण स्वरानें म्हणाले, " त्याच्यासारख्या अकाल परिपक्वबुद्धीच्या तरुणांचें मत तें काय घ्यायचें ? त्याला आमच्या-पेक्षां ज्यास्त तें काय समजणार ? तुला जर अलाहाबादला जायचें नसेल,–आणि जाऊं नये असें माझें मत आहेहि–तर आलेल्या लोकांना मी परत पाठवून देतों. तसेंच शहाजाद्यांच्या मनाला कांहीं विषाद वाटूं नये म्हणून " तूं आजारी असल्याचें पत्र दे " आणखी कांहीं महिन्यांनीं एकंदर रागरंग पाहून मग जा."

यावर जोधबाई कांहींशा व्याकुलतापूर्ण स्वरानें म्हणाली, " नको. दादा, असें करण्याचें आतां कारण नाहीं; अशानें माझें कल्याण तर होणार नाहींच; पण आहे त्या स्थितींतही बदल होईल. कारण आपल्या पत्रानें त्यांची समजूत उलट होईल. दादा ! खुसरू या वेळीं माझ्याबरोबरच येऊं दे. झालेल्या प्रकाराचा विचार करतां त्याला अम्बरच्या राजवाड्यांत ठेवणें इष्ट वाटत नाहीं. "

मानसिंह कांहीं सहज स्वस्थ बसण्यासारखा मनुष्य नव्हता. तो किंचित् हास्य करून विद्रूपपूर्ण स्वरानें म्हणाला, "ताई ! कां बरें असें तुझ्या मनांत येतें ? गेल्या रात्रीं खुसरूनें केलेल्या अपराधाचा मी सूड उगवीतों असें कां तुला वाटतें ? "

आपल्या भावाचें हें मर्मभेदक भाषण ऐकून जोधाबाईला वाईट वाटलें. ती अभिमानपूर्ण स्वरानें ह्मणाली, " दादा ! वीरचूडामणी मानसिंहाची बहीण इतक्या अनुदार अन्तःकरणाची असेल असें तूं मनांतही आणूं नको. आपल्या भावाचा स्वभाव, खुसरूवरील त्याचें निस्वार्थी प्रेम, आणि त्याच्या कल्याणासाठीं होत असलेले अविश्रांत परिश्रम हीं मी कधींहि विसरणार नाहींस, आईचं अपत्यवत्सल मन फारच दुर्बल असतं. तिला कसलाच गहन विचार करवत नाहीं. अपत्याच्या बाबतींत ती फारच चंचल असते. तेव्हां त्याच दृष्टीनें तूं माझ्याकडे पहा, आणि काय बोलायचें असेल तें बोल. "

जोधाबाईच्या किंचित् तिरस्कारयुक्त भाषणानें मानसिंह कांहींसा चमकून ह्मणाला, ' नाहीं ताई, माझ्या मनांत तुला त्रास देण्याचें कधींहि येणार नाहीं. मी जें कांहीं बोललों तें केवळ तुझा मनोभाव पहाण्यासाठींच होय. माझ्या या बोलण्यापासून जर तुला त्रास झाला असेल तर मला माझ्या त्या बोलण्याचा फारच पश्चात्ताप होईल. तुझें जें मत असेल तें मला कबूल आहे. युवराज सेलीम याच्याकडून आलेले सैनिक उत्सुकतेनें माझ्या हुकुमाची वाट पहात बसले आहेत. मी तुम्हांला त्यांच्या बरोबर रवाना करतोंच; पण त्यांच्याशिवाय आणखी मी माझ्या पदरचे शंभर शूर सैनिकाह तुमच्याबरोबर देतों. ते खुसरूच्या आज्ञेंत राहून काम करतील. तसेंच खुसरूच्या संरक्षणाची योग्य ती तजवीज करण्याकरितां मीहि लवकरच फत्तेपूर-शिक्रीला निघून जातों. खुसरू उच्छृंखल, उद्धट आणि असहिष्णु असा आहे. तेव्हां तूं त्याच्यावर नेहेमीं नजर ठेव. भगवान् एकलिंगजी तुमचें कल्याण करील ! "

आतां या बाबतींत ज्यास्त तर्क वितर्क करीत बसणें योग्य नव्हे असें वाटून जोधाबाई ह्मणाली, " तर मग दादा ! तुझ्या स्वारांना तयार राहण्याचा हुकूम दे. मी आतां यापुढें प्रत्येक विचार करणें तो तुझ्या सल्ल्यानेंच करीन. तसेंच राजधानींत गेल्यावर जर मला कांहीं कमीज्यास्त व धोक्याचा प्रकार आढळला तर मी तावडतोब तुझ्याकडे स्वार पाठवून बातमी कळवीन. "

असो. अशा तऱ्हेनें आणखीहि कांहीं बाबतींत नक्की विचार ठरून दुसऱ्यादिवशीं सकाळींच,-बालसूर्याचें किरणजाल, अंबरच्या चतुःपार्श्व-

व्यापी गिरिशिखरावर पसरण्यापूर्वीच—बादशाही थाटाला योग्य अशा मख-मलीच्या शिबिकेंत बसून जोधाबाई आपल्या हृदयेश्वराच्या भेटीला निघाली. आणि मोंगल व रजपूत सैन्याचा मुख्य होऊन खुसरूहि तिच्याबरोबरच अम्बर प्रासादांतून बाहेर पडला व आईच्या सर्वांगसुंदर शिबिकेमागून त्यानेंहि आपला उमदा घोडा चालविला.

---

## प्रकरण ७ वें.



### नको ग असा निष्ठुरपणा करूं ?

भाग्य आणि भवितव्य याच्या प्रेरणेनें, जोधाबाईनें आपल्या एकुलत्या एका मुलासह अलाहाबादचा रस्ता धरला. शहाजादा सुलतान सेलीम, त्या-वेळीं कसल्याशा राजकारणामुळें अलाहाबादला छावणी ठोकून राहात होता, व कांहीं गंभीर हेतूनें त्यानें अम्बर प्रासादांतून आपल्या पत्नीला व मुलाला तेथें बोलाविलें होतें. सेलीमचा आदेश असा होता कीं, ' दोघांनींहि प्रथम अजमीरला जाऊन तेथें सहासात दिवस मुक्काम करावा आणि एक आठवडा भर तेथें विश्रांति घेतल्यावर नंतर अलाहाबादला यावें ?

पण शिबिकेंत बसण्यापूर्वी जोधाबाईनें खुस्रूला एकीकडे बोलवून सांगि-तलें कीं, " माझ्याबरोबर तुला अजमीरला येण्याचें कारण नाहीं. तुझ्या वड-लांनीं तुला ताबडतोब आपल्याकडे बोलविलें आहे, तेव्हां तूं त्यांच्या हुकु-माप्रमाणें वाग. बरोबर आलेल्या रजपूत सैन्याचा नायक रूपालसिंह हा माझ्याबरोबर माझा संरक्षक म्हणून येऊं शकेल !'

आईनें व मुलानें अंबरचा राजवाडा जरी एकदमच सोडला तरी मातृ-आज्ञेप्रमाणें कांहींसा मार्ग चालून होतांच खुस्रूनें दुसरा मार्ग धरला. त्यानें आपल्या बरोबर बलिष्ठ असे केवळ पन्नासच रजपूतस्वार घेतले आणि बाकीचें सैन्य मानसिंहाचा हस्तक रूपालसिंह याच्या ताब्यांत देऊन त्याला आपल्या आईचा संरक्षक म्हणून अजमिराकडे रवाना केलें. हुकुमाप्रमाणें, रूपालसिंह जोधाबाईच्या मेण्यामागून चालूं लागला.

खुसरू कांहीं मार्ग चालून गेल्यावर त्याला एक डोंगरी प्रदेश लागला. हा प्रदेश आरवली पर्वताच्या डोंगराच्या ओळींनीं व्याप्त झालेला असून त्यावर झाडीही अतिशय लागून गेली होती. अम्बरापासून या पर्वतप्रांताचें अन्तर सात कोस असून सर्व प्रदेश निर्जन पण मनोहर होता. माध्यान्हीचें प्रखर ऊन सहन न होऊन खुसरू आपल्या बरोबरच्या हाताखालच्या एका स्वाराला म्हणाला " हिंम्मतसिंह ! तुम्ही सर्व सैनिकांसह या ठिकाणीं दोन घटका विश्रांति घ्या. तोंपर्यंत मी पलीकडच्या उतरणीवर बसून सभोंवारची शोभा पाहातों. " हिम्मतसिंहालाहि तेंच पाहिजे होतें. त्यानें तत्काल घोडयावरून खालीं उडी टाकली व इतरांनाहि तसें करावयास सांगितलें. खुसरू पुढें दिसणाऱ्या गर्द झाडीकडे निघून गेला.

यावेळीं शाहाजादा खुसरू अगदींच दमून गेला होता व त्याच्या आणि त्याच्या घोडयाच्या आंगांतून घामाच्या धारा चालल्या होत्या. प्रखर चंद्रकिरणांच्या तापानें त्याचा चेहेरा आरक्त दिसत होता. घोडयाच्या तोंडांतूनहि फेस येत होता. एवंच या एकंदर प्रकारावरून त्यांना विश्रांतीची फारच आवश्यकता होती हें उघड दिसत होतें. खुसरूनें घोडयाला एका झाडाला बांधलें आणि आपण त्याच सघनपल्लव वृक्षाच्या छायेंत बसला. नुसत्या गवतावर कसा बसूं असाहि यावेळीं त्याच्या मनांत विचार आला नाहीं. कांहीं वेळानें त्याच्या आंगावरील घर्मबिंदू नाहींसे झाले. कारण गिरिनदीच्या शीतल वारिकणांना स्पर्शकरून येणारा मंद वारा शीतल व श्रमहारक होता.

याचवेळीं अकस्मात बऱ्याच लांबीच्या वनांतरालांमधून अमृतप्रवाहासारखा निनादित होणारा संगीतध्वनी खुश्रूला ऐकूं आला. त्या मधुनिस्यन्दी संगीताच्या उन्मादनामय तानतरंगांत खुसरूच्या शांत हृदयाची क्रान्ती कुठच्याकुठें पार नाहींशी झाली, तें त्याचें त्यालाच समजलें नाहीं.

'कोणाचा बरें हा स्वर ! या वेळीं अशा रीतीनें पहाडांत बसून गाण्यांत त्याला काय मौज वाटते ? स्वरलहरींच्या मधुर कंपनावरून असें वाटतें कीं, हा कोणातरीगायन कुशल रमणीचा सूर असावा ! रंगमहालांत तर अनेक गायिकांचें आलाप मीं ऐकले आहेत, पण आजचें हें गायन कांहीं निराळेंच भासत आहे. या गायनापुढें त्या गायनाची मुळींच किंमत नाहीं...'

खुसरूच्या विचारांची मजल याही पुढें चालली...' या निदाघसमयीं अशा निर्जन अरण्यांत मानवप्राणी गात बसणें अशक्य आहे. निर्मनुष्य अरण्यांत वनदेवींचा विहार चाललेला असतो असें म्हणतात, तेव्हां त्यांपैकीं तरही कोणी नसतील ना? असलीं विरहगीतें आळविण्यांत मनुष्यांपेक्षां या वनदेवताच फार कुशल असतात. आणि मरदुपारीं तर त्यांना फारच सुंदर गीतें सुचत असतात. अहाहा! हें असलें गायन जर मनुष्यप्राणी गाऊं शकेल तर किती बहार होईल बरें? या गायनाची भावना प्रेमळ असून कोणातरी विरहिणीचेंच हें गीत असावें असें वाटतें. हें संगीत गाणारी रमणी मला दिसेल का? मला तिची भेट होईल का? जिचें गायन इतकें मधुर, ती किती सुंदर असेल बरें?'

शहाजादा खुसरू, इतका विचार करूनच स्वस्थ बसला नाहीं तर तो त्या गाण्याच्या धोरणानें जाऊं लागला. मंत्राकर्षित भुजंगाप्रमाणें तो प्रेमापेक्षी नाग त्या गीतानुरोधानें जंगलांत डुलत भटकूं लागला. बराच वेळ फिरल्यावर एका उंच टेंकडीवर जाऊन उभा राहिला आणि लक्षपूर्वक ऐकूं लागला. कारण गाणाऱ्या व्यक्तीचा त्याला बिलकूल शोध लागेना—कोणीतरी रमणी मात्र पुढीलप्रमाणें गात होती—

माधवे सखि माधवे, निनिमानमये. मा कुरुमा माधवे.

खुसरू समजला, ही कोणी तरी विरहिणी असून दीन स्वरानें कुणाला तरी आळवीत आहे. विरहव्यथित हृदयाचे ते सूर त्या निर्जन कान्तारांत आपल्या प्रेम केंद्रांचा शोध करीत होते.

पण ही प्रेमतृषामय हृदयस्पर्शी विरहगीती, खुसरूच्या हृदयाला तीव्र बाणाप्रमाणें झोंबली. त्याच्या मनाला कसल्या तरी वेदना होऊं लागल्या. तो मन्त्रमुग्धासारखा एका टेंकाडावर उभा राहून शून्य दृष्टीनें समोंवार पाहूं लागला. त्या गीताचा स्वर त्याला स्वस्थ बसूं देईना. कातरतापूर्ण, झंकारमय, आणि हृदयविमुग्धकर असे ते अकालसुंदर गीतालाप त्याच्या हृदयांत कसल्या तरी गूढ संवेदना उत्पन्न करूं लागले.

**तालफलादपि गुरुमति सरसें,**
**किं विफले कुरुषे कुचकलशं**
**माधवे सखी! माधवे......**

शहाजादा खुसरू तें संगीत अगदीं तन्मयतेनें ऐकत होता. मंद मंद समीरणानें डोलणाऱ्या वृक्षशाखा या स्वर्गीय संगीताला मानच तुकावीत आहेत कीं काय असें वाटत होतें; त्या गीतांत ऐकूं येणारा करुणरव, वृक्षपल्लवांना थरथर कांपवीत असल्यामुळें मर्मरध्वनि उठत होता. लवकरच दुसऱ्या गीताला सुरवात झाली.

वसन्तपंचमे हिंदोल रागे,
फूकारत कोयेला, प्रेम अनुरागे,
कां हाँ कां हाँ मेरी पिया पियारे ! !

या गीतांतील शेवटचे दोन चरण ऐकून तर खुसरूचें हृदय इतकें विरघळलें कीं, गाणाऱ्या विरहिणीला केव्हां पाहीनसें त्याला झालें. वृक्षपल्लवांच्या मर्मवाणीचा तर त्याला फारच राग आला. कारण त्या स्वर्गीय आलापांना त्यांचें तें थरारणें अडथळा करूं लागलें. त्याच्या सहज ध्वनीमुळें त्या संगीताचे मधुर आलाप त्याला नीटसे ऐकूं येतना. लक्षपूर्वक ऐकतां ऐकतां पुढील गीत त्याला पुन: ऐकूं आलें—

सुखशयान रचना, विफल स्वजनी !
झुखाल मालति माला, पोहाल रजनी ! !
कांहाँ कांहाँ मेरे कांत गुणमणी !
काहे ना आ ओल, निशा अभिसारे !

खरोखरच हृदय विदारण करणारें तें विरहगीत होतें. खुसरूचें अन्तःकरण तर अगदींच दीन होऊन गेलें. हें संगीत गाणारी रमणी कोण आहे आणि कुठें आहे याचा त्याला कांहींच अंदाज करतां येत नसल्यामुळें तो अधीर झाला. ' कुठें आहे बरें ती विरहिणी ? जिचा कंठ इतका सुंदर, जिच्या अन्तःकरणाचा उच्छ्वास आणि भावना इतक्या आवेगमय, जिच्या हृदयांत लपविलेली प्रेमगाथा इतकी मधुर कलनादमय, अहाहा, अशी ती सुंदरी दिसण्यांत किती बरें सुंदर दिसत असेल ? '— पण खुसरूची ही विचारशृंखला मध्येंच तुटली. कारण तो अविराम असा वाटणारा संगीतप्रवाह अकस्मात थांबला. ती स्तब्धता पहातांच खुसरूला ' आपण सर्वस्वालाच मुकलों ' असें वाटलें.

ह्या निर्जन पहाडावर, शब्दसमागमशून्य अशा त्या शून्य पर्वत-कान्तरांत आतां त्याला आपल्या हृदयाकाशाला शोभविणारे दोन उज्ज्वल ताऱ्यांप्रमाणें दोन तेजस्वी नेत्र दिसूं लागले. सलज्ज हावभावांनीं युक्त; पण आरक्त अधरांचें निरीक्षण करणारी एका वीरमतीची नजर त्याच्या कल्पनाचक्षूंसमोर येऊं लागली. जिचे मोकळे केंस पाठीवर लोंबत आहेत व जी अपूर्वरूप ज्योतीनें आसपासचा प्रदेश प्रकाशित करीत आहे अशी एक मानी रजपूत रमणी आपल्यापुढें मूर्तिमंत उभी राहिली असें त्याला वाटलें. खुसरूनें आपल्या आजपर्यंतच्या आयुष्यांत अनेक सुंदर तरुणी पाहिल्या होत्या; पण असली निराभरणा तापसिनी त्याच्या नजरेला पडली नव्हती. ती कोणातरी दिव्यलोक वासिनी अप्सरेची सौंदर्यछाया असावी असाच त्याचा समज झाला. ही छाया म्हणजे दुसरी कोणी नसून पौर्णिमाच होय, अशीहि त्याचें मन त्याला ग्वाही देऊं लागलें. त्या घटनापूर्ण रात्रीं गुहेंत जी सौंदर्यदेवता नजरेला पडली, जी तेजोमय विद्युद्रेखा तेथें चमकल्यासारखें त्याला वाटलें तीच सौंदर्यलतिका अशा वेळीं या निर्जन पहाडावर त्याच्या मानसचक्षूंपुढें उभी राहिली. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे ती अपूर्व लावण्यमयी रमणी त्याला आपल्या हृदयांत चमकलेली आढळली.

त्या दर्शनानें तो वेडा झाला आणि स्थलकाल विसरून भ्रमिष्टासारखा मोठ्यानें बोलूं लागला-" कोण, कोण बरें तूं ? जिच्या तानलहरींत इतकी सुधा भरलेली आहे, ती किती बरें सुंदर असेल ? कुठें बरें आहेस तूं ? मला एकवार दर्शन दे. तूं देवी, मानवी, पिशाचिनी वा मायाविनी, कोणीहि अस, पण कृपा करून एकवार माझ्या समोर ये. या जगाच्या पराक्रमी बादशाहाचा मी लाडका नातू आहे, आणि मी तुला हुकूम करीत आहे तेव्हां शक्य तितक्या लवकर तूं माझ्या समोर ये. "

पण त्याच्या या निर्वाणीच्या बोलावण्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. जिला तो इतक्या दीन वाणीनें हाका मारीत होता, ती कांहीं तेथें आली नाहीं. तिनें त्याचा हा आदेश मानला नाहीं इतकेंच नव्हे, तर ती पूर्वीच्याच मर्मभेदक करुण स्वरानें एक विरहगीती आळवूं लागली. तिचे करुण सूर खुसरूचें हृदय अस्वस्थ करूं लागले:--

मोहन आपनकी कोई किजोरे मोहन आ०
आपनकी मन आपनकी कोई०
आपन आपे पतिया न भेडोए बातु ललचावनकी १ को०
बिन दरशन व्याकुल भई सजनी जैसि बिजलिया श्रावनकी २ को०
काकरु शक्ती जाऊ मोरी सजनी पांख होवे तो उडजावनकी, ३ को०
मोहन आपनकी कोई किजोरे मोहन आ०

पण अकस्मात हेंहि गीत थांबलें. ध्वनीचें, प्रतिध्वनींत रूपांतर झालें आणि कांहीं वेळानें तर प्रतिध्वनीचेंहि अस्तित्व विलुप्त होऊन गाढ स्तब्धता पसरली. मात्र खुसरूचें हृदय शांत झालें नाहीं. त्यांत पूर्वीपेक्षांहि मोठी खळबळ सुरू झाली. तो प्रेममदिरापानानें मत्त होऊन पुन्हां बरळूं लागला, " कोण तूं! कुठें बरें तूं लपून राहून मला तो मधुर सूर ऐकवीत आहेस? ये, एकवार माझ्या समोर ये. एकवारच तुझें दर्शन दे. खरोखर मी अगदीं अन्तःकरणपूर्वक तुला बोलवीत आहें. या पहाडावरील वन्य कुसुमांची सुंदर माळ करून ती मी तुला अर्पण करीन. तूं मला फक्त एकच वेळ दर्शन दे, जिचा स्वर इतका सुंदर तिचें लावण्य किती बहारीचें असेल बरें! ये वन-देवी! ये! मायाविनी माझ्यासाठीं तरी ये! कारण तूं आल्यावांचून माझ्या हृदयाची तळमळ शांत होणार नाहीं."

हाय! खुसरूच्या या दीनवाण्या प्रार्थनेला कुणींच उत्तर दिलें नाहीं. तो पुन्हां आवेगपूर्ण स्वरानें बोलूं लागला, "रमणींचें हृदय इतकें पाषाणमय असतें हें मला माहीत नाहीं ग. नाहींतर मी तुझी इतकी प्रार्थना केली नसती. तुझें हृदय इतकें का कठीण आहे? या पहाडांतील पाषाणांच्या संग-तीनें तर तुझ्यांत हा फरक झाला नसेल ना? खरेंच असें नसतें तर तूं मला केव्हांच ओ दिली असतीस!! कारण मी तुला किती तरी करुणस्वरानें हांका मारीत आहें. देवानें सुद्धां या हांकेला ओ दिली असती!! नको ग असा निष्ठुरपणा करू!!!'

# प्रकरण ८ वें.

---:*:---

निराशापूर्ण अन्तःकरणानें खुसरू त्या पहाडावरून खालीं उतरून आपल्या सैनिकांना जाऊन मिळण्याचा विचार करीत चार पावलें मागेंही सरला; पण त्याच वेळीं एक सौंदर्यशालिनी रमणी त्याच्या समोर आली. आणि गंभीर स्वरानें म्हणाली, "शहाजादासाहेब, रमणींची इतकी निन्दा करणें योग्य नाहीं. सुदैवानें या निर्जन पहाडावर तुमचें तें बोलणें ऐकायला माझ्यावांचून दुसरें कोणी नव्हतें म्हणून बरें झालें. नाहीं तर तुमच्या नांवाला फारच मोठा कलंक लागला असता."

खुसरूनें त्या तरुणीला ओळखलें. कारण ती त्याच्या परिचयाची पौर्णिमाच होती. पण आजचा तिचा पोषाख मात्र गृहस्थी थाटाचा नसून सर्वांगाला तिनें भस्म लावलें होतें. भालप्रदेशावर चमकणाऱ्या कुंकुमतिलकानें तर तिचें गुप्त सौंदर्य ज्यास्तच उठावदार व तेजस्वी दिसत होतें. अभिमानाचें वीरोचित तेज विद्युल्लतेप्रमाणें तिच्या नेत्रांत चमकत होतें. तिचे अलिकुलासारखे दिसणारे केंस तिनें पाठीवर मोकळे सोडले असून कुरळ्या केंसाचे वर्तुळाकार असे एकदोन झुबके कपोलप्रदेशाला शोभवीत होते. गालांचा गुलाबासारखा दिसणारा मनोहर रंग चेहेऱ्याची खुलावट ज्यास्तच मोहक करीत होता. धनुष्याकार भुंवयांनीं तर इतकी हृदयंगमता आली होती कीं त्या चेहेऱ्यावरून आपली दृष्टी हालवूंच नये असें पहाणाराला वाटत असे.

खुसरू तर अनिमिष नेत्रांनीं तिच्याकडे सारखा पहातच राहिला होता. बराच वेळ अशा स्थितींत गेल्यावर तो मनांत म्हणाला, "दैन्यदारिद्र्याच्या प्रखर ज्वालांनीं कोमेजून जात असलेलें हें सुकुमार व अप्सराविनंदित सौंदर्य मोठमोठ्या रंगमहालांतही पहावयाला मिळणार नाहीं."

तुलनेचा विचार करतांच खुसरूला आणखी एका सौंदर्यदेवतेचें स्मरण झालें; पण पौर्णिमेच्या उज्ज्वल स्वरूपापुढें तें त्याला अगदींच निस्तेज दिसूं लागलें; पण हें निस्तेज दिसणारें सौंदर्य आपली पत्नी प्यारीबानू हिचें आहे हें मात्र तो विसरला असला पाहिजे. कारण आपल्याशीं धार्मिक बंधनांनीं

संलग्न झालेल्या सहचारिणीपेक्षां सौंदर्यांत श्रेष्ठ असलेली दुसऱ्याची स्त्री आपली व्हावी ही वासना किती बरें गर्हणीय!! नेहेमीं सौंदर्याकडेसच पहावें काय? आचार, विचार धर्मबंधनें यांच्याकडे लक्ष पुरवावयास नको? सम्राट् अकबरानें आपल्या नातवावर—खुसरूवर—अत्यंत प्रेम असल्यामुळें त्यानें अनेक अन्तःपुरें शोधून खुसरूसाठीं सुंदरस्वरूपिणी प्यारीबानू नामक पवित्र कुमारीची योजना करून तिच्याशीं त्याची शादी लाविली होती; पण खुसरूचें चंचल व अविचारी मन पतिधर्माला विसरून इतर सौंदर्यशालिनींच्या मोहक चेहेऱ्यावर लुब्ध होऊं लागलें होतें आणि अशा स्थितींतच त्यानें प्यारीबानूची पुष्कळ अवहेलना करून तिचें कोमेजलेलें पण पवित्र सौंदर्यपुष्प फेकून दिलें होतें. त्याला त्या पुष्पाची बिलकूल कींव आली नाहीं; पण तें पुष्प मात्र त्याच्याच चेहेऱ्याकडे पहात व त्याचेंच ध्यान करीत आपण भविष्यकालीं तरी सुखी होऊं, असा विचार करून आयुष्य कंठीत होतें. विवाहानंतर प्रथम भेटीच्या वेळीं प्यारीबानूच्या लखाखणाऱ्या व प्रतीक्षणीं वाढणाऱ्या सौंदर्याकडे पाहून खुसरू अगदीं बेहोष झाला होता व असें सौंदर्य जगांत कुठेंहि नसेल असें त्याला वाटत होतें. आणि खरोखरच बानूसारखी सौंदर्यवती स्त्री त्यावेळीं त्या रंगमहालांत कोणीही नव्हती; पण हाय! जगांतील नश्वरतेच्या त्रिकालाबाधित नियमाप्रमाणें बानूचें तें मुग्धकारी सौंदर्य तसेंच राहिलें नाहीं. व दुर्दैवानें खुसरूहि तिच्या सान्निध्यांतून निसटला. तरीहि पण बरेच दिवस खुसरूचें अन्तःकरण बानूला विसरलें नव्हतें. त्याला तिच्याशीं केलेल्या अनेक विलासांची आठवण होत होती; पण पौर्णिमेच्या दर्शनानें तो ती आठवण विसरला व तिच्यावांचून जगांत कोणी सौंदर्यवतीच नाहीं असें त्याला वाटूं लागलें. पुढें तो पुरा पागलच बनला.

खुसरूनें आपल्या अन्तर्गत हृदयाचा कोनाकोपराही धुंडाळून पाहिला; पण त्याच्या प्रिय बानूची विश्वमोहिनी सौंदर्यप्रभा त्याला कुठेंच आढळून आली नाहीं. मात्र पौर्णिमेचें विद्युत्तेजपूर्ण स्वरूप आपल्या हृदयांतील सर्व जागा व्यापून तें दशदिशांनाहि व्यापून राहिल्याचें त्याला आढळून आलें.

याच वेळीं श्यामल छायेनें पांडित झालेल्या एका विटशाखेवर लपून बसून पापिया नांवाच्या पक्ष्यानें आकस्मिक हृदयस्पर्शी गीत गाण्याला सुरवात

केली. पौर्णिमेच्या स्वर्गीय सुरांची साथ करण्यासाठींच हा सूर निघत असावा असेंहि खुसरूला वाटलें. याच संधीला, वनान्तरालांतून नवप्रस्फुटित वन्यकुसुमांचा दिव्य सुगंध खुसरूच्या नाकाशीं आला. वाऱ्याची ती क्षुद्र झुळूक याचवेळीं कशी आली कुणाला ठाऊक ! पण त्या झुळुकीबरोबर आलेला तो मादक सुगंध पौर्णिमेच्या दिव्य तनुलतेचाच असावा असें खुसरूला वाटलें. त्या वाऱ्याच्या झुळुकीचा स्पर्श होतांच त्या वेड्या शहाजाद्याला वाटलें कीं, पौर्णिमेच्या अंगाचा स्पर्श यापेक्षांही सुस्निग्ध आणि आरामदायक असेल नाहीं ? हो. तिच्या स्पर्शांत खरोखरच दिव्य सामर्थ्य असलें पाहिजे.

एवंच त्या वेड्या खुसरूला जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं चोहोंकडो पौर्णिमाच दिसूं लागली. डोळे झांकूनहि त्यानें पाहिलें तों अन्तरंगांतही तिचेंच मधुर हास्य ? डोळे उघडून पाहिलें तों बाहेरहि तीच दिव्य मूर्ति. उजव्या, डाव्या बाजूला वर खालीं, समोर, मागें, चोहोंकडे त्याला तिचीच मूर्ति दिसूं लागली. ज्योतिर्मयी पौर्णिमेचें तेजोवलयच आपणा सभोंवार आहे कीं काय असाहि त्याला भास झाला. पांढऱ्या शुभ्र कापसाप्रमाणें इतस्ततः भ्रमण करणाऱ्या मेघपुंजामध्यें त्यानें पाहिलें तों आपल्या तेजानें आकाशाला उज्ज्वलता आणीत ती रमणीय विजेप्रमाणें तेथें चमकत असल्याचें त्याला आढळलें.

काय ही तन्मयता ! सर्वांगांशीं मीलित झालेली ती सौंदर्याची उज्ज्वल छाया अत्यंत अपूर्व होय. खुसरू एका अजाणत्या ऐन्द्रजालिक शक्तीच्या आधीन होऊन पौर्णिमेच्या स्वर्गीय लावण्यांत तन्मय झाला. शहाजाद्याची ही मुग्ध स्थिति पौर्णिमेच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं.ती आपल्या आरक्त अधरावर मृदुहास्याची चमक दाखवून खुसरूला विचारते, " माझ्याकडे अशी अगदीं टक लावून काय पहाता कुमार ! "

तिचा तो प्रश्न ऐकून झोंपेंतून आकस्मात् जागृत झाल्याप्रमाणें करून शहाजादा म्हणाला, " काय पहात आहे ? तुझें हें विश्वविमोहनकारी सौंदर्य कोण बरें पहाणार नाहीं ? तुझ्या या उज्ज्वल नेत्रांतील त्या कृष्णवर्ण तारका पाहून कोण बरें वेडा होणार नाहीं. तुझ्या या बिंबफललांच्छित व सुललित अधरोष्ठाचा स्वाभाविक आरक्तपणाच मी पहात आहें.पौर्णिमा ! पौर्णिमा ! ! तूं आपल्या या अनिंद्य रूपराशीनें, त्या गुहेंत प्रथम मला वेडा केलेंसआणि आतां असा प्रश्न करणें तुला शोभतें का ? त्या दिवसाची आठवण विसरून जाण्या-

चा मी प्रयत्न करीत होतों आणि तो कांहींसा यशस्वीहि होत होता; पण इतक्यांत आपल्या मनोमुग्धकर दर्शनानें तूं मला पुन्हां वेडा बनविलेंस. मला अशारीतीनें त्रास देण्यांत आणि पुन्हां पुन्हां असले कठोर प्रश्न करण्यांत तुला मौज वाटते का ? तुझ्या स्वर्गीय सौंदर्यावरून मीं असें अनुमान केलें होतें कीं, तूं अगदीं कोमल अन्तःकरणाची असशील; पण मला अशारीतीनें तुच्छ मानून आपल्या हातांतील खेळणें बनविण्यापर्यंत तुझी मजल पोंचली हें पाहून मी कोण हेंच मला आतां ओळखतां येईनासें झालें आहे. सम्राट् अकबरच्या नातवाला अशारीतीनें नाचविण्यांत तुला मौज वाटते काय ? ”

शाहाजाद्याच्या तोंडचें हें बोलणें एकून देवी पौर्णिमा एकाद्या उन्मादिनीप्रमाणें खदखदा हंसली. या तिच्या विचित्र हंसण्यामुळें खुसरूला आश्चर्य वाटलें. तो मनांत म्हणाला, “ही पौर्णिमा आहे कोण ? ही एकादी वेडी अग मायाविनी स्त्री तर नसेल ना ? मीं कळकळीनें आणि मनापासून बोललेलें ऐकून ही अशी कां बरें हंसली ? ” खुसरूला या तिच्या कृतीचा थोडासा राग आला आणि तो किंचित् तीव्र स्वरानें म्हणाला, “ पौर्णिमे ! तूं आतां कां बरें हंसलीस ? ”

पौर्णिमेनें उत्तर केलें, “ जनाबअली ! आपली ही स्थिति पाहून कोणाला हसूं येणार नाहीं ? एका सामान्य आणि वेड्या भिकारिणीसाठीं दिल्लीश्वराच्या नातवानें इतकें तन्मय आणि वेडें व्हावें, ही गोष्ट खरोखरच हास्यास्पद नव्हे कां ? ”

“ हो, असेल. हास्यास्पद असेल; पण तुला तसें कां वाटावें बरें ! मीं तुझ्या स्वरूपानें वेडा झालों आहें ही गोष्टही खोटी नाहीं; पण तूं मला वेडा समजूं नकोस. शिवाय मी तसा कां झालों, आणि या स्थितींतून मी कसा सुटेन हें तूं जाणत आहेस. कठोर हृदयाचे तरूण स्त्रिये ! माझी तूं अशा रीतीनें अवहेलना करतेस हें तुला बरें दिसतें कां ? ”

“ पण या असल्या वादविवादांत काय अर्थ आहे ? आपण मूळमुद्यासंबंधानेंच बोलूं. आपल्याला काय पाहिजे ? ”

“ काय पाहिजे ? काय पाहिजे तें तूं जाणत नाहीं ? सुंदरी ! तूंच मला पाहिजेस ! ! ”

" हुजुरची स्मृतिशक्ति बरीच मन्द झाली असावीसें वाटतें !! मीं आपल्याला मागेंच सुचविलें होतें कीं, ' आपल्या समोर असलेली ही पूर्णिमा दुर्जयसिंहाची पत्नी आहे. ' तें आपण इतक्यांत कसें बरें विसरलांत ! एका राजपुत वीराची पत्नी बादशहाच्या नातवाची विलासिनी होऊन त्याच्या महालांतील ऐष आराम भोगीत आपल्या व्यभिचाराची काळीकुट्ट पताका जगांत फडकवील, असें आपणाला वाटलें तरीं कसें हुजूर ?"

" तर मग हा योगिनीचा वेष घेऊन तूं कुठें निघाली होतीस ? "

" आपल्याच शोधाला. "

" माझ्या शोधाला ? " खुसरूनें आश्चर्यानें प्रश्न केला.

" होय. मी कधींहि खोटें बोलून दुसऱ्याला फसवीत नसतें. "

" आणि मघाचें तें विरहगीत कोणासाठीं ? "

" आपल्यासाठींच. "

" माझ्यावर तुझें प्रेम आहे का ? सांग. मला असा घोटाळ्यांत ठेवूं नकोस. "

"शत्रूवर कुणीं कधीं प्रेम करितें का ? "

" पण मी तुझा शत्रु कसा तें तर सांगशील ? "

" आपणाला माहीत नाहीं कां शहाजादासाहेब ? आपल्यामुळेंच माझ्या हृदयेश्वराला—दुर्जयसिंहाला—आपल्या जन्मभूमीतून हद्दपार व्हावें लागलें! कदाचित् त्यांना कारागृहांतहि राहावें लागलें असेल. आपणावर आपघात करायला त्यांनीं तरवार उचलली म्हणून महाराज मानसिंहानीं त्यांना ही शिक्षा केली आहे. " पौर्णिमा किंचित् कठोर स्वरानें म्हणाली.

खुसरूला वाईट वाटलें. तो खिन्नतेनें म्हणाला, " याबद्दल मला फार वाईट वाटत आहे; पण दुर्जयाच्या अपराधाचा न्याय करणारा मी नव्हे. राजा मानसिंहाचा तो अधिकार असल्यामुळें मला त्यांत अगदीं हात घालतां येत नाहीं. तरी पण त्यावांचून या बाबतींत इतर रीतीनें जर माझ्याकडून तुला कोणत्या तऱ्हेची मदत होण्यासारखी असेल तर खुशाल सांग. ती करायला मी आनंदानें तयार आहें. "

" आपण मानसिंहाचे अत्यंत प्रिय असून आपणाला ते स्वतांच्या मुलाप्रमाणें वागवितात. अकबर बादशहाचे तर आपण प्रत्यक्ष नातूच आहां. तेव्हां

आपल्या मनांत एकादी असंभवनीय गोष्ट आली तरी ती संभवनीय होऊं शकेल. माझ्या हृदयेश्वरालाही आपण सोडवूं शकाल--"

खुसरू मध्येंच म्हणाला, " मानसिंहाच्या हुकुमावांचून? त्याला न कळवितां?"

" पण त्यांनां कळविलें तर ते तशी मान्यता देणार नाहींत. मानसिंहानें सोडलेला हुकूम फिरविण्याचें सामर्थ्य या जगांत कोणाच्याही आंगीं नाहीं. ते माझ्या प्राणेश्वराला हद्दपार करूनच स्वस्थ बसले नाहींत; तर-मीं आजच ऐकलें कीं—त्यांनीं दुर्जयसिंहांना कैद करून ठेवलें आहे. तेव्हां म्हणतें, आपण जर मानसिंहांना सांगाल तर कदाचित् ते त्यांना सोडतीलही.

" मानसिंहांना न कळवितां दुर्जयसिंह मुक्त होऊं शकेल अशी एकादी युक्ति नाहीं कां?" खुसरूनें उत्सुकतेनें पौर्णिमेला प्रश्न केला.

पौर्णिमा कांहीं वेळ विचार करून म्हणाली, "होय, आणखी एक उपाय आहे. आपल्या बोटांत जी आपल्या नांवाची आंगठी आहे ती माझ्याकडे द्या. मला समजलें आहे कीं, दुर्जयसिंह, अकबरापासून तीन कोसांवर असलेल्या रतनगडांतील कारागृहांत कैद भोगित आहेत, आणि इथून तर तो रतनगड सारा एकच कोस आहे. आपल्या मुद्रिकेच्या साहाय्यानें मी माझ्या सौभाग्यदेवतेची आजच मुक्तता करूं शकेन."

"हां! आतां मी तुझा उद्देश समजलों; पण मी या निर्जन अरण्यांत आलों आहे, हें तुला कसें समजलें बरें?" खुसरूनें कौतुकानें प्रश्न केला.

" आपण अम्बर प्रासादांतून बाहेर पडलां तत्पूर्वींच मीं तो राजवाडा सोडला होता. या पहाडाजवळून जो रस्ता जातो तोच अजमीरला जाण्याचा मार्ग. तेव्हां आपण आतां कुठें आणि कोणत्या रस्त्यानें जातां हें पहाण्यासाठींच मीं या पहाडावर चढलें होतें; मीं जेव्हां पाहिलें कीं, आपण विश्रांतीसाठीं जागा शोधीत आपल्या सैनिकांपासून बरेच दूर आलां आहां, तेव्हां मी योग्य वेळाची वाट पहात आपल्या मागून आल्यें."

"आणि गात होतीस कां?"

" आपलें लक्ष्य माझ्याकडे लागावें म्हणून! कारण तसें मीं गात राहिलें नसतें तर आपण लवकरच पहाड उतरून परत गेलां असतां."

" पौर्णिमा! तुझी बुद्धि फारच तीक्ष्ण आणि वाखाणण्यासारखी आहे

यांत संशय नाहीं. खुदानें जसें तुला अप्रतीम सौंदर्य दिलें आहे तसेंच बुद्धि-चातुर्यही देण्याला तो विसरला नाहीं; बरें पण मीं तुझ्यासाठीं इतकें केलें आणि तूं माझ्यासाठीं कांहींच का करणार नाहींस पौर्णिमे !! ”

“ स्वतःचा प्राण दिल्यानें जर तुमचा फायदा होत असेल तर तसेंहि करण्याला माझी तयारी आहे. मी नेहेमीं, माझ्या प्राणेश्वराला स्वातंत्र्य देणारा आणि जीवन देणारा पवित्र आत्मा, म्हणून आपणाला मानीन आणि कृतज्ञ हृदयानें, आपल्या कल्याणासाठीं देवाची प्रार्थना करीन. ”

खुसरूनें मनांतल्या मनांत कांहींसा विचार केला आणि पुन्हां एकदां पौर्णिमेच्या चेहऱ्याकडे पाहिलें. तिचें सूर्यकरोज्ज्वल सौंदर्य यावेळीं त्याला ज्यास्तच प्रभामय दिसलें. आपणापुढें एकादी मर्त्यलोकीं कधींही दृष्टीला न पडणारी अशी स्वर्गीयसौंदर्यवती परीच उभी आहे कीं काय असाहि त्याला भास झाला. यावेळीं त्या परीच्या आरक्त अधरोष्ठावर प्रेमळ स्मितहास्य विलसत होतें.

तिच्या त्या दिव्य स्वरूप दर्शनानें खुसरूला स्वतःची विस्मृति झाली. तो म्हणाला, “ सुन्दरी ! दानाबद्दल प्रतिदान पाहिजे. माझ्याकडून तूं घेणार असलेल्या दानाबद्दल तूं मला एकादा सामान्य मोबदला देशील काय ? मी त्या मोबदल्यासाठींच आज भिकारी बनून तुझ्या दाराशीं आलों आहें. ”

पौर्णिमा पुन्हां घोटाळ्यांत पडली. खुसरूच्या चेहेऱ्यावरचा तो उत्तेजित भाव पाहून त्याच्या मनांत काय आहे हें तिनें जाणलें. थोडा वेळ थांबून ती विद्रूपपूर्ण स्वरानें म्हणाली, “ साम्राटचे वंशज मोबदल्यावांचुन दान अगर उपकार करीत नसतात, हें मला अजून माहीत नव्हतं. आज समजलं. बरं पण शहाजादेसाहेब, माझ्याकडून कोणत्या मोबदल्याची आपण अपेक्षा करीत आहां ? ”

“ तुझ्या या कोमल आणि सुंदर हाताचें, तसेंच या संध्यारागरंजित कपोलाचें मला चुंबन घेऊं दे. खरोखर तुझ्या एवढ्या प्रतिदानानेंहि मला पुष्कळ समाधान वाटेल. ” असें म्हणून शहाजादा खुसरू आतुरतेनें कांहींसा पुढें झाला, पण त्याचा भावार्थ ओळखूनच कीं काय नकळे, पौर्णिमा विद्युद्वेगानें अगोदरच बरीच दूर सरली होती.

आपला असा विरस झाल्यामुळें खुसरूला थोडासा राग आला. ते

आवेगपूर्ण पण उत्तेजित स्वरानें म्हणाला, " पौर्णिमे ! तूं इतकी का कठोर आहेस ! नको. अशी दूर सरूं नकोस. माझी एवढी इच्छा पूर्ण कर. "

दुखावलेल्या सिंहिणीप्रमाणें आरक्त नेत्रांनीं खुसरूकडे पहात पौर्णिमा कर्कश स्वरानें म्हणाली, " कसली इच्छा खुसरू ? "

पुन्हां पूर्वीच्या स्वरानें खुसरूनें उत्तर दिलें, " देवी ! सुंदरी !! पहा. हा सर्व प्रदेश अगदीं निर्जन असून सध्यां कोणाही प्राण्याचें एथें अस्तित्व नाहीं. कांहीं अंतरावर आहेत ते माझेच लोक असून ते इकडे येणारही नाहींत. ये. अशी रागावून पाहूं नकोस ! या दुःखविरहविदग्ध हृदयाशीं आपलें हृदय मिळवून मला शांत कर. मला आतां हा तळमळ सहन करवत नाहीं. भविष्यकालीन दिल्लीच्या तक्ताचा मालक मी आहे, अर्थात् सर्व भारतवर्षाचा सम्राट् मीच होणार. मग हिंदुस्तानची राजराजेश्वरी तूंच होणार हें सांगायला का पाहिजे ? सगळें हिंदुस्तान तुझ्या या आरक्त पद्‌कमलांवर लोटांगण घालील. तेव्हां सुंदरी ! तुझ्या या सूर्यतापानें पीडित झालेल्या सुकुमार गालाचें एकवार तरी चुम्बन घेण्याची मला परवानगी दे. "

पौर्णिमेला यावेळीं आपल्यावरील संकटाची चांगलीच कल्पना झाली. ती इतकेंहि समजून चुकली कीं, ' मी एका विषारी सर्पाशीं खेळ खेळ-ण्यांत गढून गेलें आहे; ' पण ती रजपुतरमणी असल्यामुळें या संकटप्रसंगीं बिलकुल भ्याली नाहीं. कारण आत्मरक्षणाची उपाययोजना केल्यावांचून तिनें घरच सोडलें नव्हतें, आणि म्हणूनच तिला यावेळीं वीरत्वपूर्ण दृष्टीनें खुसरूकडे पहात तुच्छतापूर्ण भाषण करण्याला स्फूर्ति झाली. ती म्हणाली, " छी छी. शहाजादेसाहेब ! आपण दिल्लीच्या तक्तावर बसण्याला योग्य तरी-आहां का ? परस्त्रीविषयीं पापबुद्धि ज्याच्या अन्तःकरणांत असते तो सिंहास-नावर बसण्याला केव्हांही योग्य नव्हे. यामुळें दिल्लीचें तक्त तुम्हांला मिळणें अशक्य आहे आणि भविष्यकालीं याची आपणाला प्रचीति येईलच. "

खुसरू कांहींसा दूर झाला. आपण कांहीं तरी चुकत आहों असें त्याला वाटलें; पण आपली चलबिचल बाहेर दिसूं न देतां तो अभिमानपूर्ण स्वरानें म्हणाला, " पौर्णिमे ! इतकें ' छी छी ' म्हणायला तुला काय झालें ? मी यांत कांहीं गैर करीत आहे असें मला तर मुळींच वाटलें नाहीं ! "

" अविवेकी मनुष्याला गैर असें कांहींच वाटत नाहीं. आपण भारत सम्राट् अकबर यांचे नातू आहां!! कदाचित् या आर्यस्थानाचे आपण मालकही व्हाल! प्यारी बानू आपली अनुरक्त धर्मपत्नी असून पतिविरहानें तळमळणारी विरहिणी आहे व तिचे आपण हृदयेश्वर आहांत! पण इतकें असूनही आपलें अन्त:करण किती बरें क्षुद्र आहे! असल्या क्षुद्र अन्त:करणाच्या उच्छृंखल माणसाला केव्हांहि कोणी भारतसम्राट् म्हणणार नाहीं, कारण सम्राट ही पदवी अत्यंत श्रेष्ठ असून ती मिळवीणारा मनुष्य तशाच श्रेष्ठ योग्यतेचा व उदात्त अन्त:करणाचा असावा लागतो. तारुण्य आणि स्वरूप यांना भुलणारा अधिकारी केव्हांही अयोग्यच. शहाजादेसाहेब! आपण ज्या माझ्या सौंदर्याची इतकी प्रशंसा चालविली आहे आणि इतकी आसक्ती दाखवीत आहां तें सौंदर्य किती दिवस बरें टिकणार? वसंतऋतू कायमचाच राहातो कां? माझें सौंदर्य ज्या वेळीं कोमजलेल्या गुलाबाच्या पाकळ्यांप्रमाणें गळून जाईल तेव्हां तुमचें स्वरूपासक्त प्रेम असेंच राहूं शकेल काय? आणि परस्त्रीचा अशा रीतीनें केलेला अपमान व छळ आपणाला कधींच तापदायक व मर्मदाहक होणार नाहीं कां? याबद्दल भविष्यकालीं होणाऱ्या ज्वाला तुमच्या हृदयाला तळमळून सोडणार नाहींत कां? पाप तें पापच. त्यापासून सुख नाहींच. पण असह्य दु:ख मात्र भोगावें लागेल. आत्यंतिक सुखाची आशा म्हणजे दु:खाला आमंत्रण देणेंच होय. "

खुसरू शांतपणानें हें भाषण ऐकत होताच असें नाहीं, कारण त्याचा स्वभाव नेहमींचाच चंचल आणि नव्या नव्या कसल्या तरी योजना करण्यांत गढलेला असावयाचा; पण याला कारण तो नसून अकबरच होता. कारण तो त्याचे अत्यंत लाड करीत असे. श्रीमंतांचीं मुलें अत्यंतिक लाडानें अगदीं बिघडून जातात हें कुणालाहि माहीत आहेच. त्यांतून हा तर सम्राटाचा नातू मग काय विचरितां! वाढत्या वयाबरोबर त्याचे ढंगहि वाढतच चालले. आपल्या बापाशीं शहाजादा सेलीमशीं—तो असा कांहीं बेफिकीरपणानें आणि उद्धट रीतीनें वागत असे कीं, मुलाबद्दल बापाच्या मनांत तिरस्कारच वाढत चालला. सेलीम मनांत म्हणे, ' सम्राटच्या लाडामुळें हिंदुस्थानचा भावी सम्राट् नरकाची पायरी उतरूं लागला आहे. ' कधीं त्याच्या वर्तनाबद्दल अतिशय चीड येऊन शहाजादा सेलीम खुसरूला शिक्षा करूं लागलाच तर सम्राट्

अकबर व जोधबाई हीं दोघेंहि त्याच्या आड येत व त्याला तसें करूं देत नसत. यामुळें तर खुसरूचा चढेलपणा फारच वाढूं लागला. आणि तो सर्वांवरच विलक्षण रीतीनें दांतओठ खाऊं लागला. इतकेंच नव्हे तर त्याला असाहि संशय येऊं लागला कीं, स्वतः सम्राटच जर अशा रीतीनें नातवाला चढेल बनवून ठेवीत आहेत तर उद्यां ते आपल्यामागें हें सिंहासन त्याला देणार नाहींत कशावरून? देतीलहि. आपण जर वेळींच सावध झालों नाहीं तर मागाहून हातच चोळीत बसावें लागेल—'

असें जरी होतें तरी खुसरूचा स्वभाव कांहीं अगदींच नीच झाला नव्हता. त्याच्या हृदयांत एक प्रकारची उदारता, थोडासा आत्मसंयम, कांहींशी विचारशक्ति यांचेंहि अस्तित्व होतें; पण हे त्याचे अगदीं कोंपऱ्यांत लपून बसलेले सद्गुण शोधून काढण्यास बरीच खटपट करावी लागे आणि तशी खटपट झाल्यास तो एक दिव्य पुरुष बनत असे.

खुसरूचा हा गुण अथवा हें गूढ रहस्य जरी फारसें कोणाला माहीत नव्हतें तरी ईश्वरी योजनेनें, या वेळीं पौर्णिमेला तेथें उभी करून तिच्या तोंडून त्याला बरेंचसें हडसून खडसून जागृत करण्यांचा प्रयत्न करण्यांत आला. पौर्णिमा स्वतःची अब्रू संरक्षण व्हावी म्हणून अगदीं मनापासून जें काय सुचलें तें बोलली; पण तें तिच्या चांगलेंच पथ्यावर पडून तिनें खुसरूला तेवढ्या पुरता तरी मार्गावर आणलें.

' कारण तिचें बोलणें संपतांच कांहीं वेळ आपणाशींच विचार करून अनुतप्त स्वरानें खुसरू म्हणाला, " खरेंच मी नसत्या भ्रष्टमार्गांत सांपडून एक मोठाच अनर्थ घडवून आणीत होतों. पौर्णिमे! तूं मला आतां क्षमा कर. एक क्षणभर माझ्या हृदयांत उद्भून झालेल्या चंचलपणानें आणि अनात्मसंयमानें जें माझ्या हातून नाहींच; पण बोलण्यानें होऊन गेलें तें तूं विसरून जा आणि झालेल्या अपराधाबद्दल मला मनापासून क्षमा कर. या क्षमेचाच मोबदला म्हणून दुर्जयसिंहाच्या सुटकेसाठीं माझ्या नांवाची आंगठी मी तुला देतों; पण मला वचन देऊन तूं सांगितलें पाहिजे कीं, ' काम होतांच ही आंगठी परत आणून देईन. ' सांग, देवी पौर्णिमे! सांग आणि ही आंगठी घेऊन जा. "

आपल्या बोलण्याचा बराच उपयोग झाला असें पाहून पौर्णिमेला थोडेंसें समाधान वाटलें. औषध पोटांत जातांच रोगी मनुष्य ज्याप्रमाणें आपलें वातविकृत बडबडणें सोडून देऊन शुद्धीवर येऊन चार शब्द बोलतो, त्याप्रमाणें खुसरूच्या तोंडुन सहजस्फूर्तीनें आलेले ते उद्गार ऐकून पौर्णिमेला किती तरी आनंद झाला. खुसरूची विवेकशक्ति खरोखरच या वेळीं जागृत होऊन थोरांचा थोरपणा व्यक्त होऊं लागला होता. थोड्या वेळापूर्वी जी व्यक्ति सैतान बनली होती तीच व्यक्ति आतां देवता बनलेली पाहून पौर्णिमेची खुनशी वृत्ति व सूड घेण्याची इच्छाहि तात्पुरती तरी नाहींशी झाली म्हटलें तरी चालेल.

ती कांहीं वेळ थांबून प्रसन्न चेहेऱ्यानें व नम्रतेनें म्हणाली, " हुजुर ! आपल्या या आज्ञेला मी कबूल आहे. मी पुन्हां आपणाला भेटेनच, असें निश्चयपूर्वक मला सांगवत नाहीं. कदाचित् मी भेटण्यापूर्वी आपणाला माझ्या नांवाचें एकादें पत्रहि मिळेल. आणि त्या पत्रांत कळविलेल्या ठिकाणीं आपण येतांच मी आपली भेट घेईन. "

खुसरूला हें तिचें सांगणें मान्य झालें व त्यानें आपल्या हातांतील आंगठी काढून पौर्णिमेच्या हातांत दिली आणि म्हटलें, " सावध राहा. राजा मानसिंह यांना याबद्दल एक अक्षरहि समजतां कामा नये. कारण दुर्जयसिंहाला त्यांनीं शिक्षा दिलेली आहे, तेव्हां मीं हा असा व्यवहार करणें सर्वथा अयोग्य आहे ! जर विलक्षण योगायोगानें अथवा आकस्मित रीतीनें तूं पकडली गेलीस आणि राजा मानसिंगानें तुला प्रश्न केला कीं, शहाजाद्याच्या नांवाची आंगठी तुला कुणीं दिली ? तर त्यावर तूं काय उत्तर देशील पौर्णिमे ? सांग ! "

पौर्णिमा हास्यपूर्वक म्हणाली, " सांगेन कीं, शहाजाद्याच्या खोलींतून मीं ही चोरून आणिली आहे. आपल्या पतीच्या मुक्ततेसाठीं रजपुत रमणी काय करणार नाहींत ? "

खुसरू फारच दुर्बल मनाचा होता, आणि म्हणूनच त्यानें वरील प्रश्न केला; पण पौर्णिमेच्या धीट जबाबामुळें आपणावर या बाबतींत कोणतीहि तोहमत येणें शक्य नाहीं असें जेव्हां त्याला आढळून आलें तेव्हां तो अशा प्रफुल्ल मनानें पूर्णिमेला विचारतो, " पौर्णिमे ! आतां आपली भेट केव्हां बरं होईल ? "

पौर्णिमेनेंहि तितक्याच प्रफुल्लित मुद्रेनें उत्तर दिलें. " ज्या दिवशीं माझी सौभाग्यदेवता माझ्याजवळ येईल व माझा उदयकाल होईल त्याच दिवशीं, शहाजादेसाहेब, मी आपणाला भेटेन !"

" तर मग माझी भेट घेण्यासाठीं कदाचित् तूं आग्र्यापर्यंतहि येशील?" खुसरू उत्सुकतेनें म्हणाला. " हो. येईन. आलेंच पाहिजे. आपल्या वचनाचें रक्षण करणें हें तर रजपुत स्त्रीपुरुषांचें ब्रीद आहे. आमच्यांत वचनभंगासारखें दुसरें पाप समजत नाहींत. माझ्यासारख्या स्त्रीच्या हातून आणखी विशेष तें काय होणार ? " बोलतां बोलतां पाऊल मागें जात जात देवी पूर्णिमा चट्कन् मागच्या वृक्षराजींत नाहींशी झाली. खुसरू पुढें कांहीं बोलणार होता; पण अशी अकस्मात तीं जाईल अशी त्याला कल्पनाच नव्हती.

ती गेलीसें पाहून त्यानें एका दीर्घ सुस्कारा सोडला आणि मनांत म्हटलें, " हाय ! हाय ! पौर्णिमे ! ! आज जर मी तुझ्यासारख्या कोणा कुशल व धाडशी तरुणीला पत्नी म्हणून ग्रहण करूं शकलों असतों, तर तिला अशी जाऊं न देतां प्रेमशृंखलेनें बांधूनच ठेविलें असतें. आतां तूं मला भेटशील कीं नाहीं कोण जाणे ? तरी पण रजपूत व रजपुतानी, आपलें वचन कधींहि विसरत नसतात. तेव्हां तुला पुन्हां माझ्याकडे यावें लागेलच. कदाचित् त्याही वेळीं मी तुला आपलीशी करूं शकेन नाहीं कुणीं म्हणावें ?—"

याच वेळीं त्याच्या सैनिकांपैकीं एक घोडेस्वार तेथें आला आणि नम्रपणानें सलाम करून म्हणाला, " जनाब ! विलंब होत आहे. कारण अद्याप आपणाला बरेंच दूर जावयाचें आहे. आपण आसपास कुठें न दिसल्यामुळें मी चोहोंकडे शोधीत शोधीत येथें आलों. पुढें चालण्याचा हुकूम व्हावा. स्वार वाट पहात उभे आहेत."

त्या रजपुतस्वाराला—हिम्मतसिंहाला—आकास्मितपणें समोर पहातांच खुसरू मनांतल्यामनांत थोडासा चरकला. त्याच्या मनांत थोडासा संशय आला. त्याला वाटलें, ' माझें आणि पौर्णिमेचें झालेलें सर्व भाषण झाडाच्या आड राहून तर यानें ऐकलें नसेल ना ? ' पण त्यानें आपला हा संशय मनांतल्या मनांतच ठेवून आपला घोडा मकानाकडे वळविला. तरी एका मर्मभेदी दीर्घ निःश्वासानें त्यानें आपल्या संकल्पित कार्याची निष्फलता

उघड करून दाखविण्यास कमी केलें नाहीं. कारण हिंम्मतसिंहानें आपलें सर्व कांहीं गुप्त बोलणें ऐकलें असावें असेंच त्याला वाटलें. अस्तु.

---

# प्रकरण ९ वें.

---:*:---

## नाथ ! आतां हा विरह सहन होत नाहीं !

पौर्णिमेच्या अतुलनीय सौंदर्यानें आपली अशी वेडयासारखी स्थिती कां झाली, याचें निश्चित असें कसलेंहि कारण शहाजादा खुसरू जाणूं शकला नाहीं. तरी पण तो इतकें समजला होता कीं, जर भाग्यचक्रपरिवर्तनानें आपण या सौंदर्यवती पौर्णिमेला आपली धर्मपत्नी केलें तर आपलें दुःख-पूर्ण आयुष्य सुखाचें होईल. आणि जीवनांतील श्रेष्ठ कर्तव्येंहि तडीस जाऊं शकतील; इतकेंच नव्हे, तर तसें झाल्यास हें निरुत्साही मन कायमचें प्रफुल्लि-तहि होऊं शकेल.

पण या जगाला, उत्पत्तीच्या वेळींच, कोणीं न कळे, पण असा एक शाप दिला आहे, कीं, जो जें मागतो व आशापूर्ण हृदयानें ज्याची वाट पहात बसतो, तो तें मिळवूं शकत नाहीं. इच्छिलेलें नाहींच; पण प्रार्थिलेलेंहि मिळत नाहीं. असा जरी जगाचा त्रिकालाबाधित नियम होता व आहे तरी पौर्णिमा निघून गेल्यानंतर अभिमानी खुसरू मनांत विचार करीत होता, " अलंम दुनयेच्या बादशहाचा मी नातू आहें; आणि सगळें हिंदुस्तान मला सम्राट म्हणायला फारच उत्सुक झालेलें आहे. माझा सामर्थ्यवान् बाप, मेहेर उन्नि-सेला आपलीशी करण्यासाठीं शेरअफगाणाचा खून करण्याच्या विचारांत आहे. त्याच्या हृदयाशीं सँलग्न झालेलें तिचें हृदय तोडून काढून तें आपल्या हृदयाशीं जडविण्याचा त्याचा आटोकाट प्रयत्न चालला आहे. व त्याचा तो प्रयत्न सिद्धीला जाईल असेंहि वाटत आहे. मग सेलिम जर अशा रीतीनें आपली इच्छा पूर्ण करून घेतो तर मग मी तरी पौर्णिमेला मिळविण्याची इच्छा पूर्ण करून कां घेऊं नये ? तिच्या बाबतींत मीं केलेले प्रयत्न कां सफल होणार नाहींत ? शेर अफगाणाच्या सामर्थ्यापुढें दुर्जयसिंह म्हणजे कांहींच नाहीं.

माझी अतृप्त आकांक्षा पूर्ण करण्यासाठीं या दुर्जयसिंहाला जरी नामशेष करण्याचा प्रसंग आला, तरीहि मी तो दवडणार नाहीं–"

अशा प्रकारचे विचार करीत करीत शहाजादा आपल्या सैन्यासह अजमीरच्या रोखानें चालला होता. इतक्यांत त्याच्या तीक्ष्ण दृष्टीला, पांच मोगल स्वार आपल्याकडे, चौफेर घोडे उधळीत येत असल्याचें आढळून आलें. लागलींच त्यानें आपल्या घोड्याचा लगाम खेंचला आणि त्यांना उभा केलें. त्याच्या हृदयांत एका भयंकर शंकेनें तितक्यांतल्या तितक्यांत मोठी खळबळ उडवून दिली. फत्तेपूर शिक्रीला आल्यापासून सम्राट् अकबरची प्रकृति फारच बिघडत चालली होती. ते धांवत येत असलेले स्वार पाहून, खुसरूनें विचार केला, 'हे स्वार जेव्हां शिक्रीकडून इकडे येत आहेत, तेव्हां मला वाटतें मला सांगण्यासाठींचे ते कांहीं तरी अशुभ बातमी आणीत असावे!'

येत असलेल्या पांच स्वारांत जो मुख्य होता त्याचें नांव लतिफखान असें असून तो सम्राट्चा खास कारभारी होता. खुसरूला पाहतांच त्यानें घोड्यावरून खालीं उडी घेतली आणि लवून तो सलाम करून अदबीनें उभा राहिला.

शहाजादा खुसरू उत्सुकतेनें त्याच्याकडे पहात म्हणाला, "काय बातमी आहे लतीफ! जहांपन्नाह खुशाल आहेत ना?"

लतीफ कांहीं न बोलतां त्यानें आपल्या फेट्यांतून एक लाल रंगाचा लखोटा काढून तो शहाजाद्याच्या हातांत दिला. खुसरूनें कांपऱ्या हातांनीं तो फोडला व शंकित हृदयानें वाचूनहि संपविला. त्यांतील मजकुरावरून त्याला समजून आलें कीं, "सम्राट्चा आजार ज्यास्त झाला असून तो आपणाला–खुसरूला–पहायला फारच उत्कंठित झाला आहे. यासाठीं ताबडतोब निघून येण्यास त्यांत लिहिलें आहे."

खुसरू पक्का दैववादी होता. त्या मर्मातील मर्म लक्षांत येतांच तो समजला कीं, आपल्या आयुष्यांतील सगळ्या घडामोडी करतलामलकवत् स्वतःच्या स्वाधीनच्या नव्हत. कारण आईच्या आज्ञेप्रमाणें तो बापाला भेटण्यासाठीं व त्याची क्षमा मागण्यासाठीं अलाहाबादेला जात होता; पण मध्येंच त्याच्या

दैवानुरोधानें नवीनच भानगड उपस्थित होऊन त्याला अलाहाबादेला जाण्याचा बेत रहित करावा लागला. दैवयोजना म्हणतात ती ही अशी.

लतिफाच्या तोंडून सम्राटच्या आजाराची सगळी हकीगत ऐकून घेतल्यावर खुसरूला तर ज्यास्तच अस्वस्थता उत्पन्न झाली. कारण आपल्या आजोबावर त्याचें व आजोबाचें त्याच्यावर अत्यंत प्रेम होतें. इतका आदर, इतके लाड आणि इतकी ममता व पदोपदीं होणाऱ्या लहान मोठ्या अपराधांची विचार न करतां क्षमा, हीं आपला बाप सेलीम याला त्याच्या लहानपणीं अकबरशहाकडून अनुभवावयास मिळाली होती कीं काय, कुणाला माहीत! पण अकबर खुसरूला एक घटकाभरहि आपल्या डोळ्यांआड होऊं देत नसे. आणि खुसरूही पण आपल्या आजोबाला सोडून फारसा दूर जात नसे.

लतिफाची हकीगत ऐकून घेतल्यावर खुसरू आपल्या हाताखालील स्वार हिम्मतसिंह याला खिन्नतेनें म्हणाला, "हिम्मत! सम्राट् फारच आजारी आहेत तेव्हां पूर्वीचे सगळे बेत आणि ठराव रद्द करून मला आधीं प्रथम त्यांच्याकडे जाणें भाग आहे. आतां मला अजमीरला जाण्याचें कांहींच कारण नाहीं. मग अलाहाबाद कुठचें? हिम्मत! तूं माझ्यामागून ये, मी पुढें होतों."

या ठिकाणाहून फत्तेपूर शिक्री सुमारें पांच कोस होती. पण सगळे स्वार दौडत निघाल्यामुळें ते ठरलेल्या वेळाच्या आंतच तेथें जाऊन पोहोंचले. जातांच खुश्रू प्रथम घोड्यावरून खालीं उतरला व घोडा तसाच सोडून तो धांवत धांवत सम्राटच्या महालाशीं आला व मुख्य पहारेकऱ्याला उत्सुकतेनें म्हणाला, "शहानुशहाची तब्यत आतां कशी काय आहे?"

पहारेकऱ्यानें आपली समशेर खालीं करून शहाजाद्याला सन्मान दिला आणि कुर्निस करून नम्र स्वरानें म्हटलें, "जनाब! सम्राट्ची तब्यत काल रात्रीं अतिशयच बिघडली होती, पण आज पहाटेपासून त्यांना बरीचशी हुषारी वाटत आहे."

या बातमीनें खुसरूला बरेंचसें समाधान झालें व तो पुन्हा त्याला म्हणाला, "यावेळीं शहानुशहा कुठें आहेत बरें?"

"आपल्या खास महालांत बसले आहेत."

" तिथें आणखी कोण कोण आहे ? "

" महाराज बिरबल आणि त्यांचा अभिन्नहृदयी मित्र अबूलफत्जल. "

हीं प्रश्नोत्तरें झाल्यानंतर खुसरू तिथें न थांबतां घाईघाईनें सम्राटच्या खास महालांत आला. आंत येऊन पहातो तों सम्राट् अकबर स्वर्णखचित मंचकावर अर्धशायितावस्थेंत बसून बिरबलशीं गोष्टी करीत होता; पण त्याची आशातुर नजर मात्र वरचेवर दरवाजाकडे वळत होती, खुसरू एकदम पलंगाजवळ गेला आणि गुडघे टेंकून त्यानें आपल्या आजोबाला कुर्निस केला व म्हटलें, " दादा ! आपली प्रकृति आतां कशी आहे ? "

भारतसम्राट् अकबर खरोखर खुसरूची मोठ्या आशेनें वाट पहात होता व आतां येईल घटकेनें येईल असें वाटूनच त्याची दृष्टि वारंवार दरवाजाकडे वळत होती. आणि अशा स्थितींत खुसरू एकदम येऊन जेव्हां त्याच्या पायाशीं नम्र झाला व रुद्ध स्वरानें त्यानें वरील प्रश्न केला तेव्हां नातवाचा आपल्यावरील श्रद्धा व प्रेम पाहून अकबराला धन्यता वाटली. त्याच्या हृदयांत खुसरूबद्दल किती तरी विचार येऊन गेले.

पहिला प्रेमाचा झटका कमी होतांच सम्राटनी खुसरूला आपल्याजवळ घेतलें आणि त्याच्या तोंडावरून हात फिरवीत प्रमळ स्वरानें म्हटलें, " वाः किती लवकर आलास खुश्रू ! कालच्या त्या भयंकर आजारांतून जर माझी सुटका झाली नसती तर आज तुला आपले अश्रू माझ्या कबरेवरच ढाळावे लागले असते; पण आतां ती भीति नाहीं. "

सम्राटच्या बोलण्यानें खुसरूच्या अंतःकरणाला बराच मोठा आघात बसला. तो दीन करुण स्वरानें म्हणाला, " असे निष्ठुर आणि घातक शब्द उच्चारूंहि नयेत जहापनाह ! आपल्यावांचून या हतभाग्याच्या स्थितीकडे पहाणारें दुसरें कोणीही माणूस नाहीं ! "

सम्राटनीं हा विषय तितकाच ठेवून दुसराच एक विषय काढला. ते म्हणाले, " तूं अम्बरहून सरळच इकडे आलास का ? "

" होय जहांपनाह ! "

" तर मग तुझी आई कां आली नाहीं तुझ्याबरोबर ? "

" ती अलाहाबादला सुलतान सेलीमकडे गेली आहे. "

"अलाहाबादला ? [illegible] तिला तिकडे जाण्याची सल्ला कुणीं दिली ?"

"कुणीं नाहीं. ती स्वतःच्या इच्छेनेंच गेली."

"मी आजारी आहें हें तुझ्या आईला माहीत नाहीं काय ?"

"नाहीं. तसें तिला माहीत असतें तर ती तिकडे गेली नसती. अलाहाबादेहून एक जरुरीचा आदेश आल्यावरून तिला तिकडे जाणें भाग पडलें."

"हं समजलों. सेलिमाच्या अनेक गूढ रहस्यांचा हा एक नवा धागा आहे. एकाद्या वेळीं त्याच्या या रहस्यांची शक्ति इतकी तीव्र आणि रहस्यमय असते कीं, त्या ठिकाणीं माझ्या उपदेशाचें अगर हुकमाचें कांहींच चालत नाहीं. बरें तें जाऊं द्या. तुझा मामा,—राजा मानसिंग–सध्यां कुठें आहे बरें ?"

"तें अम्बरच्या राजवाड्यांतच आहेत, पण त्यांचा लवकरच इकडे येण्याचा विचार आहे."

या वेळीं सम्राट् अकबरच्या भृकुटी किंचित् वक्र झाल्या. खुसरूनें त्या पाहिल्या नाहींत हें खरें, पण तीक्ष्ण नजरेच्या अबुल फाजलला मात्र त्या दिसल्यावांचून राहिल्या नाहींत. ती भृकुटींची वक्रता पाहून फाजलचें अंतःकरण चमकलें. कारण, सम्राट्च्या भुंवयांत काय सामर्थ्य आहे हें, तो जाणून होता.

थोड्याच वेळांत शारदाकाशाप्रमाणें अकबराचा चेहेरा स्वच्छ झाला. नुकतेंच ज्या काळ्या मेघांचें दर्शन झालें होतें ते पार कोठच्या कोठें निघून गेले. नंतर अकबर शांत स्वरानें खुसरूला म्हणाला, "इथें न येतां तूं प्रथम आपल्या रंगमहालांतच जाणें योग्य होतें. त्या ठिकाणीं एक माणूस तुझी वाट पहात व दीर्घ सुस्कारे सोडण्यांत वेळ घालवीत आहे. जा. आधीं त्या निरपराधी बालिकेला शांत करून ये. मग आपण बोलत बसूं."

बादशाहाच्या या बोलण्यानें खुसरू कांहींसा लज्जित झाला, पण भारतेश्वराचा आदेश उल्लंघन करण्याची शक्ति कुणाला बरें आहे ? खुसरूनें लागलीच तो महाल सोडला व तो बाहेर आला.

या वेळीं खुसरूच्या मनाची स्थिति हेमन्तकालच्या सुनील आकाशा-

प्रमाणें अगदीं मेघशून्य अशी होती. या प्रसन्नतापूर्ण स्थितींत मानसिंह, दुर्जयसिंह आणि तज्जनीत इतर व्यापार यांनी तो पार विसरला होता म्हटलें तरी चालेल. पौर्णिमेचीहि त्याला आठवण राहिली नाहीं. इतकेंच नव्हे आईचे रागाचे शब्द व त्या वेळच्या प्रसंगाचीही त्याला पूर्ण विस्मृति पडली जणूं काय तें एक स्वप्नच असावें. खुसरूचा चंचल आणि अविचारी स्वभाव अशा तऱ्हेचा होता कीं त्यांत खुनशीपणा अगर मत्सर यांचें वास्तव्य नव्हतें. जें काम होईल तें तेवढ्यापुरतेंच मागाहून त्याचा आपणाशीं कांहींच संबंध नाहीं अशीच त्याची वागणूक असे.

खुसरूचे प्रेमळ आजोबा सम्राट् अकबरशाहा यांनीं आपल्या नातवासाठीं फत्तेपूरशिक्री येथील मोठ्या राजवाड्यांत एक स्वतंत्र आणि अत्यंत मनोहर असा महाल बांधून ठेवला होता, आणि त्याचें नांव त्यानें 'प्यारे महाल' असें ठेविलें होतें. खुसरूची सहधर्मिणी "प्यारीबानू" हिच्या नांवावरूनच हें नांव त्या महालाला देण्यांत आलें होतें हें रसिकांना सांगावयास नकोच.

प्यारी बानू त्यावेळच्या सुंदर रमणींत सौंदर्यशालिनी म्हणून प्रसिद्ध होती, आणि याबद्दल पूर्वी एके ठिकाणीं उल्लेखही केलेला आहे कीं, 'अकबरानें आग्रा शहरांतील असंख्य सुंदरींतून या कोमलांगीची निवड केली होती.' अर्थात् प्यारी ही त्याची फारच आवडती व खुसरूसारखीच लाडकी नातसून होती. वृद्ध सम्राट् अकबर, बानूचें तें अप्सरातुल्य लावण्य पाहून अनेकदां मनांत म्हणे कीं, 'खुसरूसारख्या भराऱ्या मारीत फिरणाऱ्या विहंगमाला या बानूसारख्या हिऱ्याच्या पिंजऱ्यांतच अडकून ठेवला पाहिजे. आणि असें केलें म्हणजेच तो कधींच पळून जाणार नाहीं.'

खुसरूच्या अदृष्टाशीं प्रेमसूत्रानें आबद्ध झाल्यामुळें शहाजादी बेगम प्यारेबानू, सम्राटच्या विशेष ममतेला पात्र झाली होती. सम्राटला ज्याप्रमाणें खुसरू नेहमीं आपल्याजवळ ठेवण्यांत आवड वाटे, त्याप्रमाणेंच त्याची पत्नीही नेहमीं आपल्याबरोबर फिरविण्यांत त्यांना समाधान वाटे. खुसरू आणि बानू हीं एकत्र झालेलीं हृदयें सम्राटच्या आत्यंतिक प्रेमाला विशेष आकर्षक झालीं होतीं यांत संशय नाहीं. आणि यामुळें बानू ही फत्तेपूरशिक्रींतील एका बड्या महालाची मालकीण बनून विलासांत मग्न झाली

होती. अकबर ज्यावेळीं आग्रा येथून निघाला त्याच वेळीं त्यानें बानूलाही बरोबर घेतलें होतें.

सौंदर्यशालिनी प्यारीच्या सौंदर्यावर शहाजाद्याचें-खुसरूचें-अत्यंत प्रेम असून तो तिच्यावर अगदीं लुब्ध झालेला होता. प्यारेबानूच्या उज्ज्वल नेत्रांचें प्रणयानंदानें चमकणारें तेज पाहून खुसरूचें चंचल आणि विलासी अन्तःकरण तिच्याभोंवतींच नेहमीं घिरट्या घालीत राहात असे. तिच्याजवळून त्याच्यानें दूरच सरवत नसे; पण निरनिराळ्या गोड नांवानींहि हाका मारूनही त्याची तृप्ति होत नसे.

प्यारेबानूच्या स्वरूपाला सौंदर्याचीच उपमा देतां आली असती. कारण दुसरी कसली उपमाच देतां येणें शक्य नव्हतें. तें तिचें लावण्य क्षणोक्षणीं वाढणारें असून विद्युत्शिखेप्रमाणें तेजस्वी आणि पौर्णिमेच्या चंद्रकिरणांप्रमाणें स्निग्ध होतें. तिचें केवळ स्मितहास्य पाहूनच खुसरू वेडा होऊन जात असे. ती त्याच्याकडे प्रेमानें पाहूं लागली म्हणजे आपण कुठें आहों याचेंही त्याला भान राहात नसे. तिचा गोंडस व नाजुक हात आंगाला लागतांच व तिच्या तोंडचे 'जनाब, हृदयेश्वर,' वगैरे मधुर शब्द ऐकतांच खुसरूला आपण परींच्या साम्राज्यांत असून त्यांचें मधुर गायन ऐकत आहों कीं काय असेंच वाटे. तिच्या स्पर्शसुखानें त्याची समाधी लागे आणि ती एक क्षणभर त्याला दिसली नाहीं कीं तो कावराबावरा होई.

पतंग ज्याप्रमाणें उज्ज्वल दिव्याची ज्योत पहातांच आपल्याला विसरून त्याच्याकडे धांव घेतो, त्याप्रमाणेंच खुसरूही प्यारेबानूच्या प्रदीप्त स्वरूपज्योतींत पतंगासारखा बेभान होऊन मिसळून गेला होता. एकसारखा पुष्कळ वेळपर्यंत जरी तो आपल्या प्यारीकडे पहात राहिला तरी तो थकत नसे. फार काय सुस्कारा सोडण्याचाही त्याला विसर पडे. एकसारखें पहातच रहावेंसे त्याला वाटे. तिचे आपणाकडे पहाणारे सुंदर नेत्र मूकभाषेंत आपणाला कोणता संदेश सांगत आहेत, हें समजावून घेण्याचा तो प्रयत्न करी; पण त्याला यश येत नसे. नेहमीं प्रफुल्लितपणें हंसत राहणाऱ्या तिच्या आरक्त अधराची सकंपता जेव्हां त्याच्या लक्ष्यांत येई तेव्हां तो तिचें चुम्बन घेण्यासाठीं आपल्या भावमुग्ध ओठांना पुढें करी, पण त्यावेळींही ते कांपणारे ओंठ आपणाला आणखीहि कांहीं विशेष रहस्य सांगत आहेत असेंच त्याला वाटल्या-

वाचून राहात नसे. केव्हां केव्हां ते रहस्य समजून न आल्यामुळें तो मोठ्या संशयांतहि पडे.

केव्हां केव्हां ती रूपवती प्यारी कौतुकानें हंसतां हंसतां तें हास्य आपल्या नाजूक ओंठांनीं दाबून ठेवण्याचा प्रयत्न करी आणि सलज्जतेनें खुसरूचें अपांगावलोकन करून मृदु मधुर स्वरानें म्हणे, " असं सारखं टक लावून काय पहायचं माझ्याकडे ! मी आपणाला इतकी का विचित्र दिसतें ? "

यावेळीं खुसरू प्रेमविमुग्ध होऊन कांहीं तरी बोललेंच पाहिजे म्हणून बोले, " काय पहात आहें म्हणतेस ? जें जन्मजन्मांतरींही पाहून आशा तृप्त झाली नाहीं, आणखी आणखी पहात पाहाण्याचाच मोह वाढत आहे, सुंदरी तेंच मी पहात आहें, माझ्यासारख्या अरसिक माणसाला लाभलेलें हें रसिक आणि अमोलिक रत्न कसें काय आहे याचीच मी परीक्षा करीत आहें.यक्षांच्या आणि पऱ्यांच्या राज्यांतील मुख्य सम्राटाच्या महालांतही जें सौंदर्य हजारों प्रयत्नांनीं मिळूं शकणार नाहीं तें मला लाभलेलें पाहून मी डोळे झांकून कसा बरें स्वस्थ बसेन ? पाहीन, प्यारी, मी असाच तुझ्याकडे पहात राहीन. कारण मला तुझ्याकडे पहावेंसेंच वाटतें; पण प्यारी ! तुझ्या या स्वरूपाला आणि सद्गुणाला मी योग्य नाहीं असेंच मला वाटतें. आहे का? सांग! हंसूं नकोस. तुझें तें हास्य पाहिलें कीं मी आणखी असाच किती वेळ तरी पहात राहीन. कारण तुझ्या त्या स्मितहास्यांत तशीच कांहीं विलक्षण जादू आहे-तसेंच तुझ्याइतकें निस्सीम प्रेम तरी प्रिये, मला अन्यत्र कुठें बरें मिळणार ? "

खुसरूचें हें गंभीर अनुरागमय भाषण ऐकून प्यारीबेगम किती तरी लाजली होती. तिला केवढी तरी धन्यता वाटली होती, आणि त्यावेळचा तिचा चेहेरा तर फारच बहारीचा दिसला होता. ती लाजत लाजत तेथून दूर सरली व पलीकडील महालांत जातां जातां मनांत म्हणाली होती कीं, " नाथ ! आपल्या या प्रेमाचा योग्य मोबदला मी या जन्मांत कधीं तरी देऊं शकेन का ? कसलें माझें रूप आणि कसले माझे गुण !! आपल्या पायांचीहि दासी शोभण्याला मी लायक तरी आहें कीं नाहीं कुणाला माहीत ! मग असल्या दासींचीही दासी शोभणाऱ्या या प्यारीला इतका मोठेपणा कशाला पाहिजे बरें हृदयेश्वर ? जन्मजन्मांतरीं मी आपलीच दासी होऊन राहीन— "

खरोखरच त्याकाळीं या सौंदर्यशालिनी प्यारीबेगमवरच खुसरूचें एकांतिक व निष्ठापूर्ण प्रेम होतें. त्याला तिच्यावांचुन दुसरी कोणतीही स्त्री चांगली वाटली नाहीं. तो अनेक वेळीं एकांतांत बसून मनांत विचार करी, ' ही प्यारी खरोखरच अतुलनीय सौंदर्यवती आहे, आणि त्यामुळेंच मी सर्वस्वीं तिचा दास होऊन राहिलों आहे. माझें हृदय ती आहे आणि माझा प्राणही तीच आहे. या जगांत मला माझें म्हणायला असें कोणीहि नाहीं. कर्मफलाच्या योगानें मी सर्वांच्या डोळ्यांना दुःसह झालों; पण माझे सगळे दोष, अवगुण, दुर्बलता, पापपुण्य सर्व कांहीं या माझ्या प्रियकरणीला माहीत असून ती माझ्यावर आत्यंतिक प्रेम करीत आहे. ती माझा कधींच तिरस्कार करीत नाहीं."

ज्याप्रमाणें खुसरू, त्याचप्रमाणें प्यारीबानूहि मनांतल्या मनांत शहाजाद्याचेंच वर्णन करण्यांत गढून जात असे. ती जगांतील दुसऱ्या कोणाही माणसाबद्दल कधींही विचार करीत नसे. ती आपल्या सुंदरकान्तिमय प्रियकराचें नेहमीं ध्यान करण्यांतच आनंद मानीत असे. त्याच्या इतका सुंदर, प्रेमळ आणि सद्गुणी मनुष्य तिला जगांत कोणीच नाहीं, असें वाटे. त्याच्या मधुर आणि मुग्धकारी स्वराला ती निरुपमेय समजे. प्रियकराचे नेत्र आपल्या चेहऱ्याकडे वळतांच ते आपणाला, " प्यारी, तूंच माझें सर्वस्व ! या विशाळ जगांत केवळ तूं आणि मीच आहों. आणखी कुणाचेंही अस्तित्व नाहीं—" असेंच सांगत आहेत असें तिला वाटे. पतीबद्दल पत्नीनें विपरीत संशय घेणें हे तिला भयंकर पाप वाटे. घात करणारें जर कोणचें पाप असेल तर हेंच, अशीच तिची पक्की समजूत होती.

प्यारी बेगमच्या मनाप्रमाणें, खुसरूच्या हृदयांत खुदानें जें प्रेम, देवसुलभ महत्त्व, जे बालकोचित सारल्य आणि जी निसर्गाप्रमाणें उदारता दिली होती ती जगांत आणखी कुणालाही दिली नव्हती. आणि त्यामुळेंच तिनें आपलें सर्वस्व त्याच्या स्वाधीन केलें व ती त्याच्याशीं एकजीव झाली होती. खुसरूला जें सुख तें तिला सुख व खुसरूला जें दुःख तेंच तिला दुःख अशी तिचे मनोविकारांचीहि एकभावना झाली होती- तो हंसला कीं तिला हसूं येई आणि त्याच्या चेहऱ्यावर थोडीशी खिन्नता दिसली कीं ती घाबरून जात असे. ती त्याच्यासाठीं पाहिजे तो त्याग करायला तयार असे. खुसरू कधीं तिला कठोर शब्द बोलत नसे; पण बोलला असता तरी त्याबद्दल तिला

मुळींच विषाद वाटला नसता. इतकी तिच्या हृदयाची तयारी असून आपण आपल्या पतीसाठीं कांहींच करूं शकत नाहीं याबद्दल तिला दुःख वाटे. असो.

एकदोन महिन्यांपूर्वीच खुसरू आपल्या आईसह याच फत्तेपूर शिक्रींतून अम्बरला गेला होता; पण तो तिकडे गेल्यानंतरचा प्रत्येक दिवस प्यारीबानू अत्यंत उदासीनतेंत घालवीत होती. ती वेड्यासारखी महालासभोंवतीं फिरे आणि फिरून महालांत येई. व तेथें बराच वेळ ती मुरुमुरुदन करून पुन्हां बाहेर जाई. रात्रंदिवस तिचा अशा रीतीनें चालला होता. ती कितीदां तरी रात्रीच्या रात्री पतीची वाट पहात खिडकींत बसून राही. तिला झोंप तर मुळींच येत नव्हती. आणि जसजसे खुसरूला जाऊन ज्यास्त ज्यास्तच दिवस होत चालले तसतशी ती वेडीच बनत चालली. तिचें खाण्यापिण्याकडेहि लक्ष उडालें. विलासाच्या वस्तूकडे तर ती ढुंकूनही पहात नसे. खुसरू नसल्यामुळें तिला तो सर्व महालच स्मशानासारखा वाटे. खुसरूच्या तसबिरीला ती मनोभावानें फुलें वाही व माळा घाली; आणि त्यांतच तिचा जो वेळ जाई तोच काय तो तिला समाधानाचा आणि आनंदाचा वाटे; पण तेथून उठतांच पुन्हां ती पूर्वीपेक्षांहि जास्त व्याकुळ होऊन जात असे. या अशा अनास्थेमुळें तिचें पूर्वीचें सौंदर्यहि, सूर्याच्या तापानें कोमेजलेल्या पुष्पाप्रमाणें निष्प्रभ दिसूं लागलें होतें, आणि खुसरूच्या दर्शनावांचून त्याला मुळींच टवटवी येण्यासारखी नव्हती.

चंद्रिकाविधौत उद्यानांतील पुष्करणीवर बसून आपल्या विरहाचा ती विचार करूं लागली म्हणजे केव्हां केव्हां तिचें मन इतकें बेफाम होत असे कीं, ती दीन स्वरानें म्हणे, " नाहीं, नाथ ! मला आतां आपला हा विरह मुळींच सहन होत नाहीं. हें हृदय आतां आपल्या सान्निध्यावांचून श्वासोच्छ्वासहि करूं शकणार नाहीं. हृदयेश्वर ! आपण माझें सर्वस्व नेलेंत. मग मी येथें कशी बरें राहूं ? दासदासींकडून सेवा घेण्यांत मला आनंद वाटत नाहीं आणि विलासाचे बादशाही भोगहि मला आतां नकोसे वाटतात. त्यांची मला आवडच नाहीं. मोंगलसम्राटाच्या स्वर्णखचित रंगमहालांतील गुलाबपाण्याचे तुषार मला अग्निकणाप्रमाणें वाटत आहेत. भारत सम्राट् अकबर यांची मी अत्यंत लाडकी सून आहे, मला ते केव्हांही कांहीं कमी पडूं देत नाहींत, घटके घटकेला समाचार घेतात, पण त्यांच्या त्या ममतेनेंहि मला सुख होत नाहीं. जी सगळी

पांखरें मीं हौसेनें बाळगिलीं होतीं व ज्यांच्याशीं आपण दोघेंहि मोठ्या आनंदानें बोलत बसत असूं, त्यांना मीं आतां उडवून लावलीं आहेत. कारण ती आठवण झाली कीं, मला मुळींच चैन पडेनासें होतें. माझी आवडती वीणा, जिला मीं क्षणभरहि दूर सारलें नाहीं, ती कोपऱ्यांत पडून राहून माझ्याकडे दीन मुद्रेनें पहात असते; पण आपल्यावांचून मला कांहीं सुचतच नाहीं. ' हाय ! हाय ! ! ' म्हणण्यापलीकडे व अश्रु गाळण्यापलीकडे मी आतां कांहींच करीनाशी झालें आहे. माझे ते मर्मभेदी सुस्कारे तरी आपणाला ऐकूं येतात का ? नाथ ! मला विसरण्या इतके आपण कसे बरें निष्ठुर झालां ? यावं ! प्रियकरा ! ! आपल्या वियोगानें माझें सौंदर्य तर मावळत चाललेंच; पण आतां ही प्राणज्योतहि विझून जाईल; नाहीं. पण नाथ ! आपल्या आदर्शनांत मला मरण यावं असं मला वाटत नाहीं. आपण याच गडे लवकर. मला एकवार आपल्या विशाल व प्रेमळ हृदयाशीं धरा कीं, लगेंच माझें समाधान होईल. मग माझं कांहीं झालं तरी हरकत नाहीं. अनेक दिवस मीं आपल्या कोमल आलिंगनपाशास मुकलें आहे तरी आपण लौकर येऊन मला पाशबद्ध करावें असेंच वाटूं लागलें आहे. किती तरी वर्षें आपला कंठस्वर ऐकला नाहीं असा मला भास होत आहे. तेव्हां विलंब न लावतां शक्य तितक्या लवकर या आणि या विरहिणीस......"

---

# प्रकरण १० वें.

---:o: --

## मधुर—मीलन

प्रेममयी आणि विरहानें दीन झालेल्या प्यारेबानूच्या महालांतील तिच्या खास बैठकीच्या खोलीच्या दाराशीं येतांच खुसरूला अमृतमय संगिताचा झंकार ऐकूं आला. अर्थात् गानप्रिय खुसरू मंत्रमुग्धवत् होऊन तेथेंच थबकला. त्यानें दरवाजाच्या आंत कांहीं पाऊल टाकलें नाहीं तोंच गायन ऐकूं आलें.

प्यारीबानू गात होती—

रोने के सिवा मेरे तो कुछ बश् नहि!
देखने के सिद्दा तेरे तरफ कुछ उमेद नही।
दिल्के जख्मे तुम्कर न सके मरहम्!
खूंके कतार वैसाहि रहि!
खेयाले आजादीके आयाथां तेरे पाश।
तुम्भी देखते रहो क्या तेरे कुछ बश नही!

*　　　　*　　　　*

## सारंग.

सैतान घर ना जाय-अरे मोरा सैया।
बेगम घर ना जाय-हा मोरा सैया॥ धृ०॥
बार बार कर जोरि बिनतह्।
और परत तोरि पैया
अरे मोरा सैया॥ १॥

हस्तिदंतानें तयार केलेल्या स्वर्णखचित सारंगीच्या मधुर सुराशीं आपला स्वर मिळवून प्यारीबानू गात होती. बैठक जमिनीवरच घातली असून वर चांगलाच गालिचा पसरला होता. प्यारीबानू गायनशास्त्रांत निपुण असून तिचा स्वरही फारच गोड होता. ती जेव्हां सारंगीच्या अगर वीणेच्या सुराशीं आपला वीणाविनिंदित सुर मिळवून इतक्या कोमल ताना व आलाप घेत असे, तेव्हां सारंगीच स्वतः गात आहे कीं काय असा भास होई. सम्राट् अकबरशहा प्यारीबानूचें गायन ऐकून फारच खुष होत असत. व एकदा अशा खुशींतच त्यानें तिला ती सारंगी व वीन बक्षिस दिलें होतें. दरवेशी, दोहे, गजल ख्याल, ध्रुपदादि पदांचे आलाप ऐकवून बादशहाला संतुष्ट करण्यांत प्यारीला आनंद वाटे. व त्या गायनानें बेहोष झालेला सम्राटहि तिला न भूतो न भविष्यति देणग्या देत असे. मोत्यांची माळ, हिऱ्यांचीं फुलें, रत्नजडीत मुद्रिका आणि असंख्य आसरफी यांचा तर तिला नेहेमींच पुष्कळ लाभ होत असे. मात्र या सगळ्या वस्तू बादशहाकडून देणगीच्या रूपानें तिला मिळत असत.

खुसरूनें दरवाजांतच लपून राहून वरील हृदयस्पर्शी विरहगीत स्वस्थ-

पणानें शेवटपर्यंत ऐकलें. कारण हें असलें गायन त्यानें तिच्या तोंडून या पूर्वी कधींहि ऐकलें नव्हतें आणि ऐकण्याचा तरी प्रसंग येणार कसा ? कारण त्यापूर्वी तिला विरह म्हणजे काय हेंच मुळीं माहीत नव्हतें. पतीशीं प्रणयलीला करण्यापुढें तिला गाण्यालाहि फारच थोडा वेळ मिळत असे. हृदयेश्वराच्या चिरमीलनरूपी मधुर प्रलयांत ती नुसती डोलत राहिली होती; पण सध्यांच्या विरहाकुल स्थितींत तिचें तें सुखवसन्ताचें डोलणें कधींच संपलें असल्यामुळें केवळ रुक्षसुस्कारे सोडण्यापलीकडे तिच्याकडून कांहींच होण्यासारखें नव्हतें आणि म्हणूनच ती आज अगदीं करुणरवानें विरहगीत गात होती.

खुसरूनें पुष्कळ दिवस प्यारीबानूचें गायन ऐकलें नव्हतें. त्यांतून आजचें हें गीत ती अगदीं मनापासून आलाप घेऊन गात असल्यामुळें खुसरूला वाटलें कीं, " असलें गायन कोणींतरी गायिलें असेल का ? पौर्णिमाहि गाते, तिचीं विरहगीतेंहि ऐकलीं आहेत; पण यांत जो मधुरपणा आणि भावगांभीर्य आहे तो तिच्या गायनांत कोठें आहे ? " थोडा वेळ थांबून खुसरू पुन्हां मनांत म्हणाला, " माझ्या या प्यारेबानूपुढें त्या पौर्णिमेची काय थोरवी ? ती हिची दासी होण्यालाहि योग्य नाहीं.

आपलें गायन संपवून मांडीवर विराजमान झालेली सारंगी तिरस्कारानें तिनें बाजूला ठेवली आणि एक मर्मभेदक दीर्घ सुस्कारा सोडून ती गहिंवरून म्हणाली, " नाथ ! आपलें अन्तःकरण इतकें का कठोर आहे ? मी इतक्या जिवाभावानें हांका मारीत असतांहि त्या आपण ऐकून घेऊं नयेत ? "

हें तिचें केविलवाणें बोलणें ऐकतांच खुसरूला बाहेर उभें राहवेना तो अर्धवट झांकलेला दरवाजा एकदम उघडून आंत आला आणि हंसत हंसत म्हणाला, " प्यारी ! हा मी आलों ना ? मग मी कसा चरें निष्ठुर ! ! "

प्यारीला वाटलें, ' हें स्वप्न तर नव्हे ? आणि हें जर स्वप्नच असेल तर खुदा याचा भंग तूं केव्हांच करूं नको. मला स्वप्नमय सुखाचा तरी उपभोग घेऊं दे ' आपल्यासमोर उभ्या असलेल्या खुसरूकडे पाहून प्यारी अगदीं वेडी झाली आणि तिनें त्याला प्रेमभरानें आलिंगन देऊन आवेगपूर्णस्वरानें म्हटलें, " आपला चेहेरा इतका खिन्न कां बरं जनाब ! ! "

खुसरू आपल्या प्रियदयितेच्या कांपऱ्या अधाराचें चुम्बन घेऊन व तिला एका मखमली कोंचावर बसवून आपण तिच्याजवळ बसला आणि तिचें

दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन सस्मित चेहेऱ्यानें म्हणाला, " बराच लांबून आल्यामुळें माझा चेहेरा खिन्न दिसत असेल. कारण अम्बरहून मध्यें विश्रांति न घेतां मी एकदम येथें आलों आहें; पण लाडके! तुझ्या दर्शनानें तो आतां प्रफुल्लित झालाच पाहिजे. "

प्यारीला अत्यंत आनन्द झाला होता. आपला प्राणेश्वर दमून आला आहे हें समजतांच तिनें प्रथम आपल्या हातांत मोरांच्या पिसाऱ्याचा पंखा घेतला आणि ती त्याला वारा घालूं लागली. नंतर उत्सुकतेनें म्हणाली, " सम्राटची भेट घेतली काय? काल त्यांचा आजार फारच वाढला होता. आणि आपण अशा वेळीं इथं नसायचं यामुळें तर मला फारच भीती वाटूं लागली; पण खुदाचें मला पूर्ण साहाय्य असल्यामुळें माझ्या परिचर्येला त्यानें यश दिलें आणि तो प्रसंग निभावला! पण नाथ, जावं बरं आधीं त्यांना भेटाया? नकाच थांबू गडे! "

खुसरूनें हंसत हसत पुन्हां एकदां आपल्या प्रियेचें चुम्बन घेऊन म्हटलें, " अग मी त्यांना भेटल्यावांचुन का इकडे आलों आहे? त्यांनींच तर मला प्रथम तुझी भेट घेण्याचा हुकुम केला आणि म्हणूनच मी इकडे आलों. पण आपण गायनांत अगदीं तल्लीन झालेल्या पाहून व बरेच दिवस आपलें गायन ऐकलें नाहीं हा विचार करून मी दरवाजाबाहेरच उभा राहिलों होतों; पण त्यानंतर तुझे ते केविलवाणे शब्द ऐकतांच माझ्यानें बाहेर उभे रहावेंना. "

प्यारी, प्रफुल्लितपणानें म्हणाली, " तर मग ज्यांच्यासाठीं तें गायन होतें त्यांनीं तें ऐकलं म्हणायचं! पण गडे त्या गाण्यांत कांहींच अर्थ नव्हताहो! मी आपली वेड्यासारखी कुठचे तरी शब्द कसे तरी गात होतें. तें पद मी कुणाच्याशा तोंडून ऐकलं होतं बरं का? माझंच नव्हे कांहीं तें पद! "

" छे छे; पण मीं तें कोणीं केलें आणि कां केलें याची चौकशी कशाला करतो. तूं म्हटलेंस आणि त्या पदाला अनुसरून पुढचे शब्दही तूंच उच्चारलेस. अर्थात् तुझ्याच तोंडून सगळा उलगडा झाला आहे. आतां तूं जें मला सांगशील तें मी तुझ्या समाधानासाठीं पाहिजे तर खरें मानतों; कारण मला त्याच्याशीं काय करायचं आहे? "

असो. खुसरूचें दर्शन होतांच आणि तें जाग्रतावस्थेंत आहे हें लक्षांत येतांच ती मागील सर्व दुःख विसरली. तिच्या दोन महिन्यांच्या विरहवेदना प्रियकराच्या दर्शनाबरोबरच नाहींशा झाल्या व सूर्यदर्शनानें जशी कुमुदिनी विकसित होते तशी तिची कळी उमलली. तिनें स्मित हास्य केलें, तिचा चेहेरा खुलला आणि ती प्रफुल्लितपणानें प्रियकराकडे पहात फक्त डोळ्यांनींच भिवयांच्या साहाय्यानें कृत्रिम कोप दाखवून म्हणाली, " जनाब ! माझी आपणाला इतके दिवस मुळींच आठवण होऊं नये ना ? आपल्या वाटेकडे डोळे लावून बसणारी मी वेडीच तर आतां मला पाहतांच माझ्यासारखं बोलायचं गडे ! पण मी आतां आपणाला असं अशी स्वस्थ मुळींच बसूं द्यायची नाहीं. मी माझ्या स्वतःच्या हातांनीं स्नान घालीन, सरबत देईन आणि पुष्कळ पुष्कळ शिक्षाहि करीन ! सम्राट् तर माझ्या शब्दाबाहेर कधींहि जाणार नाहींत. मी नुसतें हूं म्हणण्याची खोटी कीं ते माझें पाहिजे तें कल्याण करूं शकतील. आज मी त्यांना सुद्धां स्नान वगैरे घालून खाना देणार आहे. खरोखर खुदा ! आज माझें हें केवढें भाग्य ! नुसत्या खुणेसरशी भारत सम्राट् पाहिजे तें करायला तयार आहेत. नाथ ! असं माझ्याकडे काय पहायचं बरं ? उठावं आतां. "

नंतर खुसरू मन्त्रमुग्धासारखा उठला व त्यानें वस्त्रपरिवर्तन केलें. प्यारीनेंही बोलल्याप्रमाणें करण्याला कमी केलें नाहीं. तिनें सोन्याच्या चवरंगावर बसवन व उंची अत्तरें आंगाला लावून सुवासिक जलानें आपल्या प्राणदेवतेला स्नान घातलें. त्याची कोणतीही हरकत ऐकली नाहीं आणि राजाला योग्य असा व तिला आवडणारा तोच पोषाख तिनें खुसरूला स्वतःच्या हातांनीं चढविला. नंतर ती त्याला भोजनगृहांत घेऊन गेली आणि त्या ठिकाणीं तिनें त्याच्याकडून उत्तमोत्तम पदार्थांचें भोजन करविलें. सुरस फळें खावविलीं आणि उत्कृष्ट सरबतानें झालेले सगळे श्रम नाहींसे केले या वेळीं प्रिय व गोंडस हातांनीं झालेल्या त्या आदरामुळें व प्रेमाच्या सेवेमुळें खुसरू अगदीं खुष होऊन गेला असला तर त्यांत आश्चर्य तें कसचें ? प्यारी जें जें करी तें तें तो निमूटपणें करवून घेई. तिच्या वागण्यांत अगर सांगण्यांत अडथळा करण्याचें त्यानें एकदांहि मनांत आणिलें नाहीं. अर्थात् खाद्यपेयाचा पहिला प्रसंग मोठ्या मजेनें पार पडला.

जेवणानंतर प्यारीबेगम खुसरूसह पुन्हां आपल्या खास महालांत आली. आणि त्रयोदशगुणी तांबूल देतां देतां तिनें सलज्ज दृष्टीनें त्याच्याकडे पहात मधुर स्वरानें प्रश्न केला, "अम्बरहून आपण एकटंच यायचं झालं. मग मासाहेब कुठें आहेत? त्या कां नाहीं आल्या?"

खुसरू कांहींसा विचार करून गंभीरस्वरानें म्हणाला, "शहाजादेसाहेबांच्या आदेशाप्रमाणें त्या अलाहबादेला गेल्या आहेत."

"सम्राट्‌ची प्रकृति बिघडली आहे, हें त्यांना समजलं नाहीं वाटतं?"

"नाहीं. इकडून गेलेले सैनिक मला रस्त्यांत भेटले. यावेळीं मासाहेबांजवळून दुसऱ्याच एका रस्त्यानें मी बराच दूर आलों होतों."

"खुदाच्या मनांत काय आहे कुणाला माहीत! शहाजादेसाहेबांनीं आपणाला इथें जाण्याला हुकूम केला होता का?"

"नाहीं. त्यांनीं मला अलाहाबादला यायला सांगितलें होतें; पण मार्गांतच इकडून गेलेले स्वार भेटून सम्राट्‌ची तब्यत ज्यास्त बिघडल्याचें समजल्यावरून मीच होऊन इकडे आलों."

"नाथ! मी एक सामान्य स्त्री आहे अर्थात् माझी बुद्धीही क्षुद्रच असणार. अर्थात् आपल्या या जाण्यायेण्याच्या बाबतीसंबंधानें मला विशेष विचार करण्याचा अधिकार नाहीं हें खरें आहे; तरी पण मला इतकें समजूं शकतें कीं, आपण आज अलाहाबादलाच गेलें पाहिजे होतें. आपण तिकडे गेलां नाहीं याचा अर्थ कांहीं तरी विपरीत झाल्यावांचून राहणार नाहीं."

"प्यारी, कां बरं तुला असं वाटतं?" खुसरू साशंकित होऊन म्हणाला.

"सम्राट् अकबर यांचें क्षमाशील हृदय मीं आपल्या स्वाधीन करून घेतलें आहे, पण माझ्या सासऱ्याचें कठीण हृदय मला माझ्या अधिकारांत आणतां येणें अशक्य आहे. तें सामर्थ्य माझ्यांत नाहीं. ते फारच अभिमानी आहेत. त्यांना नेहमीं बारीकसारीक गोष्टीचाही संशय येतो व ते घटकेघटकेला अतिशय रागावत असतात. आम्हां दोघांच्याही दुर्दैवानें म्हणा, पण आम्हांला ते चांगल्या दृष्टीनें पहात नाहींत. अर्थात् आपल्या या येण्याच्या एवढयाशा कारणानेंही हा अग्नी पेट घेईल. सामान्य अशा एकाद्या ठिणगीनेंही महाप्रलय झाल्याचीं उदाहरणें आढळतात, हें आपणाला कळत नाहीं का? भावी कालाचा उज्ज्वल प्रकाश जरी समोर असला तरी भूतकालालाही विसरतां नये."

प्यारीबानू जें म्हणाली तेंच खरें होतें. आणि थोडासा विचार केल्यानंतर खुसरूच्याही तें लक्षांत यायला विलंब लागला नाहीं. थोडया वेळानें त्यानें एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हटलें, " प्यारी ! तूं जें म्हणतेस तें खरें आहे; पण भवितव्य जें कर्मफल उत्पन्न करीत असतें, दैव पडद्याआड राहून माझ्या भाग्यावर जी शक्ति प्रकट करीत आहे, त्या शक्तीला विरोध करण्याचें कोणत्याही प्रकारचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं, अर्थात् जें होणार तें होणारच. जें नशिबीं येईल तें भोगलेंच पाहिजे."

खुसरूच्या या गंभीर भाषणानें प्यारीबानूचें अन्तःकरण चमकलें. ती त्याला आलिंगन देऊन म्हणाली, " नाथ ! आपण जें बोललां तेंच खरें ! पण मला असें वाटतें, नशीब कांहीं मनुष्याशीं नेहेमींच वैर करतें असें नाहीं. जें दैव आम्हांला सध्यां प्रतिकूल आहे तें आतां पुढेंही तसेंच राहील असें कांहीं निश्चयपूर्वक सांगतां येणार नाहीं. तें एकदां प्रसन्न झालें कीं, त्याचे जुने लेख तेंच नाहींसे करील. आपणाला कांहीं करावें लागणार नाहीं. आशा पाहिजे. काळजी, उत्कंठा आणि शोक यांचें कारणच नाहीं. प्रकाश आणि काळोखासारखेच हेही प्रकार आहेत."

प्यारी खरोखरच मायाविनी असली पाहिजे. कारण तिचे मघांचे शब्द ऐकून खुसरूची झालेली गंभीर वृत्ति आतांच्या भाषणानें तिनें नाहींशी केली. इतकेंच नव्हे तर त्याचा चेहेराही कांहींसा प्रफुल्ल झाला.

आपली वृत्ति खुलविणाऱ्या हृदयेश्वरीच्या कपोलाचें प्रेमभरानें चुम्बन घेऊन खुसरू म्हणाला, " प्यारी ! लाडके !! तूं माणूस कीं परी ? यक्षकन्या तर नव्हेसना ? तुला हा असला संजीवनी मंत्र कुणीं दिला बरें ? मला समाधान वाटावें, मीं नेहमीं प्रफुल्लित असावें आणि मला शांतीचा उपभोग घेतां यावा, म्हणून तर खुदानें तुला माझ्याकडे पाठविली नसेल ना ? तुझ्या नुसत्या नेत्रकटाक्षानेंहि मृत देहांत जीवनाचा संचार होऊं शकेल. माझ्या निराशापूर्ण हृदयांत अन्धाराचें साम्राज्य माजलेलें होतें; पण तूं त्याठिकाणीं प्रकाशरेषा प्रकट केलीस !! अहाहा ! तुझ्यासारख्या देवतेला मी योग्य तरी आहें का ? "

प्यारीबानू आपल्या हास्ययुक्त चेहेऱ्यानें खुसरूच्या मनावर समाधानाचा ठसा उठवींत एक सलज्ज नेत्रकटाक्ष फेंकून त्याच्या

पायांजवळ बसली आणि कोमल पण सद्‌दीत स्वरानें म्हणाली, ' मी एक जादूच्या राज्यांतील परी आहें, हें आपणाला माहीत नाहीं का? नाथ! आपण मला अजून ओळखलें नाहींच का? खरोखरच परींच्या राज्यांत माझें रहाणें असतें. आपल्याला आणि सम्राट्ना फसविण्यासाठींच मी येथें आलेंय आहें, पण माझ्या या मोहिनीमंत्राचा गुरू कोण हें आपणाला माहीत आहे का? जर त्या जादुगाराचें नांव समजावें अशी आपली इच्छा असेल तर सांगतें. माझ्यांत जें कांहीं आज आपणाला विशेष दिसत आहे व आजपर्यंत दिसलें असेल तें सर्व मला भारतसम्राज्ञीकडून मिळालें आहे. मी त्यांची आजन्म ऋणी आहें. शिवाय या बाबतींत जो तिरस्कार अगर पुरस्कार मला मिळाला असेल तो त्यांच्याकडूनच. अर्थात् माझें विशेषत्व पहातांना माझ्या गुरुजींकडेहि आपणाला लक्ष द्यावें लागेल.

बरोबर याच वेळीं गंभीरस्वरानें कुणींसें दाराच्या बाहेरून म्हटलें, " वा: भारतसम्राज्ञीवरहि तुह्मी कसले तरी अपराध लादूं लागला का? "

हा स्वर त्या दोघांच्याही ओळखीचा होता. लागलींच दोघेंहि दरवाज्यांत गेलीं आणि गुडघे टेकून त्यांनीं सम्राट अकबराला कुर्निस केला. बाहेरून बोलणारा अकबरच होता. दोघेंही जवळ येतांच त्यानें त्यांचे हात आपल्या हातांत घेतले आणि तो हंसत हंसत प्यारी बानूला म्हणाला, " प्यारी, तूं आपल्या गुरूच्या निंदेला आणि आपले दोष तिच्यावर लादण्यालाहि सुरवात केलींस हें योग्य नाहीं. या तुझ्या गुन्ह्याबद्दल मी तुला अर्धा घंटापर्यंत पतिवियोगाची शिक्षा देतों. चल खुसरू, माझ्या खास बैठकीच्या दिवाणखान्यांत चल. आज तुझ्याशीं मला बऱ्याच गहन विषयावर बोलायचें आहें. " बोलतां बोलतां अकबरचा चेहरा गंभीर झाला. ते मृदु पण चिंतातुर स्वरानें पुढें म्हणाले, " खुसरू! आतां तूं लहान नाहींस. बाहेरून शांत, वैभवशाली आणि विलासी दिसणारें हें भारतसिंहासन, अंतरंगांत कसें आहे हें एकवार तुला पाहून ठेवणें जरूर आहे. "

प्यारी बेगम, बादशाहाच्या विनोदी भाषणाला व विनोदाला चांगलीच सरावलेली असल्यामुळें प्रथम प्रथमच्या शब्दांनीं तिला आनंदच होत होता. पण भारतसम्राट् अकबरशहाचें गंभीरतेनें चालणारें पुढील भाषण

ऐकून ती कांहींशी चिंतातुर झाली. सध्यां काय चाललें आहे आणि भारतवर्षाचा भावीकाल कसा आहे, याची तिला साधारण कल्पना होऊं लागली होती; पण बादशहांच्या आर्ताच्या भाषणानें, 'आपली ही कल्पना मूर्तस्वरूपांत येते कीं काय!' अशी तिला आत्यंतिक भीति वाटूं लागली व खुसरूसह बादशहा निघून गेल्यानंतरहि ती त्याच विचारांत गढून गेली होती.

---

## प्रकरण ११ वें.

---:o:---

### निराशा.

आतां आपण खुसरूला व बादशहाला येथेंच सोडून पौर्णिमेच्या मागून जाऊं. कारण तिची भेट घेतल्यावांचून पुढील कथानक समजणार नाहीं.

खुसरूच्या बाबतींत दुर्जयसिंहानें दाखविलेल्या अविचारामुळें राजा मानसिंहाची त्याच्यावर फारच इतराजी झाली होती. मानसिंहाचें खुसरूवर खरोखरच मुलापेक्षांही जास्त प्रेम होतें व त्याला वाटे, कीं, हिंदुस्तानचा सम्राट् होण्याला तोच योग्य आहे आणि यासाठींच त्यानें आपला नेहमींचा विश्वासू परिचारक दुर्जयसिंह याला, त्यानें खुसरूवर वार करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल, हद्दपारीची शिक्षा दिली होती. मानसिंहाना असें वाटलें होतें कीं, आपण सुदैवानें वेळेवर त्या गुहेत गेलों म्हणून बरें झालें. नाहीं तर दुर्जयसिंहाच्या तरवारीला खुसरू बळी पडला असता, आणि या भयंकर कर्माबद्दल राजा मानसिंहाकडून भारतसम्राट अकबरशहानें तावडतोब जबाब मागितला असता. त्या माझ्या जाण्यानें केवढी तरी मोठी आपत्ति टळली!"

दुर्जयसिंह, मानसिंहाच्या प्रेमाला पात्र झाल्यामुळें त्याला अनेक शत्रू उत्पन्न झाले होते, आणि या सर्व शत्रूंत राजा मानसिंहाच्या शरीररक्षक सैन्याचा मुख्य, लजपतसिंह हा मुख्य होता. व याच लजपतसिंहाचें पौर्णिमेशीं लग्न व्हायचें प्रथम निश्चित झालें होतें. पण तो हीनवंशज म्हणून,

पौर्णिमेच्या बापानें आपली मुलगी लजपतसिंहाला देण्याचें नाकारून दुर्जयसिंहाला दिली. आणि त्या दिवसापासूनच लजपतसिंह हा दुर्जयसिंहाचाव पूर्णिमेच्या बापाचा द्वेष करूं लागला.

दुसऱ्याचें अनिष्ट करण्याच्या दुर्जन मनुष्याच्या सामर्थ्याला जसजसा अडथळा होऊं लागतो तसतसें ते पैशाचिक सामर्थ्य जास्त भयंकर व जोरदार होत असतें. मानसिंहानें दुर्जयला पाठीशीं घातलेला अर्थात् त्याचें अनिष्ट करतां येणें शक्य नसल्यामुळें लजपतसिंह पौर्णिमेचा घात करण्याच्या खटपटीला लागला व या प्रयत्नांत आपणाला अनुकूल अशी मिळालेली लहानशी संधीसुद्धां तो व्यर्थ घालवीत नसे.

याच संधीला, दुर्दैवानें, पूर्णिमेच्या बापाला असाध्य आजार होऊन त्यांत तो स्वर्गवासी झाला. अर्थात् लजपतसिंहानें हा सुयोग व्यर्थ घालवायाचा नाहीं असें ठरवून तो पौर्णिमेवर नजर ठेवूं लागला, गरीब बिचारी पूर्णिमा लहानपणींच मातृहीन झाली असून आतां नुकतीच पितृहीन झालेली असल्यामुळें ती आपल्याच दुःखांत चूर असे. तिचा जन्म आग्रा येथें झाला होता, तरी तिचें मूळ घर अंबर येथें होतें. तिचा बाप रसद्खात्यावरील एक अधिकारी असल्यामुळें त्याला नेहमीं आग्र्यालाच राहावें लागे. पण सध्यां आजारीपणामुळें तो अम्बर येथें मुलीसह आला होता.

पूर्णिमा पितृहीन होतांच लजपतसिंहाच्या तावडींत सांपडली व त्यानें तिचा सूड उगविण्यासाठीं तिची आई व्यभिचारी होती व पूर्णिमा ही पापमार्गानेंच जगांत आली आहे असें त्यानें लोकांत जाहीर केलें, हां हां म्हणतां ही बातमी दुर्जयसिंहाच्या कानांवर आली. स्वाभिमानी व उच्च वंशाचा अतिरिक्त असलेल्या दुर्जयानें या लोकवार्तेवर विश्वास ठेवून गरीब बिचाऱ्या पौर्णिमेचा त्याग केला. लजपतसिंहाचें कारस्थान त्याला बिलकुल समजलें नाहीं इतकेंच नव्हे तर लजपतसिंह आपला व पौर्णिमेचा शत्रु आहे हेंहि त्याला माहीत नव्हतें.

दुर्जयसिंहानें पौर्णिमेचा त्याग केल्यावर तिला आपल्या स्वाधीन करून घेण्यासाठीं लजपतसिंहानें प्रयत्न केले नाहीं असें नाहीं, पण पूर्णिमेच्या शूर वर्तनाला व तीव्र दृष्टिनिक्षेपाला भिऊन तो ज्यास्त पुढें सरला नाहीं. सतित्वाच्या जाज्वल्य

लेजापुढे त्याला मान वांकवावी लागली. समोर चाल करून जातां येईना समोर चाल करून जाण्याच्या प्रयत्न त्यानें सोडून दिला.

मानसिंहानें दुर्जयसिंहाला कोणत्याशा गुप्त अपराधावरून अम्बरमधून हद्दपार होण्याची शिक्षा दिली आहे हें लजपतसिंहाला नुकतेंच समजलें होतें. तसेंच त्याच वेळीं, तीन दिवसानंतर जर दुर्जयसिंह अम्बरांत आढळला तर त्याला एकदम कैद करावें हेंहि जाहीर झाल्याचें त्याला माहीत होतें.

याच वेळीं फाल्गुनी पौर्णिमेचा उत्सव चालू असून सर्व लोक त्या उत्सवांत सामील झाले होते, सर्वांना वाटलें होतें कीं, दुर्जयसिंह हा दुर्ग सोडून गेला असेल, पण एका व्यक्तीला मात्र तसें वाटलें नाहीं,आणि ती व्यक्ति म्हणजे रजपुत कुलकलंक लजपतसिंह होय.

पौर्णिमेच्या दिवशीं रात्रीं कांहीं विशेष महत्वाच्या कामासाठीं शहराबाहेर गेलेला लजपतसिंह, मध्यरात्रीच्या सुमारास पहाडाच्या पायथ्याजवळून सरोवरच्या कडेनें असलेल्या पाऊलवाटेनें शहरांत येत होता; पण चालतां चालतां त्याला अकस्मात दोन माणसें बोलत असावेंत असा भास झाला त्यामुळें तो एका मोठ्या शीलेआड लपून पाहूं लागला. थोड्याच वेळांत त्या अज्ञात व्यक्तींचें बोलणेंहि त्याला ऐकूं येऊं लागलें. या दोन व्यक्ति म्हणजे दुसऱ्या कोणी नसून दुर्जयसिंह आणि पौर्णिमा होती. यांच्यांत त्या रात्रीं झालेलें भाषण वाचकांना माहीत आहेच.

विशेष सांगावयाचें म्हणजे हेंच कीं, पौर्णिमा निघून गेल्यानंतर पिशाच्याप्रमाणें दुर्जयाच्या पाठीमागून जाऊन लजपतसिंहानें त्याची गुप्तपणें राहण्याची जागा पाहून ठेविली व लागलीच राजा मानसिंगाला ती बातमी दिली.

दुर्जयसिंहानें जाणूनबुजून आपला हुकूम मोडला व तो लपूनछपून अद्याप अम्बरांतच आहे. हें लजपतसिंहाच्या सांगण्यावरून खरें मानून राजा मानसिंहानें त्याच वेळीं कांहीं शिपायी त्या गुप्त ठिकाणीं पाठविले व त्याला पकडून आणून त्यांनीं कैदेंत ठेवविलें पण तेथें असला राजकीय कैदी ठेवणें योग्य नव्हे असें वाटूनच कीं काय नकळे अम्बरहून दोन तीन कोसांवर असलेल्या रतनगडांत---राजा मानसिंहानें-त्या नव्या कैद्याची रवाना करून

दिली. तो किल्ला मानसिंहाच्याच मालकीचा असून महत्त्वाचे कैदी ठेवण्याकरितांच पसंत करण्यांत आला होता.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच ही बातमी पौर्णिमेला समजली; पण त्याचें गुप्त ठिकाण शोधून काढून मुद्दाम कैद करण्यांत मानसिंहाला काय लाभ झाला व दुर्जयावरचें त्याचें प्रेम इतकें एकदम कसें नाहींसें झालें याचा तिला उलगडा झाला नाहीं. तिनें मनांतल्या मनांत विचार करून ठरविलें, " दुर्जयसिंहाला मानसिंहाच्या रागांतून वांचविण्याला जर कोणी योग्य असेल तर तो खुसरूच होय. " अर्थात या विचाराप्रमाणें खुसरूचा शोध करून त्याच्याकडे एवढी कृपेची भिक्षा मागण्याकरितां ती अम्बरास येण्यासाठीं निघाली; पण कांहींसा रस्ता चालून गेल्यावर तिला आढळून आलें 'कीं, पन्नास स्वार बरोबर घेऊन शहाजादा झपाट्यानें अजमीरला जात आहे.' दुर्जयसिंहाची ती टाकलेली बायको होती तरी बहुतेक मोठमोठ्या लोकांना ती ओळखत असे. पौर्णिमा, एका टेकडीच्या आड बाजूला लपून शहाजाद्याची हालचाल पहात होती.

शहाजादा खुसरू आतां विश्रांति घेण्याच्या योजनेंत आहे व आपल्या सैन्याला एका वृक्षराजींत तळ देण्याला सांगून स्वतःसाठीं एकादी योग्य जागा पहात पहाड चढत आहे असें जेव्हां तिनें पाहिलें, तेव्हां ती त्याचा उद्देश ओळखून आपण दुसऱ्या एका गर्द झाडींत शिरली.

नंतर खुसरूची भेट घेण्यासाठीं व त्याचें लक्ष आपल्याकडे ओढून घेण्यासाठीं काय केलें, त्याची भेट कशी झाली व ती तेथें काय बोलली, तसेंच तिनें त्याची मुद्रिका कशी मिळविली, हें मागील एका प्रकरणांत वाचकांना कळविलेंच आहे.

लजपतसिंहाच्या दुष्ट कारस्थानानेंच दुर्जयसिंह कारागृहांत गेला, असा पौर्णिमेचा दृढ विश्वास होता; पण कोणत्या उपायानें या सैतानाला—लजपतसिंहाला—तें दुर्जयसिंहाचें गुप्त ठिकाण सांपडलें, याचा मात्र तिला उलगडा झाला नाहीं.

खुसरूजवळून आंगठी मिळावल्यानंतर पौर्णिमेला वाटलें कीं, आतां मी आपल्या हृदयेश्वराला—दुर्जयसिंहाला—लवकरच कैदेंतून सोडवीन, पण ती तिची आशा कितपत सफळ झाली, तें आतां आपण पाहूं.

ज्या पहाडाच्या उतरणीवर खुसरूशीं पौर्णिमेची गांठ पडली होती, तिथून रतनगडाचें अंतर केवळ एक कोस होतें आंगठी हातांत मिळतांच तिनें क्षणभरहि विलंब न लावतां रतनगड गांठला. ती ज्या वेळीं रतनगडावर आली त्या वेळीं दुपार संपून चांगले दोन तीन तास झाले होते.

किल्ल्याच्या दरवाजाशीं पोंचतांच प्रथम दरवाजांतच तिनें ती आंगठी पहारेकऱ्यांला दाखविली. आंगठी कोणाची आहे, हें पाहतांच ते सन्मानपूर्वक बाजूला झाले. पौर्णिमेला त्यांनीं कोणताहि प्रश्न केला नाहीं. कारण त्या आंगठींत तसेंच विलक्षण सामर्थ्य होतें.

इतका प्रकार झाला तरी कारागृह कोणत्या दिशेला आहे हें पौर्णिमेला माहीत नव्हतें, त्यामुळें ती आंत जातांच वेड्याप्रमाणें इकडे तिकडे पाहूं लागली. हा रतनगड मानसिंहाच्या अधिकाराखालीं असून तेथें सैन्यहि ठेवण्यांत येत असे. इतकेंच नव्हे, तर तें एक फौजेचें ठिकाणच होऊनच बसलें होतें. पौर्णिमा इकडे तिकडे पहात असतां तिला एक म्हातारा सैनिक भेटला. लागलीच तिनें आपल्याकडची मुद्रिका दाखवून त्या सैनिकाला प्रश्न केला, " दुर्जयसिंहांना ज्या कारागृहांत कैद करून ठेविलें आहे, तो कारागृह कुठें आहे, हें तुम्ही सांगूं शकाल का ! "

सुदैवानें, ज्या व्यक्तीला तिनें हा प्रश्न केला, ती व्यक्ति कारागृहावरचा पहारेकरी असून त्याचें नांव क्षेमसिंह असें होतें.त्याला त्या तापसी रमणीकडे पाहून समाधान व आश्चर्य वाटलें. कारण ती अतुलनीय रूपवती स्त्री यावेळीं तापसीच्या वेषांत होती. कांहीं वेळ स्तब्धतेंत गेल्यावर तो तिला म्हणाला. " कोण तूं मुली ? कुठून आलीस ? "

पौर्णिमा प्रथम कांहींशी भ्याली; पण भावी सुखप्रसंगाकडे लक्ष देऊन ती त्या सैनिकाला म्हणाली, " मी राजा मानसिंहाच्या महालांतील दासी आहें. सध्यां कैदेंत असलेले दुर्जयसिंह हे माझे जवळचे आप्त असल्यामुळें मी त्यांची भेट घेण्यासाठीं अम्बरहून आलें असून महाराजांची परवानगीहि घेतली आहे."

तिचें हें बोलणें ऐकून क्षेमसिंह तिच्याकडे संदिग्ध दृष्टीनें पहात म्हणाला, "कां तुला त्याच्याकडे कशाला जावयाचें आहे ? "

" त्यांना महाराजांचा एक गुप्त हुकूम सांगण्याचें बिकट काम मला करावयाचें आहे. "

" ठीक ! तूं माझ्याबरोबर ये. मी तुला दुर्जयसिंहाचा कारागृह दाखवितों. "

नंतर त्यानें तिला दुर्जयसिंहाकडे पोंचविलें व तेथील पहारेकऱ्याला अगदीं गुप्त सांकेतिक भाषेंत कसलासा हुकूम करून तो आपली दाढी गोंजारीत दुसरीकडे निघून गेला.

पहारेकऱ्यानें कोठडीचा दरवाजा उघडल्यानंतर पौर्णिमा आंत गेली. तिनें पाहिलें तों एका लहानशा बिछान्यावर दुसऱ्या बाजूला तोंड फिरवून दुर्जयसिंह झोंपलेला तिला दिसला.

इकडे तिकडे पाहून पौर्णिमेनें प्रेमभरानें दुर्जयाला हांक मारिली. पौर्णिमेचा कंठस्वर दुर्जयानें ताबडतोब ओळखला व तो धडपडून उठून बसला. आणि आश्चर्यानें म्हणाला, " सुंदरी, तूं इकडे कुठें आणि कशी आलीस ? "

पौर्णिमा तोंडावर बोट ठेवून मन्द स्वरानें म्हणाली, " अगदीं हळू बोलावं गडे ! पहारेकरी दरवाजाबाहेर उभा आहे. मी आपणाला इथून सोडवावं म्हणून आल्यें आहे. "

" कसा बरें मला तूं इथून सोडवणार ? "

" हें पहावं " असें म्हणून तिनें आपल्या हातांतील आंगठी काढून दुर्जयाला दाखविली. दुर्जयानें उत्सुकतेनें पाहिलें, तों ती खुसरूच्या नांवाची आंगठी आहे असें त्याला आढळून आलें. तो संशयित स्वरानें म्हणाला. " ही आंगठी तुला कुठें मिळाली ? "

" शाहाजादा खुसरूनेंच मला दिली "

" कां बरं ? "

" आपली सुटका व्हावी म्हणून ! "

" मग मानसिंहाच्या सहीचा परवाना कुठें आहे ? "

" ही आंगठी हाच आपल्याला मुक्ततेचा परवाना. "

दुर्जयसिंह, लहानपणापासून खुसरूला ओळखीत होता व त्यामुळें त्याची चालरीत आणि मन यांचाहि त्याला चांगलाच परिचय झाला होता. तो त्या आंगठीकडे पहात गंभीर स्वरानें म्हणाला, " पौर्णिमा सुंदरी ! तूं खरा मजकूर कां बरें लपवीत आहेस ? मी मुक्त झाल्यास आपलें अनिष्ट

होईल हें खुसरू जाणून आहे. त्याचप्रमाणें माझ्याकडून सेलिमला कोणती बातमी समजेल हेंहि तो जाणतो. खुसरू आपल्या बापाला मारण्याचा कट करीत आहे, हे जर सेलिमला समजलें तर काय परिणाम होईल बरें? या एका बातमीच्या जोरावरच मी सेलिमचा उजवा हात होऊं शकेन. तसेंच मी सूड उगविण्यांत किती खंबीर मनाचा आहें हेंहि पण त्याला माहीत नाहीं असें नाहीं. तेव्हां अशा स्थितींत तो माझ्या मुक्ततेसाठीं आपली आंगठी देईल हें संभवतें तरी का? पौर्णिमे! जोंपर्यंत, तूं, ही आंगठी कशी मिळविलीस याचें स्पष्टीकरण करणार नाहींस, तोंपर्यंत मी तुझा दुसरा कोणताहि शब्द ऐक-ण्याला तयार नाहीं."

दुर्जयसिंहाचा हा निश्चय पाहून पौर्णिमा मोठ्याच पंचायतींत पडली. शेवटीं चतुर व संशयी दुर्जयसिंहाला फसविणें हें साधें काम नव्हे असें जाणून तिनें ती आंगठी आपण कशी मिळविली ती सर्व हकीगत प्रांजलपणानें त्याला सांगितली. तेव्हां शांतपणानें त्यानें ती सगळी ऐकून घेऊन गंभीर स्वरानें म्हटलें, "प्रिये! या क्षणभंगुर देहासाठीं कां बरें तूं त्याच्याकडे भिक्षा मागायला गेलीस? तुझ्यासारख्या तेजस्वी रजपुत स्त्रीला इतका हीनपणा कां बरें स्वीकारावासा वाटला? ज्या खुसरूनें माझी तरवार मोडून रजपुतांना कधींही सहन न होणारा अपमान केला आहे, ज्या मानसिंहाचा मी विश्वासू व एकनिष्ठ नोकर असतां त्यांनीं कांहींहि विचार न करतां व न्यायान्याय न पहातां मला कारागृहांत लोटलें आहे, आणि ज्या कालाच्या प्रतिकूल-तेमुळें मी सध्यां सर्वांच्या रोषाला कारण होत आहें, त्यां सर्वांपैकीं कोणाचीहि मी प्रार्थना करणार नाहीं. आणि या स्वाभिमानी दुर्जयाला कोणाच्याहि दयेची आवश्यकता नाहीं. पौर्णिमे! कां बरें माझ्यासाठीं तूं इतकी हीनता स्वीकारतेस?"

दुर्जयसिंहाचें हें बोलणें ऐकून पौर्णिमेला आनन्द झाला नाहीं. तिला एक प्रकारचें दुःख झालें. ती सद्गदित स्वरानें म्हणाली, "नाथ, मीं असं कां केलं हें माझ्याच तोंडून ऐकावंसं वाटतं का आपल्याला? आपल्या जीवनसर्वस्वासाठीं ही काय पाहिजे तें करूं शकेन. माझं श्रेष्ठत्व, इष्ट, अभीष्ट, मान, अपमान, पुण्य सर्व कांहीं आपणच आहांत. प्रियकरा! आतां विलंब करूं नका. मला इथें येऊन बराच वेळ झाला. आतांचा जाणारा एक एक

क्षण विलक्षण मोलाचा चालला आहे. आपले सगळे कपडे मला द्या आणि माझी ही कफनी वगैरे आपण घ्या. आतां संध्याकाळ झाला असल्यामुळें चोहोंकडे अंधकार पसरत चालला आहे. आपणाला या अंधकारांत कोणीहि ओळखणार नाहीं. पहारेकऱ्यांना ही आंगठी दाखविली कीं ते मुकाट्यानें दरवाजे उघडून देतील आणि आपण बिन अडथळ्यावांचून बाहेर जाऊं शकाल."

आपल्या पत्नीचा तो त्याग व प्रेमळपणा पाहून दुर्जयला समाधान वाटलें; पण हें समाधान मनांतल्या मनांतच ठेवून तो कंपित स्वरानें म्हणाला, "आणि अशा रीतीनें मी निघून गेल्यावर तुझी स्थिति काय बरें होईल लाडके?"

"नाथ, माझी स्थिति ती कसली आणि व्हायचं तें काय? मीं तें सगळं ठरविलं आहे. आज रात्रीं आमच्या या अदलाबदलीबद्दल कांहीं गडबड होणार नाहीं. उद्यां सकाळीं हा प्रकार लोकांनां समजेल. पण त्याचवेळीं उपायहि योजण्यांत येईल. राजा मानसिंह स्त्रीहत्या करीत नाहीं हें आपणाला माहीत आहेच." आपण आतां सुखी होऊं या कल्पनेनें आनन्दित होऊन पौर्णिमा म्हणाली.

दुर्जयसिंह, स्तब्धपणानें कांहीं वेळ विचार करून म्हणाला, "हृदयेश्वरी! तूं भ्रमांत आहेस. विधात्यानें या दुर्जयसिंहाचें हृदय किती कठोर बनविलें आहे याचा तूं अद्यापही विचार केला नाहींस, असें मला वाटतें. मला तूं अद्याप ओळखलें नाहींस. जो शाहाजादा खुसरू माझा मुख्य शत्रु तोच तुला आपली आंगठी देतो आणि त्याच्या साहाय्यानें तूं माझी सुटका करणार? तसेंच बायकांचा वेष घेऊन मी पळून जावें हें दुर्जयसिंहाकडून कधींहि व्हायचें नाहीं. रजपुत वीर अशा रीतीनें पळून जाऊन आपला जीव वांचवीत नसतात—"

पुन्हां थोडावेळ थांबून दुर्जयसिंहानें एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि पुन्हां तो गंभीर स्वरानें बोलूं लागला, "सुंदरी! तुझा हाहि प्रयत्न व्यर्थ गेला असेंच तूं समज. भगवान् एकलिंगजीची शपथ घेऊन मी तुला सांगतों, कीं, असल्या हलक्या उपायांनीं मी आपली केव्हांहि सुटका करून घ्यायला तयार नाहीं. जा. पौर्णिमे आलीस तशी परत जा. माझ्यावर तुझें खरें प्रेम असेल,

खरोखरच जर तुझ्या हृदयांत तूं मलाच पूज्य मानलें असशील तर घाई करूं नको. जें काय होतें तें पहात रहा. अधीर होऊं नको. मी तुझाच आहें आणि अक्षयचा तुझाच राहीन. ईश्वराच्या अभिशापानें, माझ्या वेडेपणानें अथवा पूर्वकर्मविपाकानें मला जरी इहलोकीं तुझ्याशीं संलग्न होतां आलें नाहीं तरी स्वर्गलोक आहे, स्वर्गलोकचें नन्दनवन आहे आणि तेथील पूर्ण स्वतंत्रता आहे, त्या ठिकाणीं आमच्या मीलनाला कोणीहि अडथळा करणार नाहीं. पूर्वीहि मीं तुला हेंच सांगितलें आहे आणि आतांहि हेंच सांगत आहें. रजपूतवीर आपल्या जीवनमरणाबद्दल फारच बेफिकीर असतात. इहजीवनांत तूं मला मिळाली नाहींस व आम्ही आतां एथें एकत्र होऊं असेंहि वाटत नाहीं. अर्थात् लवकर मरण यावें अशीच प्रार्थना करावयाची कीं नाहीं? शिवाय असा हा गौरवमय मृत्युहि जीवनापेक्षां स्पृहणीय नाहीं काय? लोक मला म्हणतील दुर्जयसिंह खरोखरच क्षत्रियवीर होता. रमणीच्या साहाय्यानें आणि शत्रूच्या अनुग्रहानें जगून हीनपराक्रम म्हणून मिरविण्यापेक्षां शूरपणानें आलेला मृत्यु शतपटीनें बरा!"

हें सगळें बोलतांना दुर्जयसिंहाचे नेत्र आरक्त झाले होते आणि स्वरही फारच तीव्र आणि स्वाभिमानपूर्ण झाला होता.

दुर्जयसिंहाचा अभिमानी स्वभाव, आणि उतावळेपणा पौर्णिमेला चांगलाच माहीत होता; तरी पण नवऱ्यासंबंधानें स्त्रीच्या मनांत वसत असलेल्या श्रद्धेनें जें करावयाचें तें तिनें केलें. दुर्जयाच्या बोलण्यावरून ती समजली कीं आपले सर्व प्रयत्न व्यर्थ गेले आहेत. अशा रीतीनें आपली निराशा झालेली पाहून पौर्णिमेला फार वाईट वाटलें. ती अश्रुपूर्ण नेत्रांनीं, खिन्न चेहेऱ्यानें व दीन स्वरानें म्हणाली, "नाथ! जर तसं झालं, मला अकालीं वैधव्य यावं अशीच जर विधात्याची इच्छा असली, तर ईश्वराकडून होणारा हा दंड, मी इतर रजपुत पतिव्रतांप्रमाणें अधोमुखानें स्वीकारीन. पण दुर्जयसिंह! आपल्या मनांतही असेंच असूं द्या कीं, मीहि सत्यप्रतिज्ञ रजपुतरमणी आहें आणि माझी सूड घेण्याची इच्छाहि तितकीच तीव्र आहे. मी भगवान् एकलिंगजीची शपथ घेऊन सांगतें कीं, ज्याच्या योगानें मला हें अकाल वैधव्य येऊं पहात आहे त्याचा समूळ नाश केल्यावांचून मी स्वस्थ बसणार नाहीं. आजची माझी निराशा पूर्वीच्या प्रतिज्ञेची पुनरावृत्ति करायला कारण झाली

हेंच पुष्कळ होय. नाथ! आतां मी नेमळ्या उपायांनीं माझी प्रतिज्ञा शेवटास न नेतां वीरत्वाला योग्य असेंच वर्तन करीन. आपण कुठेंहि असा माझा पराक्रम पाहून आपणाला कौतुकच करावें लागेल. जातें. नाथ! आतां आपण स्वस्थ रहा. आपल्या कीर्तीला कमीपणा येईल असें माझ्या हातून कांहींही होणार नाहीं. आपणालाही मी तसा आग्रह करणार नाहीं–" बोलतां बोलतां एकाद्या उन्मादिनीप्रमाणें पौर्णिमा त्या कोठडींतून बाहेर पडली.

---

## प्रकरण १२ वें.

—:०:—

### माझ्या सौभाग्यतिलकाला पुसूं नका.

चांगलें करावें असें मनांत आणून मनुष्य जगांत जें कांहीं करतो तें सर्वच वेळीं चांगलें ठरतें असें नाहीं. चांगलें करायला गेलें असतां केव्हां केव्हां वाईटहि होतें. दुर्जयसिंहाला बंदिवासांतून मुक्त करावें म्हणून, पौर्णिमा इतकी खटपट करून किल्ल्यांत गेली होती; पण त्यापासून कांहीं फायदा न होतां वाईटपणा मात्र तिच्या पदरांत आला इतकेंच नव्हे,तर तिचा एक प्रकारचा हिरमोडहि झाला. जर या ठिकाणींच या सगळ्या प्रकाराचा शेवट झाला असता तर पौर्णिमेचें दैव सुप्रसन्न झालें, असेंच म्हणावें लागलें असतें; पण तसें झालें नाहीं, आणि त्यामुळेंच ही कादंबरी आम्हांला पुढें चालवावी लागत आहे.

कारागृहांतून बाहेर पडून पौर्णिमा त्या पाषाणदुर्गाच्या दरवाजाशीं आली आणि आतां बाहेर पडणार तोंच पांढऱ्या केसांचा म्हातारा क्षेमसिंह तिचा रस्ता अडवून उभा राहिला आणि गंभीर स्वरानें म्हणाला, " मुली! महाराज मानसिंहानीं तुला बोलाविलें आहे, आणि ते तटावरील निरीक्षण-गृहांत तुझी वाट पहात बसले आहेत. चल."

मानसिंहाचें नांव ऐकतांच अभागिनी पौर्णिमेचें हृदय धरारलें, तिच्या आंगावर शहारे आले, आणि तिचा चेहेरा प्रेताप्रमाणें निस्तेज झाला. ती कांपऱ्या स्वरानें क्षेमसिंहाला म्हणाली, " माझ्यासारख्या एका सामान्य

रमणीजवळ त्यांचें काय बरें काम ? मी एक गरीब आणि दुर्दैवी स्त्री आहे. कुठें तरी भटकत असतें झालें.

क्षेमसिंह प्रसन्नतेनें म्हणाला, " मुली, या बाबतींत मला त्यांनीं कांहींच सांगितलें नाहीं, तेव्हां मी तरी काय बरें सांगूं ? मी त्यांच्या हुकुमाप्रमाणें वर्तन करणारा एक नोकर आहे. मोठ्या मनुष्याजवळ जास्त बोलण्याची नोकरांना मनाई असते. ये. माझ्या बरोबर ये. मी तुला तिकडे घेऊन जातों. "

असें म्हणून तो चालूं लागला. नाइलाजानें पौर्णिमाहि त्याच्या पाठोपाठ निघाली. तटाच्या बऱ्याचशा पायऱ्या चढून गेल्यानंतर तो एका चक्क प्रकाश पडलेल्या खोलींत आला. त्या खोलींतील सर्व नीटनीटकेपणा जरी अम्बर प्रासादाप्रमाणें नव्हता तरी बड्या मनुष्यांना राहायला ती खोली अयोग्य नव्हती असें कोणीहि म्हटलें असतें.

क्षेमसिंहाच्या पाठोपाठ पौर्णिमा त्या खोलींत गेली व त्या ठिकाणीं जातांच तिनें भीतियुक्त नजरेनें एकवार सभोंवार पाहिलें, तों तेथें तिला एक वीर पुरुष छातीवर हात ठेवून गंभीरपणानें कसलासा विचार करीत सावकाश-पणें इकडे तिकडे फिरत असल्याचें आढळून आलें.

पौर्णिमेची नजर त्या वीरपुरुषाकडे जातांच तिनें त्याला ओळखलें व पुन्हां एकदां तिचें हृदय थरारलें. कारण प्रत्यक्ष मानसिंहच यावेळीं तिच्या समोर होता. पौर्णिमा घाबरली होती तरी चटकन् पुढें झाली आणि तिनें मानसिंहाला वंदन करून मृदु स्वरानें म्हटलें, " आई भवानी आपलें कल्याण करो ! "

मानसिंहानें एकवार तीक्ष्ण नजरेनें पौर्णिमेकडे पाहिलें आणि नंतर धीर, गंभीर स्वरानें म्हटलें, " पौर्णिमे ! तूं दुर्जयसिंहाला सोडवायला आली होतीस ना ! खोटें बोलूं नकोस. "

पौर्णिमा भीत भीत म्हणाली, " होय महाराज; पण मला याबद्दल क्षमा होईल अशी आशा आहे. "

राजा मानसिंहानें हंसत हंसत उत्तर दिलें. यांत तुझा कांहीं विशेष अपराध दिसत नाहीं. तूं पतिव्रता आर्यनारी आहेस, साध्वी आहेस, तेव्हां नवऱ्याच्या सुटकेसंबंधानें तूं अशा तऱ्हेचा प्रयत्न करणारच. मला कांहीं या बाबतींत तूं अपराधी दिसत नाहींत; पण तूं या बाबतींत सरळ मार्गानें न

जातां वांकड्या मार्गानें गेलीस याचा मला बराच राग आला आहे. जर तूं माझ्याजवळ येऊन दुर्जयसिंहाच्या मुक्ततेची प्रार्थना केली असतीस, तर मला वाटतें, मीं कांहीं तुझी ती प्रार्थना अमान्य केली नसती; पण तूं या बाबतींत जें कांहीं केलेंस तें अयोग्य केलें असल्यामुळें निष्फळहि झालें. तूं निश्चितपणें समजून राहा, कीं, मानसिंहाचे रक्षक आणि गुप्तहेर हे दोन डोळ्यांचे नसून चार डोळ्यांचे आहेत; असो. इतका जरी प्रकार झाला तरी तुझ्या या अयोग्य कृत्याबद्दल किंवा अपराधाबद्दल मी तुला क्षमा करायला तयार आहे; पण ही क्षमा एका करारावर अगर अटीवरच केली जाईल."

पौर्णिमा, कांहींशा आशायुक्त स्वरानें हात जोडून म्हणाली, "कोणती बरें ती अट!"

"शहाजादा खुसरूच्या नांवाची आंगठी तुझ्या जवळ आहे ती माझ्या-कडे दिलीस तरच क्षमा करूं!"

"महाराज, तसं मीं केलें कीं माझ्या सौभाग्यदेवतेला आपण बंदि-खान्यांतून सोडवाल?"

"नाहीं. तुझी कोणतीहि अट मी मानायला तयार नाहीं. तुझ्या या अपराधाबद्दल तुला क्षमा पाहिजे असेल तर ती आंगठी माझ्याकडे दे!"

"आणि नाहीं दिली तर" पौर्णिमा निराशपूर्ण धाष्टर्यानें म्हणाली.

मानसिंहानें लागलींच गंभीरस्वरानें उत्तर दिलें, "या किल्ल्यांतील पहाऱ्यावर किती तरी तातारी स्त्रिया आहेत. माझा हुकूम होतांच त्या तुझी झडती घेतील आणि आंगठी घेतील. नंतर तुला कैदेंत ठेवण्यांत येईल. या दुर्जयसिंहाला कैदेंत ठेवण्याचा हुकूम मीं स्वतः दिला आहे, व कांहीं **राज-कीय कारणासाठीं** त्याला कांहीं दिवस अशा रीतीनें अटकेंत ठेवणें भाग आहे. त्याचप्रमाणें अशा रीतीच्या कैद्याला चोरून व फसवून तुरुंगांतून पळवून लावण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसाचाहि अपराध फारच भयंकर मानला जातो. कैद्याला पळवून लावणाऱ्याला रीतीप्रमाणें शिक्षा ही झालीच पाहिजे समजलीस?"

आतां मात्र पौर्णिमेची स्वाभिमानवृत्ति जागृत झाली व मानसिंहाच्या बोलण्याचा तिला राग आला. ती रागानें व स्वाभिमानानें मानसिंहाकडे पहात तीव्र स्वरानें म्हणाली, "**राजकीय कारणानें? राजकीय**

**कारण कसलें ? रजपुतकेसरी राजा मानसिंह हा कांहीं मोगल नव्हे. आणि मोगलांची तरफदारी करून अन्यायाचा पुरस्कार करणें कांहीं त्याला योग्य नव्हे. मी रजपुत स्त्री आहें. धर्म आणि कर्तव्य याला अनुसरून मीं आतां जें केलें आहे तें 'अपराध' होऊं शकत नाहींत.** मीं यांत पाप केलें नाहीं आणि न्यायासनापुढें मी अपराधीहि ठरत नाहीं. आपण मला जी शिक्षा करणार असाल ती करा; पण मी निरपराधी आहें, असेंच माझें मन मला सांगत आहे. सत्तेपुढें शहाणपण, आणि लक्ष्मीपुढें सरस्वती जरी कांहीं वेळ निर्बल ठरली तरी अखेर जय तिचाच व्हायचा. सत्य तें सत्यच. दुर्जयसिंह खरोखर अपराधी आहे कीं नाहीं हें आपलें मन आपणाला सांगत असेल आणि सांगत नसेल तर तात्पुरत्या सत्तेची उज्ज्वलता तुमचे डोळे दिपवून आंधळे करीत असेल, असेंच मग मला म्हटलें पाहिजे."

मानसिंहानें तिच्या या बोलण्यावरून अनुमान केलें, कीं, पौर्णिमा ही साधी अबला नसून प्रबला आहे. भीति दाखवून अथवा धाक घालून तिच्याकडून इष्ट सिद्ध करून घेतां येणें अशक्य. अर्थात् मानसिंहाला दुसरा मार्ग स्वीकारावा लागला. तो कल्पनेपेक्षां ज्यास्त प्रसन्नतेनें म्हणाला, "पौर्णिमे! उगाच रागावूं नकोस; पण खरें सांग, खुसरूची ही आंगठी तुला कशी मिळाली?"

पौर्णिमेला यावेळीं खुसरूची आठवण झाली व त्याची वचनबद्धताहि तिनें जाणली. नंतर थोडा वेळ विचार केलासें दाखवून ती स्पष्ट स्वरानें म्हणाली, "खुसरूच्या खोलींतून मीं ही चोरून आणली."

यावेळीं मानसिंगाला पुन्हां रागाचा झटका आला, तो उत्तेजित स्वरानें म्हणाला, "तूं अगदीं खोटें बोलत आहेस. असें होणें अगदीं असंभवनीय. तूं जशी बोलतेस व जशी दिसतेस तशीच जर अन्तःकरणांतहि असशील तर तुझ्या हातून असलें नीच काम होईलसें मला वाटत नाहीं. खरें सांग-कारण आंगठीचें रहस्य समजावें अशी माझी फार इच्छा आहे. तसेंच मीं तुला कांहीं तशाच महत्त्वाच्या कामासाठीं यावेळीं येथें बोलविलें आहे. तरी कारण विचारूं नकोस. जर तुझ्या कर्मामुळें आणि व्यवहारामुळें माझ्या कार्यांत घोंटाळा व विलंब झाला तर तूं पक्कें समज, कीं, तुझ्यावरच्या विपत्ती कमी न

होतां त्या वाढतच जातील. आणि हेंहि तूं समजून राहा, कीं, कारण पड- ल्यास मी तुला अकाल विधवा करायलाहि मागेंपुढें पहाणार नाहीं.''

मानसिंहाचें हें कठोर बोलणें ऐकून पौर्णिमेचें हृदय पुन्हां थरारलें. ती मानसिंहाचा कठोर स्वभाव पूर्णपणें जाणून होती. त्याच्या स्वार्थाआड येणारा कोणीहि मनुष्य असो, त्याला तो जगांत ठेवणारच नाहीं, आणि मानसिं- हाची दृष्टी चुकवीन म्हणेन तर चुकवितां येणार नाहीं. याचें ताजें उदाहरण म्हणजे दुर्जयसिंह. अर्थातच पौर्णिमेला खरें सांगितल्यावांचून गत्यंतरचा नव्हतें. ती त्याच्या पायांशीं बसून अश्रुपूर्ण नेत्रांनीं म्हणाली, "महाराज ! शांत व्हा. माझा नाश करूं नका. माझ्या सौभाग्यतिलकाला पुसून टाकूं नका. दुर्जयसिंहाच्या जीवनापेक्षां मला या जगांत कांहींहि श्रेष्ठ वाटत नाहीं. तेव्हां त्यांची जीवनभिक्षा मला वाढा. मी खरें सांगतें, ही आंगठी मला खुसरूकडूनच मिळाली आहे आणि त्यानें ती स्वतांःच्या खुषीनें मला दिली आहे.''

असें म्हणून पौर्णिमेनें, आपली व खुसरूची भेट झाल्यापासूनचा सगळा वृत्तांत त्याला सांगितला आणि त्यानें आंगठी कशी व कोणत्या अटीवर दिली तेंहि उघड उघड सांगितलें. पतिप्रेमापुढें, खुसरूला दिलेलें वचन ती केव्हांच विसरली होती.

तिनें सांगितलेली सगळी हकीगत ऐकून मानसिंह कांहींसा विस्मित झाला आणि पौर्णिमेच्या स्वरूपावर खुसरू मोहित झाला आहे, हेंहि त्याला समजून चुकलें. अर्थात पौर्णिमेला आपल्या स्वाधीन ठेविली असतां तिच्या मार्फत खुसरूला, एकाद्या यांत्रिक पुतळीप्रमाणें नाचवितां येईल इतकेंच नव्हे, तर नव्या शक्तींचा प्रयोग करण्यालाहि पुष्कळ सोईचें होईल...... आणखी अशाच रीतीनें बराचवेळ विचार करून मानसिंह पौर्णिमेला म्हणाला, "शहाजादा खुसरूकडून तुला मिळालेली आंगठी तूं आपल्या जवळच ठेव. मला देण्याचें कारण नाहीं. तसेंच दुर्जयसिंहाच्या जीवित्वाचीहि तूं कोणत्याहि प्रकारें काळजी करूं नकोस. मी खात्रीनें सांगतों कीं, हे दोन महिने संपले म्हणजे मी दुर्जयला कैदेंतून सोडवीन आणि पूर्वींच्याच जागेवर नेमीन. तसेंच तुलाहि मुलगी मानून मी राजवाड्यांत आश्रय देऊन सुखाचे दिवस दिसतील असें करीन. शिवाय ज्या लजपतसिंहानें तुझ्या आईसंबंधानें तिला

कमीपणा आणणारा मजकूर प्रसिद्ध केला आहे त्याचेंहि तोंड बंद करीन; पण यावेळीं मी जसें तुला कित्येक गोष्टी करायासंबंधानें वचन देत आहें त्याचप्रमाणें तूंहि माझ्याशीं वचनबद्ध झाली पाहिजेस. इतकेंच नव्हे, तर "तसें करीन' अशी प्रतिज्ञा केली पाहिजे. तुझ्या मार्फत मी एक लहानसें काम तडीस नेऊं इच्छीत आहें; त्या कामांत तुला कोणत्याही प्रकारें हीनत्व स्वीकारावें लागणार नाहीं. जर माझें हें काम तूं करूं शकलीस, आणि तूं करशील अशी माझी खात्री आहे—तुझ्यासारख्या शूर व स्वाभिमानी रमणीच्या हातूनच असलीं कामें होत असतात—तर मी तुला याचा मेहेनताना म्हणून एक हजार आसरफी इनाम देईन. तेव्हां आतां आधीं तूं प्रथम माझ्याबरोबर अंबरच्या राजवाड्यांत चल. त्या ठिकाणीं गेल्यावर, तुला पुढें काय केलें पाहिजे तें मी समजाऊन देईन."

मानसिंहाचें हें सगळें बोलणें ऐकून पौर्णिमेच्या हृदयांत बरेंच साहस उत्पन्न झालें. स्वतांची इज्जत न घालवितां व सन्मान कायम ठेवून, तसेंच आपल्या सौभाग्यदेवतेला सुखी राखून जें कांहीं आपल्या हातून होण्यासारखें असेल तें धाडसानें करावयाचें असा तिनें मनांतल्या मनांत निश्चय केला. नंतर ती म्हणाली, "महाराज जें सांगतील तें ऐकण्याला मी तयार आहें. तसेंच याबद्दल मी वचनहि देतें. माझ्या वचानाची जर महाराजांना इतकी किंमत वाटते तर मी तरी कां कमी करीन? पण महाराज मला एवढें जें आपण काम सांगणार त्याची यावेळीं थोडीशी कल्पनाहि करून देतां येणार नाहीं का?"

मानसिंहानें गंभीर स्वरानें उत्तर दिलें. "पौर्णिमे! तूं ज्याप्रमाणें, दुर्जयसिंहाला सुख व्हावें, व त्याचें जीवन निष्कंटक व्हावें म्हणून खटपट करीत असतेस, त्याप्रमाणेंच मी शाहाजादा खुसरू याचें सर्व आयुष्य सुखांत जावें, त्याच्या मनाला शांति मिळावी आणि भावी काल उज्ज्वळ व्हावा यासाठीं खटपट करीत आहें. तुझ्या साहाय्यानें मला या कार्याचा एक लहानसा भाग सिद्धीस न्यावयाचा असून ज्या योगानें त्याचा स्वार्थ कुपथगामी होणार नाहीं असें कार्य मला करावयाचें आहे. तुला खुसरू समोर जावें लागणार नाहीं, तुझें कार्यक्षेत्र बादशहाच्या रंगमहालांतील बेगमसाहेबांच्या जवळ राहील. त्याठिकाणीं तुला राहावें लागेल. अगर केव्हां केव्हां आमच्या विताग येथील

मठांतही जाणें भाग पडेल. पुरुषाशीं तुझा संबंध येणार नाहीं. कोणाची भेटहि त्याशी लागणार नाहीं. अंबरच्या किल्ल्यांतील लहानशा महालांतही कधीं कधीं गुप्तपणें राहून माझ्या हाताखालीं काम करावें लागेल. कां पौर्णिमे! आतां माझ्या म्हणण्याला तुझी संमती आहेना? तुला एकंदर कार्याची दिशा सांगितलीच आहे, तेव्हां विचार करून काय तें उत्तर दे आणि आपलें व आपल्या पतीचें कल्याण कर!"

कांहींवेळ थांबून पौर्णिमा म्हणाली, "आपण सर्वच विषयांत जर मला अभय देत आहां तर आपल्या म्हणण्याला मी कां बरें कबूल होणार नाहीं?"

हें ऐकतांच मानसिंह प्रसन्न चेहेऱ्यानें म्हणाला, "तर मग आतां विलंब न करतां माझ्याबरोबर अंबरच्या राजवाड्यांत चल. तुला स्वाधीन करून घेण्यास मला फारसे श्रम पडणार नाहींत असें मीं पूर्वीच जाणून क्षेमसिंहाकडून तुझ्यासाठीं एक शिबिका आणून ठेवविली आहे."

लागलीच महाराजांनीं क्षेमसिंहाला हाक मारून शिबिका तयार ठेवण्याची आज्ञा दिली व म्हटलें, "दुर्जयसिंहाला कैदेंत कोणत्याहि तऱ्हेनें त्रास होणार नाहीं अशी व्यवस्था ठेव. मी घोड्यावर बसून अम्बरकडे जातों, तोंपर्यंत या बाईला शिबिकेंत बसवून तिकडे पाठविण्याची व्यवस्था कर."

नंतर ते तटावरून खालीं उतरले आणि घोड्यावर बसून अंबरच्या मार्गाला लागले. क्षेमसिंहाच्या तत्परतेनें योग्यवेळीं शिबिकाही तयार झाली आणि पौर्णिमा त्यांत बसून रक्षकांसह अंबरकडे निघाली.

जी पौर्णिमा, कैदी दुर्जयसिंहाला सोडवून नेण्यासाठीं रतनगडांत आली होती, ती निराळ्याच एका गुंतागुंतीच्या जाळ्यांत सांपडून मानसिंहाच्या स्वाधीन झाली. भवितव्य म्हणतात तें यालाच. तें मनुष्याला केव्हां कसें व कुठें नेईल हें कोणासहि सांगतां येणार नाहीं.

# प्रकरण १३ वें.

---:o:---

## जा, त्या चारण-रमणीला बोलावून आण !

पौर्णिमेला योग्य तो उपदेश करून व सावधगिरी ठेवण्याबद्दल पुनः पुनः बजावून दुसऱ्याच दिवशीं मानसिंहानें तिला योग्य वाहनांत बसवून व बरोबर तिच्या कार्याला शोभेशी सामग्री व माणसें देऊन, फत्तेपूर शिक्री-जवळील विताग नांवाच्या एका लहानशा खेड्यांत तिची रवानगी करून दिली. या वितागगांवांत महाराज मानसिंहांनीं बांधलेलें एक देऊळ व मठ होता. मठांत एक शैव संन्यासी सेवेकरी म्हणून राहात असे. हा सेवेकरी अंब-रसरकारचा आश्रित होता. कारण तेथूनच त्याला तनखा मिळत असे. फत्ते-पूर शिक्रीच्या राजप्रासादापासून या मठाचें दूरत्व फारच थोडें होतें.एक पुरा मैल सुद्धां झाला नसता.

वितागं हें एक पहाडांनीं वेष्टिलेलें गांव असून आपल्या डोक्यावर मेघां-ना हवातसा नाच करूं देणाऱ्या त्या पहाडाच्या पंक्तीमुळें तें गांव अत्यंत रम-णीय व आरामदायक असें झालें होतें. पहाडाच्या गुप्त हृदयकंदरांतून उच्छृं-खलपणें बाहेर पडून चोहोंकडे विहार करणाऱ्या लहान लहान गिरिनद्या, स्निग्ध व मधुर पाणी आपल्या हृदयांशीं धरून आपल्या मृदु कलनादानें व नेहेमीं शांत असणाऱ्या त्या जागेला मधुमय संगीतरवानें जागृत करीत होत्या. वनराजी व त्यांतील लतापुष्पें यांची शोभा तर इतकी बहारीची दिसे, कीं, साध्या प्रवाशाला सुद्धां वनविहाराची भीति न वाटतां तो पुढें पुढेंच जात असे. नलिगाई, हरणाचे कळप आणि वनवराह हे तर कितीतरी दिसत असत. अरण्याच्या बाहेरील मोकळ्या जागेंत येऊन सुद्धां हे प्राणी स्वतंत्रतेनें वागडत असत. मोरांचे थवेतर आकाशाकडे पहात पहातच नाचत असत; पण याचवेळीं जर का त्यांना एकादा पयपूर्ण मेघ आढळला, तर आपल्या प्रेमळ गायनानें ते दशादिशांनाहि कंपित करायला मागें पुढें पहात नसत. प्रेमाचा महिमाच तसा आहे. त्याला कशाचीच भीति वाटत नाहीं.

चोहोंकडे दहा कोसपर्यंत असलेले उंचच उंच पहाड तोडून, आणखी दुसऱ्या एका पहाडाच्या विस्तृत उतरणीवर अकबरशाहानें आपली नवी

राजधानी फत्तेपूरशिक्री या शहराची स्थापना केली होती. आग्रा शहरांतील तांबड्या दगडाच्या किल्ल्यांत असलेल्या राजमहालाप्रमाणेंच या नव्या शहरांतील राजप्रासादहि अत्यंत प्रेक्षणीय, विलासाला योग्य आणि भव्य असे होते. दिवाणीखास, दिवाणीआम, खास महाल, रंगमहाल, हिरामिनार, मिन, मसजीद् वगैरे हर्म्यराजी या भव्य प्रासादाच्या मध्य भागीं असून रंगमहालांत तर कितीतरी गुप्त महाल बनविले होते. तसेंच या प्रासादांपासून जवळच अकबराचा जिवाभावाचा मित्र राजा बीरबल याचा नवीन व सुंदररीतीनें बांधलेला वाडा असून त्याच्याच जवळ राजा मानसिंह व अबुलफाजल यांचेहि प्रासादतुल्य भव्य वाडे दिमाखानें आपलीं वैभवगीतें गात उभे होते. पूर्वी सांगितलेलें खेडें—विताग—आणि त्याच्या सभोंवारचें पहाडी जंगल हें या राजवाड्यांपासून फारसें दूर नव्हतें. आणि त्यामुळें नेहेमीं अकबर व त्याची मंडळी या जंगलांत शिकार करण्यासाठीं येत असे. कारण या ठिकाणीं मृगयेला योग्य असे पक्षी व जनावरें मुबलक होतीं; व त्यामुळें मृगयाव्यसनपरायण असे मोठमोठे अमीर उमरावहि अकबराच्या खास परवानगीशिवाय या जंगलांत येत नसत. कारण तो अकबराचा खासगी शिकारखाना होता म्हटलें तरी चालेल.

कोणत्या तरी एका गुप्त पण जबाबदारीच्या उद्देशानें मानसिंहानें पौर्णिमेला या जंगलांतील देवनिवासांत पाठविलें होतें एवढें खरें; पण तो उद्देश कोणता हें मात्र तूर्त समजणें शक्य नव्हतें. पुढें क्रमाक्रमानें समजणें शक्य असल्यास पाहूं.

विताग येथें आल्यावर कांहीं दिवसांनंतर सौंदर्यशालिनी पौर्णिमेनें चारणीचा वेष घेतला. या नव्या वेषांत तर तिचें सौंदर्य ज्यास्तच विकसित झालेलें दिसत होतें. व त्यांत एक नवीनच खुमारी चमकत होती. तिचें तें चम्पकवर्णी गैरिक वसन, भालप्रदेशाला शोभविणारी ती रक्तचंदनरेषा, आणि गळ्यांत, मनगटांत, व दंडांत वलयरूपानें विराजमान झालेल्या रक्तचंदनचर्चित अक्षमाला, तसेंच उजव्या हातांत शोभणारा तांबडालाल त्रिशूल, अशा वेषानें ती पौर्णिमा, मानसिंहाच्या उद्देशसिद्धीसाठीं वितागच्या जंगलांत फिरत असे.

अशी ती फिरत असतां, दैवानें उत्पन्न केलेल्या घटनाचक्रानें प्रेरित

होऊन एकेवेळीं शाहाजादा खुसरूच्या मनांत हरिणाची शिकार करावी असें आल्यामुळें तो वितागच्या जंगलांत निघाला. त्याचा उद्देश समजतांच प्यारी-बानूहि 'मी शिकार पहायला येणार' असा हट्ट धरून बसली. अन्तःपुर-चारिणी बेगमांना बरोबर घेऊन शिकारीला जाणें हें मोंगलवंशजांना कांहीं नवीन नव्हतें. अर्थात् खुसरूनेंहि आपल्या हृदयेश्वरीला बरोबर नेण्याचें ठर-वून तयारी करण्याचा हुकूम दिला.

इतकें झालें तरी शिकारीसाठीं बाहेर पडणारी मंडळी ज्यास्त नव्हती. पुरुषांत कुमार खुसरू आणि त्याला शिकारींत साहाय्य करणारे चार स्वार, तसेंच बायका मंडळींत शाहाजादी बेगम प्यारीबानू आणि तिची मुख्य सहचा-रिणी व चार तार्तारी स्त्रिया, याशिवाय इतर लवाजमा वगैरे कांहीं नव्हता.

वितागचा मठ आणि फत्तेपूर शिक्रीचा राजवाडा यांच्या बरोबर मध्यमार्गी 'हिरण्मिनार' नांवाची इमारत होती. लोक सांगत कीं, 'सम्राट्-श्रेष्ठ अकबरशाहानें, आपल्या मृत व आवडत्या शिकारी हत्तीचा देह त्या ठिकाणीं पुरून त्या करिराजाची आठवण म्हणून ही मिनार बांधली,' पण कित्येक लोक सांगत कीं, "या ठिकाणीं काळवीट हरणाची संख्या ज्यास्त असल्यामुळें मृगयेचा शोकी अकबरशाहा यानें ही हिरण अथवा हरिण मिनार बांधली." लोकमत कांहीं असो; पण मिनारच्या वरच्या भागीं शिकारीसाठीं टेहळीची जागा मात्र तयार केलेली दिसत होती. बादशाहा या ठिकाणीं बसून, लांबच्या जंगलांतून, शिकारी लोकांनीं हुसकून लावलेलें हरिण जवळच्या मोकळ्या मैदानांत आलें कीं, आपल्या अचूक नेम मार-णाऱ्या बंदुकीनें तें मारीत असे. ही मिनार काळाच्या तडाक्यांतून वांचून आजहि गतकालाची स्मृति लोकांच्या मनांत जागृत करीत आहे. असो.

खुसरू ज्यावेळीं या वितागच्या जंगलांतील एका भागांत शिकार कर-ण्यांत गढून गेला होता, त्याचवेळीं प्यारीबानू आपली मैत्रिण अमिरा हिला बरोबर घेऊन शिकारीच्या जागेपासून कांहीं अंतरावर असलेल्या एका नि-र्जनगिरि—निर्झरिणीच्या तीरीं प्रशस्त अशा एका शीलाखंडावर बसून गोष्टी करीत होती. यावेळीं तो सगळा वनप्रदेश निर्मनुष्य होता म्हटलें तरी चालेल. अर्थात् त्याठिकाणीं कोणीहि मनुष्य येण्याचा संभव नव्हता. समोरच ओळीनें दिसणाऱ्या दगडी ढिगाऱ्यांतून एक लहानशी गिरिनदी मंजूळ गाणें गात स्वच्छं-

दानें उडया मारीत चालली होती. या उथळ, लहानग्या आणि दुडदुड धांवणाऱ्या निर्झरिणीचें तीर लहानमोठया दगडांनीं अगदीं भरून गेलें होतें. तरीपण पाणी थोडें असल्यामुळें थोडयाशा श्रमांनीं पलीकडे जातां येत असे. शिकीप्रासादाच्या पिछाडीकडून या नदीला पुढें जाण्याला मार्ग मिळाल्या-कारणानें ती रंगमहालांतील गुपितें समजावून घेऊन खळखळा पुढें जात असे. त्यामुळें कोणीहि ही नदी उलंघून अलीकडे येण्याचें धाडस करीत नसे. कारण ती नदी ओलांडून प्रासादाकडे येणें झाल्यास परवाना काढावा लागत असे. त्यामुळें लांकडें गोळा करणारीं भिल्लांचीं पोरेंहि अलीकडे येण्याचें धाडस करीत नसत. ही गिरितनया फारशी कुणाला आपल्या आंगाला स्पर्श करूं देत नसे.

तरुणपणच्या उल्हासाला अनुसरून प्यारीबानूनें त्या जंगलांतून बरींचशीं वनवासी फुलें गोळा करून तिनें एक परडी भरली. कारण तिच्या त्या लहानग्या परडींत माळा करण्याचें सगळें साहित्य तयार होतें. फार प्रय-त्नांनीं व अवघड ठिकाणाहून आणिलेलीं तीं फुलें सर्वच चांगलीं होतीं असें नाहीं; पण त्यांतील कांहीं कांहीं जनपदांत दुर्लभ अशीं स्वर्गीय सुवासाचींहि होतीं. कित्येकांचा रंग तर इतका बहारीचा होता कीं, तीं फुलें नेहमीं डोळ्या-समोरच ठेवावींशीं वाटत. व प्यारी बानूला मोह पडला तो अशाच फुलांचा.

फुलें आणल्यानंतर प्यारी बानूनें हंसत हंसत तीं सगळीं फुलें एका मोठया थोरल्या दगडावर पसरलीं. आणि परडींतून रंगीत दोरा व सुई काढून मोठया मौजेनें ती माळा बनवूं लागली. तिला यावेळीं–कसला तो नकळे; पण–फारच आनंद झाला होता.

तिची ती माळा करण्याची उत्सुकता पाहून तिची मैत्रिण अभिरा तिला म्हणाली, रानफुलांच्या माळा करण्यासाठीं इतकी तयारी कशाला ग प्यारी ? वास ना रंग अशा फुलांची माळ तरी कुणाला आवडणार ?

प्यारी खुदकन् हंसून म्हणाली, “ मी माझ्या हृदयांतील देवतेसाठीं ही माळ करीत आहें. फुलांना वास आहे कीं नाहीं अथवा त्यांचा रंग चांगला आहे कीं नाहीं हें उदार मनाच्या देवता केव्हांही पहात नाहींत. शिवाय माझी ही देवता इतकी करुणामय आणि शांत स्वभावाची आहे कीं, तिला जो कांहीं नजराणा द्यावा, तो आपला ती हंसत हंसतच घेणार.”

अमिरेनें उत्तर केलें, "वा वा ! देवता तर फारच दयाळू स्वभावाची शोधून काढलीस ग तूं ! जगाची रीतच अशी आहे. जे हिरणमिनार वर बसून गरीब बिचाऱ्या हरिणीच्या हृदयांत तडफडून तीर खुपसून त्यांना मारीत आहेत, ते तुझे देवतुल्य पतिराज तूं दयाळू म्हण, पण मला तर ते फारच कठोर अन्तःकरणाचे दिसतात. कशाला बाई त्यांच्यासाठीं तूं या मृदु फुलांची माळ बनवितेस, अशानें का त्यांचें हृदय मृदु होणार आहे ? उलट त्यांच्या निर्ममत्वानें हीं गरीब बिचारीं वनफुलें कोमेजून मात्र जायचीं. त्यांनीं निरपराधी हरिणींना मारून आपली स्त्रीजातीविषयींची अनुदारता व्यक्त केली असतांहि तूं अजून त्यांची तरफदारी करतेसच ? खरोखर पुरुषांचें हें कठोर वर्तन पाहून रमणींनीं याचा कांहीं तरी प्रतिकार केला पाहिजे होता, पण अद्यापहि त्यांच्यांत म्हणण्यासारखी जागृति दिसून येत नाहीं.

प्यारीनें एकवार सभोंवार पाहून स्मित हास्य केलें आणि अमिरेकडे पाहून 'आपण रागावलों आहों' असें दाखवून म्हटलें, "खरंच. तूं बरीच शहाणी आहेस कीं ग ! पण केव्हां केव्हां तुझा फाजीलपणा शिखराला पोंचतो अगदीं. ही पुरुषजात नसती तर आम्हां बायकांचं एक पळभरहि चाललं नसतं. पुरुषांचं महत्त्व स्त्रियांपेक्षां बरेंच ज्यास्त आहे. जेव्हां पुरुष स्त्रियांच्या सुखासाठीं आपलें सर्वस्व विकून रमणीच्या स्वरूपाचें ध्यान करीत बसतात व तिला मूर्तिमंत देवीप्रमाणें मानून तिची पूजा करतात तेव्हां तुला पुरुष चांगले वाटत नाहींत का ? त्यांचा उदारपणा तुझ्या नजरेला येत नाहीं का ? पुरुषजात परिसासारखी आहे, पण अमिरा, तुला ती ओळखतां येत नाहीं त्याला मी काय करूं ? तूं दुर्दैवी आहेस आणि त्यामुळेंच तुला प्रेम म्हणजे काय हेंहि समजत नाहीं. तुझ्या काशगर प्रांतांत,—मला वाटतें, प्रेमळ पुरुष एकही नसेल ? तसं नसतं तर तुझ्या तोंडून असे उद्धटपणाचे उद्गारच आले नसते—"

अमिरा कांहींशी उपेक्षापूर्ण स्वरानें म्हणाली, "तुम्हीं कांहीं म्हणा बेगमसाहेब ! मला वाटतें, कीं, पुरुष तितके सगळे स्वार्थपर असावयाचेच. त्यांना रमणीची किंमतच नाहीं."

अमिरा ही, प्यारी बेगम हिची अत्यंत आवडती मैत्रिण होती. दोघींचीहि लहानपणापासून दोस्ती जमली असून दोघींहि उच्च कुलांतील होत्या.

त्यामुळें एकमेकींचें अगदीं स्वतंत्र विचारांचें बोलणें चालत असे. व बोलण्यांत कोणीही कुणाला हार जात नसे; पण अमिरेपेक्षां प्यारीबानू जरा मृदु स्वभावाची असल्यामुळें तिला केव्हां केव्हां आपला पराभव कबूल करावा लागे. असो.

दोघींचेंहि वरीलप्रमाणें बोलणें चाललें होतें, इतक्यांत अमिरेनें त्या नदीपलीकडे कांहींसें पाहिलें, आणि ती चकित झाली. कारण अत्यंत सौंदर्यशालिनी अशी एक चारणी पलीकडील एका झाडाखालीं उभी राहून त्यांच्याकडे सारखी पहात होती.

अमिरेनें प्यारीच्या हाताला हळूच एक धक्का मारून म्हटलें, " हं तें माळा तयार करण्याचें काम तूर्त ठेवा बाजूला, आणि या नदीच्या पलीकडील तीरावर असलेल्या झाडाखालीं उभी असलेली ती विजेसारखी रमणी कोण तें पहा."

प्यारीनें पाहिलें, तों खरोखरच नदीच्या पलीकडे, असलेल्या एका मोठ्या झाडाच्या सावलींत एक अनिंद्य सुंदर चारणी उभी असलेली तिला दिसली. ती चारणी आपल्या स्वरूपाच्या तेजानें ती जागा प्रकाशित करीत होती, म्हटलें तरी चालेल. प्यारीला वाटलें ' मनुष्याला इतकें तेजस्वी सौंदर्य कधीं तरी लाभेल कां ? "

नंतर ती अमिरेकडे वळून आश्चर्यानें म्हणाली, " काय ग हा काय प्रकार आहे अमिरे ? " अमिरा नकारदर्शक मान हालवून म्हणाली, " कदाचित् कोणी तापसी असेल. हिंदुलोकांत असल्या चारणी किंवा तापसी स्त्रिया असतात. शिवाय या नदीच्या पलीकडे राजा मानसिंहाचा एक मठ आहे. असेंहि मी ऐकतें. त्या ठिकाणीं तडी तापसी, साधू संन्यासी, भैरवी योगिनी, चारणी वगैरे माणसं असतात, असंहि लोक बोलतात. ती माणसं हात पाहून भूत भविष्य सांगतात. इतकेंच नव्हे, तर रोगी मनुष्याला योग्य तें औषधही देऊन तीं त्यांना बरेंहि करतात.

प्यारीनेंहि अमिरेच्या या बोलण्याला मान डोलविली व म्हटलें, " हो खरंच मींहि असंच ऐकलं आहे. बाबा म्हणत, ' आपणाला एका हिंदुसंन्याशानें नुसता हातच पाहून ' तूं भरतसम्राट्चा सेनापती होशील ' असें सांगितलें होतें. ' आणि पुढें झालंहि तसंच अमिरे. त्याचं तें भविष्य अगदीं तंतो-

तंत खरं झालं. तेव्हां अमिरे, मी हिला कांहीं विचारतें. जा त्या रमणीला बोलवून आण. ‘ शाहाजादी बेगम तुला बोलवीत आहे ’ असं सांग. जा. ”

प्यारीचा हा निरोप ऐकून अमिरा निराशेनें म्हणाली. “ छे. तसं बोलवून काय उपयोग ? हीं माणसं संसारविरागी असतात. फक्त खुदाचीं मात्र सेवक—मग तीं दुसऱ्याचा हुकूम कसा मानणार ? खुद्द बादशाहा आला तरी त्यांना त्याची पर्वा नसते. हरिदास स्वामीजी, आणि आग्र्याचे निराहार स्वामीजी यांना अकबर बादशाहानीं आग्राशहरांत नेण्याबद्दल किती परिश्रम केले; पण ते गेले नाहींत ते नाहींतच. ”

अमिरेच्या या बोलण्याचा प्यारीच्या मनावर थोडासा परिणाम झाला. आणि ती आपल्या मनाशींच कसलासा विचार करून उत्सुकतेनें म्हणाली, “ तर मग गडे आपणच तिकडे जाऊं. ही नदी कांहीं फारशी मोठी नाहीं. ”

अमिरा विस्मयपूर्ण नेत्रांनीं तिच्याकडे पहात म्हणाली, “ वेडी तर नाहींस तूं ! दिल्लीश्वराची सून अशी पायींच कुठें तरी भटकत असते का ? जर हें लोकांना समजलं तर ते काय म्हणतील बरं ? सम्राट्‌नां काय वाटेल तसंच तूं इकडे येतांनां शहाजाद्याला सांगून आलीस कीं, ‘ या नदीच्या तिरावर या ठिकाणीं आपली वाट पहात आम्हीं बसतों. ’ आम्हांला शोधीत ते जर येथें आले, आणि आम्हीं येथें नसलों तर त्यांना काय वाटेल बरं बेगम साहेब ? तूं आपली कशीही त्यांची समजूत घालशील;पण मी मात्र उगीचच्या उगीच त्यांच्या रोषास पात्र होईन. ”

दैव हें नेहेमीं नवे नवे मार्ग तयार करीत असतें. आणि फसविण्यांत कुशल अशी नियति देवी या मार्गाची परिचालिका असते. हीच नियति मनुष्याला प्रलोभित करून दैवरचित अशा त्या चांगल्या अथवा वाईट मार्गानें नेऊं शकते. नदीच्या दुसऱ्या तीरावर शहाजादी बेगमनें चारणीची भेट घेण्याला जाणें हें चांगलें कीं वाईट तें आम्हांला सांगतां येणार नाहीं; पण कांहीं असलें तरी सर्व ज्ञानमयी नियति, प्यारी बेगमला त्या मार्गानें ओढून नेत होती एवढें मात्र खरें. यावेळीं प्यारीनें जर थोडेंसें आत्मसंयमन केलें असतें तर तिचें पुष्कळ कल्याण झालें असतें, पण इतकें सामर्थ्य, त्या—दुर्बल म्हणा अथवा कोवळ्या म्हणा—स्त्रीच्या अंगीं नव्हतें हें मात्र खरें. बहुतेक रमणींत या आत्मसंयमसामर्थ्याचा अभावच असतो. अर्थातच प्यारीला आपल्या इच्छेच्या विरुद्ध जातां आलें नाहीं.

ती म्हणाली, " शहाजादेसाहेब या वेळीं शिकारीच्या नादांत अगदीं गढून गेलेले असावेत. तेव्हां त्यांचं येणं केव्हां होईल तें कांहीं ठरवितां येणार नाहीं. शिवाय तसंच पाहिलं तर आम्हीं राजप्रासादाच्या हद्दीबाहेर थोड्याच जाणार आहों !! तसंच त्यांना मीं म्हटलंहि होतं कीं, ' आम्हांला वाटलं तर आम्ही राजवाड्यांतहि जाऊं. ' तेव्हां आपण जाऊंच गडे त्या चारणीकडे. तिकडून यायला आम्हांला कितीसा वेळ लागणार ? जर शाहाजादेसाहेब आमचा शोध करीत येथें आले, आणि आम्हांला त्यांनीं या ठिकाणीं पाहिलं नाहीं, तर ते मनांत समजतील कीं, ' या दोघीहि प्रासादांत पोंचल्या असतील. ' आणि तूं इतकी भितेस कां अमिरे ! मीं त्यांची पाहिजे तशी समजूत घालीन. त्यांची समजूत कशी घालावी तें मला समजतं. "

अमिरा हंसून म्हणाली, " पण सांग तरी कशी काय समजूत घालशील ती ? "

अमिरेचा हा खोंचदार व थट्टेचा प्रश्न ऐकून प्यारीनें तिच्या गालावर हळूच एक चापट मारून स्मित हास्य करीत म्हटलें, " चल ! मूर्ख कुठली ! तें कोणी सांगत का असतं ? मुद्दाम आंधळ्या बनणाऱ्या माणसाला रस्ता कोण दाखवील बाई ! मी त्यांच्यावर इतकं प्रेम करतें कीं, मीं जरासं लाजून व हंसून त्यांच्याकडे पाहिलें, कीं, मला ते या बाबतींत एक प्रश्न विचारतील तर शपथ. कारण त्यांचंहि माझ्यावर तसंच उत्कट प्रेम आहे. माझ्या आलिंगनानें आणि प्रेमकटाक्षानें त्यांच्या सगळ्या प्रश्नांचीं मीं उत्तरें देईन. अमिरे ! या गोष्टी तुला माहीत नाहींत का ? अगदींच कशी ग तूं अरसिक !! स्त्रियांच्या जन्माला येऊन त्यांचे मंत्र तुला समजूं सुद्धां नयेत म्हणजे आश्चर्यच ! "

अमिरा मृदु हास्य करून म्हणाली, " बाई बाई. शर्थ झाली बरं का तुझ्या मंत्राची आणि रसिकतेची. तुझ्या इतकी निर्भीड स्त्री मीं कुठंहि पाहिली नाहीं. चला बेगमसाहेब ! आपल्याबरोबर वाद करणं फारच कठीण आहे. त्यापेक्षां तुमच्या हुकुमाप्रमाणेंच वागणं चांगलं; पण पाण्यांतून जातांना आपला हा बहुमोल पोषाख नाहीं का भिजणार ? "

" जें व्हायचं असेल तें होऊं द्या. तुझं काय गेलं ? मी सांगते तशी तूं वाग. माझ्या हुकुमाबाहेर वागण्याचं तुला कारण नाहीं. तोटा नफा जो कांहीं होईल तो माझा मी पाहून घेईन—" असें बोलतां बोलतांच प्यारीनें

अमिरेला ओढीत ओढीत नदीकडे चालविलें. नंतर अमिराहि प्यारीचा तो निश्चय पाहून कोणत्याहि प्रकारचा अडथळा आणण्याचें धाडस करूं शकली नाहीं. पुढें दोघींहि त्या नदींतून चालल्या; पण नदींतील पाणी गुडघ्या इतकेंच असल्यामुळें त्यांना मुळींच त्रास झाला नाहीं.

---

## प्रकरण १४ वें.

---:*:---

### तुम्ही राजराजेश्वरी होणार पण–

निर्विघ्नपणें नदीच्या पलीकडे पोंचल्यावर, दोघींहि त्या वृक्षछायेंत उभी राहिलेल्या चारणीकडे निघाल्या. चारणी अजूनहि झाडाखालच्या काळोखाला मागें सारून ती जागा उज्ज्वल करीत उभी होती. ही चारणी म्हणजे आपली पूर्वपरिचित पौर्णिमा, हें वाचकांना सांगायला नकोच. मानसिंहाच्या उपदेशाप्रमाणें प्यारीबेगमरूपी हरिणीला कुशलतेनें जाळ्यांत कशी पकडावी याची योजना करीत ती येथें उभी होती, व त्या बाबतींत तिनें, कोणत्या जाळ्याचा उपयोग करावयाचा व पाश कसा टाकावयाचा हेंहि ठरविलें होतें. असो.

प्यारी आणि अमिरा त्या चारिणीजवळ येऊन तिला सन्मानपूर्वक सलाम करून म्हणाल्या, " आपण कोण आहां माई ? "

चारणीनें त्यांच्या प्रश्नाचें उत्तर न देतां एका प्रशस्त शीलेकडे बोट दाखवून गंभीरपणानें म्हटलें," तिथें बसा. मी एक चारणी आहें. आपलं माझ्या हातून कांहीं काम होण्यासारखं असल्यास सांगा. "

प्यारीच्यानें स्वस्थ बसवेना. ती अमिरेच्या कानाशीं हळूच म्हणाली, " चारणी ? अग चांगलंच झालं. शहाजादेसाहेब म्हणतात कीं, या चारणींना भूतभविष्य सर्व कांहीं समजतं. "

प्यारीबेगमच्या या कानमंत्राकडे आपलें लक्षच नाहीं, असें दाखवीत चारणी किंचित् हंसून गंभीर स्वरानें म्हणाली, " कुठं असतां आपण ? तुमचा हा पोषाख आणि कुठेंहि लोपलें न जाणारें तेज पाहून मला वाटतं, कीं, तुम्ही मोठ्या कुलवान आणि श्रीमंत असाव्यात. कां खरं ना ? "

यावर प्यारी कांहीं बोलली नाहीं, पण अमिरा म्हणाली, " ही, शाहाजादा खुसरू याची पत्नी प्यारीबेगम आहे. सम्राट् अकबरशहांचा नातू खुसरू आपणाला माहीत असेलच. सम्राट्चं त्यांच्यावर अत्यंत प्रेम आहे. "

चारणीनें थोडावेळ कसलासा विचार केला आणि म्हटलें, " मग बेगमसाहेबानीं एथपर्यंत येण्याचे कां बरं श्रम घेतले ? माझ्यासारख्या संन्यासिनीकडे यांचं काय बरं काम ? कांहीं काम असेल तर अवश्य सांगा. "

या वेळीं आपणाला बोलण्याला योग्य वेळ आहे असें पाहून प्यारी बेगम म्हणाली, " माई ! माझी खात्री आहे कीं, आपण भूत भविष्य जाणूं शकतां. तेव्हां माझ्या नशिबांत काय आहे, तें माझा हात पाहून सांगाल का ? सांगा. मला फारच उत्सुकता लागली आहे. " चारणी प्यारीबेगमच्या तोंडाकडे पाहून गंभीर स्वरानें म्हणाली, " बरं तर दाखवा पाहूं हात ! "

प्यारीनें तावडतोब आपला हात पुढें केला; पण चारणी तिच्या चेहेऱ्याकडेसच पहात शांतपणानें म्हणाली, " तुझ्या नशिबांत काय आहे, तें सांगण्याला माझी हरकत नाहीं. पण मी जें सांगेन तें जर भीतिकारक असलें शोचनीय असलें, तर तें ऐकण्याची तुझी तयारी आहे ना ? कांहीं गुप्त प्रकार अथवा हृदयाला दुखविण्यासारखे शब्द जर मीं सांगितले तर माझ्यावर तुमचा राग होणार नाहीं ना ? "

चारणीचें हें बोलणें ऐकून प्यारी बेगमच्या मनाला थोडासा धक्का बसला. ' आपल्या हृदयाची मधुरशांति कायमची निघून जाण्यासारखें तर ही कांहीं सांगणार नसेल ना ? ' प्यारीच्या मनांत जरी या विचारानें बरीच खळबळ उडवून दिली होती, तरी पण तिच्या स्वभावांतच असें एक विशिष्टत्व होतें कीं, एकदां मनांत आलेली गोष्ट ती सहसा सोडीत नसे. एकदां करीन असें म्हटल्यावर भीतीनें मागें सरावयाचें नाहीं, हें जणुं काय तिचें व्रतच होतें.

या दृढनिश्चयी स्वभावाला अनुसरून कांहीं वेळ विचार केल्यावर ती म्हणाली, " माई ! जर मी बरं वाईट जें कांहीं असेल तें ऐकण्यासाठीं इथें आल्यें आहें व ऐकण्याला तयार आहें, तर आतां भीती कसली ? माझी सध्यांची स्थिती फारच सुखाची आहे. खुदाच्या कृपेनें स्त्रीजन्माचें श्रेष्ठ सुख मला भरपूर मिळत आहे; असें असलें तरी पण भूत भविष्य वर्तमान या माझ्या स्थिती पतीच्या दैवाशीं जखडलेल्या आहेत. तेव्हां आपण जें सांगणार

असाल तें कितीहि का भयंकर असेना तें, माझ्या नव्हे, पण त्यांच्या कल्याणासाठीं तरी मला ऐकलेंच पाहिजे. मग मी त्याला कां बरें भिईन ? ''

चारणी किंचित् हसून मन्द स्वरानें म्हणाली, " मी आतां तुम्हांला सांगेन तें अशुभ, भयंकर अगर दुःखदायकच असेल असें जरी मला या वेळींच सांगतां येणार नाहीं तरी तसें असल्यास तुमची ऐकण्याची तयारी आहे कीं नाहीं तें विचारावें, हाच माझा आतांच्या प्रश्नाचा उद्देश होता "

निष्कारण बोलण्यांत वेळ घालविणें बरें नव्हे व आपणाला इथें बसायला मिळणारा वेळहि अगदीं थोडा आहे असा विचार करून प्यारी बेगमनें मागें घेतलेला हात पुन्हां पुढें केला, मोंगल राजअन्तःपुरांत अनेक वेडसर बाया मधून मधून येत असत. त्यांचें काम इतकेंच कीं, बेगम महालांत बेगमांचे हात पाहून पैसे मिळवायचे. चांगलें भविष्य सांगितलें कीं पुष्कळ पैसे मिळतात हें त्या बायांना चांगलें माहित असे व त्याच धोरणानें भविष्यें वर्तवून त्या पैसे मिळवीत. या बाया आल्या कीं, सौंदर्यवती रमणींची मोठी धांदल उडते असेंहि सांगतात. असो.

प्यारीबेगमनें हात पुढें करतांच चारणीनें तो आपल्या हातांत घेतला आणि विचारपूर्वक बराचवेळ पाहिल्यानंतर ती गंभीरपणानें म्हणाली, "बेगमसाहेब ! आपल्या उज्ज्वल दैवांत राजयोग स्पष्ट दिसत आहे. तुम्हीं राजराजेश्वरी होणार. फार काय हिंदुस्तानची वैभवशाली सम्राज्ञी होण्याचें भाग्य तुम्हांलाच लाभलें पाहिजे. "

चारणीचें हें गंभीरपणाचें बोलणें ऐकून प्यारीबेगम खो खो करून हंसत सुटली. चारणीला कांहीं तिचें हें हंसणें आवडलें नाहीं. ती कांहींशी तीव्र स्वरानें म्हणाली, " कां बरं हंसल्या बिबीसाहेब ? "

" आपलें भविष्य ऐकून हंसू आलं बरं कां माईसाहेब !! हसूं का नये येऊं ? आधीं माझा सुलतान सेलीम दिल्लीच्या तख्तावर बसणार हें उघड उघड दिसत आहे. तेव्हां आधीं आमच्या सासुबाई राजराजेश्वरी होणारच आणि त्यानंतर दैव अनुकूल असल्यास आमचा राजयोग !! मग आपल्या बोलण्यांचें कां बरं हंसूं येऊं नये ? "

चारणी गंभीर स्वरानें म्हणाली, " नाहीं तसें नाहीं बेगमसाहेब ! तुमच्या हातावरील रेषा पाहून जें मला दिसलें तेंच मी सांगितलं—या रेषांवरून

मी अद्यापहि स्पष्ट सांगतें, कीं, शाहाजादा खुसरूच सम्राट् होणार! तुमच्या सासऱ्याची दैवरेषा फारच अंधारांत गोंधळलेली दिसते.तरी पण तुमच्या स्वामींना हें सिंहासन आपलेंसें करावयाचें असल्यास स्वतां-जोराचा प्रयत्न केला पाहिजे. आणि त्यांचा हा प्रयत्न जर फारच जोराचा झाला नाहीं व ते मध्येंच मागें हटले तर यश न येतां शोचनीय रीतीनें मृत्यूच्या नोंडांत पडावें लागेल. आपली सौभाग्यदेवता शहाजादा खुसरू यांनीं जर बापाच्या हातून तो राजदंड काढून घेतला नाहीं, ते तसे करूं शकले नाहींत, आणि तुम्हींहि जर या महत्वाच्या कार्याकडे आपल्या स्वामींची दृष्टी वळविली नाहीं तर तुम्हांला अकालीं वैधव्य आलेंच असें समजा. "

या कधींहि ऐकूं न येणाऱ्या भयंकर गोष्टी ऐकून प्यारीचा नेहेमीं प्रफुल्ल असणारा चेहेरा एवढासा झाला. तिनें मनांत विचार केला. "हाय! मीं इथं कां बरं आल्यें? स्त्रियांचा स्वभाव चंचल म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. मीं चंचलस्वभावाच्या स्वाधीन होऊन कां बरं इथं येण्याचें धाडस केलें! मीं आज जें ऐकलं तें फारच भयंकर आहे. चांगलें असें कांहींच नाहीं. तेव्हां हें ऐकलं नसतें तर बरं झालें असतें!"

बराच वेळ मध्यें गेल्यावर प्यारीनें आश्चर्यानें चारणीकडे पाहून प्रश्न केला, "तुम्ही कोण आहां माई?"

चारणी अत्यंत गंभीरस्वरानें म्हणाली, "मी चोंहोंकडे भटकणारी एक चारणी आहे."

"तुम्ही राहतां कुठें?"

"वृक्षाची छाया हेंच आमचें राहण्याचें ठिकाण; पण केव्हां कुठें असेन याचा मात्र नेम नसतो. कारण विरक्त प्राण्याला सगळे जग हें आपलेंच घर असें वाटतें."

"तुम्ही माझ्या बरोबर आमच्या बादशाही रंगमहालांत येऊं शकाल कां?"

"नाहीं. तिकडे जायला मला फारच भीती वाटते."

"कां बरं? आपण कधीं बेगममहालांत गेलां होतां वाटते?"

"ज्या ठिकाणीं रात्रंदिवस ऐश्वर्याच्या उघडया लीला चालत असतात त्या ठिकाणीं गेल्यास माझ्या ईश्वरचिंतनांत बराच अडथळा येण्याचा संभव आहे."

नंतर प्यारीनें आपल्या गळ्यांतून एक फार किंमतीचा मोत्यांचा हा काढला आणि ती तो त्या चारणीला देऊं लागली; पण चारणीनें तो घेतला नाहीं. इतकेंच नव्हे, तर ती काहींशीं रागानें म्हणाली, " हा आमच्या दृष्टीं मातीमोल वाटणारा हार घेऊन मी काय करूं ? ही चारणी बक्षिसाच्या आशेनें कांहीं तरी भविष्यें वर्तवीत फिरते अशी का आपली समजूत आहे बेगमसाहेब ? पुन्हां स्पष्ट सांगतें, तुमचा दोघांचाही भविष्यकाळ अंधकारमय आहे. जोराचे आणि धाडसी प्रयत्न करून हा अंधार दूर करावा लागेल; पण या अंधाराला भिऊन जर तुम्हीं दूर पळालांत तर तुमचा शोचनीय शेवट होईल. स्त्रिया जर आपलें सामर्थ्य दाखविण्याचा प्रयत्न करतील तर त्यांना जमिनीचा समुद्र आणि समुद्राची जमीनहि करतां येईल. अत्यंत पराक्रमी शूर पुरुषहि रमणीच्या सामर्थ्यापुढें निस्तेज होतात, तेव्हां बेगमसाहेब, प्रयत्न करा. दिल्लीचें सिंहासन तुमचेंच आहे; आणि जर तें तुमचें झालें नाहीं तर— तुमचा समूळ नाश आणि शाहाजादेसाहेबांचा शोचनीय मृत्यु हें ठरलेलेंच आहे ! फार काय, तुमच्या सासऱ्याच्याच हातानें तुमच्या हृदयेश्वराचा अंतहि होईल. माझ्यानें हें भविष्य सांगवत नाहीं; पण तुम्हीं प्रश्नच केलांत, म्हणून सांगितलें. "

चारणीच्या तोंडचे शब्द ऐकून विलासांत दिवस घालविणाऱ्या प्यारीचें अन्तःकरण थरथर कांपूं लागलें आणि चेहेरा अगदीं निस्तेज झाला. ती आपलें डोकें डाव्या तळहातावर टेंकून किती तरी वेळ कसला तरी विचार करीत होती; पण कांहीं वेळानें तिनें सभोंवार पाहिलें तों तिला मायाविनी चारणी दिसली नाहीं. जणुं काय ती मंत्रसामर्थ्यानेंच अकस्मात् अदृश्य झाली असावी.

आणि अमिरा ! अमिरा एकाद्या मंत्रमुग्ध माणसाप्रमाणें प्यारीच्या चेहेऱ्याकडे टक लावून पहात होती. चारणी तिथून केव्हां आणि कुठें गेली हें तिनेंहि पाहिलें नाहीं. कारण आपल्या प्रियमैत्रिणीची ही स्थिति पाहून तिला फारच वाईट वाटत होतें.

सूर्यास्ताला आतां फारसा अवकाश नव्हता. प्यारीबेगम अकस्मात् शुद्धीवर आल्या सारखें करून म्हणाली, " किती ग भयंकर गोष्टी सांगितल्या त्या चारणीनें ! ते शब्द सांगतांना तिला माझी मुळींच का दया आली नाहीं ? आमचें आतां कसें होईल अमिरे ! "

अमिरा तिचें शांतवन करण्याच्या हेतूनें म्हणाली, " अग भविष्य तें भविष्यच-सगळेच का कधीं कुठें खरे होत असतें ? आणि यांचीं अशीं भविष्यें खरीं झालीं असतीं तर यांना लोकांनीं असें भटकत बरं फिरूं दिले असते ! तुझी इच्छाच असेल तर या रानांत तिचा शोध करूं. जाते कुठें ? तिच्या या भविष्याचा मला तर बाई नीटसा अर्थच समजला नाहीं. "

प्यारी अधीरतेनें म्हणाली, " नको. नको. आतां तिच्या शोधाला जाण्याचें कारण नाहीं. ती एक सैतानी आहे. तिनें माझ्या सर्व सुखशांतीचा आणि उत्साहाचा भंग केला. आतां मला ती पूर्वींची स्थिति पुन्हां मिळेल का ? छे. पुढें काय काय प्रकार होणार आहेत कुणाला माहीत ? चल. अमिरे आपण आतां नदीपलीकडे जाऊं. आम्हांला इथें बराच उशीर झाला. "

लागलींच त्या दोघीहि तेथून निघाल्या आणि दगडांनीं गच्च भरलेल्या त्या नदींतून उतरून सुखरूपपणें अलीकडे आल्या.

याच वेळीं खुसरूही त्यांचा शोध करीत तेथें येऊन पोंचला होता. दोघींनाही नदी उतरून अलीकडे आलेल्या पाहातांच तो म्हणाला, " कुठें गेलां होतां बेगमसाहेब ? मी आपला उगाच वेड्यासारखा तुमचा शोध करीत चोहोंकडे भटकत आहें ? "

खुसरूचें हें कांहींसें विनोदी भाषण ऐकून प्यारी बानू या वेळीं प्रफुल्लित व्हायची; पण ती कांहीं न बोलतां मनांत म्हणाली, " कुठं बरं गेलें होतें ? बरोबर सांगतां येणार नाहीं. तरी पण एका सैतानी स्त्रीच्या राज्यांत गेलें होतें एवढं खरं. " नंतर ती उघडपणें खुसरूला म्हणाली, " आपणाला इकडे यायला बराच विलंब लागलासें पाहून आह्मी या समोरच्या पहाडावर गेलों होतों. इतकंच नव्हे, तर आपण आम्हांला चोहोंकडे शोधीत आहां असें पाहून आनंदितहि झालों होतों, "

खुसरूनें कांहींसें तिरस्कारानेंच उत्तर दिलें, " स्त्रियांचें हृदय इतकं कठोर असतं हें मला अजून अनुभवाला आलं नव्हतं. तें पहाण्याचा प्रसंग आला खरा. तुला ज्या योगानें सुख होईल तेंच माझें सुख, मला त्रास होऊनहि जर तुला आनंद होत असला तर तोच माझा आनंद, असं असतां, आज तूं माझी परीक्षाच पाहूं लागलीस वाटतं ! बरं चल, आपण आतां राजवाड्यांत जाऊं. आज माझें दुर्दैव मला इतकें आड आलें कीं, शक्य तितके परिश्रम करू-

नही मला एकही हरीण तीरानें मारतां आला नाहीं. ”

प्यारी, स्मित हास्य करून मृदु स्वरानें म्हणाली “ तें चांगलेंच झालें. आतां आपल्या मनाला थोडसं वाईट वाटलं असेल; पण बिचाऱ्या हरिणीचा प्राण वांचला हें काय थोडं झालं ? मुके बिचारे पशु, आपल्या स्वतांःच्या स्वतंत्र राज्यांत मनाचा आनंद निश्चितपणें वनविहार करून व्यक्त करीत असतां त्यांना बाणांनीं मारणं हें आपल्यासारख्या वीर पुरुषांना जितकं आनंदकारक वाटतं, तितकंच तें आमच्यासारख्या कोंवळ्या मनाच्या स्त्रियांना दुःखाचं वाटतं.तसेंच तुम्ही पुरुष आपल्या असल्या कार्यांनीं स्वतःच्या निष्ठुरतेचा चांगलाच परिचय करून देत असतां ! ”

अशा प्रकारच्या श्लेषमय रहस्यालापांत निमग्न होऊन तीं तिघेंहि हळू हळू चालत राजवाड्याकडे येत होतीं.कारण या अरण्यांतून शिक्रीचा राजवाडा कांहीं फारसा दूर नव्हता.

सगळ्या दिवसाचे परिश्रम फुकट गेले व कांहींच शिकार झाली नाहीं असें वाटल्यामुळें खुसरूचें मन फारच खिन्न झालें होतें व त्याची छाया चेहेऱ्यावर पडून तोहि विषण्ण दिसत होता. तसेंच प्यारीबानूचें मनहि अस्वस्थच होतें. तिचाहि चेहेरा बराच उदासीन दिसत होता. भयंकर वेदना देणारी चिन्तारूपी राक्षसी प्यारीच्या अन्तःकरणाचे लचके तोडीत असतां तिचा चेहेरा कसा बरें प्रफुल्लित दिसावा ! तिच्या हृदयाकाशांत एक लहानसा काळा मेघ प्रथम दिसूं लागला होता; पण तो पसरत पसरत सर्व हृदय व्यापून बसला. चारणीनें तिला जें कांहीं सांगितलें होतें तें अक्षरान् अक्षर तिला आठवत असल्यामुळें तिची स्थिती फारच शोचनीय झाली होती.

प्यारीचा तो विषण्ण चेहेरा पाहून खुसरूनें तिला विचारलें, “ कां प्यारी ! आज तुझें सदोदित प्रफुल्लित दिसणारें मुखकमल इतकें कोमजलेलें कां बरें दिसतें ! ”

प्यारी मुद्दाम चेहेऱ्यावर हास्य आणून म्हणाली, “ आपल्या निष्फळ शिकारीमुळें आपणाला आजचा सबंध दिवस अरण्यांत फिरावं लागलं. मी स्वस्थ बसून होतें; पण सूर्यताप जें करूं शकला नाहीं, तें आपला विरहताप करूं शकला आणि त्यामुळेंच माझा चेहेरा आपल्यापेक्षां म्लान दिसत असेल!”

खुसरूला यावर कांहीं बोलावेंसें वाटेना व प्यारी बानूचीहि तीच स्थि-

ती होती; पण वेळ कांहीं कुणाची वाट पहात राहात नाहीं. सूर्य तर केव्हांच अस्ताला गेला होता; आणि संध्यादेवीहि जगाचा निरोप घेण्याच्या विचारांत होती. थोडयाच वेळांत रात्र झाली. व खाणें पिणें झाल्यानंतर खुसरूनें फारसा वेळ गाणें बजावणें ऐकण्यांत न घालावितां बिछान्याचा आश्रय केला. व श्रम बरेच झालेले असल्यामुळें त्याला झोंपहि पण लवकरच लागली; पण मखमलीच्या सुकोमल शय्येवर असतांहि प्यारी बानूला झोंप येईना. जवळच खुसरू शांत अन्तःकरणानें स्वस्थ झोंप घेत होता; पण प्यारीला ती सुवासिक मृदुशय्या अग्निकणाकडे जाळीत होती. बराच वेळ गेला तरी झोंप येत नाहीं असें पाहून ती मध्यरात्रीच्या सुमारास बिछान्यारून उठली आणि उघडया खिडकीजवळ येऊन उभी राहिली.

या वेळीं प्रकृति देवी हळू हळू रणरंगिणीचा वेष घेत असल्याचें प्यारीला दिसून आलें. तिच्या हृदयांत ज्याप्रमाणें चितारूपी मेघांचें तांडव नृत्य चालू होतें तसेंच बाहेरील आकाशांतहि मेघांच्या जमावास सुरवात झाली होती. तसेंच काळ्या मेघांची कृष्ण छाया पडून प्रकृतिदेवीचा चेहेरा प्यारीपेक्षांहि दुर्मुखलेला दिसत होता. निळ्या व तारकाखचित आकाशांत वारा सुरू झाला असल्यामुळें मेघहि नाचूं लागले होते, आणि त्यामुळें पावसाची चिन्हें स्पष्ट दिसत होतीं.

प्यारीनें एकवार काळ्याकभिन्न आकाशाकडे व प्रकृतिदेवीच्या भीषण वेषाकडे पाहून एक दीर्घ सुस्कारा सोडून मनांत म्हटलें, "तसं होणारच नाहीं? तरी पण चारणीचं भविष्य जशाच्या तसंच का खरं होऊं शकणार नाहीं ? या जगांत असंभव असं कांहींच नाहीं. शिवाय मोगल राजसंसारांत संभवातीत असे प्रकार बरेच झाले आहेत व नेहेमी होतहि असतात. मनुष्याला प्रयत्नांनीं होणार नाहीं असं काय आहे? खुदा! माझ्या मनांत उत्पन्न झालेली ही नवी आशा खरी होणार नाहीं का? तुझ्या कृपेचं साहाय्य आम्हांला मिळाल्यास आम्हीं पाहिजे तें करूं शकूं. मी स्त्री असलें, व माझी शक्ति सामान्य असली तरी हीच क्षीण शक्ति उज्ज्वल करून ध्येय साध्य करून देण्याचें मनांत आणल्यास खुदा, तुला मुळींच अशक्य नाहीं!"

याचवेळीं अन्धकारानें व्याप्त झालेल्या त्या आकाशांत अकस्मात वीज चमकली आणि त्याबरोबरच कानठाळ्या बसणारा भयंकर मेघांचा गडगडाट

झाला. तो भीषण प्रकार पहातांच कोमल मनाची सुकुमार प्यारीबानू हातानें आपले डोळे झांकून थरथर कांपत बिछान्याजवळ आली—कारण तो वज्रध्वनी ऐकतांच व तें विद्युत्स्फुरण पहातांच तिच्या हृदयाला कसेंसेंच वाटलें. तिला तें जाणतां येईना. ती भ्याली, शंकित झाली आणि धांवतच जाऊन तिनें झोंपलेल्या खुसरूला आलिंगन दिलें. तिची त्यावेळची तत्परता इतकी विलक्षण होती कीं, 'कोणाही पहाणाराला खुसरूचा कोणी घात करीत आहे' अशी तिची समजूत झाली असावी, असें वाटलें असतें. त्यानंतर तिला त्या श्रमांनीं म्हणा अथवा अन्य कांहीं कारणानें म्हणा गाढ झोंप लागली; पण त्या गाढ झोंपेंतंहि भयंकर स्वप्नांनीं तिला चैन पडूं दिलें नाहीं.

आणि हीच काळीकुट्ट वस्त्र पांघरलेली रात्र दुसऱ्याही एका महत्वाच्या ठिकाणीं बरीच खळबळ उडवून द्यायाला उद्युक्त झाली होती. अम्बर राजप्रासादांतील गुप्त मसलतीच्या दिवाणखान्यांत बसून राजा मानसिंह कसलीशी काळजी करण्यांत गढून गेला होता. तेव्हां त्याच्या चिंतेचा विषय कोणता, त्याचें आपण निरिक्षण करूं.

---

# प्रकरण १५ वें.

—:o:—

## शहाजादा सेलीमचा खलिता.

चोहोंकडे मुसळधारांनीं पाऊस पडत होता. काळोख, विजांचें चकाकणें, आणि मेघांचा गडगडाट यांच्या योगानें प्रत्येकाच्या हृदयाचा थरकांप होत होता. प्रकृति देवीचा हा उन्मत्तपणा पाहून तिच्या स्त्रीत्वाबद्दलही संशय होता.

अशावेळीं अम्बरेश्वर मानसिंह आपल्या मसलतीच्या खोलींत, कसला तरी गहन विचार करीत इकडून तिकडे फिरत होते. खोलीच्या उघड्या खिडकींतून जलतुषारपूर्ण हवा जोराजोरानें आंत येत होती, आणि त्या जोराच्या वाऱ्यानें खोलींतील सुगन्धी दिव्यांच्या ज्योती थरथर कांपत होत्या. कित्येक तर निर्वाणालाच जाण्याच्या विचारांत होत्या आणि त्यामुळें येथें

एक प्रकारची भीषणता पसरली होती; पण राजा मानसिंह विचारांत गढून गेलेले असल्यामुळे त्यांना कशाचीच दाद नव्हती.

थोडया वेळानें या चाललेल्या प्रकाराकडे मानसिंहाचें लक्ष गेलें व कांहींशा रागानें त्यांनीं सगळ्या खिडक्यांचीं दारें धाड धाडकन् बंद करून टाकलीं. आतां बाहेर काय चाललें आहे हें जरी दिसण्यासारखें नव्हतें तरी एक प्रकारचा भीषण आवाज ऐकूं येत होताच; पण या आवाजापेक्षांहि तीव्र स्वरूप राजा मानसिंहाच्या हृदयांत थैमान करीत होतें, त्यामुळें बाहेरचा आवाज त्याला ऐकूं येत नव्हता म्हटलें तरी चालेल. आज आपल्या हृदयांतील झंझावात थांबेल असें कांहीं त्यांना वाटेना. ते पुन्हां पुन्हां एका उघडया पत्राकडे पहात असत आणि त्या पत्रामुळेंच त्यांची आज अशी स्थिति झाली होती. पत्रांतील मजकूर वाचून पाहतांच त्यांना बाह्य जगाचा विसर पडला होता. अर्थात् त्या पत्रांतील मजकूर तसाच कांहींतरी महत्वाचा असला पाहिजे.

अम्बरेश्वरांचा चेहेरा यावेळीं क्रोधाविष्ट झाला असून त्यांचे नेत्र लाल झाले होते. तसेंच ओंठ थरथर कांपत होते आणि डोळ्यांत एक प्रकारचा तिरस्कार चमकत होता. एकेकदा त्यांच्या या मानसिक स्थितीचा इतका अतिरेक होत असे कीं, ते आपली कमरेला असलेली म्यानबद्ध तरवार सरकन् बाहेर ओढीत; पण पुन्हां कसलासा विचार करून ती कोषबद्ध करीत आणि इकडून तिकडे फिरूं लागत; पण पुन्हां त्या पत्राकडे दृष्टी जातांच त्यांचा चेहेरा रागानें लाल होई आणि तिरस्कारानें ते कुठें तरी पाहूं लागत.

हा खलिता—अलाहाबादेहून आला होता, व शाहाजादा सुलतान सेलीम यानें तो पाठविला होता. जोधाबाईनें अम्बर सोडल्यानंतर सात दिवसांनीं मध्यरात्रीं हा खलिता एका घोडेस्वारानें राजा मानसिंहाच्या हातांत देऊन तो निघून गेला होता; आणि या खलित्यामुळेंच आज राजा मानसिंह भ्रमिष्टासारखे होऊन खोलींतल्या खोलींत फिरत होते.

जेव्हां जेव्हां त्या खलित्यावर त्यांची दृष्टी पडे तेव्हां तेव्हां महाराजांना असा कांहीं राग येई कीं, या वेळीं ते कांहीं तरी भयंकर कृत्य करूं लागतील असें वाटे. त्यांच्या उजव्या हाताची मूठ इतकी घट्ट आवळली जाई कीं, तिच्या आधारानें आतां दगडही फुटेल अशी खात्री होई. खिडकींतून येणा-

ऱ्या वाऱ्याच्या झोतामुळें चंचल व म्लान होणाऱ्या दिव्याच्या ज्योती, जणुं काय यांच्याच रुष्ट दृष्टीला भिऊन आणखी थरारत आहेत, असाही भास होई आणि त्यामुळें येथील एकंदर प्रकार स्पष्ट समजणें कठीण होत असे. तेव्हां प्रथम आधीं आपण तें पत्र पाहूं. पत्रांत पुढील मजकूर होताः—

" अम्बरेश्वर ! आपण आमचे अगदीं निकटचे आप्त आहां, व ही आत्मीयता, जरूर त्या साधारण कार्यक्षेत्राच्या आंत जाऊन जनानखान्यांतील रंगमहालांतही प्रकाशित होऊं लागली आहे; पण ज्या कार्याशीं हिंदुस्तानच्या भावी सम्राट्चा स्वार्थसंबंध विजडित झालेला आहे, त्याशीं तुमच्या सारख्यांनीं लहानसहान नात्याच्या जोरावर स्वतंत्रपणें संबंध ठेवणें म्हणजे किती उद्धटपणा आहे बरें ? आपण याचा कधीं विचार केलेला असेल असें मला वाटत नाहीं. माझी पत्नी आणि मुलगा हीं दोघेहि माझ्या आज्ञेच्या बाहेर जाऊं पहात आहेत, याचें कारणही आपणच आहांत. मोंगलांचें दास्यत्व करण्याचेंच ज्यांना बाळकडू पाजलेलें आहे, व ज्यांच्या नशिबांत तें केल्यावांचून गत्यंतर नाहीं असें विधात्यानें स्पष्ट लिहून ठेविलें आहे, ज्यांनीं हिंदुस्तानच्या भावी सम्राट्ची आज्ञा पाळलीच पाहिजे, ज्यांचें तें मुख्य व आवश्यक कर्तव्यच आहे, त्यांचा हा सध्यांचा अपराध फारच निराळ्या स्वरूपाचा असून सम्राट्नीं जरी त्यांना क्षमा केली तरी केव्हांहि करणार नाहीं. सर्पांना दूध पाजलें तरी त्याचें वीषच व्हायचें. शहाजादा खुसरू याला अम्बर शहरांत अडकवून ठेवण्याचा तुह्मांला कोणत्याही प्रकारचा अधिकार नाहीं. या आजच्या पत्रानें आपले मुद्दाम झाकलेले डोळे चटकन् उघडले जातील अशी मला फार आशा आहे. माझ्या हुकमाप्रमाणें ताबडतोब व्यवस्था झाली पाहिजे. इति.

—शहाजादा सुलतान नूरमहंमद सेलीम. "

मानसिंहांनीं पुन्हां एकवार तें पत्र वाचलें. त्यांना वाटलें कीं, कदाचित् हें पत्र बनावटही असूं शकेल, सुलतान सेलीमचें हें लिहिणें नव्हे, कदाचित् नांव वाचण्यांत माझी चूक झाली असेल; पण तिसऱ्यावेळीं पत्र वाचल्यानंतर त्यांचा तो वृथा भ्रम नाहींसा झाला. त्यांनीं अगदीं निरखून पाहिलें तों पत्राखालीं, सेलिमनें आपली सही केलेली त्यांना स्पष्ट दिसून आली. भाषा, अक्षर आणि शील मोहोर सर्व कांहीं त्याच्या स्वतःच्या हातानें झालेलें आहे असें मानसिंहास आतां अगदीं स्पष्टपणें कळून चुकलें.

महाराज मानसिंहांचें हृदय पुन्हां क्रोधानें व्याप्त झालें. पत्रांतील अपमानकारक भाषेनें त्याच्या हृदयाला विषारी बाणच टोंचले गेले, आणि त्या विषाच्या ज्वालांनीं त्यांचें हृदय तळमळूं लागलें. त्या ज्वाला आणि ती तळमळ यांना तुलनाच नव्हती. त्या ज्वालांनीं त्यांचें सर्वांग जळूं लागलें. त्यांना कुठेंहि कसेंच चैन पडेना. कारण आजपर्यंतच्या जीवनांत त्यांचा असा अपमान केव्हांहि झाला नव्हता.

बराच वेळ झाल्यावर बाहेरचें वादळ थोडथोडें कमी होऊं लागलें. प्रकृतीनेंहि आपल्या रणरंगिणी वेषाचा त्याग करून सौम्यवेष धारण केला. यावेळीं बाहेरून येणाऱ्या शीतळ समीरणाच्या स्निग्ध लहरींनीं राजा मानसिंहांचेंहि डोकें कांहींसें शांत झालें; पण हृदयाची तळमळ मात्र कमी झाली नाहीं.

ते स्वाभिमानपूर्ण नजरेनें समोर पहात दाण्‌कन् जमिनीवर पाय आपटून तीव्र स्वरानें म्हणाले, "सेलीम ! तूं इतका उद्धट आणि अभिमानी झालास काय ! राजा मानसिंह मोगलांचा दास ? सेलिमा, माझ्या दृष्टीआड होतास म्हणून तुला इतका उद्धटपणा करायला सांपडला ! ! हा मानसिंह नसता, तर पठाणाप्रमाणें काळाच्या तीव्र प्रवाहांत तुम्ही कुठच्याकुठें वाहून गेलां असतां ! ! महापराक्रमी आणि या दीन दुनयेचा मालक बादशाहा अकबर हासुद्धां जे शब्द बोलण्याचें धाडस करणार नाहीं, ते शब्द आज तूं मला लिहून पाठविलेस ! सेलीम ! बंगाल, बहार आणि ओरिसा या तीन प्रांतांत राहून नेहमीं सतावून सोडणाऱ्या पठाणाचें राजसिंहासन कुणीं बरें नाहींसें केलें ? सिंहाप्रमाणें शक्तिमान असणारे जे अफगाण लोक व दुर्भेद्य पर्वतांच्या तटांनीं ज्यांनीं आपल्या मातृभूमीला सुसंरक्षित केली आहे त्या अफगाणांना नाहींसें करून काबुलचें स्वातंत्र्य कुणीं बरें हिरावून घेतलें सेलीम ? निर्मलाकाशांतील निष्कलंक चंद्राप्रमाणें, सगळ्या राजस्थानाला भूषणभूत झालेल्या महाराणा प्रतापसिंहानें जेव्हां अर्धें अधिक हिंदुस्तान आपल्या पराक्रमानें हादरून सोडलें, त्यावेळीं माझी मदत नसती तर सम्राट्चा मान कुणाला मिळाला असता बरें ? हिंदुस्ताचा व हिंदूंचा गौरवस्वरूप राणा प्रताप जेव्हां झपाट्यानें सर्व मोगलांची लांडगेतोड करीत चालला तेव्हां त्या वीरकेसरीला कुणीं बरें निजधामाला पाठविला सेलीम ! खरं

सांगावयाचें म्हणजे तूं असंख्य सैन्य घेऊन त्याच्याविरुद्ध चालून गेलास; पण त्याचा कांहीं तरी उपयोग झाला का? इतकेंच नव्हे, तर चितोरविजयानंतर राजस्तानचा मुकुट माझ्या मस्तकावर शोभत होता; पण तोच मीं तुझ्या मस्तकावर किती आनंदानें ठेवला बरें? त्या स्वारीच्या सगळ्या पराक्रमाचें यश तुझें असें मीं सम्राट्ना सांगितलें त्यावेळीं तूं तेथें होतास ना? पण हाय! शेवटीं तूं त्या सर्व उपकारांची अशा रीतीनें फेड करावीसना! ज्यानें रजपुतांच्या गौरवज्ज्वल कीर्तीला कलंक लावून मोगलांचें दास्यत्व स्वीकारलें आहे, आणि ज्याच्या बाहुबलानें काबूलपासून ओरिसापर्यंतचें हिंदुस्तान मोंगलांच्या हातांत आलें आहे त्या मानसिंहानें प्रयत्न केल्यास तुमचें सिंहासन डळमळून खालीं पडेल आणि येथें उभें राहायलाहि तुह्मांला जागा मिळणार नाहीं, हें तुझ्या मनांत कधींच का आलें नाहीं? द्वेष, तिरस्कार आणि सूड हीं तीन्ही शस्त्रें या मानसिंहाला इतक्या कुशलतेनें चालवितां येतात कीं, तुह्मी आ वासूनच बसाल. आणि प्रत्यक्ष प्रमाणाला वेळच नको, या आजच्या तुझ्या पत्रानें, तीं शस्त्रें माझ्याजवळ आहेत व तीं मी कशी चालवितों हें दाखविण्याचा प्रसंग पण आणला आहे. आतां पहाशीलच--"

राजा मानसिंह इतकें बोलले तरी त्यांच्या हृदयाची तळमळ शांत झाली नाहीं. कांहीं वेळ थांबून ते पुन्हां दृढ स्वरानें बोलूं लागले, " मोंगलांचा सेवक मानसिंह असें त्याच्यानें म्हणवलें तरी कसें? सम्राट् अकबरच्या तोंडून अशीं अक्षरें केव्हांहि निघालीं नसतीं. सम्राट्नाहि जे शब्द बोलण्याची नव्हे नुसते मनांतहि आणण्याची भीति वाटते ते शब्द तूं उच्चारण्याचें धाडस करतोस का सेलीम? छे आतां मला हा अपमान सहन होत नाहीं. जोधेच्या केविलवाण्या तोंडाकडे पाहून मीं तुझे अपराध पोटांत घातले आहेत; पण आजचें तुझें हें उद्धटपणाचें लिहिणें मी केव्हांच सहन करणार नाहीं. माझ्या सहनशीलपणाचा आतां कळस झाला. मी निश्चयपूर्वक तुला माझ्या हुकमतीखालीं आणीन. तुला आजपासून प्रत्येक कार्यांत अपमानित करणें आणि बारिकसारिक अपराधहि सम्राट्च्या नजरेला आणणें हेंच माझें आतां मुख्य कर्तव्य राहील. तुझ्यावर माझी नेहमीं तीव्र नजर राहील. माझी प्रेमळ बहीण जोधा आजपासून सम्राट्ची पत्नी न होतां सम्राज्ञी कशी होईल हाच प्रयत्न मी आतां जोरानें चालू ठेवणार. हिंदु-

स्थानचा रत्नखचित राजमुकूट माझ्या भाच्याच्याच मस्तकावर चांगला शोभेल. तुला त्याची जबाबदारी घेतांच येणार नाहीं आणि घेतां आली तरी मी तो तुला केव्हांहि देणार नाहीं. शिवाय शहाजादा खुसरू आजीवन माझ्याच तंत्रानें चालेल. तूं तसा चालणार नाहींस. अकबरशाहा सध्यां वृद्धावस्थेंत असल्यामुळें त्याचा सर्व उत्साह पार मावळला असून रोगांनीं आणि भावी काळजीनें त्याचें हृदय अगदीं दीन होऊन गेलें आहे. त्याचे शक्तिशाली दोर्दंड आज निशक्त झाले आहेत, मनाला उत्साह नाहीं, बुद्धि विकल झाली आहे, प्रज्ञा केव्हां नाहींशी झाली तें त्याचें त्यालाच समजलें नाहीं, शौर्यासंबंधीं तर बोलायलाच नको, मग त्याच्या हातून प्रतिकार आणि मदत कांहींच होणार नाहीं. झालें. अशारीतीनें मानसिंहाचे विचार-पूर्ण झाल्यावर, "सेलीम ! तुझ्या बापानें काबुलविजयाची आठवण म्हणून जी ही मला रत्नखचित तरवार बक्षिस दिली आहे, तीच-तीच-कारण पडल्यास मी तुझ्या हृदयांत खोल-खोलपर्यंत पुरून ठेवीन समजलास ? सेलिमा ! पहा, तुझ्या पत्राचा आतां काय शोचनीय परिणाम होईल तो ? ?" असें स्वतःशींच निश्चयानें म्हणतात.

राजा मानसिंहाचें हृदय सूड उगविण्याला इतकें तयार झालें होतें कीं, शेवटचीं शेवटचीं वाक्यें तो, मोठ्यानें भांडतात त्याप्रमाणें बोलत होता; पण त्याला याच वेळीं दरवाजाबाहेर कुणाचीं तरी हळूच पावलें वाजलीं असावीं असा भास झाला; आणि या संबंधीं तो साशंकपणें विचार करीत असतां त्याच्या हृदयाची क्रोधवृत्ति, बऱ्याच अंशानें कमी होत चालली होती. आपल्या संशयाची निवृत्ति करावी म्हणून हळूच त्यानें दरवाजा उघडला; पण दरवाजाबाहेर कोणीहि नव्हतें. तेव्हां त्याला वाटलें हा आपला भ्रम असावा. मनाची अशी समजूत होतांच राजा मानसिंह पुन्हां त्याच खोलींत आले व त्यांनीं दरवाजा बंद करून घेतला.

डोकें शांत व्हावें म्हणून कांहीं वेळानें त्यानें खिडकी उघडली. आतां वारा व पाऊस बराचसा कमी झाला होता; पण त्याचें अस्तित्व कांहीं अगदीं-च नाहींसें झालें नव्हतें. बराच वेळ पाहिल्यावर त्यानें कपाळावरचे मोत्यांप्रमाणें चमकणारे घर्मबिंदु पुसून टाकले आणि दीर्घ सुस्कारा सोडून राजेसाहेबांची स्वारी मखमलीच्या एका कोचावर विराजमान झाली. आणि [illegible]

पुन्हां बोलूं लागली, " माझी आशा पूर्ण होणार नाहीं का? या जगांत ईश्वरापासून एकदोन पायऱ्या खालीं बसण्याला हाच एक अद्वितीय वीर योग्य आहे. बाकी एकाही प्राण्याची तितकी योग्यता नाहीं. मनुष्य आपल्या शक्तीनें काय करूं शकणार नाहीं? जगांतील अहमिहकेच्या कर्मक्षेत्रांत मनुष्यप्राणी हा कधीं ईश्वर तर कधीं सैतान होऊं शकतो. सेलिमाचा संपूर्ण रीतीनें घात करण्यासाठीं मी आपल्या देवत्वाला भस्मीभूत करून सैतान होणार आणि या सुशांत भारतवर्षांत महाप्रलयाला सुरवात करणार! देवाला हांका मारीत बसून व व्रतें उद्यापनें करून असलीं मोठीं कार्यें साधत नसतात. याला प्रलयकाल ओढून आणणारा सैतानच बनावें लागतें. कदाचित यांत असंख्य जीव संहार आणि स्वतःचाहि नाश होऊं शकेल; पण कार्य झाल्याशिवाय राहणार नाहीं. बायकांसारखें मुळूमुळू रडत बसून कांहीं तरी होणें शक्य आहे का? मला तर तसें मुळींच वाटत नाहीं. माझ्या या सामार्थ्यपूर्ण उजव्या हातानें मी माझ्या खुसरूच्या मस्तकावर राजमुकूट ठेवीन, आणि त्याच वेळीं मला समाधान वाटेल. तोच त्या राजमुकुटाला योग्य आहे. सेलिमाच्या आंगीं, सिंहासनाला योग्य असा एकही गुण नाहीं. खुसरूच्या आंगींहि तसे कांहीं ते सर्वच असतील असें नाहीं; पण मी त्याला लहानपणापासून चांगलच ओळखत असल्यामुळें त्याच्या आंगीं सुप्तावस्थेंत असलेल्या जाज्वल्य गुणरूपी शस्त्राला थोडासा उजळा देतांच तीं शस्त्रें जगालाहि जिंकू शकतील, मग या मोंगलांच्या शापित सिंहासनाची काय गोष्ट? मी माझ्या बहिणीला विधवा करूं इच्छित नाहीं; पण तिनें राजमाता म्हणून मिरवावें अशी माझी फार इच्छा आहे. मोंगलांच्या जनानखान्यांत आपल्या बहिणीला निष्ठुरपणें लोटून जें मीं पाप केलें आहे, त्याचें प्रायश्चित्त मी अशा रीतीनें घेऊं इच्छितों; पण माझे हे सगळे बेत हाणून पाडण्यासाठीं खुसरू जर माझ्या ताब्यांतून निसटला, आणि प्रतिस्पर्धी बनला तर त्यालाहि मी सेलिमासारखीच भयंकर शिक्षा करण्याला मी बिलकुल मागें पुढें पहाणार नाहीं!!!"

मानसिंहाचें बोलणें संपतें न संपतें तोंच दरवाजांत कोणी तरी बोललें, " नाहीं महाराजजी!! आपणाला असे विचार हृदयांत सुद्धां आणावे लागणार नाहींत. खुदा, आपले सर्व हेतू तडीला नेऊन आनन्दित करील. या बाबतींत आपणाला इतकें पुढेंहि जावें लागणार नाहीं."

राजा मानसिंह निधड्या छातीचा वीर होता तरी हे आपल्या विचारांना अनुलक्षून आलेले शब्द ऐकून तो अस्वस्थ झाला. त्याला आश्चर्य वाटलें. राजाजींच्या कमरपट्यांत नेहमींच एक तीक्ष्ण धारेचा खंजीर ठविलेला असे. वरील शब्द त्यांच्या कानीं पडतांच त्यांनीं तो खंजीर आपल्या उजव्या हातांत घट्ट धरला, आणि दरवाजाच्या कडीला हात घालून गंभीर, पण तीव्रस्वरानें म्हटलें, " कोण आहे ? " व खाडकन् दरवाजा उघडला, तोंच, ज्याचें सर्वांग काळ्याकुट्ट वस्त्रानें आच्छादित झालें आहे, असा एक भीमकाय पुरुष मानसिंहासमोर येऊन उभा राहिला, आणि मृदु स्वरानें म्हणाला, " आदाब जनाब ! मी आपलाच नातेवाईक असून प्यारीजानूचा बाप आहें. मला आपण अद्यापिही ओळखलें नाहीं का ? "

लागलीच मानसिंहाला आपल्या पाहुण्याची ओळख पटली, व दोघांनींहि आनंदानें एकमेकांला आलिंगन दिलें. नंतर पूर्वीच्याच कोंचावर मानसिंहांनीं प्रथम पाहुण्यांना बसवून व कांहीं वेळानें आपण बसून आनंदानें विचारलें, खानसाहेब, आपणच का माझ्या त्या गुप्त प्रश्नाचें उत्तर दिलेंत ? "

खानसाहेब हंसून म्हणाले, " होय. मीच; पण आपल्यासारख्या वीर पुरुषानें व मुत्सद्दी वीरानें अशा बेसावधपणांत इतकें उघड रीतीनें बोलणें योग्य नव्हे. "

हंसत हंसत मानसिंहांच्या हृदयावर खानसाहेबांनीं मारलेला बाण कार्यकारीच झाला. त्यापासून रागाची उत्पत्ति झाली नाहींच; पण राजेसाहेबांना आपल्या या बेसावधपणाबद्दल लाज वाटली. कांहीं वेळ स्तब्धपणांत गेल्यावर राजाजींनीं एक दीर्घ सुस्कारा सोडून, पूर्वीं वाचकांना परिचित झालेलें पत्र खानसाहेबांच्या हातांत देऊन पश्चात्तापपूर्ण स्वरानें म्हटलें, " मला राग येण्याचें हें स्पष्ट कारण समोर असतां मी बेभान होऊन चार कमजयास्त शब्द बोललों, तर मी अपराधी झालों का खानसाहेब ? "

राजाजींना कांहीं उत्तर न देतां खानानें तें पत्र मन लावून वाचलें आणि एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हटलें, " हं तरच आपण तसें बोललां ! सेलिम हल्लीं फारच बहकत चालला आहे. हें पत्र लिहितांना सम्राट् अकबरशाहा जिवंत आहेत हें त्यानें लक्षांत आणणें उचित होतें. तसेंच आपण

सम्राट्चे उजवे हात आहां याचाहि आपल्या मनाशीं त्यानें विचार केला पाहिजे होता. ”

खानसाहेबांनीं अर्धवट शब्द ऐकल्यामुळें मानसिंहाला तें पत्र दाखविणें भाग पडलें. नाहीं तर तें पत्र त्यानें केव्हांहि कोणाला दाखविलें नसतें; पण आतां तरी खानानें त्या संबंधीं ज्यास्त चर्चा करूं नये म्हणून मानसिंहानें त्याचें लक्ष दुसरीकडे वळविण्यासाठीं सहज स्वरानें म्हटलें, “ हा काय आज नवा प्रकार खानसाहेब ? इतक्या रात्रीं आणि असल्या पावसांतून चालला आहां कुठें ? प्रवासाला ही वेळ योग्य का ? ”

खानानें गंभीरस्वारानें उत्तर दिलें, “ प्रकार फारच महत्त्वाचा आहे राजाजी ! ”

“ अकबरशाहांचें दुखणें तर जास्त वाढलें नाहीं ना ? “ मानसिंहानें आश्चर्यानें विचारलें. ’

“ हो. ते बरेच आजारी होते खरें; व आतां त्यानां बराच आराम पडला आहे हेंहि खरें; पण नुकतीच त्यांना जी एक भयंकर वाईट बातमी समजली त्या योगानें ते पुन्हां बिछान्यावर पडले आहेत. ” असें म्हणून खाननें आपले डोळे पुसले.

मानसिंहाला याचा कांहींच बोध होईना. त्यानें उत्सुकतेमें प्रश्न केला, “ कसली वाईट बातमी ? ” खाननें मृदुस्वरानें उत्तर दिलें, “ अत्यंत मदिरापानामुळें शहाजादा दानियल हा दक्खनमध्यें अकालीं मृत्युमुखीं पडला. दानियलवर सम्राट्चें किती प्रेम होतें हें आपल्यासारख्या नेहमीं सम्राट्जवळ असणाऱ्या माणसाला सांगावयास नकोच. ”

दानियलच्या मृत्यूची बातमी ऐकून मानसिंहाचा चेहेरा खिन्न झाला-तो मृदुस्वरानें म्हणाला, “ मला वाटतें खानसाहेब, या जगांत जें चांगलें आणि ज्याच्या हृदयांत मनुष्यत्व असेल तें ईश्वराला फार आवडतें आणि तें तो घेऊन जातो. या गर्विष्ट सेलिमाशीं तुलना केली तर शहाजादा दानियल किती चांगला ? त्याचें श्रेष्ठत्व, उदात्तपणा, निर्मत्सरवृत्ति वगैरे पाहून हाच भावी सम्राट् होण्याला योग्य आहे असें कित्येकांच्या तोंडून निघालेले उद्गार तुम्हीं नाहीं का ऐकलेत खानसाहेब ? ”

खानसाहेब उदासपणानें म्हणाले, “त्या सगळ्या गोष्टींकडे लक्ष द्यायला

तूर्त वेळ नाहीं राजाजी ! या बातमीपेक्षांहि तीव्रस्वरूपाची बातमी घेऊन आज मी येथें आलों आहें.

" म्हणजे ! आणखी आहेच का कांहीं ऐकायचं उरलें ? बरं सांगा पाहूं आधीं ! "

मानसिंहाची उत्सुकता नाहींशी करण्यासाठीं खाननें त्याच्या कानांत हळूच कांहीं सांगितलें; पण त्या लहानशा कानमंत्रानें मानसिंहाच्या आंगावर शहारे आले आणि तो आ वासून खानसाहेबांकडे पाहूं लागला. बराच वेळपर्यंत कोणी कांहीं बोललें नाहीं; पण या स्तब्धतेचा कंटाळा येऊनच कीं काय न कळे गंभीर स्वरानें मानसिंहानें विचारलें, " केवढा भयंकर हा घातक प्रकार ? पण खानसाहेब, खरंच का—"

" पण राजाजी, तें जर खरें नसतें तर असल्या काळोख्या आणि भयंकर वादळ असलेल्या रात्रीं, इतक्या श्रमांनीं आणि बरोबर कोणीहि न घेतां शिक्रीहून अम्बरपर्यंतचा लांबलचक मार्ग मी चालून आलों असतों का ? "

" सम्राट् अकबरशाहा, अजून फत्तेपूर शिक्रीच्या राजवाड्यांतच आहेत का ? "

" नाहीं. मी इकडे येण्याला निघण्यापूर्वीच ते आग्र्याला जाण्यासाठीं प्रासादांतून बाहेर पडले. या वृद्धपणींहि त्यांना स्वस्थता लाभूं नये असा ईश्वरी संकेतच दिसतो. "

" खुसरूहि त्यांच्याबरोबर गेला ? "

" नाहीं. ते फत्तेपूर येथेंच राजप्रासादांत आहेत. "

इतकें बोलणें झाल्यानंतर मानसिंह, खानसाहेबांना बरोबर घेऊन पलीकडच्या खोलींत गेला व नोकरांना खानसाहेबांची सगळी व्यवस्था करण्याला सांगितलें. खानसाहेबांनींहि नोकरांच्या मदतीनें लवकरच वेष परिपरिवर्तन करून फराळ केला. खानसाहेबांचा हा आदरसत्कार व ' खाना पीना ' चालला असतां मानसिंह कांहींही बोलला नाहीं. तो कसल्या तरी गहन विचारांत गढून गेला होता.

पण खानसाहेबांनाच या स्तब्धतेचा कंटाळा येऊन ते म्हणाले. " मग आतां पुढें काय करायचें महाराज ? "

" आतां सारी एकप्रहर रात्र राहिली असेल, आणि आम्हांला दोघां-नाहि विश्रांतीची आवश्यकता भासत आहे. तेव्हां आतां स्वस्थ झोंपून उद्-ईक यासंबंधानें कांहीं विचार करणें तो करूं. "

खानसाहेबांना विश्रांतीची आवश्यकता होतीच. कारण ते फारच दमून गेले होते. लागलीच त्यांनीं मानसिंहांच्या बोलण्याला मान डोलविली. नंतर मानसिंहानें त्यांना झोंपण्याच्या खोलींत पोंचविलें व आपण शिष्टाचाराप्रमाणें निरोप घेऊन आपल्या महालांत आले.

या खानसाहेबांचा चांगलासा परिचय अद्याप आम्हीं वाचकांना करून दिलेला नाहीं. हे एक पांच हजारी मनबदार असून सम्राट्चे मुख्य सेनापति होते. खुसरूचे सासरे, प्यारीबानुचे वडील आणि तदनुरोधानें मानसिंहाचे व्याही हेच होत.

इतिहासांत हे अजिमखान अथवा खान अजिम या नांवानें परिचित आहेत. यांच्यासारखा समरकुशल व कारस्थानी महावीर तत्कालिन दरबारीं अमिरउमरावांत फारच क्वचित् आढळत असे.

## प्रकरण १६ वें.

—:o:—

## सेलीम व जोधाबाई.

अलाहाबादच्या किल्ल्यांतील एका गुप्त दिवाणखान्यांत बसून सुलतान सेलीम कसल्या तरी खोल विचारांत गढून गेलेला दिसत होता, आणि विचार करतां करतां होणाऱ्या अस्वस्थ मनस्थितीवरून असें अनुमान निघे कीं, त्याला आपल्या विचाररूपी समुद्राचा किनाराच सांपडत नसावा. कारण जसजसा वेळ जात होता तसतशी त्याच्या मनाची चंचलता जास्त जास्तच वाढत होती.

किंवा या दिवाणखान्याच्या खालींच गंगायमुनेचा मनोहर संगम झाला असल्यामुळें त्याठिकाणीं एकमेकावर आघात करणाऱ्या लहरींचा आवाज सुलतान सेलीमच्या मनःस्थितीला इकडून तिकडे भटकवीत असावा, कारण पुन्हां पुन्हां त्या लाटांकडे पाहून त्याचा चेहरा आरक्त होत होता.

आकाशांत चमकणाऱ्या निष्कलंक चंद्राचा सुधाधवल प्रकाश पृथ्वी-वरील सर्व जीवकोटीला आनंदवीत होता. तीं विमल चंद्रकिरणें जान्हवी यमु-नेला जोराजोरानें हंसायाला लावीत होतीं, तर कधीं त्यांच्या लहान लाटांना हिऱ्याचे चकचकीत तुकडे बनवून इतस्ततः फेकून देत होतीं. आणि यामुळेंच त्या दोन्हीं नद्यांची आज अपूर्व शोभा दिसत होती. प्रकृतीहि शुभ्रवस्त्र परिधान करून हांसत होती. प्रभात झाली कीं काय असें वाटून आपापल्या घरट्यांतून मधुर स्वरानें गाणारे पक्षी वेडे झाले आहेत अशी कदाचित् तिची समजूत होऊन ती हंसत असेल,तेंहि कांहीं अगदींच खरें आहे असें वाटत नाहीं: तरी पण त्यादिवशीं निसर्गदेवीचें सौंदर्य फारच खुलून दिसत होतें; पण काय असेल तें असो; सुंदरी प्रकृतिदेवीची ही भुवन-मोहिनी शोभा पाहूनहि सुलतान सेलीम याच्या मनाला समाधान वाटलें नाहीं.

बराचवेळ, अस्वस्थ मनःस्थितींत घालविल्यावर तो आपल्या कोचावरून एकदम उठला आणि तीव्रस्वरानें त्यानें आपल्या गुलामाला हांक मारली; पण त्या वेळीं तेथलि पहाऱ्यावर एकही गुलाम नव्हता. प्रभूची हाक ऐकतांच एक तातार रमणी आंत आली व तिनें थरथर कांपत सुलतानसेलीम याला कुर्निस केला आणि म्हटलें, " जनाबाली हुकूम !! "

सेलिमनें उत्तर दिलें, "इस्कन्दरी चिबीला सलाम सांग, आणि तिच्या बरोबर साकीहि पाठवून दे."

हुकूम ऐकतांच तातारमणी निघून गेली आणि कांहीं वेळ जातो न जातो तोंच साकी-स्वर्णखचीत सुरईत सुवासिक शिराजी घेऊन आली व मागोमाग इस्कंदरीहि आली. इस्कन्दरी ही उत्तम गायिका, नृत्यकला चतुर रसिक वेश्या व सुलतान सेलिमच्या निरुत्साही मनाला आनंद देणारी त्याची मैत्रिण असून त्याचसाठीं ती मुद्दाम आग्र्याहून अलाहाबादला आणण्यांत आली होती.

सेलिमच्या जवळ जाऊन आपल्या पद्धतीप्रमाणें तिनें तसलीम बजावल्या-नंतर कोमल स्वरानें म्हटलें, " जहांपनाह ! आज खावंदांना दासीचें स्मरण कां बरं झालं ? मेजाज शरीफ् है तों ! "

सेलिम खिन्नतेनें हंसून म्हणाला, " खरेंच, आज मला मुळींच

करमत नाहीं, आणि मनाला कांहीं स्वस्थता येत नाहीं. आपल्याला बोलावणें केलें तें यामुळेंच. "

सुचतुर इस्कन्दरी बिबी सगळें कांहीं समजली. तिनें साकीच्या हातांतील मद्याची सुरई आपल्या हातांत घेतली आणि त्यांतील थोडीशी एका उत्कृष्ट पानपात्रांत ओतून तें पानपात्र तिनें हंसत हंसत सेलिमापुढें धरलें. "

सेलिमला फुरसत नव्हतीच. त्यानें तें मद्य चट्कन् प्राशन करून हास्यपूर्ण स्वरानें म्हटलें " ऐकलेंस का, मागच्या दिवाणखान्यांत एक सुंदर वीणा तुझी आठवण काढकाढून रडत बसली आहे. जा पाहूं तिची एकवार समजूत करून तिला इकडे घेऊन ये. तुझं थोडं गायन ऐकावं असें मला वाटत आहे. जा मेरे प्यारे !! अशी लाजू नकोस ! "

हिंदुस्तानच्या भावी सम्राट्चा हुकूम कोण अमान्य करणार ! इस्कंदरी त्या खोलींत गेली आणि तिनें ठुमकत मुरडत ती वीणा आणून सुलतानाच्या खुणेप्रमाणें एका आसनावर बसली आणि त्यानंतर आपल्या ताम्बूलरसरंजित अधरावर स्मित हास्यरूपी विद्युत्‌रेषा चमकवून मधुरस्वरानें म्हटलें, " जनाब अली ! मी आतां कोणतं पद म्हणूं बरें ? दासीला हुकूम व्हावा. "

सुलताननें हंसत हंसत हुकूम केला, " तुझ्या मर्जीला वाटेल तें म्हण. मीं तुझ्यासारख्या सुंदरीला हुकूम करावा हें योग्य नाहीं.-"

लागलीच त्या गायिकेनें त्या वीणेच्या सुरांशीं आपला कोमल व स्वर्गीय सूर मिळवून गाण्याला सुरवात केली;—

" न छोडो हमे दिल् दुखाये हुँये है—

पदाची पहिली ओळ पुरी होते न होते तोंच घाईघाईनें एक तातार-रमणी आंत आली आणि तिनें बातमी दिली कीं, ' शहाजादी शाहीबेगमनें जहांपनाहला सलाम कळविण्याला सांगितलें आहे ' जोधाबाई ही रुर्व रंगमहालांत शाहीबेगम याच नांवानें परिचित होती आणि हें सन्मानाचें व आदराचें नांव सुलतान सेलिमनेंच आपल्या लाडक्या पत्नीला दिलें होते. असो.

शाहीबेगम आली असें समजतांच सुलतान सेलीम, आपल्या कोचावरून उठला, आणि अस्पष्ट स्वरानें म्हणाला, " शाहीबेगम ? जोधाबाई ! एवढ्या रात्रीं अम्बरचा राजवाडा सोडून ती कां बरं आली ? "

पण या गुणगुणण्याचें त्याला उत्तर कोण देणार ! इकडे तिकडे पाहून

त्यानें गायिकेला चटकन् उठून जाण्याची खूण केली. अपुऱ्या राहिलेल्या गीताचा मधुर झंकारहि यावेळीं सभोंवारच्या हवेंत विलीन होत होता. तो सुद्धां विचारा! भ्यालाच असेल. इस्कद्रीचा चेहेरा मात्र अत्यंत खिन्न झाला. कारण आज सेलिमला खूष करून बक्षिस मिळवावें असें तिच्या मनांत होतें; पण शाही बेगमनें अडथळा केला, अर्थात् उघड नाहींच पण मनांतल्या मनांत तिनें तिला बऱ्याच शिव्या दिल्या असाव्यात. असो.

गायिका निघून जाते न जाते तोंच जोधाबाई ऊर्फ शाहीबेगम तेथें आली व सन्मानपूर्वक तिनें आपल्या पतिदेवतेला प्रणाम करून म्हटलें, " जहांपनाहची प्रकृती कशी काय आहे ? "

सेलिमनें जोधाचा हात धरून तिला एका कोचावर बसविलें व आपण तिच्या जवळ बसून कांहींसें मर्मभेदक उत्तर देण्याच्या हेतूनें म्हटलें, " तूं जसा मला ठेवून गेलीस तसाच मी आहें, पण मानसिंहाला मी दुसरें पत्र पाठवूनहि तो तुला इतक्या विलंबानें पाठवील असें मात्र मला केव्हांहि वाटलें नव्हतें."

" म्हणजे ! आपण माझ्या दादाला आणखी पत्र पाठविलें होतें का ?" " जोधानें चकित होऊन प्रश्न केला.

" अग पत्र पाठविलें इतकेंच नव्हे, तर पतित्व आणि पितृत्व यांची केवढी कठोर जबाबदारी असते हेंहि मीं त्यांत उघड उघड लिहिलें आहे. तूं तें पत्र पाहिलें नाहींस का ? "

" नाहीं ! कदाचित् मी इकडे येण्यासाठीं निघून आल्यावर तें पत्र अम्बरच्या राजवाड्यांत पोंचलं असेल. अर्थात् तें मला कसें समजणार ? "

" बरं, मी तुला आतां एकच प्रश्न विचारतों, इतक्या लवकर तुझ्या-सारख्या रजपुतानीचा राग शांत झाला कसा ? "

" खरोखर आपण मोंगलच !! रजपुतांशीं इतके दिवस चांगल्या रीतीनें मिळून मिसळून वागूनही आपण त्यांना ओळखूं येऊं नये, ही फारच दुःखा-ची गोष्ट आहे. स्नेह, माया, कर्तव्य, आणि पत्नीची पतिसेवा हे सद्गुण जर जगांत नसतील, आईचें आणि पत्नीचें कर्तव्य जर आर्य स्त्रिया विसर-ल्या असतील, तर मला वाटतें रजपुतांचा राग इतक्या लवकर जाता ना. "

" गेल्या गोष्टी सोडून दे जोधा !! जें बोलून गेलों, त्यासाठीं जर मी

तुझा अपराधी होत असेन व तुझ्या हृदयाला वेदना होतील असें केलें असेल, तर तूं तें विसरून जाशील अशी मला आशा आहे. शाही! माझी चालू परिस्थिती फारच अंधकारमय आहे आणि भविष्यत्काल तर याहिपेक्षां भीषण रीतीनें मला भिववीत आहे. बरं पण शाही, तूं एकटीच कां आलीस ? खुसरू कुठं आहे ? "

" तो फत्तेपूर शिक्री येथें गेला आहे ! "

सेलीम लागलीच तिच्याकडे तिरस्कारानें पहात म्हणाला, " कुणीं त्याला तिकडे पाठविलें शाहीबेगम ? मला वाटतें हें एक तुझ्या भावाचेंच कारस्थान असावें ! "

" नाहीं. नाथ ! आपण निष्कारण संशयित होऊं नये. खुद्द सम्राट्नींच त्याला बोलावणें पाठविलें होतें म्हणून तो गेला. अम्बर येथून निघतांना प्रथम, खुसरूनें एकदम आग्र्याला जावें असेंच ठरलें होतें व त्यानंतर तो अलाहाबादला येणार होता, आणि याचसाठीं आम्ही भिन्न भिन्न मार्गांनीं निघालोंहि होतों. " पण सम्राटनें त्याला असें आकस्मिकपणें बोलविण्याचें कारण काय ? " सेलीमनें मध्येंच प्रश्न केला. कारण त्याला कसला तरी संशय येत होता.

पण या प्रश्नाला न डगमगतां जोधानें शांतपणानें उत्तर दिलें, " आपण हें पत्र वाचून पहावं म्हणजे सर्व कांहीं प्रकार आपल्या नजरेला येईल. " असें म्हणून तिनें एक पत्र सेलिमच्या हातांत दिलें. फत्तेपूर शिक्रीहून खुसरूनें अजमीरला जोधाच्या नांवानें पाठविलेलें पत्र शाहीजवळ होतें आणि या वेळीं तिच्या तें फारच उपयोगीं पडलें. सेलिमनें अत्यंत उत्सुकतेनें पत्र आमूलान्त वाचून पाहिलें व म्हटलें, " धन्य धन्य त्या खुदाची !! या आणीबाणीच्या वेळींहि त्यानें शहानशहांना एका भयंकर दुखण्यांतून वांचविलें !! पण कायग जोधा ! या पत्रानंतर खुसरूनें तुला आणखी एकादें पत्र पाठविलें होतें का ? "

" नाहीं. मुळींच नाहीं. "

" मग या वेळीं मानसिंह कुठें आहे तर ? "

" मला वाटतें बहुतकरून ते अम्बरच्या राजवाड्यांतच असावे ! "

" नाहीं. ही तुझी समजूत चुकीची आहे. कारण मला पूर्णपणें माहीत आहे कीं, रजपुतवीरांचा घोडा आपल्या मालकाचा फायदा ओळखून फारच लवकर चालूं शकतो. आपलीं हजारों कामें बाजूला सारून तुझा भाऊ मानसिंह यावेळीं सम्राट्च्याच भेटीला गेला असला पाहिजे. तूं आणि मी इथें आहों ही गोष्ट जितकी सत्याला धरून आहे तितकीच तीहि आहे."

" पण गडे, आपण माझ्या भावावर इतकं रागवायचं कां बरं ? मला वाटतं, आपणाला सर्वच कांहीं संशयित दिसत असावं. आपला प्रथमचा निष्कारण संशय मानसिंहाबद्दलचा, दुसरा खुस्रूविषयींचा आणि तिसरा शेर अफखानची पत्नी मेहेरउन्निसा हिच्याबद्दलचा."

सेलीम, जोधाकडे पहात गंभीरस्वरानें म्हणाला. " पुन्हां त्या जुन्या गोष्टी तूं मुद्दाम बोलण्यांत आणूं लागलीस; पण तूं जर आतां स्पष्टच विचारतेस, तर मीहि स्पष्ट बोलतों. मानसिंहावर मी इतका रागावतों कां, हें ऐकण्याची तुझी इच्छा आहे का ? ऐक. ढोंगी मानसिंह मनांत समजतो, आज ज्या मोंगल राज्याची प्रस्थापना झाली आहे, ती सर्व माझ्या पराक्रमावर ! आपण प्रकाश व आह्मी म्हणजे केवळ त्याची छाया ! ! आणि त्याला जर कोणता भयंकर भ्रम झाला असेल, तर तो हाच. स्वाभिमानी, शूर आणि विश्वासू अशा सर्व मोंगल सैन्याचें याच्याकडे आधिपत्य आहे आणि त्यामुळें तो इतका गर्वाला चढला असून सर्व कांहीं मी असें म्हणत आहे. जोधा! मला सांगायला दुःख वाटतें, त्याला खऱ्या खऱ्या सगळ्या गोष्टी समजत असून तो मुद्दाम हट्टानें बखेडे माजवीत आहे; पण जोधा, मला असा राग येण्याचें आणखीहि एक कारण आहे; हा कृष्णकारस्थानी रजपुत राजा मानसिंह, माझ्या लाडक्या मुलाला जाणून बुजून आडमार्गाला लावीत आहे, आणि माझ्या पितृभक्त मुलाला, पितृद्रोही करण्याची त्याची खटपट जारीनें सुरू आहे. ज्या खुसरूला पाहतांच माझ्या नेत्रांत आनंद चमकूं लागले, जो माझ्या सिंहासनाचा भावी अधिकारी, ज्याला मी लहानपणापासून मोठ्या प्रेमानें वागवून त्याचेंच कोड पुरवीत गेल्यामुळें खुदाचा निष्कंटक आनंद मला उपभोगतां आला होता, ज्याच्या प्रेमासाठीं मी शाहाजादा खुरम याला-हि विसरलों व जगत्बाईचीहि हेळसांड करून तिच्या रागाला पात्र झालों, आणि ज्या माझ्या खुसरूपुढें मीं सर्व जगाला तुच्छ मानलें, तो माझा

खुसरू, जोधा! तुझ्या त्या कारस्थानी भावानें, निरनिराळ्या रहस्यमय कारस्थानांत गुंतवून माझ्यापासून दूर केला. माझ्या प्रेमव्याकुळ हृद्यापासून त्याला ओढून नेलें आणि तो आतां त्याचा सर्वस्वी नाश करूं पहात आहे. कां बरें जोधा तो असें कां करीत आहे, हें तूं जाणलेंस का? नाहीं. तें सर्व मला माहीत आहे; पण तुझें मधुरतापूर्ण असें कोमल हृदय दुखवेल म्हणून मीं अद्याप तुला तें सांगितलें नाहीं. आतां सांगण्याची वेळच आली, म्हणून सांगतों. माझी तूं धर्मपत्नी आहेस, आज अगर कांहीं दिवसांनीं का म्हणेनास हें सर्व हिंदुस्तान माझ्या पायांशीं नम्र होईल, आणि तूं राजराजेश्वरी होशील; पण या तुझ्या कृष्णकारस्थानी भावाच्या मनांत पुन्हां या हिंदुस्तानला हिंदुपद्पातशाही करावी असें फार आहे, आणि खुसरूला बाहुलीप्रमाणें आपल्या हातांत वागवून दिल्लीच्या सिंहासनावर आपलेपाय लागावें असेंहि तो आपलें जाळें विणीत आहे. तूं त्याची कितीहि तरफदारी कर पण मी त्याला चांगलाच ओळखतों.

ज्या मोंगलांनीं आपल्या बाहुबलानें हें सोन्याचें हिंदुस्तान आपलेंस केलें तें, हा काढून घेण्याचा व्यर्थ-प्रयत्न करीत आहे, आणि खुसरूचें जें एवढें कारण तें यासाठींच. तो त्या अपरिपक्व पोराच्या डोक्यांत नसत्या आशा उत्पन्न करून त्याला, पुढें केवढा मोठा फायदा आहे, हें वर्णन करून सांगत आहे, आणि ही त्याची फितुरी आतां इतकी तीव्रतेला आली आहे कीं तिची उपेक्षा करून उपयोगी नाहीं. यापैकीं कांहींच तुला सांगूं नये असें मीं मनाशीं ठरविलें होतें; पण मानसिंह या बाबतींत इतका पुढें गेला आहे कीं, आपल्या उद्देशसाधनाला सवड सांपडावी म्हणून सम्राट्‌कडे त्यानें, 'सेलिमला बंगालच्या सुभेदारीवर पाठवा' असा तगादा लावला आहे. जोधा! आतां उपेक्षा करणें शक्य आहे? इतकीं धडधडीत प्रमाणें डोळ्यांसमोर दिसत असतां मी स्वस्थ बसूं? जोधा! यापेक्षांहि तुझ्या भावाचा नीचपणा पुढें गेला आहे. तो मला म्हणतो 'सेलीम, तूं आतां सिंहासनप्राप्तीची कितीवेळ पहाणार? बाप झाला म्हणून काय झालें? आजच तुला सिंहासन मिळणें योग्य आहे...' पण जोधा! मी त्याचा उद्देश समजलों. 'मी सिंहासनाला नालायक' आहें हें सम्राट्‌च्या नजरेला आणावें आणि मध्यें आपलें सूत्र चालू करावें हाच त्याचा उद्देश. तसेंच या सगळ्या कामांत खुसरूचा सासरा

त्याला मदत करीत आहे. जोधा! मला आतां या लपंडावाचा कंटाळा आला आहे. मानसिंहानें मनांत कांहींहि किंतू न ठेवतां माझ्या स्वाधीन होऊन मला साहाय्य केलें पाहिजे, खुसरूला त्यानें पूर्ण स्वतंत्रता दिली पाहिजे. त्याच याशीं कसलेंहि खलबत करतां कामा नये, आणि जर तो असें न करील तर जे सुष्ट दुष्ट उपाय योजावे लागतील ते मीं योजून माझी इच्छा पूर्ण करीन."

आपल्या राजराजेश्वर पतीचें बोलणें, जोधाबाई अगदीं मन लावून ऐकत होती. तिला वाटलें, 'सुलतान सेलीम जें सांगत आहे, त्यापैकीं कांहीं-ही खोटें नाहीं. शिवाय या बरोबरच आणखीहि तिला वाटलें कीं, "खरोखरच एक महाभयंकर कारस्थान चालू असून त्याचे परिणामहि तितकेच भयंकर आहेत.' जोधाबाई यावेळीं मोठ्या संकटांत सांपडली होती. एकीकडे पतीचा स्वार्थ आणि दुसरीकडे मुलाचा आणि भावाचा स्वार्थ अशी स्थिति असल्यामुळें तिला नुसतें बोलतांहि येत नव्हतें. तिला यांत सरळ असा कोणताच मार्ग सुचवितां येईना. तरी पण स्वार्थ झाला तरी त्यांत चांगला वाईट हा भेद आहेच. वाईट स्वार्थापेक्षां चांगला स्वार्थ श्रेयस्कर होय. राक्षसी महत्वाकांक्षेपेक्षां सात्विक महत्वाकांक्षा बरी.

पतीच्या बोलण्याला विरुद्ध जबाब दिला तर त्याचा राग वाढेल असा विचार करून ती म्हणाली, "बरं, या खुसरूला जर मानसिंहाच्याकारस्थानांतून काढून आणून मीं आपल्या स्वाधीन केला तर आपण त्याच्यावर पूर्वीप्रमाणें प्रेम कराल? खुसरू केवळ आपल्या पूज्य पित्याच्या कल्याणासाठींच मानसिंहाचा खून करण्याचें ठरवित होता. आतां तरी खुसरूवरील आपला सगळा राग एकदम नाहींसा होईल का?"

आपल्या पत्नीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच सेलीम आश्चर्यानें म्हणाला, "कसल्या असंभाव्य गोष्टी सांगत आहेत तूं जोधा! खुसरूनें मानसिंहाचा खरोखरच का खून करण्याचा प्रयत्न केला होता? कां बरं? तो कशासाठीं असं करीत होता?"

जोधाबाईनें उत्तर दिलें, "नाथ! बाळ खुसरू आपल्या मामाचा खून करायला कां तयार झाला, हें सांगितलं कां पाहिजे माझ्या खुसरूला राज्य नको, आणि हिंदुस्तानचें शापितासिंहासनहि नको. तो मातृभक्त आणि सद्गुणी मुलगा फक्त आई-

बापांच्या वत्सलतेचीच इच्छा करीत आहे. आईबापानीं प्रफुल्लित मनानं व चेहेऱ्यानं हाक मारावी ही एकच इच्छा माझा बाळ आपल्या हृदयाशीं बागवीत आहे. त्याच्या आशेप्रमाणें त्याला मातृप्रेम तर भरपूर मिळत आहे; पण सांगायला वाईट वाटतें तें हेंच कीं, तो बिचारा निरपराधी बालक पितृस्नेहाला अगदीं-अगदींच वंचित होत आहे. नाथ! आपण अजूनहि जर त्या सरळ मनाच्या, महत्त्वाकांक्षाहीन अशा, आणि प्रेमाची भिक्षा मागणाऱ्या हतभागी मुलाला ओळखूं शकला नसाल तर मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. तो जेव्हां आपल्या मामाचा खून करायला तयार झाला, त्यावेळीं त्याला कदाचित् असेंहि वाटलें असेल कीं, मानसिंह नाहींसा झाल्यावांचून आपणाला आपल्या बापाचें स्नेहमय हृदय आपलसं करून घेतां येणार नाहीं; पण मीं त्याला म्हटलं, असले खुनी विचार नुसते मनांतहि आणणं मोठं पाप आहे.' बंधुप्रेमाला वश होऊन मीं असं म्हटलं असं आपल्याला वाटेल; पण, नाथ! तशी आपण चुकीची समजूत करून घेऊन घेऊं नये. मुलगा एकादं-घोर-पाप करायला पुढें सरत असला तर कोणती आई त्याला मागें ओढल्यावांचून राहील? आणि म्हणूनच मीं त्याला त्यावेळीं त्या घोर कर्मापासून मागें फिरविलें. या गर्हणीय हेतूबद्दल मी त्याला इतकें कांहीं टाकून बोललें कीं, तो मामाचें साहचर्य सोडून त्याच क्षणीं आपल्या पायांशीं यायला निघाला."

या हृदयवेधक भाषणानंतर जोधाबाईनें मानसिंह आणि दुर्जयसिंह यांच्या बाबतींत झालेलीहि सगळी हकीगत सेलीमला सांगितली.

हा सगळा रहस्यमय असा आंतला प्रकार ऐकून सेलिमाचें प्रेमळ हृदय अपत्यस्नेहानें अगदीं व्याकूळ झालें. त्यानें एक दीर्घ निःश्वास सोडला आणि जोधाबाईला आपल्या हृदयाशीं धरून म्हणाला, "खुसरूसंबंधानें तूं केलेंस तें अगदीं योग्य आहे. तूं आईचें कर्तव्य बजावलेंस. आज त्याच्यांत आणि मानसिंहांत कसला तरी भयंकर विचारविनिमय चालूं असावा असा माझा अंदाज आहे. मानसिंह आपण होऊनच त्याला कांहीं तरी अपरिहार्य कार्याकडे वळवीत असावा आणि त्यामुळें त्याच्याबद्दल खुसरूच्या मनांत ही क्रूरवृत्ती उत्पन्न झाली असावी. आमचें दोघांचेंहि असंच होत आहे. व रागाच्या आवेशांत कांहीं तरी अविचारी कृत्य घडेल कीं काय अशीहि मला

भीति वाटत आहे. त्यामुळें मी आपल्या मनाला पुष्कळ शांत करीत आहे. मानसिंहाला नाहींसा करून सम्राट्चा उजवा हात तोडल्याप्रमाणें करावें, असें माझ्या हातून होणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर खुसरूला जर त्यानें भलत्याच कार्याला नाहीं वळविलें, व गुप्तपणानें माझ्याशीं शत्रुत्वहि नाहीं केलें तर मी कधींहि त्याला कैद करणार नाहीं. मग त्याचे आणखी कितीहि अपराध असोत, मी त्याला ते सर्व क्षमा करीन."

आपल्या प्राणेश्वराचें हें मनापासूनचें बोलणें ऐकून जोधाबाईच्या हृद-यावरच्या बराचसा भार कमी झाला. इतक्या सहज तऱ्हेनें संशयी सेलीम खुसरूला क्षमा करील असें तिच्या स्वप्नांतही आलें नव्हतें. तीनें आनंदानें आपल्या प्रियकराच्या हृदयावर मस्तक ठेवून व त्याचे दोन्ही हात आपल्या नवनीतसदृश सुकुमार हृदयावर ठेवून मृदुस्वरानें म्हटलें, "तर मग गडे, खुसरूला एक पत्र पाठवावं ना ? फत्तेपुरांतून तो एकदांचा इकडे आला कीं कांहीं गडबड होणार नाहीं."

सेलिमनेंहि तितक्याच प्रेमळपणानें आपल्या प्रिय पत्नीचें चुम्बन घेऊन म्हटलें, "लाडके ! मी उद्यां सकाळींच शिकीला स्वार रवाना करतों. किती दिवस तरी मीं माझ्या बाळाला पाहिलं नाहीं ग ! आणि त्यामुळें कधीं एकदां मी त्याला माझ्या हृदयाशीं धरीन असं झालं आहे. माझा हा शुभ हेतु केव्हां तडीला जाईल तें एका खुदालाच माहीत !!"

यानंतर त्या दोघांचें विशेष कांहीं बोलणें झालें नाहीं, व झालें असलें तरी त्याचें तूर्त आम्हांला कारणही नाहीं. कारण दुसऱ्या एकदोन ठिकाणीं यापेक्षांहि महत्त्वाचे प्रकार घडत असल्यामुळें तिकडे आपणाला प्रथम लक्ष्य पुरविलें पाहिजे.

---

## प्रकरण १७ वें.

---:*:---

### खुसरूला पराक्रमी कर.

गुप्त-प्रतिनिधीच्या तोंडून, कसलीशी राजकीय गुप्त बातमी ऐकल्यामुळें सम्राट् अकबरशहा फत्तेपुराहून दरकुच दरमजल करीत आग्र्याला येऊन

पोंचला होता. ही गोष्ट अजीमखान आणि मानसिंह यांच्या संभाषणावरून वाचकांना समजून चुकलीच असेल. या बातमीसंबंधानें साधारण अंदाजच काय तो खानाला समजला होता, व अनुमानावर भरंवसा ठेवून सिद्धान्त ठरविणें जरी बरें नव्हे तरी त्यावरून होत असलेला प्रकार उपेक्षा करण्याला योग्य नव्हे एवढें तो जाणून होता. आणि तसें नसतें तर असल्या रुग्णावस्थेंत आपलें आवडतें स्थान सोडून कधीं तरी तो आग्र्याला गेला असता का ? नाहीं. केव्हांहि गेला नसता. असो.

जातेवेळीं सगळ्या प्रासादांवर देखरेख करण्याचें काम त्यानें खुसरूला सांगितलें होतें, ही गोष्ट अजीजखान विसरला नव्हता. अर्थात् मानसिंहालाहि ही गोष्ट माहीत होतीच. त्यानें खुसरूच्या या एकांताचा फायदा घेण्याचें ठरविलें. त्याला आपल्या ताब्यांत आणण्याला व आपले हेतू त्याच्या मनांत बिंबविण्याला ही वेळ फारच उत्तम आहे, व अशी सुवेळा पुन्हां येणार नाहीं, असा विचार करून मानसिंह खानाला म्हणाला, "तर मग मला आतां सम्राट्कडे आग्र्याला जाण्याचें बिलकूल कारण नाहीं. सम्राट्नें मला फत्तेपूर शिक्रीला जाण्यासाठीं कांहीं दिवसांपूर्वींच परवाना देऊन ठेविला आहे. तेव्हां मी आतां त्या त्यांच्या हुकुमाप्रमाणें वागणारच. यानंतर आग्र्याहून एकादा नवीन हुकूम आलाच तर त्याचा विचार मागाहून करूं. भावी कार्याची दिशा कदाचित् बदलावी लागली तरीहि सुरवातही आज करावयाचीच आणि शिक्रीला जावयाचेंच ! खानसाहेब आतां विचारच नको !"

खुसरूचा सासरा अजीमखान, याला मानसिंहाचें हें बोलणें ऐकून काय वाटलें तें त्याचें त्यालाच माहीत. कारण त्याचा चेहेरा अगदीं निर्विकार होता. त्यानें सलीमाच्या हालचालीवर लक्ष ठेवण्यासाठी नेमलेल्या गुप्त हेराकडून त्याला जी एक महत्त्वाची बातमी समजली होती, ती त्यानें अद्याप मानसिंहाला कळविली नव्हती, आणि पुढें तरी ती कळवावी कीं नाहीं याबद्दलही त्याचा संशयितपणाच होता.

दोघेहि पुरे चतुर असून दोघांच्याहि मुत्सद्देगिरीचा विनिमय चालू होता. दोघांचीहि स्वार्थी काकदृष्टि एकाच केन्द्रांत स्थिर होत असल्यामुळें

निदान कार्यसाधनापुरते तरी ते एकमेकांचे मित्र बनले होते. मानसिंह मनांत म्हणत होता, ' खुसरूला सिंहासनावर बसविलें कीं, मी सार्वभौमच झालों. कारण खुसरू म्हणजे माझ्या हातांतील एक बाहुली आहे. ' इकडे अजीमखान विचार करीत होता, ' या वेड्या रजपुतांलाच हाताशीं धरला पाहिजे. कारण सामर्थ्य आणि संपत्ति यांचा कार्यापुरता लाभ याच्याकडून होणार आणि एकदां आपलें कार्य झालें कीं, दिला बेट्याला उडवून म्हणजे झालें. '

दोघांचाही मानस जरी विभिन्नमार्गी होता तरी प्रथमच्या कार्याची दिशा एकच असल्यामुळें ते एकमेकांचे मित्र बनले. तरी पण जें व्यक्त केल्यानें स्वतःला दुर्बल होऊन राहावें लागेल तें गुप्त ठेवण्यांत दोघेहि तत्पर होते.

सुलतान सेलीम मनांतल्या मनांत मानसिंहाची फार प्रशंसा करी. त्याचें धाडस, सामर्थ्य, आणि बुद्धिमत्ता या बाबतींत सेलिम त्याला मान देई, पण खुसरूवरचा मानसिंहाचा मर्यादेपलीकडे असलेला स्नेह पाहून त्याचें अंतःकरण उत्तरोत्तर संशयित बनत चाललें.

खानाबद्दल मात्र प्रथमपासूनच सेलिमच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झालेला होता. कारण या खानापेक्षांहि उच्च दर्जाच्या अशा एका उमरावाच्या मुलीशीं खुसरूचा विवाह करावा असा त्याचा हेतु होता व त्या बाबतींत तो फारच उत्सुक झाला होता; पण खानानें बादशाहालाच आपलासा केल्यावर सेलीमचें काय चालतें ! थोडेच दिवसांत खानाची मुलगी प्यारीबानू मोठ्या थाटानें बादशाही रंगमहालांत येऊन दाखल झाली व खुसरूला तिनें आपलेंसें करून सोडलें. सुलतान सेलिमला हा संबंध बिलकूल आवडला नसल्यामुळें त्यानें खानाला बिलकूल मान दिला नाहीं. उलट त्या दिवसापासून त्याच्याबद्दलचा त्याचा तिरस्कार ज्यास्तच वाढू लागला. मग सून या नात्यानें प्यारीबानूकडे पहाणें कुठचें ? त्यांतच मानसिंहाशीं त्याची जुळलेली अंतरंगमैत्री पाहून तर सेलिमला ते दोघेहि आपले हाडवैरी आहेत असें वाटू लागलें. झाल्या गेल्या गोष्टींचा परस्परांशीं मेळ घालून त्यानें असें ठरविलें कीं [illegible]

अजीमखान आणि मानसिंह हे मात्र पक्के वैरी असून बलशाली आहेत. शिवाय आज ते बादशाहाचे मुख्य सेनापती आहेत. शिवाय मानसिंहाच्या हाताखालीं खासगी म्हणून साठ हजार रजपुत वीर असून अजीमखानाच्या ताब्यांत पन्नास हजार कडवे मोंगल स्वार आहेत आणि या दोघांचीं हीं सैन्यें जर एकत्र होऊन माझ्यावर उठलीं तर— पण आपण हा प्रश्न तूर्त गुलदस्तांतच ठेवून दुसऱ्या गोष्टींकडे वळूं.

अजीमखान योग्य वेळीं मानसिंहासह फत्तेपुराला येऊन पोहोंचला. व कारणापुरतीच विश्रांति घेतल्यावर तो आपल्या मुलीच्या महालांत आला.

खानसाहेबांनीं विशेष लक्षपूर्वक पाहिलें तों त्यांना आपल्या मुलीचा चेहेरा बराच खिन्न झालेला आढळला. कसल्या तरी घोर चिंतेनें तिच्या हृदयांत ठाणें दिलें असल्यामुळें तिचें सुंदर मुखकमल इतकें कोमेजलें असावें, असाही खानाला संशय आल्यावांचून राहिला नाहीं. कारण आपल्या मुलीचा असला निस्तेज चेहेरा त्यानें कधींच पाहिला नव्हता. खान आंत आल्यावर त्यानें आपल्या लाडक्या मुलीला एका कोचावर बसविलें आणि आपण जवळच बसून प्रेमळ स्वरानें म्हटलें, "तुझा सदा प्रफुल्ल असणारा चेहेरा इतका खिन्न का प्यारी प्यारीजानू ? तुझी तब्यत तर बिघडली नाहीं ना ?"

चारणीची भेट झाल्यापासून प्यारीची स्थिति खरोखरच फार शोचनीय होत चालली होती. वादळी वाऱ्यांत सांपडलेल्या फुलांच्या पाकळ्या ज्याप्रमाणें अगदीं कोमेजून जातात व मलूल होतात त्याप्रमाणें तिचा टवटवीत चेहेरा अगदीं मलूल झाला होता. आनंदाचें तर नांवहि नव्हतें. तिचे नेहेमीचे हंसरे गाल अगदीं तेजहीन होऊन गेले होते. यावरून तिला कसलें तरी गुप्त दुःख होत असून त्याचा हा सगळा परिणाम आहे, असें खानानें अनुमान केलें.

खरें पहायचें म्हणजे प्यारी बेगम ही त्या वेळीं जगाच्या कार्यक्षेत्राचें एक संकटमय संधीस्थल होऊन बसली होती. तिनें आपल्या प्रियकराजवळ चारणीसंबंधानें अद्याप कांहींच सांगितलें नव्हतें. कारण तो सर्व प्रकार सांगण्याला तिला धैर्य होईना. अमिरेलाहि तिनें मूकव्रतच स्वीकारण्याबद्दल सां-

तरी पण शाहजाद्यानें, प्यारीचा जेव्हां खिन्न चेहेरा पाहिला, तेव्हां संदिग्ध मनानें त्यानें तिला प्रश्न केला, " तुझ्या नेहमीं आनन्दित असणाऱ्या चेहेऱ्यावर हा असा मलिनपणा कां बरें प्यारी ? " प्यारी प्रथम किंचित् चमकली; पण दुसऱ्याच क्षणीं तिनें उत्तर दिलें, " आजाराच्या मनस्तापानें शहानशहांचा देह दिवसेंदिवस जास्तच विगलित होत चालला आहे. तेव्हां माझ्या मुख्य काळजीचा हाच एक मुख्य विषय होऊन बसला आहे. त्यांचं जर देहावसान झालं तर आमची दशा काय होईल बरं ? पहावें तिकडे मत्सर, पहावे तिकडे संशयाची कठोर नजर आणि जावें तिकडे तिरस्कार व अपमान ! ! कुणाचा प्रसन्न चेहेरा पाहून आह्मीं या दुःखी दुनियेंत शांती मिळवूं बरं नाथ ! आमचं कोण आहे ? "

प्यारीचें हें त्यावेळचें युक्ति संगत उत्तर ऐकून तिच्याबद्दल खुसरूच्या मनांतील सर्व संशय नाहींसे झाले. इतकेंच नव्हे, तर त्यानें तिच्या बोलण्याला दुजोरा देण्यासाठीं म्हटलें, " खरंच तुझं म्हणणं अगदीं खरं आहे. मलाहि तीच काळजी पडली आहे. माझ्यासारखा हतभागी शाहाजादा, अद्याप या महाथोर राजवंशांत कोणी निपजला असेल का ? माझी काळजी वाहाणारं एकही माणूस नाहीं, आणि प्यारे ! शहानशहा बादशाहाच आमचा खरा हितकर्ता आहे हें तुझं बोलणं अक्षरशः खरं आहे. बाबांना तर आह्मी दोघेंहि दृष्टीसमोर नकोत, इतकंच काय; पण तुझ्या बापाचाहि ते तिरस्कार करतात. शहानशहाचं जर आकस्मिक कांहीं बरं वाईट झालं, तर आमची दशा काय होईल बरं लाडके ?"

खुसरू यापेक्षां ज्यास्त कांहींच बोलूं शकला नाहीं. कारण एवढ्यांच बोलण्यांत त्याचें हृदय अगदीं मोकळें होऊन गेलें होतें व पुढें होणारी आपली भयंकर स्थिती लक्षांत येतांच तो घाबरून गेला होता; पण प्यारी, त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन म्हणाली, " प्राणेश्वर ! आपणाला इतकी कसची भीती वाटते ! मनुष्याजवळ कदाचित् आह्मी अपराधी होऊं; पण खुदाचें तर आपणांवर प्रेम आहे ना ? तो अत्यंत दयाळू आणि आश्रितवत्सल आहे. तो आम्हांला केव्हांहि दुःखांत लोटणार नाहीं—"

प्रियकराजवळ बोलतांना असें कांहीं तरी बरेंचसें बोललें कीं, खिन्न-

तेचें खरें कारण जें चारणीची भेट, तें सांगितल्यावांचून चालत असे; पण बापाला असें कांहीं सांगून चालावयाचें नाहीं. तसेंच चारणीचें तें भविष्य ऐकून त्यांना माझ्या मूढपणाबद्दल व वेडगळ समजुतीबद्दल हंसूंच आलं असतं; पण बापाला तें भाविष्य सांगण्यांत तशी कांहीं भीति नाहीं, असा विचार करून प्यारीनें आपल्या बापाला चारणीनें वर्तविलेलें भविष्य व तें ऐकून आपली झालेली स्थिति सांगितली.

भविष्य ऐकतांच खानसाहेब अगदीं चमकून गेले. कांहीं वेळपर्यंत ते स्तब्ध होते, कदाचित् ते त्या भविष्याचाच पुन: पुन्हां मनाशीं विचार करीत असावे. बऱ्याच वेळानें त्यांना त्या भविष्यरूपी काळोखांत प्रकाश दिसला व ते त्या प्रकाशाच्या अनुरोधानें जाऊं लागले.

या असल्या चारणी व वेडया बाया जीं भविष्यें वर्तवितात तीं खरीं होतात अशी खानसाहेबांची बऱ्याच दिवसांपासूनची समजूत होती आणि याचें कारण असें होतें, कीं, त्यांना एका चारणीनें, 'तुह्मी लवकरच मोठे उमराव व्हाल' असें सांगितलें होतें आणि हें भविष्य वर्तविलें त्यावेळीं खानसाहेब शंभर शिपायांवरचे मुख्य होते. अर्थात् आपली स्थिति म्हणजे तें भविष्य कथनच होय, असें त्यांना वाटणें व भविष्यावर त्यांचा विश्वास बसणें साहाजिक होतें, आणि मुलीच्या सांगण्याचाहि तसा परिणाम झाला तो यामुळेंच. कर्तव्यपरायण लोक असल्या भविष्यावर फारसा भरंवसा ठेवीत नसतात तरी पण स्वानुभवामुळें अर्जामखानानें या भविष्यावर विश्वास ठेविला होता. त्यामुळें त्याला दोष देतां येत नाहीं. असो.

मुलीनें सांगितलेली हकीगत ऐकून खानसाहेबांना वाटलें, कीं, 'खुसरूचा भविष्यकाळ फारच बहारीचा आहे. तसेंच, होऊन गेलेल्या व होत असलेल्या गोष्टीवरूनही पहातां या मताला दुजोराच मिळतो. बादशाहांचें प्रेम खुसरूवरच असून सेलिमला ते तिरस्कारानें पाहातात. इतकेंच नव्हे, तर त्याचा ते द्वेषाहि करतात. तेव्हां खुसरूला सिंहासन मिळणें फारसें अशक्य नाहीं. फार काय मनांत आल्यास खुद्द बादशाहाच सेलीमला बाजूला सारून खुसरूला तक्ताधिपती केला असें दरबारांत ठरवूनहि टाकतील...' खानसाहेबाचे विचार सुरू झाले.

राक्षसी महत्त्वाकांक्षा म्हणजे अत्यंत तीव्र मादकता उत्पन्न करणारी मदिरा होय. कारण असल्या महत्त्वाकांक्षेनें एकदा का एकाद्याचें मस्तक भरून गेलें म्हणजे ती त्याला दुसरें कांहींच सुचूं देत नाहीं. आतां याचें पहिलें प्रमाण म्हणजे प्यारी बानू आणि दुसरें प्रमाण म्हणजे तिचा बाप खानसाहेब. प्यारी पूर्वी मनांत म्हणत होती, " कां ? असं होणं कां संभवनीय नाहीं ? " प्यारीनें सांगितलेलें चारणीचें भविष्य ऐकून खानसाहेबहि यावेळीं मनांत म्हणाले, ' या जगांत असंभवनीय असें काय आहे ? आणि प्रयत्न केले असतां काय होणार नाहीं ? या मोंगल साम्राज्याची सामर्थ्यसंपन्नशक्ती म्हणजे सम्राट् अकबर होय. दुसरी, त्याच्या खालोखाल अधिकार चालविणारी व्यक्ति मानसिंह, आणि तिसरा मी. तसेंच आम्हीं तिघेहि खुसरूला मदत करणारे ! अहाहा ! जर भाग्यदेवता अनुकूल असेल-आणि ती आहेच-तर खुसरू आग्र्याच्या मसनदीवर विराजमान झालाच पाहिजे. आणि त्याला सिंहासनाधिष्ठित करणारा कोण ? तर मी ! मला आतां कोण विरोध करणार ? घटना परंपरा सांगत आहे कीं, प्रयत्न कर. तुला सामर्थ्यवान् मंडळी अनुकूल आहे--" खानसाहेब बेभान होऊन पुन्हां पुन्हां त्याच गोष्टी मनांतल्या मनात घोळवूं लागले; पण कांहीं वेळानंतर ते अकस्मात भानावर आल्यासारखें करून म्हणाले, " प्यारी बानू ! कुठं आहेस ? "

आपल्या बापाचा तो विकृत स्वर ऐकून प्यारीला आश्चर्य वाटलें. ती कांहींशी घाबऱ्या स्वरानें म्हणाली, " कां बाबा ! असं काय ? "

" नाहीं तसें नाहींग ! पण प्यारी, प्रयत्नाला अशक्य असें काय आहे ?"

" म्हणजे ? असं आपण कां विचारतां ? "

" तुझ्या सांगण्याचा विचार करून पाहिला, त्यावरून तुमचा दोघांचाहि भावी आयुष्यक्रम फारच भरभराटीचा दिसत आहे. कारण हिंदु संन्याशांचें भविष्य कधींहि खोटें ठरत नाहीं. चारणीच्या भविष्यवर्तनावरून मला वाटत आहे कीं, तूं खात्रीनें भारतेश्वरी होशील. आणि लवकरच सर्व हिंदुस्तान तुझ्या पायांशीं लोळूं लागेल. त्याचप्रमाणें मी सम्राट्चा सासरा होऊन माझ्या सगळ्या आकांक्षा पूर्ण करून घेईन."

प्यारी बानू विस्मित होऊन बापाच्या तोंडाकडे कांहींवेळ पहातच

राहिली, आणि नंतर एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाली, " तुम्हीं हें काय बोलतां बाबा ? वेडा मनुष्य सुद्धां असली बडबड करणार नाहीं ! !"

खानसाहेब दृढ स्वरानें म्हणाले, " नाहीं. प्यारी हें मीं कांहीं तरी बडबडत आहे असें नाहीं. होत असलेल्या गोष्टीवरून जें मला दिसत आहे आणि महा बुद्धिमान् राजा मानसिंह यांना जें खात्रीनें माहीत आहे, तेंच मीं तुला सांगत असल्यामुळें आतां माझा प्रत्येक शब्द त्रिकालाबाधित सत्य आहे असें समज. तुझा सासरा सेलीम हा लवकरच आग्रा शहरावर स्वारी करणार आहे हें तूं ऐकलें आहेस का ? " बापाचें हें बोलणें ऐकतांच प्यारी चमकली. प्रथम तें तिला खरेंच वाटेना पण बापाच्या तोंडाकडे क्षणभर पहातांच तिला त्याचें बोलणें खरें असावेसें वाटलें. कारण यावेळीं त्याच्या चेहेऱ्यावर विलक्षण गांभीर्य विलसत होतें. मानसिंहाजवळहि जी गोष्ट खान बोलला नाहीं, ती त्यानें कांहीं गूढ कारणानें आपल्या मुलीला सांगितली.

प्यारी बानू कांहीं वेळानें म्हणाली, " बाबा तसं झालं तर फारच भयंकर नाहीं का ? "

खानसाहेबांनीं उत्तर दिलें, " हिंदुस्तानच्या सिंहासनलाभासाठीं हें असें व्हायचेंच, यांत भयंकर असं कांहींच नाहीं. अकबर शहाच्या शिथिल हातांतून राजदंड काढून घेण्यासाठीं सुलतान सेलीम फारच अधिर होऊन गेला आहे आणि बंडाचा प्रारंभ तो हाच. या बंडाचे परिणाम सुलतान सेलीम याला अशुभ आणि खुसरूला शुभ असेच होणार. "

मुत्सद्दी मानसिंह काष्ठसंग्रह करून ज्या महायज्ञाची तयारी करीत होता त्या महायज्ञाला हातभार लावण्यासाठीं यावेळीं बरीच मंडळी पुढें सरलेली दिसत होती. जमविलेल्या लांकडांना अग्नी लावण्याचें काम चारणीनें केलें आणि खानसाहेबांनीं फुकर मारून तो अग्नी मोठा करण्याचें काम तडीस नेलें. झालें. महायज्ञाचा अग्नी धडाक्यानें आपल्या ज्वाला चोंहोंकडे पसरवूं लागला.

खानसाहेबांच्या बोलण्यानें प्यारी बानूच्या कोमल अन्तःकरणांत एक प्रकारचा अननुभूत उत्साह उत्पन्न झाला. ती म्हणाली, " बाबा ! जर तसं झालं आणि सुदैवानें त्यांच्या मस्तकावर राजमुकूट झळकूं लागला तर फारच उत्तम होईल. पण त्याच्यासाठीं प्रयत्न कसे कसे करावयाचे ? प्रयत्न

करायला मी केव्हांहि तयार आहे! शहाजादेसाहेबांच्या हृदयांत या नवीन मंत्राची स्थापना करणें आणि ती करीत असतां ते कितीहि रागावले तरी तो निमूटपणें सहन करणें हें कटुकर्तव्य मला आधीं करावें लागेल. बाबा. मी हें करीन; पण आणखी मला काय काय करावें लागेल? कारण चारणी म्हणाली होती बरेच प्रयत्न करावे लागतील, म्हणून विचारतेंहो!—"

खानसाहेब म्हणाले, "तुला आणखी फारसें कांहींच करावें लागणार नाहीं. तूं फक्त खुसरूच्या निस्तब्ध कर्मशक्तीला असें एक प्रकारचें चालन दे, कीं, ज्या योगानें तो सध्यांची स्वतःची शोचनीय स्थिति जाणूं शकेल आणि सिंहासन मिळेपर्यंत स्वस्थ बसणार नाहीं. तसें न केल्यास अकबरशहा ज्या दिवशीं आपले डोळे झांकील व आपला पंचमहाभूतमय देह सिकंदरबादच्या कबरेंत विराजमान करील, त्याच दिवशीं मी आणि मानसिंह आग्रा शहरांतून कायमचे निघून जाऊं. कारण आम्हांला हद्दपारच करण्यांत येईल. प्यारी! या शोचनीय प्रकारापासून जर तुला आपल्या नवऱ्याला वांचवावयाचें असेल, तसेंच ग्वाल्हेरच्या किल्ल्यांतील अंधाऱ्या व बिनहवेच्या खोलींतील कैद चुकवावयाची असेल. फार काय तेथील भयंकर विषपानाची तरी तुला भीति वाटत असेल, तर आजपासून खुसरूला पराक्रमी कर. आज तो चोहोंकडून संकटांत आहे, आणि तीं संकटें तर फारच भयंकर आहेत."

बोलत बोलतच खानसाहेब खोलीच्या बाहेर पडले, त्यामुळें प्यारीला, त्यांना कोणताच प्रश्न करतां आला नाहीं. ती मूढ होऊन तिथच्याच एका कोंचावर बसली आणि विचार करूं लागली. पुढील कार्याची योजना कशी करावी हाच तो विचार होता; पण तिला कांहींच सुचेना आणि तळमळ तर मुळींच थांबेना.

---

## प्रकरण १८ वें.

—:o:—

### राजसंसार.

बापानें पाजलेल्या राक्षसी महत्त्वाकांक्षारूपी विषपानानें अस्थिर होऊन प्यारीबानू घाईघाईनें शहाजाद्याच्या शोधाला लागली; पण बराच वेळ शोधू-

नहि त्याचें तिला दर्शन झालें नाहीं. नंतर तिनें आपली मैत्रिण अमिरा हिला बोलवून आणून म्हटलें, " शहाजादेसाहेब कुठेंहि आणि कसल्याही कामांत असोत, त्यांना मी ऐथें लवकर बोलविलें आहे म्हणून सांग. महत्त्वाचं काम आहे म्हणावं ! " पण अमिरेलाहि त्याचा शोध न लागल्यामुळें ती निराश होऊनच परत आली.

बादशाही महालासभोंवार गुलाबबाग असून त्या गुलाबबागेंतच एकीकडे खुसरूनें आपल्या आवडीप्रमाणें व नवीन पद्धतीनें एकच कुंज बनविला होता, आणि केव्हां केव्हां त्याचे मन अत्यंत चिन्ताक्रान्त झालें म्हणजे विचार करीत तो इथें येऊन बसत असे. आतां प्यारीला या कुंजाची आठवण झाली आणि ती घाईघाईनें तिकडे निघाली.

कुंजाच्या तोंडाशीं आल्यावर तिनें हळूच पुढें वाकून पाहिलें, तों ज्या चबुत्र्यासभोंवार चमेलीचीं फुलें डोलत आहेत अशा एका संगमरवरी चबुत्र्यावर खुसरू बसला असून हातांत एक पत्र आहे.

पत्र पहातांच प्यारीबानू समजून चुकली की, ' या पत्रानेंच शाहाजादेसाहेबांचें मन अस्वस्थ झालें असावें. ' नंतर ती तशीच त्या वेलीच्या आडून पुढे सरत सरत चबुत्र्याच्या मागें येऊन उभी राहिली. खुसरू पुढें काय करतो आणि काय बोलतो हें पहावें हाच तिचा उद्देश होता.

आणि तो तिचा उद्देश लवकरच सिद्धीस गेला. कारण आपल्याशींच पुटपुटत असलेला खुसरू आतां कांहींसा मोठ्यानें बोलूं लागला-" मला रस्ता दाखवून दे, खुदा ! मी आतां कोणत्या मार्गानें जाऊं ? चोहोंकडे मला भयंकर अंधार दिसत आहे. एकीकडे बादशाहाचा हुकूम मला इथेंच राहा म्हणत आहे. तर सुलतान सेलीमचा हुकूम मला तिकडे बोलवीत आहे. आईनें सांगितलें आहे बापच सर्वांत श्रेष्ठ होय व बापाच्या आज्ञेबाहेर जाणाऱ्या मुलाला पापी समजतात.इकडे शहानशाहा जातांना सांगून गेले आहेत," मी कांहीं महत्त्वाच्या राजकार्यासाठीं आग्र्याला जात आहें. तेव्हां तिकडून मी परत येईतों शिक्रीचें संरक्षण करण्याचा भार तुझ्यावर सोंपविला आहे. माझा दुसरा हुकूम होईपर्यंत तूं इथून एक पाऊलहि बाहेर टाकतां नये-' बोलतां बोलतां खुसरू मध्येंच थांबला आणि हातांतील पत्र वाचण्यास सुरवात केली. पत्रवाचनानंतर त्याचा चेहरा बराचसा प्रसन्न दिसूं लागला. तो पुन्हां म्हणाला,

"अलाहाबाद् येथें बापाकडे जायला मला का भीती वाटावी ? शिवाय त्या ठिकाणीं माझी प्रेमळ आईहि आहे. माझी आई देवीस्वरूपिणी असून कल्याण करणारी आहे. तेव्हां ती मला माझ्या बऱ्याच्याच दोन गोष्टी सांगेल. तेव्हां जावें हें बरें—"

पण याचवेळीं मागून शब्द उमटला, "नको, अलाहाबादला जाणें नको. कारण, त्या ठिकाणीं गेल्यावर मोठ्या संकटांत पडाल !"

खुसरू चमकून उठला आणि चबुतऱ्याच्या मागें जाऊन पाहूं लागला ! तों आपलीच पत्नी प्यारीबानू खिन्न चेहेऱ्यानें तेथें उभी असल्याचें त्याला आढळून आलें.

तिला तेथें पहातांच तो उत्सुकतेनें म्हणाला, "प्यारी, तूंच का आताचे शब्द बोललीस ?"

प्यारीनें उत्तर दिलें,"दासीला अपराधाची क्षमा असावी. आपलं दुर्विचारसूत्र तोडावं यासाठींच मी ते शब्द बोललें. आपल्या हातांतील हें पत्र कुठून आलं तें सांगायचं होईल का मला ?"

"हो. न सांगायला काय झालें. हें पत्र अलाहाबादहून आलें आहे."

"मीं पत्र वाचलें नाहीं, तरी पण त्यांतील मजकूर कांहीं तरी जरूरीचा असून तें मामंजींनीं लिहिलं आहे एवढं सांगूं शकेन."

"हो. तसाच कांहींसा मजकूर आहे. खोटं नाहीं."

"अलाहाबादला अगत्याचं बोलावणं असेलच ! !"

"हो. आहे. आणि गेलेंहि पाहिजेच."

"आपलां तिकडे जाण्याचा अगदीं निश्चयच झाला का ?"

"होय प्यारी ! माझं जाण्याचं ठरलं. आणि बापानं बोलाविलं असतां कोण जाणार नाहीं." आणि यावेळीं तसं न जाणं म्हणजे आपलंच अकल्याण करून घेतल्यासारखं होणार आहे."

"छे. जातां नये. न गेल्यानं संकट येणार नसून गेल्यानेंच संकट येणार आहे."

"पण हें तुला कसें समजलें ?"

"नाथ ! स्त्रियांना पतीवरील संकट आपोआप समजत असतं अगोदरपासूनच त्यांच्या मनाला एक प्रकारची हुरहुर लागून राहाते. हृदयेश्वर !

आपल्या दर्शनानेंच माझ्यांत हालचाल करण्याची ताकद् आलेली आहे, आणि या निष्ठुर व हृदयहीन राजसंसारांत आपल्यावांचून मला कुणाकुणाचाही आधार नाही. मग एकमेकांच्या सुखदु:खाचा विचार एकमेकांनीं करावयाचा नाहीं का ! " प्यारी अगदीं दीनवाणानें बोलत होती.

" अंह. असल्या महत्वाच्या बाबतींत मनावर अवलंबून राहाण्यांत अर्थ नाहीं. प्यारीबानू ! जगांतील स्त्रीपुरुषांचीं मनें सभोंवतालच्या संशयित परिस्थिंत भटकत असतात हें तुला माहीत आहे का ? "

" असेल तस खरं असेल, पण आपणाला जर अगदीं गेलंच पाहिजे असं असेल तर मलाहि बरोबर न्यायचं. आणखी असाही विचार करून पहावा, कीं, शहानशहानी आपण परत येईपर्यंत इथंच राहण्याबद्दल निक्षून सांगितलं असून त्यांच्या परवानगीवांचून असं एकाएकीं जाण बरं का ? तसंच आग्रा कांहीं इथून फार दूर नाहीं. उद्यांच सकाळीं सर्व हकीकतींचें पत्र देऊन तिकडे एक स्वार रवाना करावा, म्हणजे आपोआपच आपल्यावरची जबाबदारी कमी होईल. "

खुसरूनें शांतपणानें विचार केला तेव्हां प्यारीबेगमचेंच बोलणें त्याला बरोबर वाटलें. तसें केल्यानें आपल्यावर शहाचा शब्द येणार नाहीं अशी त्याची खात्री झाली. नंतर त्यानें प्यारीला प्रेमभरानें आलिंगन देऊन म्हटलें, " शत्रूंनीं भरलेल्या या राजपुरींत तुझ्यावांचून माझं हित पहाणारी दुसरी कोण आहे बरं ? जर केव्हां सेलीमचा वडील मुलगा म्हणून मला सिंहासनावर बसण्याची वेळ आली तर राजराजेश्वरांच्या जागीं विराजमान होण्याला तूंच योग्य आहेस, हें तूं आपल्या प्रत्येक युक्तीवादानें व्यक्त करीत आहेस. आणि यासाठींच खुदानें तुला असलें दिव्य लावण्य, प्रखरबुद्धि आणि उत्तम गुण देऊन इकडे पाठविली आहे. "

शहाजाद्याचें प्रशंसायुक्त पण भावी उन्नतींचें द्योतक बोलणें ऐकून महत्वाकांक्षेनें तळमळत असलेली बेगम थोडीशी चमकली. आपले हेतू यांना समजले कीं काय असाहि तिला भास झाला; पण ती आतां राजकारणांत निर्ढावत चाललेली बेगम असल्या क्षुल्लक गोष्टींकडे थोडेंच लक्ष देणार ? तिनें गंभीर स्वरानें म्हटलें. " आपलं म्हणणंच खरं होणार. खरोखरच आपली सिंहासनावर बसण्याची इच्छा दयाळू खुदा लवकरच पूर्ण करील. "

खुसरूनें प्यारीच्या बोलण्याचें खरें मर्म लक्षांत न घेतां प्रश्न केला, " प्यारी, तूं अगदीं मला आशिर्वादच दिलास ? "

आपला हेतु, खुसरूपुढें मांडण्याला हा सुयोग बरा आहे असें प्यारीला वाटून ती म्हणाली, " आपले वडील आग्रा शहरावर चाल करून येत आहेत हें आपण ऐकलं नाहीं काय ? मग हा आपल्या म्हणण्याप्रमाणें ' आशिर्वाद ' कदाचित् खराहि होऊं शकेल, नाहीं कुणीं म्हणावं ! म्हातारपणामुळें अशक्त झालेल्या, व शोकतापांनीं जर्जर होऊन दीन झालेल्या सम्राट्च्या हातांतील राजदंड काढून घ्यावा, हा या स्वारीचा उद्देश आहे. माझ्या बाबानीं आपल्या विश्वासू हेरांमार्फत अशी बातमी आली आहे कीं, अलाहाबादपासून बहारपर्यंतचा सर्व प्रदेश आपल्या ताब्यांत घेऊन सुलतान सेलीमनें तेथें आपला अधिकार चालू केला आहे, व असंख्य सैन्य घेऊन आग्रा लुटण्यासाठीं तो येत आहे; पण नाथ ! या भांडणाचा काय परिणाम होईल बरें ? "

खुसरू अत्यंताश्चर्यानें आ वासून प्यारीच्या तोंडाकडे नुसता पहात राहिला होता; पण शेवटीं तिच्या प्रश्नानें तो शुद्धीवर आला, व मन्द स्वरानें म्हणाला, " शहानूशहानंतर राजकानूप्रमाणें आग्र्याची मसनद ज्याची त्याला मिळण्याला कांही अडथळा नसतां तो वारस, असें बंडखोर बनून शहरें लुटीत सुटतो हें आधीं खरें तरी कोण मानील ? प्यारी ! तुला वेड लागलें आहे. तुझ्या या सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. "

प्यारी पुन्हां धीर स्वरानें बोलूं लागली, " आपल्या मस्तकावर जें हें अनंत नीलिमामय आकाश दिसत आहे, तें खरें वाटतेंना ? तर मग मी जें बोललें तें तसेंच खरें आहे. नुकत्याच फुललेल्या चमेलीचा सुवास, मलयानिलाच्या हृदयांत शिरून आपले मनोमुग्धकर स्वरूप जेव्हां चोहोंकडे दाखवूं लागतो आणि तो जितका आपणाला सत्य वाटतो तितकेंच माझं बोलणं खरं आहे; पण मी आधीं आपणाला खोटं का सांगेन ? आपली अशी समजूत कां झाली ? माझ्यावर आपला विश्वास नाहीं का ? आहे. आणि म्हणून आपणाला मी आणखीहि कांहीं सांगणार आहे. जें आपण कधीं कल्पनेनेंहि जाणले नसेल-व जाणण्याचा संभवहि नाहीं-तें मीं आतां आपणाला सांगतें कीं, अकबरशाहाचें आपणावर अत्यंत प्रेम आहे, आपणाला सोडून ते थोडा वेळ

सुद्धां दूर राहात नाहींत, त्यांच्यानं तसं राहावतच नाहीं, आणि याचमुळें आपले वडील आपणांवर नेहेमीं रागावलेले असतात. त्यांना आपण दुष्टासारखे दिसतां ते यामुळेंच. आपल्यावर त्यांची फारच संशयित दृष्टि आहे. ते आपल्याला कोणत्या ना कोणत्या कौशल्यानें आपल्या ताब्यांत घेऊं पहात आहेत. आणि त्याच कार्यासाठीं आजचें हें त्यांचें कृत्रिम स्नेहपूर्ण पत्र होय. सम्राट् शेंकडों वर्षें राज्य करोत असं आम्हांला वाटतं, पण आपले वडील त्यांच्या या ज्यास्त राज्योपभोगाबद्दल फारच रुष्ट झाले आहेत. त्यांना आपल्या हातांत लवकर राजदंड आला पाहिजे आहे. आणि आपल्या सिंहासनप्राप्तीमधील मुख्य कंटक, ते आपल्या मुलाला-शाहाजादेसाहेब आपणाला-मानीत असून तो कंटक दूर करण्यासाठीं ते प्रथम धडपड करीत आहेत, आणि त्याचा पहिला प्रयत्न म्हणजे हें पत्र; पण नाथ ! हीं सगळीं त्यांचीं कारस्थानं आम्हांला समजलीं आहेत, व आतां हिंदुस्तानचं सिंहासन आपलं आहे. त्यांचे हे सगळे प्रयत्न व्यर्थ जातील. हिंदू चारणीची भविष्यद्वाणी केव्हांही खोटी होणार नाहीं ”

खुसरूनें अस्वस्थपणानें प्रश्न केला, “ हिंदू चारणी ? तापसिनी ? कुठें तुला ती भेटली ? तिनें तुझ्यामाझ्यासंबंधानें कोणतें भविष्य सांगितलें, प्यारी ? ”

आतां मात्र प्यारीला चांगलीच संधी मिळाली. व त्या संधीचा फायदा घेऊन तिनें आपल्या मधुर भाषेनें, चारणीनें वर्तविलेलें भविष्य खुसरूला सांगितलें.

स्थिर नेत्रांनीं प्यारीकडे पहात शांतपणानें खुसरूनें आपल्या पत्नीचें सांगणें ऐकून घेतलें. प्यारीनें तर इतक्या कांहीं तीव्र उत्साहानें तें भविष्य सांगितलें कीं, खुसरूला तें तिचें हंसरें तोंड, नाजुक हावभाव वगैरे पाहून एक प्रकारचें कौतुकहि वाटलें; पण तो कांहीं बोलला नाहीं. मनांत मात्र म्हणाला, “ मी यापूर्वींच असल्या भविष्याच्या जाळ्यांत गुरफटलों आहें. हा त्याचा एक लहानसा भाग असेल कदाचित् ! ”

आपलें सांगून संपलें तरी आपल्या हृदयेश्वरानें आपणाला कांहीं विचारलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर तो आपल्याच विचारांत गढून गेला आहे असें पाहून प्यारी लडिवाळपणानें खुसरूच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली, ‘कसला इतका गहन विचार चालला आहे प्रियतम ? ”

खुसरूनें एक दीर्घ सुस्कारा सोडून उत्तर दिलें, " कसला विचार करायचा ? दैव आपल्या कारस्थानाचे धागे किती लांबवर फेकीत आहे तें मी पहात आहें. खरं सांगू का प्यारी ! मी आपल्या नशिबाचा विचार करीत आहे. अव्यक्त भाषेनें व विचित्र लिपीनें खुदानें माझ्या भाग्यसूत्रांत काय गोंवलें आहे तें मी पाहात आहें; पण नाहीं प्रिये ! पुष्कळ लांबवर पाहिलें; पण माझा भावी काल मला अंधकारमय दिसत आहे. तूं आणि मी कुठच्या तरी रहस्यगंगेंत वाहात जाणार. परिणाम—नको. तो विचार नको—"

प्यारीनें विषय बदलण्याच्या हेतूनें मध्येंच म्हटलें, " मग इतक्याउपरांहि आपण अलाहाबादला जाणारच का ? "

" तें मी अजूनही निश्चित असें कांहीं सांगू शकत नाहींत. " खुसरू मंद स्वरानें म्हणाला.

" कदाचित् नाहीं जाणं झालं तर सुलतान सेलीमच्या या पत्राला उत्तर तरी पाठवावं लागेल ना ? "

" सम्राट्चा हुकूम येईपर्यंत सुलतान सेलीमच्या पत्राला उत्तर न देणें हेंच खुसरूला श्रेयस्कर वाटतें. मला एवढं माहीत आहे, माझी कार्यपरंपरा पाहून, स्थिती पाहून, आणि चंचलपणा पाहून, सुलतान सेलीम माझ्याकडे विषमय दृष्टीनें पाहूं लागला. जोराच्या प्रवाहाच्या तोंडीं जसं शुष्क तृण सांपडावं, आणि त्याला मुकाट्यानें प्रवाहाच्या दिशेनें जाणें भाग पडावें, त्याप्रमाणें इच्छा नसतां मला गुंतागुंतीच्या मार्गांतून लोटत लोटत पुढें जावें लागत आहे. माझ्यासारख्या दुर्बल हृदयी माणसाला या आकर्षणांचा व आघातांचा कसा प्रतिकार करतां येणार ? अर्थात् दैन्यावस्थेला पोंचविणारें हें दैव मला ज्या मार्गानें घेऊन जाईल त्या मार्गानें जाण्याला मी तयार आहें. जरी त्या रस्त्यांत माझी आहुती घेण्यासाठीं मृत्यू टपून बसला असेल तरी त्यालाहि मी अडथळा करूं शकणार नाहीं. "

खुसरूच्या या बोलण्यावर प्यारीनें कांहीं वेळ विचार केला आणि तेज व उत्साहपूर्ण पण तीव्र दृष्टीनें, आपल्या हतबल झालेल्या नाथाकडे पहात ती गंभीर स्वरानें बोलूं लागली. " तर मग कर्तृत्वशक्ति म्हणतात ती जगांतून अगदीं नाहींशीं झालीच म्हणायची !! दैवाला अडथळा करण्याचें मुळींच

सामर्थ्य कर्तृत्वशक्तींत नाहीं का! प्रयत्न हें प्रधानतत्व आहे. दैव मुख्य नव्हे. प्रलयकालचे नद्यांचे भयंकर तुफानी प्रवाह येणार आहेत असें आगाऊ समजतांच जर प्रचंड बांधबंदस्ती केली तर नदीकांठचेंहि घर सुरक्षित नाहीं कां राहायचें? प्रयत्नानें सर्व कांहीं साध्य होतें. नाहीं तर आपण आतां आपल्या वडलांच्या आदेशाप्रमाणें दैवावर हवाला ठेवून त्यांच्याकडे जाणार आणि कारागृहांत पडणार!! गुप्त शत्रूच्या तरवारीखालीं आपली मान देण्यापेक्षां पराक्रमानें आपल्या साध्याकडे जाण्याचा प्रयत्न करणेंच योग होईल? मी आपणाला आपल्या बापाशीं विरोध करण्याला बिलकुल सांगत नाहीं. त्यांची अवज्ञा करा असाहि माझा सांगण्याचा हेतु नाहीं. फक्त मी म्हणतें, कीं, आपण आपलें रक्षण करा. नाथ! विचार करून पहा. नवे नवे होत असलेले प्रकार पाहून आपलें मन चंचल बनत चाललें आहे. निश्चितपणा असा कुठेंच दिसत नाहीं. सोन्याचे राजभोग आणि अलौकिक विलास यांत आतां आपलें मन रमत नाहीं. झोपेनें तर आपणाला अजिबात सोडलें, कुठेंहि एक क्षणभर चैन पडत नाहीं. कां बरं! नाथ? आपली ही अशी स्थिती कशानें झाली!"

खुसरूनें एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हटलें, "दिल्लीपतीच्या वंशांत जन्माला येणें हें एवढें मोठें भयंकर पातक आहे हें मला माहीत नव्हतें. सिंहासनाच्या वारसाला असल्या भीषण ज्वालांत तळमळावें लागतें हें मी पूर्वीं समजलों नव्हतों. पळोविपळीं माझा देह तीळ तीळ जळत आहे. कां बरं असें व्हावें? छे सांगवत नाहीं. मला ही दुर्धर चिंता कशी व कां लागली तें एक खुदाच जाणें. मला वाटतें असा विचार करतां करतां मी ऐके दिवशीं वेडा होईन. माझ्या हृदयानन्ददायिनी प्रियतमे प्यारे? तूं माझी आहेस आणि मी तुझा आहें. माझ्या धडाडणाऱ्या हृदयाला तूं आपल्या सुकुमार व अमृतमय स्पर्शानें नवजीवन देत आहेस; पण खुदानें आतां तुझाहि मगज बिघडवून टाकला असावासें वाटतें! तुझ्या हृदयांत कोणातरी दुष्टानें राक्षसी महत्वाकांक्षेचें विष ओतल्याचें दिसत आहे. हो. विषदान करणारी ती चारणीच! सुखाचा जीव दुःखांत लोटण्याला आणि दुधांत मिठाचा खडा घालण्याला तीच कारण. तूं! प्रिये तूं!! माझ्या हृदया तूं!! तिची गुप्तपणें भेट घेऊन तें विषपान केलेंस आणि माझ्यावर अत्यंत प्रेम करणाऱ्या लाडके, मला तूं

आतां तें विष पाजून तळमळवीत आहेस!! हाय! कां बरं तूं अशी निष्ठुर झालीस प्यारी?—" खुसरूच्यानें पुढें बोलवेना. त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले आणि त्या अश्रूंनीं प्यारीचे गाल भिजून गेले.

प्रियकराच्या नेत्रांतील ते अश्रू आणि तें भाषण पाहून प्यारीला फारच वाईट वाटलें. तिच्या सगळ्या महत्वाकांक्षा, आणि भावीकालांतील सगळीं सुखस्वप्नें व उज्ज्वल देखावे नाहींसे झाले. त्यांचा विचारच करायचा तिनें सोडून दिला आणि आपल्या प्रियकराचे डोळे पुसून व त्याला आलिंगन देऊन म्हणाली, " नाथ? सिंहासन नको आणि ऐश्वर्यहि नको. तसेंच राजसंसारांतील मोठ्या लोकांच्या विलासभोगांचीहि आवश्यकता नको. आपल्या पुढें मला मसनद् आणि हिंदुस्तानचें आधिपत्यहि तुच्छ आहेत. आपणाला दुःख होईल असं कोणतेंहि वर्तन आतां माझ्याकडून घडणार नाहीं. चला. हें फत्तेपूर आणि हा राजवाडा सोडून आपण कुठेंतरी अरण्यांत एकांतीं राहून शांतिरसाचा आस्वाद घेऊं. आग्र्याशीं असलेला सगळा संबंध आम्ही सोडून देऊं. ज्या जगांत सुवर्णाला इतका मोठेपणा आहे; जेथें स्नेह, प्रेम आणि भक्ति यांच्या योग्य मोबदला मिळत नाहीं; मित्र विश्वास ठेवण्यासारखे नाहींत; आपला कोण व परका कोण हें ओळखणें कठीण झालें आहे, आणि ज्या ठिकाणीं हिंसा, द्वेष, संशय, अविश्वास, निष्कारण अडथळे करीत आहेत, नाथ! तेथें आपण कशाला रहावें? हें असलें जग सोडून आपण दूर-दूर कुठें तरी जाऊं! ज्या ठिकाणीं हृदय, सामर्थ्यसंपन्न होतें व शांति मिळते, तेंच निर्जन ठिकाण आपण आतां जवळ करूं. पर्णकुटींत राहाणें आपणांला फारच आनंदकारक होईल. त्या ठिकाणीं नोकर चाकर कोणी न्यावयाचे नाहींत. फक्त मी आणि आपण. खरंच आपण दोघेंच त्या ठिकाणीं सुखाची दुनिया करून सोडूं. कारण त्या ठिकाणीं प्रेम आणि आनंद यांवाचून कांहींच नाहीं. मत्सर द्वेष नाहीं. आणि हृदयें क्षत विक्षत करणारे स्वार्थसंग्रामहि नाहींत. त्या ठिकाणीं फक्त ज्योतिर्मय सौंदर्यच असणार! त्यावांचून कांहीं नसणार! चलावं आपण तिकडेच जाऊं"

प्यारीचें हें मनापासूनचें व मधुर बोलणें ऐकून खुसरूचें तळमळणारें हृदय बरेंच शांत झालें. इतकेंच नव्हे, तर त्यानें हंसून मनांत म्हटलें, " खरो-

खरच ही मायाविनी प्यारी हां हां म्हणतां नवीन स्वर्ग उत्पन्न करूं शकेल!" कांहीं असो, या वेळीं खुसरूचें मन प्रफुल्लित झालें एवढें खरें.

अजूनहि आकाशांत चंद्र हंसत होता. खुसरूनें त्या अनिंद्य ज्योतिपूर्ण चंद्राकडे पाहिलें; पण तो मनांत म्हणाला, 'हा माझी थट्टाच करीत असावा.कारण हा एकवार दिसतो आणि एकवार तिरस्कारपूर्ण नजरेनें पहात पहात चटकन मेघाआड आपलें तोंड लपवतो. यावरून हा गगनविहारी चंद्र जणुं काय मला म्हणत आहे, 'होय! हतभागी राजकुमारा, या जगांत तुला स्वस्थपणा केव्हां तरी मिळेल का? रमणीच्या गोडभाषणीं कारस्थानांत नसत्या महत्वाकांक्षेनें स्वतांला गुंतवून तूं आपला नाश करून घेणार' हा मालतीचा सुवास चोरून आणणारा वारा माझ्या कानाशीं गुणगुणत आहे, कीं, 'ही प्यारी जादुगारीण आहे. हिच्या कारस्थानांत सांपडूं नकोस. हिंदुस्थानचें सिंहासन म्हणजे तुला पण दुःस्वप्नच आहे. मग निष्कारण तें स्वप्न पाहून तूं वेदनांनीं कां तळमळतोस बरं?' याच वेळीं पापिया नांवाचा पक्षी मोठ्यानें ओरडला.त्याला कसला आनंद झाला कुणाला ठाऊक. पण तें ओरडणें आनंदाचें होतें. दुसऱ्याचें दुःख पाहून कित्येकांना आनंद होत असतो, हा पक्षीहि तसाच असेल नाहीं कुणीं म्हणावें? आणखीहि खुसरूला वाटलें कीं, तो पक्षी आपणाला सुचवीत आहे, 'कालसर्पिणी रमणीच्या बोलण्यावर विश्वासूं नकोस त्यांच्या दृष्टींत चंचलपणा, बोलण्यांत प्रतारणा आणि हृदयांत हलाहल आहे. सांभाळ!'

खुसरूनें पाहिलें, सगळी जडसृष्टीहि आपणाला पत्नीच्या भाषणाबद्दल धिक्कार दर्शवीत आहे–जणुं काय, जड प्रकृति भयंकर कट करून आपल्या विरुद्ध उभीच आहे. प्यारीनें जेव्हां चारणीचें भाविष्य त्याला सांगितलें होतें, त्यावेळीं त्याच्या मनांत असा एक विचार उत्पन्न झाला होता, कीं, 'प्रयत्नांनीं काय होणार नाहीं? कर्मशक्तिच्या जोरावर शत्रु-मित्र सर्वांना आपल्या स्वाधीन करून घेतां येणार नाहीं का? जो आज अडचणीचा मार्ग वाटत आहे, तो आपणाला कां सरळ करतां येऊं नये?—', पण हे त्याचे विचार, जड प्रकृतीच्या विचारांपुढें टिकले नाहींत. कारण प्रकृतिदेवीचे ते चाळे पाहून त्याचें मन कचरलें. तो म्हणाला, "नको. मला तें सिंहासन नको. व

त्याचें मला कारणहि नाहीं. सामर्थ्य दाखविण्याचा प्रयत्न करण्याचीहि विशेष आवश्यकता नाहीं. मी जसा आहें, तसाच राहीन, आणि जसा तळमळत आहें तसाच तळमळेन. काळच मला विश्रांति देईल व निर्जन कबरींत जाऊन मी आपलें सर्वस्व शून्यांत मिळवीन. ही प्यारी! ही प्यारी खरोखरच सैतानी आहे, हिचे डावपेचहि भयंकर असतात. ती आज माझ्या मनांत अशा कांहीं दुराशा उत्पन्न करीत आहे, कीं, त्या मला भयंकर कलंककारकच होतील. आणि शेवटीं—शेवटीं त्याचें अपमृत्यूंत पर्यवसान—"

शाहाजाद्याला तन्मयतेनें विचार करतांना पाहून प्यारी वीणाविनिन्दित स्वरानें म्हणाली, " नाथ! रात्र तर फार झाली गडे!! महालांत नाहीं का चलायचं!'

या संबोधनानें खुसरू, जणुं काय स्वप्नमय राज्यांतून आपल्या चिरपरिचित दुनियेंत आला, आणि प्रियकरणीच्या मधुर आवाजानें सर्व हृदयवेदना विसरून व तिला गाढ आलिंगन देऊन म्हणाला, " चल प्यारी! पण प्रिये! महालांत गेल्यानें मला पूर्वीच्या शांततेचा लाभ होईल का!"

प्यारीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. ती किंचित् हंसली मात्र, आणि नंतर दोघेंहि हळूहळू पावलें टाकीत त्या आल्हादकारक चमेलीकुंजांतून राजप्रासादाकडे जायला निघालीं. प्रासादाच्या प्रवेशद्वारांतच, एक सुकुमार तार्तारी उभी होती—तिनें एक लहानशी चिठी चटकन् खुसरूच्या हातांत दिली. खुसरू चमकला व घाईघाईनें तें पत्र घेऊन तो आपल्या खास महालांत आला. आणि प्यारी निरनिराळ्या गोष्टींचा विचार करीत आपल्या विश्रांतिमहालांत निघून गेली.

राजवाड्यांतील सर्व खोल्या या वेळीं दिव्य प्रकाशानें प्रकाशित झालेल्या होत्या. खुसरूनें आपल्या महालांत जातांच प्रथम तें सर्व पत्र घाईघाईनें वाचून टाकलें. तेव्हां त्यावरून त्याला समजलें कीं, 'मानसिंहानें आपली गुप्त भेट घेण्याबद्दल आग्रहपूर्वक लिहिलें आहे.' मात्र एकांतीं आणि गुप्तपणें भेट घेण्याच्या कारणाचा त्यानें कांहींच उल्लेख केला नव्हता.

शाहाजादा मनांत म्हणाला, " राजा मानसिंहाच्या भेटींत माझ्या हृदयाला आणखी कसल्या वेदना होणार आहेत कुणाला माहीत!! खुदा! खुदा!! माझ्या या हितकारी आप्तांच्या तीव्र प्रभावापासून मला मुक्तकर.

आणि तसें झाल्यानें मी बऱ्याचशा शांततेचा उपभोग घेईन. खुदा ! ! तूंच आतां मला सांभाळणार. ! ! ! "

## प्रकरण १९ वें.

---:o:---

### उज्ज्वल मातृपितृभक्ति.

फत्तेपूर शिक्रीच्या राजवाड्यांत राजअतिथी वगैरे राहण्यासाठीं एक विशिष्ट महाल ठरवून ठेवण्यांत आला होता. जे सगळे अमीर-उल्-उमराव, सेनापती, मनसबदार तेहि या महालांतच राहूं शकत असत.

महाराज मानसिंह यांचाहि एक अशाच प्रकारचा ठरलेला महाल होता, व त्याच महालांत त्यांच्या बरोबरचे लोक व सैन्य यांचीहि व्यवस्था करण्यांत आलेली असे. तसेंच राजा मानसिंहाचा नोकरवर्ग व जनानखाना यांनाहि त्या ठिकाणीं अडचण होत नसे. आणि **याच मालेंतून प्रसिद्ध झालेल्या 'ताजमहाल' कादंबरींतील फत्तेपूर शिक्रीच्या 'मेरियम' महालाचें वर्णन** वाचल्यास आमच्या वरील म्हणण्याची सत्यता पटल्यावांचून राहणार नाहीं. असो.

महालांतील मुख्यभागांत असलेल्या एका लहानशा; पण उत्तम रीतीनें शृंगारलेल्या दिवाणखान्यांत, मध्यरात्रीच्या सुमारास राजा मानसिंह, उत्कंठेनें शाहाजादा खुसरूची वाट पहात बसला होता. इतक्यांत मन्द गतीनें चालत शाहाजादा तिथें येऊन पोहोंचला.

चारणीच्या बाबतींत झालेला सगळा प्रकार, खुसरूचा सासरा अजीजखान यानें मोठ्या आनंदानें यापूर्वीच मानसिंहाला सांगितला होता. तसेंच, त्यामुळें प्यारीचें मन अत्यंत चंचल झालें आहे हेंहि सुचविलें होतें; पण ही बातमी ऐकून मानसिंहाला समाधान जरी वाटलें तरी आश्चर्य न वाटतां बरेंच हंसूं आलें. कारण चारणी ही त्यानेंच शिकवून पाठविलेली पौर्णिमा होती. आपण आपल्या मुलीला अगदीं गुप्तपणें भावी स्थितीची आशा दाखविली आहे हेंहि मानसिंहाला सांगण्याला अजीमखान विसरला नाहीं.

खुसरूच्या हातांत सामर्थ्य होतें, व सैन्य परिचालनाचें कसबहि तो

विसरला नव्हता; पण त्याच्या हृदयांत, 'तात्पुरत्या उत्तेजनाला बळी पडून एकाद्या राक्षसी महत्त्वाकांक्षेच्या मागें लागावें' असलें साहसी धाडस नव्हतें. तसेंच बापाविरुद्ध शस्त्र घेऊन उठण्याचा प्रयत्नहि त्याच्यानें झाला नसता; पण अजीमखान आणि मानसिंह यांनीं असा दृढनिश्चय केला होता कीं, "कोणतेहि उपाय करावे लागले तरी ते करूं; पण खुसरूलाच सिंहासनावर अधिष्ठित करावयाचें." त्यांच्या या उद्देशसाधनाच्या मार्गांत जो अडथळासा त्यांना वाटत होता तो म्हणजे खुसरूची उज्ज्वल पितृभक्ति हा होय. आणि त्याच्या हृदयांत इतकी जाज्वल्य पितृभक्ति उत्पन्न करणारी त्याची आई शाहीबेगम जोधाबाई हीच होय.

अजीमखानानें मनांत विचार करून ठेवला होता, 'आपण आपल्या मुलीच्या हृदयांत ज्या महत्त्वाकांक्षेची पेटती ज्योत उत्पन्न करून ठेविली आहे, ती खात्रीनें खुसरूच्या कोमल हृदयांत पेटूं लागेल व तिला जास्त पेटविण्याचें सामर्थ्य त्यारीजवळ आहे.' इतका जरी मुलीबद्दल त्याच्या मनांत विश्वास होता तरी, त्या ज्योतीचें अग्नींत रूपांतर करावें असें वाटूनच कीं, काय न कळे, त्यानें मानसिंहाशीं संगनमत करून एवढ्या मोठ्या रात्रीं मानसिंहामार्फत खुसरूला तेथें बोलाविण्याचें धाडस केलें होतें. मानसिंह मनांत आणता तर राजवाड्यांत जाऊनहि खुसरूला तो आपला हेतु सांगूं शकता; पण मानसिंहाला भाडोत्री कार्य करावयाचें नसल्यामुळें त्यानें शांतपणें बोलण्यासाठीं खुसरूलाच आपल्या जागेंत बोलवून घेतलें.

सेलीमाचें जें पत्र एके दिवशीं मानसिंहानें अजीमखानाला दाखविलें होतें व ज्या पत्रानें याच्या हृदयांतून सेलीमाला हुसकून काढून दूर फेंकून दिलें होतें, तें पत्र खुसरूला दाखविण्यासाठीं मानसिंहानें आपल्याजवळ फार जपून ठेविलें होतें. असो.

खुसरू दिवाणखान्यांत येतांच मानसिंहानें हंसत हंसत पुढें होऊन मोठ्या प्रेमानें त्याला आलिंगन दिलें, व स्वागत कुशल प्रश्नादि झाल्यावर म्हटलें, "तुझे आजोबा इतक्या घाईनें फत्तेपूर शिक्री, सोडून जाण्याचें काय बरें कारण असावें खुसरू ?"

मानसिंहाचा हा अकल्पनीय प्रश्न ऐकून खुसरू चमकला; पण आपणाला आश्चर्य वाटल्याचें बाहेर न दाखवितां गंभीरपणानें म्हणाला, "का गेले

तें बरोबर सांगतां येणें शक्य नाहीं. ते इतक्या घाईघाईनें निघून गेले कीं, मला त्यांना कोणताच प्रश्न करतां आला नाहीं. तरी पण अगदीं जातांना मला ते इतकेंच सांगून गेले, 'या फत्तेपूर प्रासादांत आमच्या राजभांडाराची सोन्याची किल्ली ठेविलेली असून तिचें रक्षण करण्याचें तुझ्याकडे दिलेलें आहे. तेव्हां प्राणापलीकडे तिचें संरक्षण असून कर, आणि माझ्याकडून दुसरा हुकूम येईपर्यंत तूं कोणत्याहि कारणानें राजवाडा सोडून जातां नये.'

राजा मानसिंह मोठ्या प्रेमानें खुसरूच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला, "शहाजादेसाहेब ! आपण जरी सम्राटूच्या एकाएकीं जाण्याचें कारण समजूं शकलां नाहीं, तरी तें मी समजलों आहें. सुलतान सेलीम सैन्य जमवून आग्रा घेण्यासाठीं दर कुच दर मजल करीत झपाट्यानें येत आहे, हें तूं त्याचा मुलगा असल्यामुळें तुला कदाचित् माहीत नसेल; पण आज सत्तर हजार सैन्य त्याच्या हुकमतीखालीं आग्र्याकडे येत आहे हें अर्ध्याअधिक हिंदुस्तानाला माहीत झालें आहे. अलाहाबादचा खजिना त्यानें आपल्या ताब्यांत घेतला. सगळा बहार प्रांत आणि अयोध्या येथें त्यानें आपल्या नांवानें राज्यकारभार सुरू केला आहे. सुलतान सेलीम जर आग्र्याला वेढा घालून राजकोष आपल्या ताब्यांत घेऊन बसला, तर महाप्रलय माजेल, आणि त्या प्रचंड प्रलयाच्या तीव्र प्रवाहांत तूं कुठें वाहून जाशील त्याचा पत्ताहि लागणार नाहीं. तसेंच याच धामधुमींत माझी आणि तुझा सासरा अजीमखान याची काय शोचनीय स्थिति होईल ती नुसती कल्पनाचक्षूंनीं पाहिली तरी आंगावर शहारे येतात–"

'आपल्या बापानें बंड केलें आहे,' ही गोष्ट खुसरूला प्यारी बेगमकडून थोड्या वेळापूर्वी समजली होती; पण त्या वेळीं त्यानें त्या सांगण्याकडे द्यावें तितकें लक्ष दिलें नव्हतें. पण आतां मानसिंहाच्या तोंडून ती जोरदार व खोंचदार भाषेत व गंभीर स्वरांत ऐकून तो समजला कीं, ही कांहीं काल्पनिक दंतकथा नव्हे. बंडाबद्दल खात्री होतांच खुसरू अगदीं मन्द स्वरानें म्हणाला, "असें होणें संभवनीय आहे काय ! प्रबल पराक्रमी अकबर बादशाहा अजून जिवंत आहे महाराज ! तेव्हां हें शक्य कसें ?"

मानसिंहानें शांतपणानें उत्तर दिलें, "खरें आहे खुसरू! तुझें बोलणें-पण बादशाहा सध्यां रोगांनीं व मनस्तापानें अगदीं अशक्त होऊन गेला आहे. खरें पाहूं गेल्यास अकबरबादशाहा अनेक दिवसांपूर्वींच निघून गेला असून आतां तो जो आहे ती केवळ त्याची छाया होय. ज्या महाशक्तीनें चितोरची स्मशानभूमी केली होती, व माळव आणि वंग देशांतून पठाणांना धुडकावून लाविलें होतें, तें सामर्थ्य आतां कोठें आहे? तें उज्ज्वल रणचातुर्य आतां कुठें आहे? आणखी एक महत्त्वाची गोष्ट तूं याच वेळीं लक्षांत ठेव, अकबर-शाहा आपल्या या जीवन संध्येच्या वेळीं मुलाबरोबर सिंहासनाबद्दल वाद्विवाद करणार नाहीं, हें अत्यंत संभवनीय आहे. जो राजकुमार न्यायानें व धर्मानें या सिंहासनाचा अधिकारी आहे, व जो खटपट न करतांहि हक्कानें ही मसनद मिळवूं शकेल, त्याच्याशीं शाहा राजतक्ताबद्दल का भांडण करील? सगळें जग विस्मित नेत्रांनीं या वीरकेसरी सम्राटाकडे आज सारखें पहात आहे खुसरू!!"

खुसरू दृढ स्वरानें म्हणाला, "राजेसाहेब! तुमच्या एकंदर बोलण्याचा आशय माझ्या लक्षांत आला; पण माझ्या स्वार्थासाठीं तुम्ही कां बरें इतके श्रम घेतां महाराज? केवळ या सिंहासनासाठीं मी केव्हांहि पितृद्रोही होणार नाहीं. कारण तो कलंक मला अक्षयचा तळमळत ठेवील. मला आपण शेवटचें आलिंगन देऊन निरोप द्या. कारण मी वडलांच्या पायांवर सर्वस्व वाहाणार आहें. आणि असें केल्यानेंच माझ्या हृदयांत होणाऱ्या पश्चात्तापाच्या वेदना नाहींशा होतील. शिवाय आईजवळ केलेली प्रतिज्ञाहि पूर्ण केल्यासारखें होईल. इतकेंच नव्हे तर तुम्हींहि आपला अभिमान सोडून माझ्या वडलांकडे जाल तर ते तुमचा (भारतसचिवाचा) अधिकार कायम ठेवतील; इतकेंच नव्हे, तर ज्यास्त मानही देतील. जे हिंदुस्तानचे भावी सम्राट्, असंख्य सैन्यें ज्यांच्या नुसत्या खुणेनें मोठमोठ्या हालचाली करीत आहेत, रणकौशल्य म्हणजे ज्यांचा केवळ हातचा खेळ, आमा घेऊं शकल्यानें ज्यांच्या हातांत मोंगलांची परंपरागत सर्व संपत्ति येऊं शकणार आहे, आणि वडील मुलगा म्हणून मी ज्यांचा भावी वारस, त्यांच्याशीं मी सिंहासनासाठीं भांडण करूं? महाराज! नको. या सैतानाचा माझ्या हृदयांत प्रवेश नको. मला जाऊं द्या. मला स्वतंत्रता द्या. माझ्या दुर्बल मनाला या पाशांतून

मुक्त करा. हे भयंकर पाश माझा घात करतील ! ! ! मी वडलांकडे जाऊन त्याचें पाय धरतों आणि क्षमा मागतों. त्यांच्या प्रेमळ हृदयाच्या आश्रयाशिवाय मला सुख होणार नाहीं; आणि मला जिवंत जाळणारी चिंताहि संपणार नाहीं. मी झोंपेंत असलों, फिरत असलों, विश्रांति घेत असलों अथवा झोंपेंत एकादें सुखस्वप्न पहात असलों, तरी मला स्वस्थता किंवा शांति नाहीं, मनाला प्रफुल्लता नाहीं आणि हृदयांत उत्साहहि नाहीं. तरी पण मी सम्राट् अकबरशहाचा नातू आहें ! मग कां माझी अशी दशा व्हावी परमेश्वर ? ”

इतक्यांत त्या दिवाणखान्यांत आणखी एक मनुष्य आला आणि तो म्हणाला, “ मूढ तरुणा ! बापाकडे तूं अशा रीतीनें आत्मसमर्पण केल्यास त्याचा केवढा शोचनीय परिणाम होईल याचा तूं विचार करून पाहिला आहेस का ? या तुझ्या आत्मसमर्पणाचा होणारा लाभदायक परिणाम म्हणजे केवळ गुप्त घातकाच्या हातून येणारा अत्यंत भयंकर असा मृत्यूच होय ! अथवा विषपान करवून जीवनाचा अकालीं अंत होय ! तेव्हां खुसरू ! या वेळीं थोडेसे श्रम करून जर हा मृत्यु चुकवितां येत असेल, तर त्यांत तुझा काय तोटा आहे ? आणि राजेसाहेबांना तरी तूं इतकें टाकून कां बोलतोस ? ”

यावेळीं अकस्मात् आलेला व इतक्या सलगीनें बोलणारा दुसरा कोणी नसून खुसरूचा सासरा अमीर-उल्-उमराव अजीमखान हा होता. बादशहाचा विश्वासू वजीर आणि प्रत्येक बाबतींत सल्ला देणारा हाच होय.

खानसाहेबांच्या उत्तेजित चेहेऱ्याकडे विस्मित दृष्टीनें पहात खुसरूनें त्याला प्रश्न केला, “ आपण क्षणोक्षणीं माझा छल करण्याची इच्छा कां करतां ? तुम्हांला खुदाची शपथ आहे, अशा तऱ्हेनें माझा छळ करूं नका. तुमच्या मनांत काय आहे तें स्पष्ट सांगा. ”

खानसाहेब गंभीरपणानें बोलूं लागले, “ ऐक तर मग. आज तुला सर्व कांहीं उघड करून सांगतों. आतां या गोष्टी मला बोलण्याचें कारण, माझ्या आणि हे तुझे मामा राजे मानसिंह यांच्या बोलण्यांत एका विशिष्ट हेतूबद्दल एकमत झाल्यामुळें व तें तुझ्या कल्याणाचें असल्यामुळें तुला सांगावें असें

मीं यांना सुचवून तुला येथें बोलवून आणलें. आतां जें कांहीं आमचें निश्चित मत झालें आहे तें तुला सांगतों. वीस हजार अत्यंत रणकुशल आणि सदाविजयी असें गुप्त मोंगल सैन्य माझ्या ताब्यांत आहे, आणि पंचवीस हजार शूर रजपूत स्वारांचें खासगी सैन्यपथक राजेसाहेबांच्या हातांत आहे. त्याचप्रमाणें राजभांडाराची चावी तर या राजवाड्यांत असून ती तुझ्या ताब्यांत आहे. तेव्हां तुझ्या वडलांनीं आग्र्याचें राजभांडार आपल्या ताब्यांत घेण्यापूर्वीं तूं जर तें कोणत्या ना कोणत्या उपायानें आपल्या ताब्यांत करून घेऊं शकशील तर खात्रीनें समज, कीं, हें सुवर्णभारत तुझें आहे. खुदानें तुला धाडस दिलें आहे, सामर्थ्य दिलें आहे, आणि आमच्यासारखे पाठीराखे वीर दिले आहेत; तेव्हां तूं स्वस्थ बसणें इष्ट नव्हे. तुझ्याबद्दल तुझ्या आजोबांच्या मनांत अत्यंत प्रेम आहे हें मी कबूल करतों; पण दुसऱ्या बाजूनें पाहिल्यास सुलतान सेलीमचा ते द्वेष करतात, त्याच्याविषयीं त्यांना संशय वाटतो; आणि तुला एक क्षणही ते आपल्या नजरे आड होऊं देत नाहींत. तुझ्या वियोगानें त्यांचें हृदय तळमळतें. हा सगळा प्रकार पाहूनहि तुला कांहींच समज पडत नाहीं का खुसरू ? तुझ्या सुदैवानें होत असलेला एकंदर प्रकार अनुकूल असतां तूं अद्याप कसल्या भ्रमांत स्वस्थ बसला आहेस ? मला तर तुझा भावी काल फारच उज्ज्वल दिसत आहे ! ”

आपल्या सासऱ्याचें हें अनपेक्षित बोलणें ऐकून खुसरूच्या सर्वांगावर शहारे आले. तो कांहीं वेळ थांबून खिन्नतेनें म्हणाला, “ जनाब ! खानसाहेब ! ! सेलिमाचा मुलगा म्हणूनच मीं बादशहाला प्रिय आहे. परका कोणी असतों तर ते माझ्यावर इतकं प्रेम करते का ? अर्थात् त्यांनीं परवानगी दिल्यावांचून त्यांच्या मुलाविरुद्ध मीं बंड केल्यास बादशहा काय समजतील बरें ! ”

खानसाहेबानीं उत्तर दिलें, “ आणि सम्राट्च्या या विपन्नावस्थेंत तूं जर अगदीं कांहीं प्रयत्न न करतां स्वस्थ बसून राहिलास, तर त्यांना काय वाटेल बरें खुसरू ? चितोर, काबुल, दख्खन, अंगवंग वगैरे प्रांतांवर विजय मिळवितांना त्यांच्या अंगीं जें अचाट सामर्थ्य होतें तें आतां तसें राहिलेलें नाहीं. त्याचप्रमाणें त्यांच्याबरोबर नेहमीं असणारा त्यांचा अत्यंत जिवलग मित्र व विपन्नावस्थेंत योग्य परामर्ष घेणारा अबूल फजल आज फार दूर

दख्खनमध्यें आपल्या कामावर आहे. तसेंच त्यांच्या ताब्यांतील सेनापती वगैरे बहुतेक विश्वासू लोक, मनांतून सेलिमला अनुकूल असून त्याच्या पैशांना विकले गेले आहेत. फार काय तूं इतकें खात्रीपूर्वक समज कीं, सम्राट् अकबरशाहावांचून आणखी दुसरा कोणीहि सुलतान सेलिमच्या विरुद्ध शस्त्र धरण्याला समर्थ नाहीं, आणि सम्राट्चें सामर्थ्य किती आहे, त्यांना युद्धावर जाण्याला किती उत्साह आहे हें तूं जाणतच आहेस. अर्थात् या वेळीं तुलाच पुढें सरणें जरूरीचें आहे. जर तूं आपल्या बापाला आग्रा शहरांत प्रवेश करण्याला अडथळा करूं शकलास, आणि बादशाहाची अनुमती न घेतां स्वतः होऊन हें काम तडीस नेलेंस, तर मुत्सद्दी अकबरशहा लोकांना दाखविण्यासाठीं तुझ्यावर कदाचित् रागवेल; पण हें तूं केलेलें अनपेक्षित व अकल्पनीय साहाय्य तो केव्हांहि न विसरतां तुझा योग्य तो गौरवच करील.

"उज्ज्वल प्रकाशमय असा भावी काल तुझ्या समोर आहे. ऐक. मोंगलांची राजलक्ष्मी तुला हास्यमुखानें सांगत आहे, 'खुसरू! प्रयत्न कर. उद्योगी हो. शौर्य दाखवून विजयीवीर अशी कीर्ति मिळीव. तुझ्या सुदैवानें शुभ मुहूर्त अगदीं नजीक आलेला आहे. मोंगलांची अर्धचन्द्रांकित राजपताका फारच लवकर तुझ्या प्रासादशिखरावर फडकूं लागेल. किती जन्मांच्या पुण्याईनें प्राणी मनुष्यजन्माला येतो, हें तुला माहीत आहे का खुसरू? अत्यंत पुण्याईवांचून कोणताहि प्राणी राजकुलांत जन्मालाच येणार नाहीं. त्याचप्रमाणें राजवंशियामध्यें ज्याचें पूर्वकर्मफल अत्यंत शक्तिमान, तोच सुदैवी वीर, सम्राट्चा रत्नखचित स्वर्णमुकुट आपल्या मस्तकावर धारण करून कीर्ति मिळवितो. आणि अशानेंच मानवजन्माचें सार्थक होतें. याला प्रमाण पहा. निर्जल अशा मरुभूमींत तुझा आजा अकबरशाहा जन्माला आला. तेथील भयंकर उष्णतेनें तर त्याचे हाल झालेच; पण एकदां तर एका किल्ल्यावर मरण्याचीहि त्याला पाळी आली होती; पण आज तेच आपल्या भाग्यदेवतेच्या बळावर व पूर्ण पुण्याईच्या पवित्रपणावर स्वावलंबनानें **दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा!** असें म्हणवून घेऊन सगळ्या हिंदुस्थानाला पूज्य होऊन बसले आहेत."

"एकवार तूं आपले ज्ञानचक्षू उघडून पहा. कारण तूं शाहाजादा खुसरू आहेस. असेतु हिमाचल पर्वताचा विस्तृत भूभाग तुझ्या पायांशीं

लोटांगण घ्यायाला उत्सुक आहे. मोंगलाची राजलक्ष्मी आपल्या स्नेहमय अंकावर घेण्यासाठीं तुला बोलवीत आहे. सगळें हिंदुस्तान पुष्पमाला हातांत घेऊन विजयदुंदुभी वाजवीत तुझें स्वागत करण्याला तयार होऊन राहिलें आहे. चंगीझ वंशाचा कायमची ठरलेली सिंहासन मिळविण्याची पद्धत तूं सोडूं नको. प्रवृत्ति, स्नेह, माया, दया, पितृभक्ति वगैरे सर्व कांहीं विसरून जाऊन म्यानमुक्त तरवार हातांत घ्यायची आणि कार्याला पुढें सरायचें तसें तूं कर! आणि मोंगलवीराचा पराक्रम सर्व जगाला दाखवून त्याला थक्क करून सोड!"

मंत्रमुग्धवत् स्तब्ध राहून शाहाजादा खुसरू खानाचें हे बोलणें ऐकत होता. तें भयंकर बोलणें ऐकुन त्याचें हृदय थरारलें आणि नसानसांतून विद्युत्प्रवाह सुरू झाला. पण याच वेळीं त्याला शाहीबेगम जोधाबाई हिच्या कळकळीच्या उपदेशाची आठवण झाली. लहानपणच्या सुखाच्या आठवणी, बापाचें अत्यंत लाडानें 'खुसरू' असें हांक मारणें, खुर्रमलाहि बाजूला सारून आपलें मोठ्या प्रेमानें चुम्बन घेणें वगैरे गोष्टीहि त्याला एकामागून एक आठवूं लागल्या. ' अमल्या प्रेमळ बापाविरुद्ध, यःकश्चित् सिंहासनासाठीं मी आपल्या हातांत प्राणघातकी तरवार घेऊन उभा राहूं काय? छी. छी. किती लाजिरवाणी गोष्ट! सगळें जग मला काय म्हणेल?' खुसरूच्या मनांत असे विचार येत होतेच; पण त्याला हीहि गोष्ट दिसत होती कीं, अकबरशाहाचें क्षमाशील हृदय, सुलतान सेलीमाबद्दल केव्हांहि रुष्ट होणार नाहीं. संशयानें, अविचारानें आणि असहिष्णुतेनें एकमेकांत विवाद माजविणें म्हणजे आत्मघात करून घेणें होय, हेंहि खुसरू जाणत होता. बंडाला उद्युक्त झालेला; पण ज्याचें अन्तःकरण पश्चात्तापानें पोळत आहे असा मुलगा, अश्रुपूर्ण नेत्रांनीं जर सम्राट्च्या पायांवर डोकी ठेवून क्षमा मागूं लागला तर दयाळू आणि महान् हृदयाचा अकबरशाहा मुलानें केलेले सर्व अपराध एका क्षणांत विसरून त्याला मोठ्या प्रेमानें आपल्या विशाल हृदयाशीं धरून त्याचें समाधान करील, तीहि खुसरूची खात्री होती. अर्थात् ' आपण जर या वेळीं पितृद्रोहीपणा करून अविचार केला, तर तो मात्र कलंक केव्हांहि व कसाहि धुतला जाणार नाहीं. माझे वडील भ्रमानें चंचल बनून उतावळेपणानें बंडाचें

निशाण उमारीत आहेत, त्यांत मी आणखी तसेंच करून त्या महापापांत कशाला भर घालूं बरें—"

खुसरू बराच वेळपर्यंत स्तब्ध राहून विचार करीत असलेला पाहून राजा मानसिंह म्हणाला, "लाडक्या खुसरू! फार वेळ विचार करायला आतां अवसर नाहीं. तसेंच शुभकार्याला अशा रीतीनें विलंब लावल्यानें अकस्मात सर्वस्वी घात होण्याचाहि संभव असतो. तुझ्या हितासाठीं आणि फायद्यासाठीं आम्हीं दोघेहि कोणताहि कलंक लावून घ्यायला तयार आहों. फार काय, प्राण देण्याची वेळ आली तरीहि बाजूला सरणार नाहीं. आतां तुला कसली शंका आणि संशय राहिला सांग बरें! ऐक, खुसरू मी काय सांगतों तें ऐक. तुझ्या जवळची एक वस्तू आम्हांला या वेळीं पाहिजे, ती द्या-यला तुला कांहीं हरकत आहे का?"

खुसरू चकित नेत्रांनीं मामाच्या तोंडाकडे पहात म्हणाला, "आपणाला देण्याला योग्य असें माझ्याजवळ काय आहे बरें? सांगा महाराज आपणाला काय पाहिजे?"

मानसिंहानें उत्तर दिलें, "तुझ्या जवळ बादशाहानें आग्र्याच्या राज-भांडाराची जी चावी ठेविली आहे, ती आत्तां, या घटकेला माझ्या स्वा-धीन कर"

मानसिंहाचे हे शब्द ऐकतांच खुसरूची दृष्टि रुष्ट झाली. तो तिरस्कार-पूर्ण नेत्रांनीं मानसिंहाकडे पहात दृढ स्वरानें म्हणाला, "दुसरें पाहिजे तें करूं शकेन; पण हिंदुस्तानचा बादशाही शाहानशाहा अकबरशाहा याच्याशीं मीं केव्हांहि कपट करणार नाहीं. व विश्वासघात तर माझ्या हातून केव्हांहि देऊं शकणार नाहीं. राजेसाहेब! मला या हिंदुस्तानच्या सिंहासनाची मुळींच किंमत वाटत नाहीं. माझ्या सदा स्नेहमय आजोबांच्या प्रेमळनेत्रांना, आपला नातू विश्वासघातकी आहे, हें दाखविण्याचा कलंक असल्या हजारों सिंहास-नांनींहि धुतला जाणार नाहीं. आणि खानसाहेब आपणाला मी आतां ज्यास्त तें काय सांगूं! जनाबाली! सामान्य स्थितींतून आज जे आपण भारतेश्वर अकबरशाहाचे मुख्य वजीर, आवडते मित्र, आणि अमीर-उल्-उमराव झालां आहां, ते स्वतः तुम्हीं इतक्या सगळ्या गोष्टी एकदम विसरून जातां याचें

आश्चर्य वाटतें ! ! ज्या स्वार्थाच्या मागें लागून आपण व हे माझे मामा राजे मानसिंह, मला बंडखोर, आणि विश्वासघातकी बनवूं पहात आहां, त्या स्वार्थाला मी मुळींच महत्त्व देत नाहीं. तो स्वार्थ माझ्या दृष्टीनें अत्यंत तुच्छ आहे—"

खुसरू थोडा वेळ विसावा घेऊन पुन्हां बोलूं लागला, "आपल्या उद्देश-साधनासाठीं मी पितृद्रोही आणि माझ्या प्रिय आजोबाशीं विश्वासघातकी व्हावें, अशी आपली इच्छा आहे; पण मी या दोन्ही गोष्टी करायला तयार नाहीं. वारस हक्काच्या कायदेशीर नियमाप्रमाणें जें विशाल साम्राज्य माझ्या करतलगत होण्यासारखें आहे, त्याच्यासाठीं मी पितृद्रोह आणि आंगावर शहारे आणणारा रक्तपात कशाला करूं बरें महाराज ? या जगांत जर मला कोठें निर्मल स्नेह मिळाला असेल आणि जर कुणाला मी प्रत्यक्ष देवता मानून अत्यंत मान दिला असेल, तर तो दुसऱ्या कुणालाहि नसून दिल्लीश्वर अकबरशाहालाच होय. पण हा अकबरशाहाही जर मला हुकूम करील, कीं, ' माझा वडील मुलगा सेलीम बंडखोर झाला आहे, व तो माझी राजधानी आणि राजभांडार घेण्यासाठीं येत आहे, मला कैद करावा असा त्याचा उद्देश आहे; मी या समग्र हिंदुस्तानचा सम्राट् आहें, तेव्हां, खुसरू! तूं माझें सगळें सैन्य घेऊन तुझ्या बापाविरुद्ध उभा राहा. मी सगळें हिंदुस्तान तुला देतों आणि माझ्या मागून तुला या सिंहासनावर बसविण्याची व्यवस्थाहि करतों. तर मला वाटतें, मी बादशाहाचा हा हुकूम केव्हांहि मानणार नाहीं. इत-केंच नव्हे, तर माझ्या ताब्यांत असलेले सगळे सैन्य आणि पैसा मी बादशा-हाची परवानगी न घेतांहि अगदीं मनांत कांहीं न आणतां आनंदानें जाऊन वडलांच्या स्वाधीन करीन ! "

पुन्हां कांहीं वेळ थांबून खुसरू बोलूं लागला, " राजेसाहेब ! आपणहि मुलाचे बाप आहां. आपला मुलगा जर बंडखोर झाला तर तुमच्या मनाची काय स्थिति होईल सांगा—पाहूं अंबरेश्वर ! पापाचीहि एक ठरविलेली सीमा आहे. कर्तव्यहीनतेची एकादी ठरविलेली मूळपीठिका असेल, त्याप्रमाणें कृतघ्नताहि कांहीं ठरींव मर्यादेपलीकडे जाऊं शकत नाहीं; पण आपण दोघांनाहि राक्षसी महत्त्वाकांक्षेच्या नादीं लागून सगळ्या सीमा पार उल्लंघन केल्यात

आणि एक अत्यंत भयंकर महापाप करायला उद्युक्त झालां आहांत, व मलाहि त्या पापाचा मुख्य वांटेकरी बनवीत आहां ! ! धिक्कार असो आपल्या मुत्सद्देगिरीला ! खानसाहेबांचा तर धिक्कार करावा तितका थोडाच आहे. तुमचा तो स्वार्थ आणि तुमचें तें जीवन यांना शतशः धिःक्कार असोत मामा!!! खुसरू म्हणजे यंत्राचा पुतळा नव्हे ! खुदाच्या कृपेनें त्याला मनुष्यत्व प्राप्त झालें असून त्याचे ज्ञाननेत्र उघडले आहेत. अर्थात त्याला तुह्मीं हवा तसा नाचवूं शकणार नाहीं हें लक्षांत ठेवा !!!"

मनाच्या आवेगा सरशीं जें सुचलें तें बोलून खुसरूनें मानसिंहाचा दिवाणखाना सोडला, आणि खानसाहेब व राजा मानसिंह भग्नमनोरथ होऊन अगदीं एखाद्या मूढाप्रमाणें नुसते एकमेकांच्या तोंडांकडे पाहात राहिले. या त्यांच्या पहाण्याचा अर्थ, 'आम्हीं अद्याप खुसरूला ओळखलें नव्हतें,' असा घेतला तर तो वावगा होणार नाहीं. त्याची मातृपितृभक्ति इतकी उज्ज्वल असेल असें त्यांना पूर्वी अनुमानही झालें नव्हतें. असो.

हृदयांत हजारों विंचू चावल्याप्रमाणें वेदना होत असतां शाहजादा खुसरू झरझर पावलें टाकीत आपल्या विश्रांतिमहालांत आला. त्याच्या तीव्र दुःखाचें शांतवन, तळमळणाऱ्या हृदयाची समजूत, वेदनांचा उपशम, आणि निराशेची आशा जी प्यारीबानू, ती त्या ठिकाणीं असावयाची; पण तीहि तिथें नाहींशी पाहून तो तसाच, रुक्षप्रांतांतून जाणाऱ्या तृषातुर प्रवाशाप्रमाणें, प्रियदर्शनरूपी शीतल जलांच्या आशेनें प्यारीबेगमच्या खास महालाकडे हळूहळू निघाला; पण त्याच्या हृदयांतील ज्वाळा शांत झाल्या नाहींत. निर्जलभूमींतून निघणाऱ्या उष्ण निःश्वासापासून आत्मरक्षण करीत तो मोठ्या आशेनें पुढें सरला; पण त्याला धडाडणाऱ्या अग्निकुंडांत पतंगाप्रमाणें आत्मविसर्जन करावें लागलें ! ! !

# प्रकरण २० वें.

---:*:---

## विरही शहाजादी.

" हे, सुधेचा वर्षाव करणाऱ्या चंद्रा! तुझ्या सगळ्या स्निग्धज्योती माझ्या या ज्वालामय हृदयांत एकदम सोडून दे. असें ऐकलें, तूं स्निग्धत्वाचा आधार, शीतलतेचा आश्रय, आणि अमृताचा सतत वाहाणारा झरा आहेस! ये! प्रसूनसुवासमय स्निग्धमन्दानिला, ये, आणि तुझा तो आंगावर शहारे आणणारा शीतल स्पर्श माझ्या या पेटणाऱ्या हृदयांत मिसळूं दे. सर्व वेद-नांचा नाश करणारी आणि स्निग्ध अशी शांति माझ्या या तळमळणाऱ्या हृदयकंदरांत येऊन राहील का? विजेची ज्वाला माझ्या सर्वांगाला जाळीत आहे. शांतिदेवी, तुझ्या कोमल करस्पर्शानें ती ज्वाला तूं विझवून टाक आणि माझ्या हृदयाला शांतता दे. माझ्या हृदयदेवते ये. माझी आरा-धना आणि ध्यानधारणा केवळ शाहाजादा खुसरू आहे! प्राणेश्वरा! मी आशातूर नेत्रांनीं तुझ्या वाटेकडे पहात आहे. संधी मिळालेली पाहून सैता-नानें माझ्या हृदयांत आपलें आसन ठोकण्याची तयारी चालविली होती; पण नाथ! आपल्या सारख्या देवाची दासी, मी सैतानाची कशी होऊं शकेन? यावं. हृदयेश्वरा! यावं. मला या विरहाग्नींतून मुक्त करायचं असेल तर धावत यावं गडे!! दीनदुनियेला उत्पन्न करणाऱ्या कीर्तिमान खुदा! मला या महत्त्वाकांक्षेंतून मुक्त कर. ऐश्वर्य नको. विलास नको. कांहीं नको. नाथा-ची भेट होऊं दे, आणि मला या दुस्थितींतून मुक्त कर!"

फत्तेपूर शिक्रीच्या राजप्रासादांतील हवाखान्यांत सौधावर एका मोकळ्या जागीं बसून शाहाजादा खुसरूची आवडती बेगम प्यारीबानू वर लिहिल्याप्रमाणें आपल्या मनांतील विरहवेदना अस्पष्ट स्वरानें बोलून प्रकृतिदेवीचें साहाय्य मागत होती. प्यारी, बसलेल्या जागीं, प्रकाशही भरपूर होता.

जवळच असलेल्या कलाकुसरीच्या चौरंगावर स्वर्णाक्षरांनीं लिहिलेलें हाफीजचें काव्य पडलेलें होतें, आणि त्याच्यापासून कांहीं अंतरावर, सुरांत बसविलेली वीणा अनादरामुळें खिन्नतेनें पडलेली दिसत होती. त्या उपवना

खोलीच्या सभोंवार सोन्याच्या फुल्दाणींत मोठ्या खुबीनें बसविलेले अनेक तऱ्हेच्या फुलांचे गुच्छ शोभत होते, आणि त्यांच्या संमिश्रित मधुर सुवासानें ती सगळी जागा दरवळून गेली होती. असो.

वर मेघशून्य नीलाकाशांत षोडशकलांनीं पूर्ण असलेला चंद्र पाहून "हा आपलें विरहदुःख मनांत आणून आपणाला हंसत असावा' असेंहि एक-दोनदां प्यारीला वाटलें. रजतधारांप्रमाणें स्वच्छ असलेला चंद्रप्रकाश नजी-कच्या पर्वतशिखरांवर, प्रस्तरमय हिरण्मिनारच्या गच्चीवर, स्निग्धसलिल-जलानें युक्त अशा क्षुद्र गिरिनदीच्या लहरींवर इत्यादि ठिकाणीं पडून रजनीसौंदर्याला नयनाभिराम करण्यांत आपलें स्वर्गीय कौशल्य खर्च करीत होता; पण प्यारीच्या हृदयाचें कांहीं त्याच्यानें समाधान करवलें नाहीं.

प्यारीनें पाहिलें, स्निग्धमलयानिलानें, सुगंधी प्रसूनस्वरानें आणि रजत-शुभ्र अशा चंद्राच्या स्निग्ध अमृतवर्षावानें कांहीं आपल्या तळमळणाऱ्या हृद-यांतील ज्वाला शांत होत नाहींत. कांहीं वेळानें तिनें आपला आवडत्या हाफीजचें काव्य हातांत घेऊन त्याचीं पानें उलटण्याला सुरवात केली, व ती त्यांतील कविता मनापासून वाचूंहि लागली; पण तिला त्यांत फार वेळ मनाला रमवितां येईना. लागलीच तिनें हाफीजला बाजूला ठेवून वीणा उचलली आणि तिचे सूर वाज-विण्याला तिनें सुरवात केली; पण तिच्या कोमल अंगुलीच्या त्या वीणेंतून मधुर सुराऐवजीं बेसूरच येऊं लागले.

लागलीच प्यारीनें वीणेला दूर सारलें आणि एक दीर्घ सुस्कारा सोडून आपणाशींच बोलण्याला सुरवात केली, "हाय! मीं कां बरं असं निष्ठुर काम करून बसलें? हिंदुचारणींच्या भविष्यवाणीवर विश्वासून माझ्या प्रिय-कराच्या कोमल मनांत मीं राक्षसी महत्वाकांक्षेचें बीज रोवण्याचा प्रयत्न करून त्यांना कां बरें अस्वस्थ केलें? माझे हृदयेश्वर, मला सोडून एक क्षण-भरहि कुठें राहूं शकत नसत; पण आतां पद्मानें तों माझी संगती सोडून दूर राहिल्यानेंच त्यांच्या मनाला विशेष समाधान वाटूं लागलें आहे. हाय! त्या घातक चारणींची भेट घ्यायला मी कां बरें गेलें? तें साम्राज्य सिंहासन अत्यं-त खोल अशा पाण्यांत बुडून का जाईना. सुखाचा नाश करणारें सिंहासन पाहिजेच कशाला? माझ्या प्राणेश्वराच्या मनाला शांति आणि सुख ज्या योगानें मिळेल तें मला पाहिजे. खुदानें कृपाळू होऊन मला जें दिलें तें मेहे-

नतीनें सांभाळावयाचें सोडून मी दुसरीकडे पहात राहिलें आणि आकाशाच्या फुलाला हात पोंचविण्याची इच्छा केली त्याचें मला आज योग्य प्रायश्चित्त मिळत आहे ! ! हाय ! छेपण खुदा, नाहीं आतां माझ्यानें या विरहवेदना सहन करवत ? "

प्यारीनें कांहीं वेळापूर्वी अमिरेला खुसरूच्या शोधासाठीं पाठविलें होतें; पण अमिरा सगळे महाल शोधूनहि खुसरूला पाहूं शकली नाहीं. बरोबरच आहे, तो तिला कसा दिसणार ? कारण त्यावेळीं तो मानसिंह आणि अजीमखान यांच्या तावडींत सांपडलेला होता. खुसरूचा शोध लागत नाहीं असें रडगाणें गात अमिरा प्यारीकडे आली, तेव्हां प्यारीनें तिचें कांहीं ऐकून न घेतां तिला पुन्हां आपल्या प्राणेश्वराच्या शोधाकरितां पाठविलें. लागलींच अमिरा पुन्हां खुसरूच्या शोधाला बाहेर पडली, तोंच तिला मोठ्या दरवाजाच्या बाहेरील आंगणांत कांहीं अंतरावर कोणी एक मनुष्य दगडीखांबाला टेकून मोकळ्या आकाशाकडे वर पहात असलेला तिला आढळून आला.

तिच्या मनांत कांहीं संशय येऊन ती घाईघाईनें पुढें झाली आणि तिनें विस्मयानें निरखून पाहिलें, तों एका लाल रंगाच्या गोल खांबाला टेकून नक्षत्रखचित व चंद्रप्रकाशविभासित अशा विशाल आकाशाकडे पहात विचार करीत उभा असलेला शाहाजादा खुसरू तिला दिसला.

लागलीच अमिरेनें बोलण्याला सुरवात केली,"शहाजादेसाहेब ! दासीची तसलीम स्वीकारण्याची कृपा करावी. "

खुसरूची विचारशृंखला तुटली आणि तो चमकून इकडे तिकडे पाहूं लागला, तों 'आपल्यापासून कांहीं अंतरावर अमिरा उभी आहे,' असें त्याला आढळून आलें. नंतर त्यानें एक दीर्घ निःश्वास सोडून विचारलें, " कोणत्या हेतूनें तूं इतक्या रात्रीं येथें आलीस अमिरा ? "

" शाहाजादीबेगमनें आपणाला सलाम सांगितला आहे. "

" मध्यरात्र होऊन गेली आहे, अजूनही तुझी बेगम झोंपली नाहीं काय ? कां बरं ! "

" कां, तें या दासीला कसें समजणार ! पण आपण तरी अजून कां बरं झोंपलां नाहीं जनाबअली ! "

खुसरू, प्यारीबानूच्याच महालांत येत होता, पण अंगणांत येतांच कोणतासा विचार त्याच्या मनांत येऊन तो पुढें सरला नाहीं. त्याला त्याच्या अन्तःकरणांतून कोणीतरी सांगत होतें, 'जाऊं नकोस खुसरू! त्या मायाविनी प्यारीकडे जाऊं नकोस. कारण तिनेंच तुझ्या हृद्यांत विषाचा प्रवाह सोडून देण्याचें नीच काम केलें आहे. ती आतां पूर्वीची शांतिमयी देवी राहिली नाहीं. ती स्वतः महत्वाकांक्षेच्या विषाच्या ज्वालांनीं तळमळत असून आपल्याप्रमाणेंच तुलाही ती तळमळत ठेवील—यासाठीं तिकडे जाऊं नको—''

आणि यामुळेंच खुसरू प्यारीच्या महालांत न जातां त्या खांबाला टेकून गत गोष्टींचा विचार करीत उभा होता. त्याला आतां वाटत होतें कीं, खरें सुख हें निर्जनतेंत व जनपदापासून दूर राहण्यांतच आहे. प्रेमळ प्रकृतीदेवीच्या आश्रयाला जाऊन राहाण्यांतच खरी मौज आहे. चंद्राचे शीतल किरण, पक्ष्यांचें मधुर गायन, आणि निर्झरिणीचे कलकल तानयुक्त आलाप यांत जो आनंद आहे तो दुसरा कशांतही नाहीं. आकांक्षा आणि प्रवृत्ति यांचें दमन करून कर्तव्य पालन करण्यांतच खरें सौख्य आहे—याच विचारमालिकेच्या वेळीं अमिरा आली आणि तिनें ती माला तोडून टाकली. खुसरू पुन्हां दृश्य जगांत आला आणि त्याचे त्या दृष्टीनें विचार सुरू झाले.

अमिरेच्या प्रश्नाला कांहीं उत्तर न देतां खिन्न चेहेऱ्यानें तो तिच्या मागून चालला. तुफानानें संतप्त झालेल्या नदीच्या संगमस्थलीं लहानशा सुक्या लांकडाच्या तुकड्याची ज्याप्रमाणें एक प्रकारची विलक्षण चंचल स्थिती होते, त्याप्रमाणें आपल्या विचारांची दिशा एक असतां दुसरीकडेसच आपणाला जावें लागत आहे, असें मनाला वाटणाऱ्या खुसरूची स्थिती यावेळीं झाली होती. त्याला स्वतःची गतीच राहिली नव्हती म्हटलें तरी चालेल. आणि दुर्बल मनाच्या पुरुषाची स्थिति नेहेमीं अशीच होत असते. याच स्थितींत खुसरू विचार करूं लागला, ''प्यारेचा महाल म्हणजे वसन्तकालांतील भ्रमरगुंजमय निकुञ्जकानन च असणार! त्या ठिकाणीं वीणेचा आणि बांसरीचा किती मधुर आवाज निघत असेल! आणि त्या मिश्रसुरानें तो सगळा महाल पऱ्यांचें निवासस्थान बनून गेला असेल. त्या ठिकाणीं किती प्रकारचे सुंदर प्रकाश आणि किती सुवासीक फुलांचे गुच्छ असतील याचा अंदाजच करतां येणार नाहीं. त्या ठिकाणीं हावभावांनीं युक्त अशा मृदुनृत्याचा

मधुर आवाज घुमत असेल. त्याठिकाणीं नेहेमींच चंद्राचा प्रकाश असतो म्हटलें तरी चालेल. माझी जीवनानन्ददायिनी प्यारी महालांत असली म्हणजे तो महाल मला स्वर्णज्योतिर्मय बेहेस्ताप्रमाणें वाटत असतो; पण हाय! गेलें. तें सर्व नाहींसें झालें. आज तें सगळें सौंदर्य निघून गेलें. आज तें आनन्द-वन स्मशानांतील दुर्गन्धीमय वातावरणानें पूर्ण झालें आहे. खुदा! कां बरें अशी स्थिति झाली? कोणत्या अपराधाचें बरें हें प्रायश्चित्त!"--

या सगळ्या गोष्टींचा मनापासून विचार करीत करीत खुसरू प्यारी-बानूच्या महालाजवळ आला आणि 'प्यारी' अशा मधुरस्वरानें त्यानें आपल्या प्रियकरणीला हांक मारली.

प्यारी लागलीच घाईघाईनें उठून बाहेर आली आणि खुसरूच्या पायांशीं बसून आर्द्रनेत्रांनीं व खिन्न चेहेऱ्यानें म्हणाली, "नाथ! मला क्षमा करायची गडे! मी अत्यंत तीव्रवेदनांनीं तळमळत आहें. आपल्या चेहे-ऱ्यावर हास्य दिसत नाहीं, हृदयांत आनंद नाहीं, मला मनापासूनच्या प्रेमानें हाक मारणं नाहीं, आणि आपल्या नेत्रांसभोंवार एक प्रकारचं कृष्ण वलय दिसत आहे. हृदयेश्वरा! मला हें आतां सहन होत नाहीं. मला क्षमा करून प्रेमानें हृदयाशीं घ्यायची; आणि पूर्वीप्रमाणं मोठ्या आदरानं आणि प्रेमानं 'मेरे प्यारे' असं म्हणून चुम्बन घ्यायचं गडे!! ज्यांचं राज्य, आणि ज्यांचं सिंहासन तें ते घेवोत. आम्हांला त्यांची जरूरी नाहीं. दुसऱ्याच्या वस्तूवर लक्ष ठेवून आम्हीं उगाच कां तळमळावं! आपण सुखी आणि आनंदी असल्यावर मला कांहीं कमी नाहीं. चलावं आम्हीं दोघेहि बादशाहाकडे जाऊं आणि एक लहानशी जहागीर मागून घेऊं, आणि दख्खनमध्यें किंवा बंगाल्यांत निघून जाऊं; आणि तसं झाल्यावांचून आम्हांला शांति मिळणार नाहीं. नाथ! मीं म्हणतें हें खरं ना!"

प्यारीच्या कमलासारख्या नेत्रांतून वाहात असलेले ते अश्रू पाहून खुसरूनें अत्यंत आदरानें व प्रेमानें तिला आपल्याजवळ घेतलें, आणि पश्चा-त्तापपूर्ण हृदयानें आपल्या रेशमीवस्त्रानें त्यानें तिचे डोळे पुसले. नंतर तिला एका मखमलीच्या कोचावर बसवून तोंडावर हात फिरवीत प्रेमानें म्हटलें, "प्यारी! आतां तूं जें बोलत आहेस, तें इतके दिवस कां बरें नाहीं बोललीस!"

प्यारी, आपल्या प्राणेश्वराच्या तोंडाकडे पहात पश्चात्तापपूर्ण स्वरानें म्हणाली, " कां बोलल्यें नाहीं, तें मला सुद्धां कळत नाहीं. चारणीची भेट झाली त्या दिवसापासून–मला आतां वाटतें कीं,–माझ्या हृदयांत सैतानानें प्रवेश केला होता, आणि त्याच्याशीं या घटकेपर्यंत युद्ध करून मीं त्याचा आतां अगदीं पराभव करून टाकला आहे. अर्थात मीं आतां मोकळी झाल्यें नाथ! माझ्या या अपराधाबद्दल मला क्षमा नाहीं का मिळणार! "

खुसरूनें हास्यपूर्वक प्यारीचें चुम्बन घेत म्हटलें, " माझ्या प्राणा, ही तुझ्या अपराधाची क्षमा बरं का!! तूं माझा अपराध करशील, हें कधीं तरी संभवनीय आहे का? मीं आज बराच वेळ विचार करून एक उद्देश ठरविला आहे. आणि जर त्या उद्देशाप्रमाणें कार्य होऊं शकलें; तर अजीमखान आणि मानसिंह यांच्या कठोरशक्तिरूपी नागपाशांतून मी मुक्त होऊं शकेन. त्यांनीं मला आपल्या गूढमंत्रानें अगदीं मुग्ध करून सोडलें आहे. मला असें वाटतें, इतक्यांतच आपण योग्य संधी पाहून अजोबाकडे आग्र्याला निघून जावें. तिथें गेल्यावर आपणाला कोणतीही भीति नाहीं!"

प्यारीनें स्मित हास्यपूर्वक उत्तर दिलें, " आपला विचार उत्तम आहे. तसंच आपण करूं. मीहि थोड्या वेळापूर्वी हाच विचार करीत होतें. खुदा आपलें कल्याण करो.

यावेळीं खरोखरच प्यारीला आनंद झाला, आणि तिच्या हृदयावरचा भार बराचसा कमी झाला. इतकेंच नव्हे, तर तिला पुन्हां सगळें जग सुखमय दिसूं लागलें.

मानसिंह आणि अजीमखान यांनीं आपल्या स्वार्थी मंत्रबलानें रचलेली इमारत अशारीतीनें पत्त्यांचा राजवाडा ठरून प्यारीनें केवळ अंगुलिस्पर्शानें तो अकस्मात कोसळून टाकला. अर्थात त्या दोघांचीहि मेहेनत व्यर्थ गेली हें सांगावयास नकोच.

---

# प्रकरण २१ वें.

—:०:—

## प्रेमळ पिता पण विक्षिप्त पुत्र.

आम्हीं आतां थोडावेळ, कादंबरीलेखन बाजूला ठेवून वाचकांना थोडासा इतिहास सांगण्याचा प्रयत्न करतों.त्यावरून वाचक बंधुभगिनींना कित्येक न समजलेल्या ऐतिहासिक गोष्टी त्यांच्या मूळ कारणांसह समजून पुढें लिहिणार असलेली कादंबरी समजण्याला अडचण पडणार नाहीं. कारण तत्कालिन इतिहास आमच्या कादंबरीवाचकांना समजणें इष्ट आहे.

विधिलिपी इतकी कांहीं वैचित्र्यमय आहे कीं, अकबर शहाचें लहानपण आणि वृद्धपण सारखेंच फार त्रासांत आणि दुःखांत गेलें. विशेषतः त्याच्या शेवटच्या जीवनांत घडलेल्या शोचनीय गोष्टींनीं त्यांचा फारच मर्मभेद केला, आणि त्यापासून त्याला ते दिवस अत्यंत दुःखांत व त्रासांत काढावे लागले. त्याला कसकसा त्रास होत गेला हें पुढें क्रमशः वाचकांना समजणारच आहे. तेव्हां त्याबद्दल तेथें विशेष कांहीं लिहीत नाहीं.

आमचें नीतिशास्त्र सांगतें, कीं, तारुण्य,ऐश्वर्य,प्रभुत्व आणि अविवेकता हीं चार एकत्र झालीं म्हणजे फारच अनर्थ होतात. अकबरशहाचा पुढचा वारस सुलतान सेलीम याच्यांत या चारीहि अनर्थकारक गुणांचें एकीकरण झालेलें होतें. बापाची अत्यंत माया, नेहमीं सुखविलासांत तन्मयता, अतिरिक्तप्रमाणानें मद्य आणि अफू यांचें सेवन, आणि यावर कळस म्हणजे आपमतलबी आणि दुष्ट मित्राची संगत या सगळ्या सवलतीच्या प्रकारांमुळें सुलतान सेलीमचा मेंदू अगदीं बिघडून गेला आणि त्याच्यांत आचार विचार स्वातंत्र्य व विवेक यांना बिलकुल थारा मिळेनासा झाला.

अकबरशहाच्या चालू राजकारणांतील चार माणसांना सेलीम आपले घातक शत्रु मानीत असे. यांत, राजा मानसिंह आणि अबूल फजल हे मुख्य होते. हे सेलिमाकडे उपेक्षापूर्ण दृष्टीनें पहात असत. सुयोग मिळाल्यास दोघेहि अकबरशहाला हिताचा सल्ला म्हणून असें समजावून देत. कीं, ' सेलीमाची सध्यांची चालचालणूक ही, हिंदुस्तानच्या भावी सम्राटाची योग्यता राखणारी नाहीं. ' सम्राट सगळें कांहीं समजे, त्याला सगळें कांहीं माहीत होतें; पण

आपला लाडका मुलगा सेलीम, याला तो कोणत्याही प्रकारें कठोर शासन करायला तयार होत नसे.

राजा मानसिंहानें बादशहाला अनेकवेळा आपला सल्ला दिला होता कीं, " सुलतान सेलीम याला, बंगाल आणि ओरिसा या प्रांतांचा जबाबदारीनें पूर्ण असलेला राजकारभार देऊन त्याला तिकडे पाठवून द्या, म्हणजे बंडखोर पठाणांच्या कार्यक्षेत्रांत गेल्यानंतर तो महत्वाच्या कामकाजांत गढून जाईल आणि तसें झालें म्हणजे त्याच्या एकंदर वर्तनांतहि फरक पडेल;" पण मानसिंहाच्या या योग्य सल्लेचा अकबरशाहानें निराळाच अर्थ केला. तो मनांत संशयितपणानें म्हणाला, " मानसिंह, आबुल फजल आणि अजीजखान हे तिघेहि सेलीमला चांगल्या दृष्टीनें पहात नसावेत, आणि म्हणूनच हा असा सल्ला त्यांच्या तोंडून निघाला असावा. " बादशाहाला असें वाटण्याला कारण होतें. शाहाजादा खुसरूवर या तिघांचेंहि अत्यंत प्रेम असून ते सेलिमच्या विरुद्ध कोणतीहि गोष्ट बोलतांना खुसरूच्या कर्तृत्वाचें फारच गौरवपूर्ण वर्णन करीत असत, आणि यामुळेंच बादशहा संशयित होऊन सेलिमला इतक्या दूर बंगाल्यांत पाठविण्याला तयार होत नसे; शिवाय या तिघा मित्रांची बादशाहाला मिळणारी ही सल्ला सेलिमच्या कानीं योग्यवेळीं जात असे हें सांगायला नकोच.

मानसिंहाचा अधिकार जो एवढा मोठा वाढला होता तो अकबरशाहामुळेंच; पण दुसऱ्या बाजूनें विचार केल्यास, महाप्रतापी मानसिंह नसता तर अकबरशाहाला एवढ्या मोठ्या राज्याचा अधिपतीहि होतां आलें नसतें. मानसिंहाचें सामर्थ्य, धाडस आणि चातुर्य हीं तीन्ही अकबरशाहा जाणून होता. तसेंच राजा मानसिंह हा सुलतान सेलिमचा अति निकटचा आप्त असून सगळ्या भारतवर्षाचा मुख्य सेनापती होता; पण सेलिम आणि मानसिंह यांच्यात मानसिक वैर आहे हें अकबरशाहा विसरला नव्हता, आणि म्हणून बादशाहानें, बंगाल्यांत पठाणाचें बंड होतांच तें मोडण्यासाठीं मानसिंहाची मोठ्या गौरवानें तिकडे योजना केली. तसेंच आपण दख्खनवर विजय मिळविण्यासाठीं जातांना त्यानें सेलिमला अजमीरचा सुभेदार नेमून रजपु- [illegible] [illegible] [illegible]धिपत्य करण्याची आज्ञा केली. एवंच अशाप्रकारें मोठ्या

कौशल्यानें मानसिंहाचें कुब्जकारस्थान मोडून बादशाहानें आपल्या मनाप्रमाणें सर्व व्यवस्था करून टाकली.

१ मनुष्य हा नेहमींच चुकीला पात्र आहे. कळून न कळून केव्हांना केव्हां तरी त्याच्या हातून चूक होतेच. मग तो सम्राट् असो, वा दुसरा कोणीहि असो. अकबरशाहानें सेलिमला बंगल्यांत न पाठवितां अजमीरचा राज्यकारभार त्याच्या स्वाधीन करण्यांत मोठीच चूक केली. बादशाहानें विचार केला होता, ' महाराणा प्रताप, याचा वारस राणा अमरसिंह याला आपल्या ताब्यांत आणला, कीं, त्या भानगडींत सेलिमाचें रणकौशल्य दिसून येईल, कष्ट कसे सहन करावे, हेंहि त्याला कळेल आणि वेळ न मिळाल्यामुळें विलासांतूनहि त्यांचें मन बाजूला सरेल. शिवाय त्यांतच विजयगौरवाची भर पडेलच. समरकुशल आणि जिंकण्याला कठिण अशा रजपुतांना उध्वस्त करण्यांत मिळणारी कीर्ति आपल्या सेलीमानें मिळवावी यासाठीं बादशाहानें ही व्यवस्था केली होती; पण त्याची ही भ्रांतिमूलक आशा समूळ नष्ट झाली. बादशाहानें भविष्य ठरविण्यांत एक मोठी चूक केली ती हीच.

२ बापाची आज्ञा उल्लंघन करावयाची नाहीं म्हणूनच सेलीम आपल्या इच्छेविरुद्ध अजमीरला आला. अरवली पर्वताचीं आवडतीं मुलें जे सामर्थ्यवान् रजपुतवीर-त्यांच्याशीं युद्ध करणें म्हणजे अग्नीशींच खेळ करण्यासारखें होय. हा तेजस्वी आणि फार प्राचीन काळापासून आपल्या सामर्थ्यानें धुमसत असलेला अग्नी नाहींसा करण्याची आशा धरणें फारच कष्टकारक कार्य होय. रजपुतांच्यांतील भयंकर समरयज्ञाचा शेवट करणें असल्यास, बराच काळ, पुष्कळ पैसा आणि कष्ट सहन करण्याचें सामर्थ्य अवश्य पाहिजे हें, त्यांच्याशीं युद्ध करणाऱ्यानें केव्हांहि विसरतां कामा नये-या सगळ्या गोष्टी मनांत आणूनच सेलीमनें बापाकडे हट्ट धरला, कीं, मला इथें अजमीरला राहायचें म्हणजे आणखी पैसा आणि सैन्य यांची फार आवश्यकता आहे. ' सम्राट्नें मुलाची ही प्रार्थना आनंदानें पूर्ण केली. अपरिमित सैन्याचा अधिनायक झाल्यामुळें सेलीम फारच सामर्थ्यसंपन्न झाला. सेलीमसंबंधानें अकबरशाहाची झालेली ही दुसरी चूक होय.

' दुष्ट सल्लामसलत देणाऱ्या त्याच्या आपमतलबी पारिपार्श्वकांनीं या वेळीं सेलिमच्या मनांत बंडाची कल्पना अंकुरित करण्याला सुरवात केली. त्यांनीं

त्याला समजावून दिलें, कीं, 'साम्राज्याचें बहुतेक सैन्य सध्यां विभागलें असून तें बंगाल्यांत व दख्खनमध्यें आपापली कामगिरी बजावीत आहे. अर्थात थोड्याशा प्रयत्नांनीं तुम्हांला हिंदुस्तानचा निदान अर्धा भाग तरी या वेळीं बापाच्या हातून काढून घेतां येण्यासारखा आहे व तुम्ही काढून घेऊं शकालहि. त्यांची ही कृष्णकल्पना सेलीमलाहि आवडली. आणि याच अशुभमुहूर्तावर हा बंडाचा विषवृक्ष वाढीला लागला. या वेळीं सम्राट् अकबरशाहा फार लांब दख्खनमध्यें घनघोर युद्धांत गढून गेलेला होता.

विचार ठरतांच, निष्कारण कालक्षय करावयाचा नाहीं असें ठरवून सुलतान सेलीम अजमीर सोडून आग्रा शहराकडे झपाट्यानें निघाला. बादशाहा राजधानींत नाहीं हा सुयोग लक्षांत आणून आग्र्याचें राजभांडार ताब्यांत घ्यावें हा त्याच्या मनांतील मुख्य हेतु होता; पण त्याचा तो हेतु फुकट केला. आग्र्याच्या किल्ल्यांत त्या वेळीं आफाट सैन्य जय्यत तयार होतें, आणि अकबरशाहानें एका योग्य अधिकाऱ्याला राजकोषाचें आणि शहराचें संरक्षण करण्याला निक्षून सांगितलें होतें. अर्थात् तो अधिकारी कोणत्याही प्रसंगाला तयार होताच. तरी पण सुलतान सेलीमनें आपल्या सैन्यासह यमुना ओलांडलीच.

सुलतान सेलीम सैन्यासह येत आहे हें ऐकून दुर्गाधिपती कुलीजखान किल्ल्यांतून बाहेर आला आणि त्यानें सेलिमचा योग्य तो सत्कार केला. शिवाय त्यानें त्याला समजाविलें कीं, आग्र्याच्या राजभांडारांत एवढ्या मोठ्या सैन्याचा नाश करून मिळण्यासारखें असें कांहींच नाहीं. जर आपल्याला सामर्थ्यसंचय आणि द्रव्यसंचय करावयाचा असेल तर आपण अलाहाबादचा किल्ला आपल्या ताब्यांत घ्या. शिवाय बहार आणि अयोध्या हे दोन्ही प्रांत सध्यां कुणाच्याहि संरक्षणाखालीं नसल्यामुळें ते आपणाला सहज हाताखालीं घालतां येतील. याच वेळीं सम्राट्कडून बातमी आली आहे कीं, 'दख्खनमध्यें मी पूर्ण विजयी झालों असून असंख्य सैन्यासह आग्र्याला येत आहें.' अर्थात् यावेळीं आपण शत्रुरूपानें येथें राहाणें धोक्याचें आहे, हें सेलिमला सांगणें नकोच."

दुर्गाधिपति कुलीजखान याला सेलीम चांगलाच ओळखीत असे, व त्याचें सामर्थ्यहि त्याला माहीत होतें. इतकेंच नव्हे, तर तो त्याला मित्र

मानीत असे. अर्थात् त्याचा हा सल्ला योग्य आहे असें मानून सेलीमनें अलाहाबादकडे आपला मोर्चा फिरविला. अयोध्या आणि बहार हे दोन्ही प्रांत यावेळीं अनायासें त्याच्या ताब्यांत आले आणि अलाहाबादच्या किल्ल्यावर त्यानें आपल्या नांवाचें निशाणहि फडकाविलें. इतकेंच नव्हे, तर स्वतःच्या नांवाचीं नाणीं पाडून त्यांपैकीं कांहीं नाणीं दुष्टपणानें त्यानें बादशाहाला नजर म्हणून पाठवून दिलीं.

याच वेळीं दख्खनमध्यें विजयी झालेला बादशाहा, आपलें विजयी निशाण फडकावीत आग्र्याच्या रोखानें येत होता. सेलीमच्या नांवाचीं त्यांना पाठविलेलीं नाणीं रस्त्यांतच त्यांना मिळालीं आणि याच वेळीं आपल्या अकृतज्ञ मुलानें केलेल्या बंडाची बातमी बादशाहाला समजली.

ही सगळी अंदाधुंदी पहातांच सम्राट् रागानें उसळून गेला. एका हिंदुस्तानांत दोन सम्राट् असूं शकणार नाहींत, असा निश्चय करून बादशाहानें ससैन्य अलाहाबादला जाण्याचें ठरविलें खरें; पण त्याच्या हृदयांत पुन्हां पुत्रस्नेहानें खळबळ उडविली. लागलीच त्यानें मुलाला तिरस्कारयुक्त पत्र लिहिलें. पत्रांतील मजकूर पुढीलप्रमाणें होता:—' सेलीम तुझें सामर्थ्य तें किती ? तुझा बाप अकबरशाहा हिंदुस्तानचा मालक आहे, मग त्याच्या विरुद्ध तुझें सामर्थ्य कितीसें चालणार ? जें तूं केलेंस तें मी लहान मुलाच्या खेड्या आहेत असें मानतों, आणि म्हणूनच तुझ्या प्रेमळ बापाला हा तुझा अपराध क्षमेला योग्य असा वाटत आहे. हें पत्र वाचतांच तुझ्या दुष्ट व स्वार्थी मित्रांना निरोप दे, आणि विचारपूर्वक आपल्या अविचारी बुद्धीचें संशोधन कर. सेलीम ! मी आणखी किती दिवस राहाणार ? सिंहासन तर तुझेंच आहे. मग असला हा दुष्टपणा कां बरें ? अजूनही माझें स्नेहमय हृदय तुझ्या क्षमापूर्ण आलिंगनासाठीं तयार होऊन राहिलें आहे. माझी म्यानबद्ध तरवार केव्हांहि तुझ्या विरुद्ध मोकळी होऊं शकणार नाहीं. जर तुला आपल्या तिरस्कृत कार्याचा थोडा तरी पश्चात्ताप होत असेल, तुला आपला भ्रम समजून चुकला असेल, तर हें पत्र वाचतांच आग्र्याला निघून ये. विलंब

बापाचें हें पत्र मिळतांच सेलिमला फार पश्चात्ताप झाला, आणि त्याच्या हृदयांत थोडेंसें सात्विक सामर्थ्यहि आलें. त्यानें विचार केला, " कदा-

चित्, उदार हृदयाचे प्रेमळ वडील आणि ज्यांचें हृदय कायमचें करुणामय आहे, असे भारत सम्राट्, मला क्षमा करतील. ते तरी आणखी किती दिवस या दुनियेंत राहाणार ? त्यांच्या देहान्तानंतर हिंदुस्तानचें सिंहासन माझेंच आहे. खरोखर मी फारच हतभागी ! राजकुलांत जन्माला येऊन कलंक आवला ! ! क्षमाशील आणि स्नेहमय बापाविरुद्ध मीं शस्त्र उचलण्याचा प्रयत्न केला, ही माझी केवढी चूक बरें ? या पापांतून मी कधीं तरी मोकळा होईन का ? "

या वेळीं सेलिमाचें स्वार्थपर मित्रमंडळ जवळच होतें. सेलिमाचे हे पश्चात्तापपूर्ण उद्गार त्यांनीं ऐकले व ते थोडेसे चिंतातुर झाले. कारण जोंपर्यंत सेलीम त्यांच्या ताब्यांत राहील तोंपर्यंत त्यांना कशाचीहि कमतरता नसावयाची हें ठरलेलें. सुलतान सेलीमचा तो खिन्न चेहेरा पाहून त्या मित्रांनीं त्याला समजाविण्याला सुरवात केली. ते म्हणाले, " असलें नामर्दपणाचें काम करावयाचें नाहीं हुजुर ! कोणत्याहि राजकीय बंडखोराला अकबरशाहा केव्हांहि क्षमा करीत नसतो. आपण त्यांची भेट घ्यायला गेलां, तर खात्रीनें ते तुम्हांला कैदच करतील. आणि आपला मुलगा खुसरू याला हें हिंदुस्तानचें सिंहासन अचानक मिळेल. जर अगदीं जावेंच असें आपणाला वाटत असेल तर भरपूर सैन्य तरी घेऊन चला. आम्हीं आपल्या सेवकाचे सेवक ! अर्थात् आपल्या धन्याच्या कल्याणाचें जें असेल तें सांगावें हाच आमचा मानस ! तेव्हां आमच्या या सल्ल्याचा आपण विचार कराल अशी आम्ही आशा करतों. "

अव्यवस्थित चित्त आणि खुषामतप्रिय अभिष्ट सुलतान सेलीम, आपल्या मित्रांचीं सल्ला ऐकून मान डोलवूं लागला. त्याला तें भाषण आवडलें. लागलीच त्यानें अलाहाबादहून बरेंचसें सैन्य घेऊन आग्र्याकडे येण्याला सुरवात केली. अगणित सैन्य घेऊन सेलीम आपल्या भेटीला येत आहे, ही बातमी लागलीच सम्राट्ला समजली, व त्यांनीं कालविलंब न करतां लागलीच त्याला पत्र लिहिलें, " अपरिमित सैन्य घेऊन कोणताहि चंगीझवंशीय राजपुत्र आपल्या बापाची भेट घेण्याला आल्याचें कुणालाहि माहीत नाहीं. तेव्हां सामान्य दोन चार शरीररक्षक सैनिक व कांहीं गुलाम यांना बरोबर घेऊन तूं आग्र्याच्या दरबारांत हजर हो, आणि हें जर तुला कठीण वाटत असेल व

अशा रीतीनें वागण्याची तुझी तयारी नसेल तर अलाहाबाद सोडून बाहेर पड-ण्याचें तुला कोणतेंही कारण नाहीं-"

हें बापाचें पत्र मिळतांच सेलीम कांहींसा शुद्धीवर आला, आणि त्यानें शेवटचा मार्गच स्वीकारावयाचा असें ठरविलें, आणि त्याबरोबरच आपल्या उ-द्धटपणाबद्दल पश्चात्तापदर्शक असें एक पत्र त्यानें सम्राटला पाठवून क्षमेची याचना केली.

या शरणरूपी पत्राचा व पश्चात्तापाचा योग्य तोच परिणाम झाला. सम्राट्नें या पत्राचें उत्तर पाठवून त्यांत सेलिमला बंगाल आणि बहार या दोन प्रांतांची सुभेदारी दिली व ती दिल्याबद्दल एक राजकीय सनदही पाठ-विली. अपराधाबद्दल क्षमा, रागाबद्दल प्रेम आणि काराग्रहाबद्दल दोन प्रांतांचें आधिपत्य हें आपल्या बापाचें उदार हृदय पाहून सेलिमला आपल्या कृत्याची लाज वाटली, व कांहीं दिवस बापाचें आणि मुलाचें मीलनही झालें.

पण सेलिमला त्याच्या आपमतलबी मित्रांनीं अद्याप सोडिलें नव्हतें, आणि त्या मित्रवर्गांतील एक बडा मित्र अबूलफजलच्या रोषास पात्र होऊन इकडे आलेला होता. आणि दुर्दैवाची सांगावयाची गोष्ट म्हणजे त्या नीच व कारस्थानी माणसावरच सेलीमचा बराचसा विश्वास होता. त्यानें सेलिमला आपल्या मधुर भाषेनें समजावून दिलें कीं, " मानसिंह लांब बंगाल्यांत बंडें मोडण्याला गेला आहे आणि तो मागें येईल कीं नाहीं हेंहि सांगवत नाहीं. तसेंच तो कांहीं सम्राट्चा मित्र नसून त्याचा हुकुमी सेवक मात्र आहे. पण हा अबूलफजलला वरचेवर मत देत असतो आणि सम्राट्ला त्याची योग्यता फारच मोठी वाटते. तेव्हां त्या अबूलफजलला या जगांतून नाहींसा केल्यास आपलें कार्य होण्याला बरेंच सोपें जाणार आहे. मला अशी बातमी समजली आहे कीं, सम्राट्नें त्याला दखनकडून जलदीनें इकडे बोलविलें आहे, आणि बहुधा तें सिंहासनाचा वारस पुढें कोण नेमावा या बाबतींत सल्ला घेण्यासाठींच असेल. तेव्हां कोणत्या उपायानें तरी अबूलफजलचा खून करणें आपल्या का-र्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. तसेंच तो दखनमधून इकडे येत असतां गुपचुपपणें हें कार्य उरकल्यास आपणाकडे त्याचा कांहींहि संबंध न येतां कोणा तरी वाटमान्यानें त्याला मारलें असेल अशीच लोकवार्ता बोलूं लागेल. "

मित्राचा सल्ला सेलिमाला योग्य वाटला. त्याच्याही मनाची अगदीं खात्री झाली होती कीं, सम्राट्चा मुख्य मित्र हा अबूलफजलच असून तो आपला मुख्य शत्रु आणि भयंकर दुष्मन आहे. खुसरूला सिंहासनावर बसविण्याच्या कारस्थानांतील मुख्य नेता आणि राजा मानसिंहाचा उजवा हात हाच असला पाहिजे. शिवाय अबूलफजल हा मोंगल साम्राज्यांतील एक बडा उमराव व सेनापती असल्यामुळें राज्यांत त्याची योग्यता फारच मोठी आहे. अर्थात् त्याला ठार मारावयाचें म्हणजे फारच सावधपणानें काम केलें पाहिजे. नाहीं तर आयत्या वेळीं सगळेंच कारस्थान बाहेर पडावयाचें.

सैतानानें, सुलतान सेलीमाच्या हृदयांत आसुरी सामर्थ्य उत्पन्न केलें, आणि विवेक, कर्तव्य, धर्म, न्याय सगळें कांहीं विसरून त्यानें आपला आवडता मित्र बुंदेलचा राजा वीरसिंहदेव याच्या साहाय्यानें अबूलफजलला ठार मारण्याचें कार्य उरकलें, आणि योग्य वेळीं त्या स्वामिनिष्ठ अबूलफजलचें तुटकें मस्तक अलाहाबादला येऊन पोंचलेंहि.

आग्र्याच्या राजप्रासादांत, अमीरउमरावांच्या कानीं अबूलफजलच्या शोचनीय मरणाची बातमी पोहोंचतांच ते अत्यंत भिऊन गेले. सम्राट्च्या कानीं ही बातमी जातांच काय परिणाम होईल याचा कुणालाच कांहीं अंदाज करतां येईना, आणि त्यामुळें त्यांचीं हृदयें ज्यास्तच साशंक झालीं.

सम्राट्ला ही भयंकर बातमी कळविण्यासाठीं वजीर आणि अधिकारी उमराववर्ग यांनीं निराळाच एक नवा मार्ग शोधून काढला. मोंगल राजवंशांतील कोणा शाहाजाद्याच्या मृत्यूची बातमी सम्राट्ला कळविण्याचें कारण पडल्यास, त्याच्या वकिलाच्या उजव्या हाताच्या मनगटांत एक रेशमी रुमाल बांधून त्याला सम्राट्कडे पाठवून द्यावयाचा. यावेळींही तसेंच करून अबूल फजलच्या वकिलाला सम्राट्कडे पाठविण्यांत आलें, आणि नित्य नियमाप्रमाणें सम्राट्नें सगळा प्रकार जाणलाहि.

यानंतर बरेच दिवसपर्यंत सम्राट् अकबरशाहा आपल्या प्रियमित्राच्या निधनदुःखाबद्दल शोक करण्यांत गढून गेलेला होता; पण मित्रविरहदुःखानें विव्हळ झालेल्या सम्राट्च्या नेत्रांत केव्हांहि कुणाला अश्रू दिसले नाहींत; कांहीं दिवसांनीं मात्र त्याच्या नेत्रांतून अश्रूंचा प्रवाह वाहतांना कित्येकांनीं स्पष्ट पाहिलें. कारण पुढें पुढें त्यांना तें दुःख आंतल्या आंत मुळींच सहन

करतां येईना. ज्यावेळीं रजपूत आसदखान, हा सम्राट्च्या प्रियमित्राच्या मृत्यूची बातमी आपल्या हृदयभेदक व शोकविव्हल भाषेनें सविस्तररूपानें सांगत होता, त्यावेळीं ती ऐकून अकबरशाहा मनाच्या आवेगासरशीं ओरडून म्हणाला, "हाय ! सेलीम !! सम्राट् होण्याची जर तुझी इतकी प्रबल इच्छा होती, तर माझ्या आवडत्या अबूल फजलला अशा निष्ठुरपणानें ठार न मारतां तूं आपल्या बापाचा खून कां नाहीं केलास ? बापाचा खून केला असतास म्हणजे तुझी आशा फारच लवकर सफल झाली असती !"

अबूलफजलचा अकालीं मृत्यु आणि तोहि खुनानें, या एकाच गोष्टी-बद्दल सम्राट्, सुलतान सेलिमावर फारच रागावला; पण या त्याच्या रागाव-ण्याचा परिणाम अत्यंत भयानक होईल असें पाहून एक मोठ्या उदात्त हृदयाची स्त्री, पितापुत्रांचें हें मनोमालिन्य दूर करण्यासाठीं मध्यें आली. ही दुसरी कोणी नसून सुलताना सेलिमाबेगम होय. ही अकबर शाहाची एक अत्यंत सुंदर व आवडती बेगम होती. सुलतान सेलिमला मातृवियोग झाल्या-नंतर हिलाच त्यानें आपली आई मानली, व ही त्याची आई झाली, आणि पुत्रप्रेमानेंच ही यावेळीं मध्यें आली.

सुलताना सेलिमेच्या दीर्घप्रयत्नांनीं पुन्हां पितापुत्रांचें मीलन झालें. अकबर आपल्या मुलाशीं इतका कांहीं स्नेहपूर्ण व्यवहार करूं लागला कीं, तो पाहून कुणालाहि वाटलें नसतें, कीं, यापुढें या दोघांत मतभेद उत्पन्न होईल ! ! पण ईश्वराची इच्छा !

युद्धकार्यांत गढून गेल्यानें दुष्ट मित्रांच्या तावडींतून सेलीम मोकळा होईल आणि क्रमशः कर्तव्यपरायण होऊं शकेल, असा विचार करून अकबरशा-हानें पुन्हां सुलतान सेलिमाला उदेपूरच्या राण्याविरुद्ध युद्ध करण्याला जाण्याची आज्ञा केली. सुखविलासमग्न सुलतान, यावेळींहि पूर्वीप्रमाणें निरनिराळे अड-थळे आणणारीं कारणें दाखवूं लागल्यामुळें सम्राट्नें त्याला पुन्हां अलाहाबादला जाण्याची परवानगी दिली. सेलीम अलाहाबादला फिरून येतांच तो आतां पूर्ण स्वातंत्र्यानें वागूं लागला. दुष्ट आणि स्वार्थी मित्रांनीं त्याला पुन्हां चहूंकडून वेढलें. पुन्हां शिराजी आणि अफू यांचा पूर्णतेनें उपयोग होऊं लागला, व दिवसेंदिवस सेलिमाचा अधःपात होत होत तो अधोगतीच्या पायऱ्या झपाट्यानें उतरत उतरत खालीं जाऊं लागला; पण अलाहाबादला आल्यानंतर सेलीम काय

करीत आहे हें पाहण्यासाठीं अकबरशहानें एक गुप्त हेर तिथें ठेविला होता, तो, हा एकंदर प्रकार सम्राट्च्या कानवार रोजच्या रोज घालीत होताच.

वार्धक्यानें पिडलेल्या आणि शोकतापानें जर्जर झालेल्या सम्राटनें पाहिलें, कीं, आतां केवळ गोड बोलण्यानें काम भागण्यासारखें नाहीं. स्नेहाच्या आवरणांत जळता राग झांकून ठेविल्यास आपला भावी वारस चांगलाच अधोगतीला पोंचेल. सम्राट्च्या गुप्त हेरानें याच वेळीं त्याला एक गुप्त बातमी आणून पोंचाविली व त्यावरून सम्राट्ला वाटलें कीं, यावेळीं सैन्यासह आपण पुढें होऊन सेलिमला जर भीती दाखविली नाहीं, तर हा हट्टी मुलगा कशानेंहि ताब्यांत येणें शक्य नाहीं.

दुसरा कांहींच उपाय नाहीं असें पाहून सम्राट् अकबरशाहा, आपल्या बेढखोर पुत्राला ताळ्यावर आणण्यासाठीं ससैन्य अलाहाबादकडे निघाला. मोठ्या थोरल्या सैन्यासह यमुना पार होऊन कांहींसा दूर जातो न जातो तोंच सम्राटला बातमी समजली कीं, आपली आई हमिदाबानू अत्यंत आजारी असून ती या दुखण्यांतून उठणें कठीण आहे.

अकबरशाहा अत्यंत मातृभक्त होता. आईला साक्षात् देवी मानून तो तिची पूजा करीत असे. जिच्या स्तनपानानें आज आपण ऐवढे महानुशक्तिमान सम्राट् झालों तिचा शेवटचा वेळ जवळ आला असतांना आपण दूर राहाणें अगदीं अयोग्य ! असा विचार करून जड अन्तःकरणानें अकबरशाहा मागें फिरला आणि आग्रा शहरांत आला; पण पुष्कळ प्रयत्न करूनही तो आपल्या आईला वांचवूं शकला नाहीं. आईच्या शोकानें रडणाऱ्या बालकाप्रमाणें अश्रुविसर्जन करीत करीत मातेच्या पवित्र देहाच्या अखेरच्या संस्कारासाठीं तो मोकळ्या पायांनीं व उघड्या मस्तकानें मृतमातेची पेटी खांद्यावर घेऊन समाधिक्षेत्राकडे—कबरस्थानाकडे—निघाला. असंख्य अमीर उमराव त्याच्याच सारख्या पोषाकानें त्याच्या मागून चाळले होते. मुंग्यांप्रमाणें अगणित सैन्य आग्र्याच्या राजरस्त्यावर दोन रांगांनीं उभें राहून मृतसम्राट्जननीला सन्मान देत होतें. नंतर या सगळ्या मंडळीनें दिल्लींतील हुमायुनाच्या कबरेचा रस्ता धरला व योग्यवेळीं सम्राट्, मातृदेह समाधिस्थ करून आग्र्याच्या राजवाड्यांत आला. सगळ्या राजसभासदांनीं शोकचिन्हें परिधान केलीं होतीं, व रोजचीं दरबारचीं राजकारणें अगदीं बंद ठेवण्यांत आलीं होतीं.

सम्राट्नें तर सगळे सुखविलास, हिऱ्यामोत्यांचे हार आणि अंगाला शोभा आणणाऱ्या इतर वस्तू व व्यवहार यांचा त्याग करून शोकमय हृद्यानें दिवस कंठण्याला सुरवात केली होती. सेलिमाचें बंड, त्याचा हट्टपिणा, व त्याला शिक्षा करण्याचा प्रयत्न सगळें कांहीं सम्राट्च्या मनांतून कांहीं दिवसांसाठीं अदृश्य झालें होतें, असें म्हटलें तरी चालेल.

अकबरशाहाचा बंडखोर मुलगा सेलीम यानें अलाहाबादला आजीच्या मृत्यूची व बापाच्या शोचनीय शोकमय स्थितीची बातमी ऐकली. यावेळीं त्याच्या उद्धटपणाचा मोठा थोरला बांध—अडथळा—अकस्मात् कोसळला—नाहींसा झाला. या प्रबल शोकरूपी तुफानाच्या भयंकर प्रवाहांत, सगळा हट्टीपणा, सगळा असभ्यपणा आणि सैतानाचें प्रछन्न सामर्थ्य, पार वाहून गेलें—मनांतून नाहींसें झालें.कारण सेलिम हा आजीचा फारच आवडता नातू असून सेलिमचेंहि तिच्यावर तसेंच अलोट प्रेम होतें.

नशिबांत जें असेल तें होवो असा विचार करून सुलतान सेलीम आग्ऱ्याला येऊन पोंचला, व बापाची भेट घेऊन आणि त्याचे पाय धरून त्यानें पश्चात्तापपूर्ण अन्तःकरणानें क्षमा मागितली. तसेंच आजीच्या मृत्यूबद्दलही त्यानें पुष्कळ शोक केला, आणि त्यामुळें सेलिमच्या त्या अश्रुप्रवाहांत सम्राट्चा राग, विराग, उपेक्षा सगळें कांहीं वाहून गेलें. आणि विलक्षण योगायोगानें व प्रसंगानें पुन्हां पितापुत्राचें मीलन झालें.

जेव्हां मनुष्याच्या दुःखाचे दिवस येतात, तेव्हां कोणीहि त्याच्या अश्रूंना अडवू शकत नाहीं. असेत् हिमाचलव्यापी हिंदुस्तानचा सम्राट् अकबरशाहा हा त्यावेळीं जगाचा सम्राट् म्हणूनही ओळखला जात असे; पण त्याच्यावरही स्वर्गांत राहणारा या दीनदुनियेचा सर्वशक्तिमान् असा आणखी एक सम्राट् आहे. अकबराच्या यशाचे, आनन्दाचे आणि स्वाभिमानाचे दिवस आतां संपत आले होते. सिंहासनाचा भावी अधिकारी सुलतान सेलीम बापाची अवज्ञा करीत असून, बापाप्रमाणें मानलेला अत्यंत थोर असा मित्र अबूल फजल हा अत्यंत शोचनीय रीतीनें व अकालीं मरण पावला होता, तसेंच दारुण मातृवियोग तर डोळ्यांचें पाणी खळूं देत नव्हता. एकंदरींत अशा प्रकारचे मानसिक उद्वेगाचे दिवस मोठ्या कष्टानें घालवीत असतां बादशहाला, प्रिय पुत्र दानियल याच्या शोचनीय मृत्यूची बातमी समजली.

यावेळीं अकबराचें दुःख पाहून पाषाणही विदीर्ण झाला असता. निर-निराळ्या बाजूंकडून दुःसहनीय शोकाच्या तडाक्यांनीं शाहाचें हृदय अगदीं फुटून जाण्याच्या बेतांत आलें. मुराद् गेला ! दानियल गेला !! आणि आतां राहिला काय तो नेहेमीं त्रास देणारा सेलिम !!! पण या शोकतापामुळें व पुत्रविरहामुळें बादशाहाचें सगळें प्रेम एकटया सेलिमाकडेच वळलें व तो त्याच्यावर अत्यंत प्रेम करूं लागला.

या सगळ्या दुर्भाग्याची सूचना करणाऱ्या गोष्टी घडल्यानंतर असा एक विलक्षण प्रकार घडून आला कीं, ज्याच्या परिणामानें अकबरशाहा कायमचा रोगी बनून व भग्नोत्साह होऊन रुग्ण शय्येवर पडला. आतां तो प्रकार कसकसा घडून आला हें पुढील प्रकरणांत वाचकांना कळून येईल.

---

# प्रकरण २२ वें.

—:०:—

## सेलीमचें पुत्र द्वेषास कारण.

क्रमशः दुर्भाग्याच्या छळानें अकबरशाहाचें मानसिक सामर्थ्य कमी होत चाललें, आणि यासाठींच तो आपल्या शेवटच्या आयुष्यांत अनेक लहरीच्या करमणुकींच्या आधीन होऊन पडला. एके दिवशीं काय त्याच्या मनांत आलें कुणाला ठाऊक, त्यानें हुकूम दिला कीं, " मला हत्तींची लढाई पहावयाची आहे, तेव्हां त्याचीं व्यवस्था करा. शाहाजाद्याचाच हत्ती आज लढला पाहिजे."

हत्ती, वाघ, चित्ते वगैरे पशूंची लढाई लावून ती पाहाणें हा अकबर-शाहाला अगदीं लहानपणापासूनचा शोक. त्यांत त्याला जितका आनंद वाटे तितका दुसरा कशांतही वाटत नसे. कबूतर, पारवे, वगैरेंची गोष्ट सोडून दिली तरी इतिहास सांगतो कीं, अकबरशाहा ऊर्णनाभाची लढाई वरचेवर लावून मौज पहात असे. त्या लढाया पहाण्यांत तो एकाद्या व्यसनी माणसा-प्रमाणें आनंद मानी. असो.

घटनाचक्राच्या प्रेरणेनें म्हणा अथवा अन्य कांहीं कारणानें म्हणा याच संधीला शाहाजादा खुसरू, प्यारी बानूसह आग्ऱ्याला येऊन पोंहोंचला

होता. खुसरूचा लढावयाचा म्हणून एक हत्ती असून त्याचें नांव त्यानें 'अपरूप' असें ठेविलेलें होतें. तत्कालिन इतिहासलेखक लिहितात कीं, या हत्तीचें नांव 'चंचल' असेंहि होतें, आणि सुलतान सेलिमाचाहि एक महापराक्रमी लढाईचा हत्ती होता, त्याचें नांव 'जिरानवार' असें होतें.

अकबरशाहानें शोकाच्या तडाक्यांत सांपडून एक आनंदाची करमणूक म्हणून शोधून काढली, पण यांतही तो एक मोठी चूक करून बसला. शाहाच्या हुकुमाप्रमाणें खुसरू आणि सुलतान सेलीम या दोघांचेहि हत्ती लढण्यासाठीं तयार करण्यांत आले.

ही हत्तींची लढाई म्हणजे एक अत्यंत भयंकर प्रकार होता. अंकुशाघातानें माजलेला हत्ती उन्मत्त होऊन एकदा रागावला, कीं, तो आटोपून धरणें फारच जड जात असे, व ज्या हत्तीचें सामर्थ्य ज्यास्त तो आपल्या प्रतिस्पर्धी हत्तीला ठार केल्यावांचून केव्हांहि शांत होत नसे. हे सगळे समर-कुञ्जर अत्यंत सुशिक्षित असून यांची किंमतही फारच मोठी असे.

हत्तीच्या लढाईचा आणखी एक नियम असा होता, कीं, एक तिसरा हत्ती, या कुञ्जर रणांगणांत सहकारी आणून उभा करून ठेवण्यांत येत असे. जेव्हां दोहोंपैकीं कोणीतरी समरविजयी हत्ती आपल्या पराभूत होणाऱ्या प्रतिस्पर्धी हत्तीला आपल्या शुंडेच्या आघातांनीं विदीर्ण करून ठार मारण्याचा प्रयत्न करूं लागे, तेव्हां हा तिसरा हत्ती त्या दोघांमध्यें पडून ती लढाई संपवीत असे. या लढाईचा निकाल करणाऱ्या हत्तीला 'तबञ्चा' असें नांव देण्यांत आलेलें होतें.

समोर, तटानें वेष्टित असें विस्तृत रणांगण असून त्याच्या उत्तरबाजूकडे संगमरवरी तांबडया व पांढऱ्या दगडाचीं आसनें मंडळीला बसण्यासाठीं उत्तमोत्तम तयार करण्यांत आलेलीं होतीं, व या सगळ्या आसनांवर स्वर्णखचित चंद्रातप होते. योग्य वेळ होतांच एका उच्च व सुशोभित चंद्रातपाच्या खालीं सम्राट् व त्याच्या जवळ लहानगा खुर्रम येऊन बसला. सम्राट्च्या डाव्या उजव्या बाजूला अमीरउमरावांच्या जागा ठरलेल्या होत्या व त्या त्या जागीं येऊन तेहि बसले.

सम्राटनें हुकूम देतांच लढाईला सुरवात झाली. सुलतान सेलिमाचा 'जिरानवार' फारच सामर्थ्यसंपन्न हत्ती असून त्याचा प्रतिस्पर्धी खुसरूचा

' अपरूप ' अथवा ' चंचल ' नामक हत्ती होता हें आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे. जिरान्यारनें मोठ्या जोरानें चंचलवर स्वारी केली. रणोन्मत्त गजराजद्वयाच्या ओरडण्यानें त्या रणांगणांत एक मोठीच गडबड उडून गेली, व आतां कोण विजयी होतो व कुणाचा पराभव होतो हेंच प्रत्येकाला गूढ पडून गेलें. जो तो लक्षपूर्वक लढाई पाहूं लागला.

आपल्या 'अपरूप'ची अवस्था घटकोघटकीं शोचनीय होत आहे हें पाहून खुसरूनें आपला घोडा अपरूपकडे चौखूर फेंकला; पण याच वेळीं सम्राट्नें स्वतःच ' तवञ्चा' हत्ती लढाई थांबविण्यासाठीं सोडला.

महाताच्या खुणेप्रमाणें हा 'तवञ्चा', जिरान्यार व अपरूप यांच्यामध्यें जाऊन त्यांना दूर दूर करण्यासाठीं झपाट्यानें पुढें चालला; पण इतक्यांत सेलिमाच्या लोकांनीं 'तवञ्चा'ला जोराजोरानें दगड मारण्याला सुरवात केली. सेलिमाच्याहि मनांत, आपल्या हत्तीनें विजयी होऊन खुसरूच्या हत्तीचा पराभव करावा असेंच होतें.

अकबरशाहानें आपल्या बसलेल्या जागेवरून हा सगळा प्रकार पाहिला, आणि त्याला या अन्यायमूलक गोष्टीचा फारच राग आला. सगळ्या प्रकारच्या लढायांचे परंपरागत चालत आलेले असे कांहीं न मोडतां येणारे नियम असतात. तसेच या हत्तींच्या लढाईबद्दलवेहि नियम होते. सेलिमाच्या लोकांनीं तवञ्चाला दगड फेंकून मारणें हें बेकायदेशीर काम होतें. सम्राट्, आपल्याजवळ बसलेल्या शाहाजादा खुर्रमला म्हणाला, " बाळ ! तूं खालीं उतरून जा, आणि तुझ्या बापाला जाऊन सांग कीं, तुम्ही नियमाविरुद्ध काम करीत आहां ! " खुर्रम, सम्राट्च्या आदेशाप्रमाणें रणांगणांत येऊन घोड्यावर बसलेल्या आपल्या बापला म्हणाला, "अशा प्रकारें तुमच्या लोकांनीं 'तवञ्चा'ला दगड फेंकून मारल्यामुळें सम्राट् फार रागावले आहेत. " हें ऐकून सेलिमनें आपल्या मुलाला म्हटलें, "सम्राट्ला जाऊन सांग कीं, मीं माझ्या लोकांना अशा प्रकारचा कोणताही हुकूम दिलेला नाहीं. खुसरूच्या नोकरांनींच दगड फेंकून ही सगळी गडबड उडविली आहे. "

अजूनही रणोन्मत्त हस्तिद्वय, आपल्या रक्तानें भरलेल्या देहानें एकमेकांवर जोराजोरानें चाल करून जातच होते; 'तवञ्चा'चे प्रयत्न व्यर्थ झालेले पाहून, दोघांच्या मध्यें मोठा जाळ करण्यांत आला व दोन्ही जनावरांना वेग-

वेगळें करण्याची व्यवस्था करण्यांत आली; पण याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं व तवञ्चासह अपरूप हत्तीनें, त्याच्या रक्तानें भरलेल्या देहाला त्या अग्नीच्या ज्वाला असह्य झाल्यामुळें यमुनेच्या शीतल जलांत एकदम उडी घेतली.

तारुण्यानें उन्मत्त झालेला खुसरू, आपल्या शिकलेल्या युद्धाच्या हत्तीची ती शोचनीय स्थिति पाहून त्या उघड्या रणांगणांत सर्वांसमक्ष आपल्या बापाशीं अगदीं रुक्ष मर्षित मोठमोठ्यानें भांडूं लागला. वर आसनावर बसलेल्या अकबरशाहानें हें भांडण स्पष्टपणें आपल्या कानांनीं ऐकलें आणि रागानें आपली जागा सोडून तो तेथून झपाट्यानें निघून गेला, या हत्तींच्या लढाईचा परिणाम, अशा रीतीनें गृहकलहाची वाढ करण्याला कारणीभूत झाला. आतां यापुढें काय होणार, हें ईश्वरालाच माहीत ! !

---

# प्रकरण २३ वें.

---:*:---

## सतीचे शाप त्याचा उच्छेद करितील !

विविध वैचित्र्यमय अशा अनेक गोष्टी घडत गेल्यामुळें आम्हांला अजूनपर्यंत पौर्णिमा आणि दुर्जयसिंह यांच्याबद्दल कांहींच माहिती लिहितां आली नाहीं. तेव्हां आधीं आतां त्या दोघांकडे प्रथम वळून नंतर इतर गोष्टींकडे आपण लक्ष देऊं.

मानसिंहानें, दुर्जयसिंहाच्या कारागृहमुक्तीबद्दलची सगळी व्यवस्था केली होती खरी; पण दोन महिने होऊन गेले तरी त्याला सोडून देण्याबद्दलची कांहींच तजवीज झाली नाहीं, आणि नंतर तर अकस्मात् मानसिंहहि आग्र्यास निघून गेला, अर्थात् पौर्णिमाहि त्याला कांहीं विचारूं शकली नाहीं. कारण विचारण्यास तिला तितका वेळच मिळाला नाहीं.

सुखाच्या आशेनेंच जगांतील प्रत्येक मनुष्य जगत असतो व दिवस मोजीत मोजीत असलेली वाईट स्थिति आणि दुःख सहन करतो; पण किती लोकांची आशा अशा रीतीनें पूर्ण होत असेल बरें ? दुर्जयसिंह लवकरच कैदेतून सुटेल या आशेनें पौर्णिमा एकेक दिवस घालवीत होती व मधून मधून त्याला ती

भेटतही असे. तसेंच ती रोज संध्याकाळीं आरती नंतर, मानसिंहानें नवीनें स्थापन केलेल्या कालिकामंदिरांत जाऊन व भवानीसमोर बसून अश्रुपूर्ण नेत्रांनीं आणि आर्द्रस्वरानें म्हणे, " माते ! मला आणखी तूं असें किती दुःख देणार ? माझी आशा लवकर पूर्ण कर. मला आतां रडवत नाहीं, विचार करवत नाहीं आणि दीर्घ सुस्कारेहि सोडवत नाहींत. आई! मला तूं स्त्रीजन्म दिला आहेस, मग पतिच्या प्रेमळ हृदयापासून मला कां बरं दूर केलंस ? मी जगाबाहेरची तर नाहीं ना ? तूं जगन्माता आहेस ! मग माझ्यावर कृपा कां बरें करीत नाहींस ? मीं असा तुझा काय अपराध केला आहे ? "

अम्बर शहरापासून रतनगड दोन कोसांला बिलकूल कमी नव्हता, आणि त्यामुळेंच तिला रोजच्यारोज शहरांतून गडावर जाववत नसे.

पतिवियोगानें तळमळत असलेली व असहिष्णु पौर्णिमा एके दिवशीं सायंकाळीं रतनगडावर गेली; पण त्या ठिकाणीं जातांच तिला समजलें कीं, " दुर्जयसिंह कारागृहांतून पळून गेला आहे. "

गेल्याबरोबर प्रथमच तिला ही बातमी समजली व ती त्याच ठिकाणीं दुःखानें कपाळावर हात मारून बसली. नंतर तुरुंगरक्षकाची काकुळतीनें विनंति करून, ती दुर्जयसिंह ज्या खोलींत राहात असे त्या खोलींत गेली. पण पहाते तों काय, पक्षी खरोखरच पळून गेल्याचें तिला आढळलें दुर्जयसिंह पळून—जावयाचा नाहीं अशी तिची खात्री होती हें कसें घडलें तें तिला उमजेना, तिला वाटलें, मानसिंहानें त्याला या जगांतून कायमचें नाहींसें केलें असावें. कारण सेलिमाविरुद्ध चालत असलेलीं सगळीं कारस्थानें त्यालाच माहीत होतीं. शिवाय मानसिंहाचा गुप्त संदेशवाहक तोच होता. 'गुहेंतील खुसरूला ठार मारण्याचा त्याच्यावरील आरोप हें केवळ दिखाऊ कारण होतें, हें पौर्णिमा पूर्णपणें जाणून होती, आणि म्हणूनच तिच्या मनांत ही कल्पना आली.

पौर्णिमा त्या गडाच्या एके बाजूस उभी राहून निरनिराळ्या रीतींनें गत गोष्टींचा विचार करूं लागली. वाऱ्यानें हालणाऱ्या लतिकेप्रमाणें तिचें मन सारखें हेलकावे खात होतें. तिला एकवार वाटे, दुर्जयसिंहाला पुष्कळ वेळपर्यंतची दुसऱ्याची ताबेदारी सहन न होऊन तो कदाचित् पळूनही गेला असेल; पण पुन्हां तिचें संशयित मन तिला सांगे, असला हलकेपणा वीरश्रेष्ठ

दुर्जयच्या हातून कधींही होणार नाहीं. मानसिंहानें खात्रीनें त्याला विषच देऊन ठार मारलें असावें।

तिला हे आत्मगत विचार असह्य होऊन ती उच्च स्वरानें ओरडून म्हणाली, "दुर्जयसिंह! आपण कुठं आहां बरं! माझ्या जीवनाचें ध्येय, हृदयाचें सामर्थ्य आणि नेत्रांतील ज्योती मला केव्हां दिसेल बरं? खरोखरच का विषानें आपणाला मृत्यु आला? आणि जर तसा मृत्यु आला असेल तर आपला अशरीरी आत्मा मला त्या खुनी इसमाचें नांव सांगू शकणार नाहीं का?"

याचवेळीं तिच्या मागाहून कुणींसे म्हटलें, "अशरीरी आत्मा सांगो अथवा न सांगो, पण हा शरीरी आत्मा, दुर्जयसिंहाला कोणीं विष दिलें तें सांगायला तयार आहे."

व्याधाचा शब्द ऐकून हरिणी ज्याप्रमाणें चकित दृष्टीनें मागें पहाते त्याप्रमाणें पौर्णिमेनें मागें तोंड फिरवून पाहिलें तों तिला त्या अस्पष्ट प्रकाशांत लजपतसिंह उभा असलेला दिसला. वाचक या लजपतसिंहाला विसरले नसतीलच.

अकस्मात् समोर फणा असलेला नाग पाहिला म्हणजे प्रवासी ज्याप्रमाणें आश्चर्यचकित व भयभीत होऊन चट्कन् दूर सरून उभा राहतो, त्याप्रमाणें लजपतसिंहाला तेथें पहातांच पौर्णिमा चकित होऊन दूर उभी राहिली. लजपत आपल्या अपराधामुळें यापूर्वीच आपल्या जागेवरून पदच्युत झाला होता खरा; पण त्यानें मानसिंहाची क्षमा मागून व प्रार्थना करून पुन्हां ती जागा मिळविली होती.

पौर्णिमा, त्याला अत्यंत क्रुद्ध होऊन म्हणाली, "मीं बोललेले सगळे शब्द तूं ऐकलेस काय?" लजपतनें उत्तर दिलें, "होय; पण केवळ इच्छेच्या विरुद्ध मला तुझें भाषण ऐकावें लागलें. मी गडाच्या बाहेर कांहीं कारणासाठीं जात होतों, तों तुला या निर्जन ठिकाणीं पहातांच मी या खांबाआड गुप्तपणानें उभा राहिलों, आणि यावेळीं मी जो तुला भेटलों, त्याचें दुसरें कांहीं कारण नसून तुझ्यावर केवळ उपकार करावा हेंच (कारण) आहे. मीं तुझे पुष्कळ अपराध केले असून तुला त्यापासून त्रासही फार झाला आहे. तसेंच तुझ्या आईच्या बाबतींत खोट्या गोष्टी लोकांत पसरवून मीं पापही केलें

आहे. आणि मला त्या पापाचें शासन मिळण्यालाही वेळ लागला नाहीं; पण आतां त्या सगळ्या गोष्टी विसरून जा. पौर्णिमे! तुझ्या हृदयेश्वराला कुणीं ठार मारलें त्याचें नांव समजण्याची तुला इच्छा आहे का?"

पौर्णिमा, लजपतसिंहाचें बोलणें प्रथमपासून मन लावून ऐकत होती. तिनें एकवार संशयित नेत्रांनीं त्याच्याकडे पाहिलें, त्यावरून ती समजून चुकली, कीं, याला खरोखरच पश्चात्ताप झाला आहे. कारण त्याचे दोन्ही नेत्र अश्रूंनीं भरून आले होते.

पौर्णिमेनें विचारलें, "ज्यानें माझ्या सुखसर्वस्वाचा घात केला त्याचें नांव ऐकण्याची मला फारच उत्कंठा लागली आहे."

लजपतनें एकवार संदिग्ध नेत्रांनीं चहूंकडे पाहून हळूच म्हटलें; जवळच जो तुला खांब दिसत आहे त्याच्या मागें चल. इथें कदाचित् कोणी येऊं शकेल. कारण असल्या महत्त्वाच्या गोष्टी अशा उघड्या जागीं बोलणें बरें नाहीं; पण पौर्णिमे, तुला मी आधीं एवढेंच सुचवून ठेवतों, कीं, तुझ्या त्या शत्रूच्या सामर्थ्याच्या मानानें तूं अगदीं अकिंचन आणि सामर्थ्य-हीन आहेस."

लजपतसिंहाचें हें बोलणें ऐकतांच पौर्णिमेचा चेहरा रागानें लाल झाला; पण ती किंचित् आत्मसंयमन करून कम्पित स्वरानें म्हणाली, "समजलें मी, माझ्या नाथाला कुणीं मारलें तें. सतीच्या मर्मज्वालामय निश्वासांनीं आणि अकालवैधव्याच्या यातनांपासून निघणाऱ्या अभिशापांनीं त्या घातक्याचा समूळ नाश होईल हें तुम्ही खात्रीपूर्वक समजा लजपत!"

लजपत घाईघाईनें म्हणाला, "कुणाला या खुनाबद्दल जबाबदार धरतेस तूं पौर्णिमे?"

पौर्णिमा, आपले आरक्तनेत्र लजपतच्या चेहेऱ्यावर रोंखून तीव्र स्वरानें म्हणाली, "राजा मानसिंहाला!"

लजपत उत्तरला, "मग तूं साफ चुकलीस तर!! राजा मानसिंहाच्या हुकुमानें दुर्जयचा आत्मा इहलोक सोडून गेलेला नाहीं."

"तर मग त्याशिवाय इतका दुष्ट कोण?"

"कोण? शाहाजादा खुसरूला तूं विसरलीस काय?"

"पण मानसिंहाच्या कैद्यावर खुसरूचा हुकूम कसा चालेल?"

"खुसरू हा यावेळीं मानसिंहाचें सर्वस्व आहे. व त्यानें केलेले न्याय अन्याय सर्व कांहीं झाकून ठेवायला मानसिंह मागें पुढें पहात नाहीं."

"लजपतसिंह! जरी तुम्ही सांगतां हें खरें असलें, तरी त्यास प्रमाणभूत आधार मला यावेळीं पाहिजे आहे."

"तुला माहीत नसेल पौर्णिमे! मीं यापूर्वी एकदां दुर्जयचे पाय धरून क्षमा मागितल्यामुळें मी त्याचा जिवलग दोस्त बनलों होतों, व त्यामुळेंच मी त्याला नेहेमीं सांगत असें, कीं, तूं पहारेकऱ्याचा वेष घेऊन इथून पळून जा व अशा रीतीनें त्याला सवड देऊन, तुझ्या बाबतींत मीं केलेल्या पापाचें प्रायश्चित्त भोगावें असाही माझा इरादा होता, पण जितके वेळ मीं त्याला हा उपाय सांगितला तितके वेळ त्यानें माझी निर्भर्त्सनाच करून तो उपाय मानण्याचें नाकारलें. मला संकटांत लोटून आपण अशाप्रकारें पळून जावें हें त्याला बिलकूल पसंत पडलें नाहीं. पौर्णिमे! हा एक त्याच्या उदात्त हृदयाचा तुला दाखला दिला; पण थोडावेळ या ठिकाणीं थांबशील तर दुर्जयसिंहानें मृत्यूच्यावेळीं जो एक जिन्नस मला विश्वासानें दिला आहे तो मी तुला आणून दाखवीन आणि तुझी खात्री करीन."

पौर्णिमा कांहीं बोलली नाहीं; पण लजपतसिंह लागलाच तेथून निघाला. आणि तें आंगण पार होऊन धांवत आपल्या खोलींत गेला, व दुर्जयसिंहाच्या मृत्यूचें निदर्शक चिन्ह हातांत घेऊन पौर्णिमा ज्याठिकाणीं अधोमुखानें विचार करीत उभी होती त्याठिकाणीं तो धांवतच आला. पुन्हा त्यानें एकदां चोहोंकडे संशयितपणानें पाहिलें आणि पौर्णिमेच्या हातांत एक चकचकीत आंगठी देत म्हटलें, "ओळख पाहूं ही कोणाची मुद्रिका तें!"

पौर्णिमेनें ती मुद्रिका पाहतांच ओळखली. कारण ती आपल्या विवाहाच्यावेळीं तिनें आपल्या प्रियकराला प्रेमचिन्ह म्हणून अर्पण केलेली होती, व शिसोदिया रजपुतांची इष्टदेवता भगवान् एकलिंगजीची मूर्ती त्या आंगठीवर कोरलेली होती. ही आंगठी वैवाहिक मंत्रानें पवित्र झालेली आहे अशी दुर्जयसिंहाची खात्री असल्यामुळें तो ती युद्धावर जातांनाही हातांत घालीत असे व त्याला चोहोंकडे जयही मिळे.

पौर्णिमेनें ती आंगठी पुष्कळ वेळ इकडून तिकडे फिरवून पाहिली आणि भक्तिभावानें तिचें चुम्बन घेऊन म्हटलें, "नाथ! हृदयेश्वर!! आज

आपल्या मृत्यूचें प्रत्यक्ष निदर्शक चिन्ह मला मिळालें. निष्ठुर जगांतील हृदय-हीन लोकांच्या अत्याचारांनीं, दुसऱ्याच्या स्वार्थ संग्रामांतील कठोर चक्रांत पिळले जाऊन, नाथ! आपण स्वर्गलोकचा रस्ता धरला आहे; पण नाथ! तो रस्ता मीहि जाणतें, आणि त्याच रस्त्यानें येण्याचें मलाहि माहीत आहे; तरी. पण मी इतक्यांतच येणार नाहीं. माझीं बरींच कामें अद्याप शिल्लक आहेत. ज्यानें आज माझ्या नेत्रांतून हे अश्रु वहाविले आहेत, त्याच्या नेत्रांतून रक्ताच्या अश्रुधारा वाहिलेल्या पाहिल्यावांचून मी मुळींच विश्रांति घेणार नाहीं, आणि मला शांतीही मिळणार नाहीं--"

आणखीं थोडासा विचार करून पौर्णिमा पुढें म्हणाली, " ही आंगठी आतां माझ्याजवळ असूं दे. कारण ती माझ्या व्रतधारणेला आणि पूजेला उप-योगीं पडेल."

लजपतनें उत्तर दिलें, "ही आंगठी तुलाच देण्यासंबंधानें दुर्जयनें मला सांगितलें आहे; तेव्हां तूं ती खुशाल घे. माझी त्याला बिलकूल हर-कत नाहीं."

यावेळीं अगदीं संध्याकाळ होत आली होती.आकाशाच्या पश्चिमबाजूला सूर्याचें आरक्त बिंब अस्तंगत होऊं पहात होतें, आणि अस्ताचलाच्या नील आवरणावर फार दूर एक काळा मेघ दुष्ट मनुष्याप्रमाणें खुनशी दृष्टीनें सभों-वार पहात असलेला दिसत होता. त्यामुळें पाऊस येण्याचा फार संभव आहे असेंहि वाटत असे.

आकाशाची ही स्थिति पाहून पौर्णिमा थोडीशी भ्याली. कारण याच-वेळीं तिला दोनतीन कोसांचें अंतर तोडून जावयाचें होतें. ती इकडे तिकडे पाहून लजपतसिंहाला म्हणाली, " तुम्हीं केलेल्या या उपकाराबद्दल मी तुमचे आभार मानतें, आणि तुम्हीं केलेले माझे अपराध विसरून जाऊन मी तुम्हांला त्याबद्दल पूर्णपणें क्षमा करतें."

लजपतसिंह लघळपणानें म्हणाला, "पौर्णिमे! आतांच या गोष्टी कशाला पाहिजेत? माझी एक विनंति तूं मान्य करणार नाहींस का?!!

पौर्णिमा आश्चर्यानें म्हणाली, " कोणती विनंति ? "

लजपत उत्तरला, " आज तूं माझ्याच घरीं रहा. आकाशांत भयंकर मेघ फिरत आहेत, आणि रस्त्यांतून जातांना पाऊस आला तर फारच

त्रास होईल. शिवाय तूं एकटी आहेस. असल्या अंधाऱ्या रात्रीं, निर्जन प्रदेशांतून तुझ्यासारख्या एकट्या स्त्रीनें जाणें योग्य नव्हे. "

पौर्णिमा निर्भयपणानें म्हणाली, " मला पावसाची भीति वाटत नाहीं. तसेंच या रजपुतांच्या देशांत माझ्यासारख्या रजपुतस्त्रीला भीति वाटणें अगदीं अशक्य आहे. "

पौर्णिमा आणखी कांहीं न बोलतां झरझर पाय उचलीत किल्ल्याच्या बाहेर पडून निघून गेली, आणि लजपतसिंह तिच्याकडे नुसताच पहात राहिला. शेवटीं तो एक दीर्घ निःश्वास सोडून म्हणाला, " हाय! पाषाणहृदयाच्या प्रिये !! मीं तुझ्यासाठीं काय काय केलें, हें तुला कसें समजणार ? तूं मला अशा रीतीनें पददलित करून जावें हें तुला कदाचित् शोभत असेल; पण मी मात्र तुला सोडणार नाहीं. हा असा पिशाच्चाप्रमाणें तुझ्या मागें मी नेहेमीं फिरतच राहणार ! "

---

# प्रकरण २४ वें.



## सतीच्या संरक्षकांनो, धांवा हो धांवा !!!

सौंदर्यशालिनी पौर्णिमा, त्या पूर्व रात्रीच्या पहिल्या प्रहरीं अंधाऱ्या रस्त्यांतून चालली होती. रत्नगडावरून एक अगदीं सरळ रस्ता, थेट अंबरला जात असे, आणि त्याच नित्य परिचयाच्या रस्त्यानें पौर्णिमेचीं धाडसी पावलें अंबरच्या रोखानें एकामागून पडत चाललीं होतीं.

यावेळीं आकाशाच्या अंकावरही अंधकाराची क्रीडा चालेली होती, व प्रकृतिदेवीही अंधकारानेंच नटली होती. पौर्णिमेच्या हृदयांत तर आंधाराचेंच साम्राज्य माजलें होतें. अर्थात् आंतबाहेर चालणारें हें अंधाराचें ताण्डवनृत्य भीषण होतें यांत शंका नाहीं. तरी पण धैर्यशाली पौर्णिमेनें, तिकडे लक्ष द्याव-याचें नाहीं असा जणुं काय निश्चयच केला आहे कीं काय, असें वाटत होतें.

पौर्णिमेचा विचार चालला होता, " खरोखरच दुर्जयसिंह परलोकीं गेले काय ? आणि शाहाजादा खुसरूच त्यांना ठार मारणारा ? नाहीं. कोणी तरी माझ्या हृदयांतून मला सांगत आहे, ' पौर्णिमे ! तुझा दुर्जय मरण

पावला नसून तुझें सौभाग्य अचल ठेवण्यासाठीं तो या जगांत जिवंत राहिला आहे. तुझ्या सारख्या सतीसाध्वीला अकालीं वैधव्य कधींही येणार नाहीं !"

पण याचवेळीं तिची नजर त्या मुद्रिकेवर गेल्यामुळें ती अस्पष्ट स्वरानें म्हणाली " नाहीं. नाथ ! आपण जिवंत नाहींत. कारण आपल्या मृत्यूचें प्रत्यक्ष निदर्शक चिन्ह हें माझ्या हातांत आहे. दुर्जय ! हृदयेश्वर ! ! खरो खरच का आपण या जगांत नाहींत ! ! हाय हाय ! ईश्वरा ! तुला मी आतां दयाळू कसा रे म्हणूं ? तूं सर्वांवर दया करतोस; पण माझ्यावरच निष्ठुर झालासना ? माझा गरिबाचा असा घात करण्यांत तुला काय बरें मौज वाटली ? मृत्यु हाच जर परलोकचा सेतु असेल तर करुणामय देवा ! तो मला दाखीव. छे. मला तो नुसता मार्ग दाखवून काय उपयोग ? माझ्यानें तें असह्य दुःख सहन करवणार नाहीं. मृत्यो ! ये. मला तूंच आतां आपल्या मृदु अंकावर घे. तुझा स्पर्श किती सुखकर आणि किती शांतिमय आहे, हें जरी मला माहित नाहीं तरी माझ्या हृदयांतील वेदना कदाचित् तो शांत तरी करील. तेव्हां या अभागिनीवर दया करून मला तुझ्या पायांचा आश्रय दे ! "

हृदयाच्या अशा अस्वस्थ स्थितींत बराचसा मार्ग चालून आल्यावर पौर्णिमेला वाटलें, कीं, आपल्या मागून कोणी तरी येत असावें. कारण तिला स्पष्टपणें कुणाचा तरी–मनुष्याचाच–पदरव ऐकूं आला. ती चमकून थबकली. तिच्यानें पुढें जाववेना. या वेळीं जरी वृष्टी नव्हती, मेघांची गर्जनाहि नव्हती, वादळ नव्हतें आणि विजांचा चकचकाटही नव्हता, तरी पण तिच्या सभोंवारचें जग निबिड अंधकारानें व्याप्त झालेलें होतें.

तिला पुन्हां पदरव ऐकूं आला. पौर्णिमेच्या मनांत आलें, हा कोणीतरी निशाचर असावा; पण निशाचराचा पदरव इतका सावधपूर्ण नसतो. तर मग कोणी दुष्ट मनुष्यच आपला पाठलाग तर करीत नसेलना ?

पौर्णिमेच्यानें पुढें पाऊल टाकवेना. ती एका झाडाखालीं उभी राहिली. पूर्वीं ऐकलेला पदरव आतां क्रमशः आपल्याकडेसच येत आहे असें तिला स्पष्टपणें ऐकूं येऊं लागलें, व हां हां म्हणतां त्या विराट् अंधाराचा भेद करून एक छायामूर्ति तिच्या समोर येऊन उभी राहिली. काळोखामुळें पौर्णिमेला ज्यास्त स्पष्ट असें कांहींच दिसेना.

अर्थातच पौर्णिमेला अंधकारवेष्टित अशा त्या आलेल्या माणसाला

ओळखतां आलें नाहीं यांत आश्चर्य नाहीं! तिनें भयचकित हृदयानें व विस्मित स्वरानें त्या आलेल्या व्यक्तीला प्रश्न केला, " कोण तूं ? "

आलेली व्यक्ति पौर्णिमेच्या अगदीं जवळ येऊन म्हणाली, " मला तूं ओळखलं नाहींस का ? मी लजपतसिंह! "

" मग, तुम्हीं माझा पाठलाग कां चालविला आहे लजपत ? " पौर्णिमेनें तिरस्कारानें प्रश्न केला.

" या अंधाऱ्या रात्रीं, तूं आपल्या बरोबर सोबतीला कोणी न घेतां माझा निरोप घेऊन निघालीस; पण मला तुझ्या बाबतींत निश्चिंत होतां येईना. काळजी वाटूं लागली. म्हणून मी तुझ्या मागोमाग आलों. तसंच आणखीही तुला कांहीं सांगावं असंहि मनांत आहे—" लजपतसिंहाच्यानें प्रथमच ज्यास्त लघळपणा करवेना म्हणून तो मध्येंच थांबला.

पौर्णिमेनें सरळपणानें त्याला प्रश्न केला, " तुम्हांला जें सांगावयाचें होतें, तें तुम्ही रतनगडांतही सांगूं शकलां असतां; मग एवढ्या रात्रीं इथपर्यंत येण्याचे श्रम कां बरें घेतलेत ? "

लजपत उतरला, " पण तिथें तसें बोलण्याचा योग कुठें आला ? ईश्वरानें तुला इतकें सौंदर्य दिलें आहे; पण मनुष्याच्या मनांतील भाव समजण्याचें सामर्थ्य दिलें नाहीं याबद्दल वाईट वाटतें! तूं कुसुम-कोमल रमणी असूनही पाषाणहृदयाची आहेस!! "

पौर्णिमा म्हणाली, " काय बोलतां तुम्ही हें लजपतसिंह ? तुम्ही रजपूत आहांत ना ? रमणीच्या अब्रूचें संरक्षण करणें हें प्रत्येक रजपूतवीराचें कर्तव्य आहे; पण तुम्ही जे या वेळीं शब्द बोलत आहां ते सभ्यपणाला अनुसरून नाहींत, हें कोणीही सांगूं शकेल!"

लजपत आतां स्पष्टच बोलूं लागला, " खरें तूं बोललीस हें खोटें नाहीं. मीं सभ्यपणा सोडला असून धर्मही विसरलों आहें, व कर्तव्य तर मीं केव्हांच सोडून दिलें आहे. तुझ्या स्वर्गीय सौंदर्यानें मोहित झालेलें मन मला आडमार्गानेंच चालवीत आहे. तेव्हां पौर्णिमे! तूं आतां माझी होशील काय ? "

लजपतसिंहाचें हें अनपेक्षित बोलणें ऐकून पौर्णिमेच्या आंगावर शहारे आले. कारण या वेळीं तिच्याजवळ आत्मसंरक्षणाचें असें कोणतेंहि साधन

नव्हतें. तसेंच त्या निर्जन ठिकाणीं साहाय्याला कोणी धांवून येईल अशीहि आशा करायला नको होती. तरी पण पौर्णिमा इतकें समजली कीं, आपण या वेळीं धैर्य सोडलें, कीं, घात व्हायला फारसा विलंब लागणार नाहीं. तसाच तिनें विचार केला, " लजपत आज नसत्या मोहांत पडून हिंदू धर्माला कां बरें विसरत आहे ? " तिला याचें उत्तर न सुचल्यामुळें ती लजपतलाच उद्देशून गंभीरपणानें म्हणाली, " लजपतसिंह ! मी हिंदु विधवा आहें हें तुला माहीत नाहीं कां ? कसें माहीत नसेल ? तेव्हां कारण मी विधवा झालें म्हणून तूंच माझी खात्री केलीस ! तेव्हां सती साध्वीची अशी थट्टा करूं नये, आणि तिचा असा अपमानही करूं नये. या जगांत नात्याचे आणि ममतेचे आणखी अनेक संबंध आहेत. बहीण या नात्यानें मी तुझ्याशीं आजन्म प्रेमानें वागूं शकेन. तसेंच या मातृभूमीवर आईवांचून श्रेष्ठ काय आहे बरें ? मातृरूपानेंहि मला तुझ्याशीं अत्यंत ममतेनें वागतां येईल. या सौंदर्यांत काय आहे ? आणि हें राहणार तरी किती दिवस ? तुझें-रजपूतवीराचें-महत्त्व अशानें तूं कां कमी करून घेतोस ? या निर्जन ठिकाणीं माझा रक्षक कोणी नाहीं, असें तूं समजूं नकोस. या अंधकारमंडित नीलाकाशाकडे एकवार निरखून पहा. असंख्य देवता विमानांत बसून मला सांगत आहेत, कीं, तूं कोणत्याही प्रकारें भिऊं नकोस. "

पौर्णिमेचें हें सगळें बोलणें ऐकूनही लजपतला कांहीं वाटलें नाहीं. कारण त्या वेळीं सैतानानें त्याच्या हृदयाचें आधिपत्य पूर्णपणें स्वीकारलें होतें. तो म्हणाला, " पौर्णिमे ! एका सुखस्वप्नांत मग्न होऊन या वेदनापूर्ण जीवनाला मीं सुखमय करून ठेविलें होतें, आणि माझें तें मोहमय सुखस्वप्न तूं आहेस. आज जसा सुयोग मला मिळाला आहे तसा योग पुन्हां माझ्या आयुष्यांत मला मिळेल असें माझ्यानें खात्रीपूर्वक सांगवत नाहीं. ज्या दुर्जयसिंहानें विवाहानंतर तुझा त्याग केला होता, त्या दुर्जयसिंहाशीं तुझा असलेला संबंध त्याच्या मृत्यूबरोबरच नाहींसा झाला. तूं अशा दुःखदारिद्र्यांत आणि विरहांत कां बरें तळमळत राहातेस ? माझ्या अनेक दिवसांच्या अनेक आशा मला आतां तुझ्याकडून पूर्ण करून घेऊं देत. जग अंधकारमय आहे. अर्थात् कोणी हें पाहूं शकणार नाहीं आणि कुणाला हेंहॉ समजणार पण नाहीं. ये. एकवार माझ्या

या विरहसंतप्त हृदयाजवळ ये, म्हणजे तुला गाढ आलिंगन देऊन अनेक दिवसांच्या माझ्या तळमळणाऱ्या हृदयाला मी शांत करीन."

आतां मात्र पूर्वीपेक्षांही ज्यास्त रीतीनें पौर्णिमेला भीति वाटूं लागली व ती कांहींशी दूरही सरली. लजपतच्याहि मनांत काय आलें कुणाला ठाऊक, तो ज्यास्त ज्यास्त पुढें सरूं लागला. तेव्हां पौर्णिमेला मोठी पंचाईत पडली आणि ती पळण्याचा प्रयत्न करूं लागली; पण सैतानी लजपतसिंहानें तिचा हेतु ओळखला व तो तसाच तिचा पाठलाग करीत पुढें सरला आणि त्यानें अधीरपणानें तिच्या पदराचें टोंक हातांत धरलें. अर्थात् तिची पळण्याची गती कुंठित झाली.

आपला आतां कांहींच उपाय चालण्यासारखा नाहीं असें पाहून पौर्णिमा अगदीं वेडी झाली. आपल्या पायांखालची जमीन सरकत चालली असावी असाही तिला भास झाला. शेवटीं कांहीं न सुचून ती ओरडून म्हणाली, " कोणी कुठेंहि असणाऱ्यांनो, या वेळीं माझ्या सहाय्याला धांवा !" एका असहाय आणि दीन अबलेचें सतीत्व नष्ट होण्याची वेळ आली आहे !" पण दुर्दैवाची गोष्ट म्हणजे, ती ओरड ऐकून कोणीहि तिच्या साहाय्याला धांवून आलें नाहीं.

तेव्हां अनन्योपाय होऊन जोरानें लजपतसिंहाला तिनें दूर लोटलें आणि भीतियुक्त मनानें हात जोडून ती दीणवाणीनें म्हणाली, " संकटाच्या वेळीं धांवून येणाऱ्या ईश्वरा ! तूं या वेळीं कुठं बरं आहेस ? जर तूं जगांत असशील आणि सतींचा धर्मसंरक्षक हें तुझें ब्रीद असेल, तर मला या दुष्टाच्या हातून लवकर सोडवा ! मी भयंकर संकटांत आहे "

भक्तसंकटाच्या वेळीं धांव घेणाऱ्या ईश्वराच्या कानीं ही सतीची हांक पोंचली असावी असें वाटतें. कारण पौर्णिमेची प्रार्थना संपते न संपते तोंच कांहीं अंतरावर घोड्याच्या पायांचे शब्द ऐकूं येऊं लागले. मात्र काळोख असल्यामुळें कोण येत आहे हें कांहींच समजेना.

भ्यालेल्या पौर्णिमेच्या हृदयांत पुन्हां धाडसाचा संचार झाला, ती पुन्हां आपलें सर्व सामर्थ्य एकवटून मोठ्यानें ओरडली, " सतीच्या संरक्षकांनो ! धांवा हो धांवा !! या दीन अबलेला या चंडाळापासून सोडवा ! हा मांग माझें सतीत्व नष्ट करीत आहे हो ! देवा धांवा !"

हे उद्गार ऐकतांच अकस्मात् कुठूनसे चौघे घोडेस्वार जणुं काय भगवत्प्रेरित सहाय्यक म्हणून त्या ठिकाणीं दौडतच आले. सैतानी लजपतसिंह त्यांना पहातांच पळण्याचा प्रयत्न करीत होता; पण त्या चौघां स्वारांत जो मुख्य होता त्यानें आपल्या प्रभुत्वसूचक स्वरानें त्याला आज्ञा केली, " तुझा उद्देश समजलों, आतां एक पाऊल उचलशील तर ठारच होशील. इनायत उल्लाखान ! या पळणाऱ्या सैतानाला आधीं कैद कर. "

लागलाच लजपत त्या सैनिकाकडून कैद झाला. ज्यानें लजपतला कैद करण्याचा हुकूम केला होता, त्यानें पौर्णिमा ओरडत असलेल्या झाडाखालीं जाऊन पाहिलें तों ती अत्याचारपीडित रमणी मूर्छित झालेली त्याला आढळून आली.

लागलीच त्या वीर पुरुषानें गंभीर स्वरानें आपल्या स्वारांना हुकूम केला, " मला वाटतें, निराशायुक्त भीतीनें ही स्त्री मूर्छित झाली असावी. या दोघांनाही तुम्ही दोघे आपापल्या घोड्यांवर घ्या. लवकर आम्हीं राजवाड्यांत पोंहोचूं आणि तेथें पोंचल्यावर यांची काय व्यवस्था करावयाची ती करूं. "

लागलीच झपाट्यानें घोडे सुटले आणि त्यांनीं फत्तेपूर शिक्रीच्या राजप्रासादाचा रस्ता धरला. घोडे झपाट्यानें दौडत असल्यामुळें सगळे स्वार लवकरच फत्तेपूरच्या प्रासादद्वाराजवळ आले. दरवाजांत पहारेकरी उभे होतेच. त्यांनीं यांना पहातांच सन्मानपूर्वक कुर्निसात करून दरवाजे उघडून दिले.

वाचकहो, पौर्णिमेला या भयंकर संकटांतून सोडविणारा दुसरा कोणी नसून तो स्वतः शाहाजादा खुसरूच होता; पण निबिड अंधकार असल्यामुळें तो पौर्णिमेला ओळखूं शकला नाहीं. आपण कोणा एका स्त्रीला एका दुष्टाच्या हातून सोडविलें एवढेंच त्याला या वेळीं वाटलें. असो.

राजवाड्यांत पोहोंचतांच दोघां तातारींना खुसरूनें हुकूम केला, " या अर्ध्या बेशुद्धावस्थेंत असलेल्या स्त्रीला तुम्ही इस्तंबुली बेगमसाहेबांच्या महालांत घेऊन जा. "

ही इस्तंबुली अथवा रुमी बेगम, अकबरशाहाची अत्यंत आवडती बेगम होती व ही प्यारी आणि खुसरू यांच्यावर अत्यंत ममता करीत असे. अनेक वेळीं सम्राट्‌जवळ खुसरूची प्रशंसा करण्याचें कामही या बेगमसाहेबच

करीत असत. तुर्कस्थानांतील इस्तंबूल शहरीं हिचा जन्म झाला असून असली गायनकुशला रसिक रमणी त्या वेळीं बादशाही जनानखान्यांत दुसरी कोणीहि नव्हती म्हटलें तरी चालेल. सम्राट्ला ती अत्यंत प्यार होती व तीही आग्र्याच्या कोलाहलमय राजपुरीपासून शक्य तितकें दूर राहण्याला खूष असल्यामुळें अकबरशाहानें तिच्यासाठीं अत्यंत मनोरम असा महाल फत्तेपूर शिक्रीसारख्या एकांत जागीं बांधून दिलेला होता; व त्या ठिकाणीं आपल्या प्रियकराच्या संगतींत ती मोठ्या सुखानें राहात असे. महालाचा भग्नावशेष अजूनही पहायला सांपडतो. अस्तु.

तातेरी रमणींना सगळी हकीगत सविस्तरपणें समजावून देऊन खुसरूनें त्याच वेळीं एका अनुभवशीर वृद्ध हकिमाला बोलवून आणिलें व त्याला रुमी बेगमसाहेबांच्या महालांत जाण्याला सांगितलें. नंतर लजरतला कारागृहांत बंदोबस्तानें ठेवण्याचा हुकूम करून तो आपल्या खासमहालांत विश्रांतीसाठीं निघून गेला.

पौर्णिमेचा पोषाख पाहून इस्तंबुली समजली, कीं, ही मूर्छित रमणी हिंदु असावी. तिच्या उदार आणि उदात्त हृदयांत हिंदु मुसलमानांबद्दल कधींच भेदभाव नव्हता. अर्थात तिनें आपलीच मुलगी मानून पौर्णिमेची अविश्रांत शुश्रूषा केल्यामुळें ती लवकरच शुद्धीवर आली. शुद्धीवर आल्यानंतर तिचें तें स्वर्गीय लावण्य पाहून इस्तंबुली मनांत अगदीं चकित होऊन गेली.

शुद्धीवर आल्यानंतर पौर्णिमेनें आपले डोळे उघडून सभोंवार पाहिलें, तेव्हां, आपण एका उत्तम रीतीनें शृंगारलेल्या महालांत मृदु शय्येवर झोपलेले आहों, असें तिला आढळून आलें. या वेळीं दोघी दासी तिला वारा घालणें, सरबत पाजणें वगैरे तिची सेवा करीत होत्या. पौर्णिमा कांहीं वेळ स्तब्ध राहून आश्चर्यानें हळूच म्हणाली, " मी कुठं आहे आणि मला इथं कुणी आणलं ? "

इस्तंबुली अथवा रुमी बेगम तिच्या जवळच बसलेली होती, ती तिचा तो प्रश्न ऐकून प्रसन्न चेहेऱ्यानें म्हणाली, " भिऊं नकोस आणि चकीतही होऊं नकोस. माझं नांव रूमी बेगम. मी सम्राट् अकबरशाहाची पत्नी आहे. तुला रस्त्यांत मूर्छित पडलेली पाहून शाहाजादा खुसरूनें आणलें, आणि

खुदाच्या कृपेनें तूं लवकर शुद्धीवरही आलीस. तुला आतां जीवनाबद्दल भीती बाळगण्याचें कारण नाहीं ''

खुसरूचें नांव ऐकतांच पौर्णिमा भीतीनें चमकली; कारण आपल्या नवऱ्याच्या मृत्यूला कारण झालेला अर्थात् आपला शत्रु जो खुसरू यानें आपणाला इथें कां आणलें असावें अशी तिच्या मनांत शंका आली. तसेंच 'आपण यावेळीं फत्तेपूर शिक्रीच्या राजवाड्यांत आहों अशीही तिची खात्री झाली. कारण फत्तेपूर शिक्रीवांचून रतनगडाजवळ दुसरें कोणतेंहि राजभवन नाहीं हें तिला पक्कें ठाऊक होतें. अर्थात् आपण यावेळीं आपल्या कट्टया वैऱ्याच्या घरांत आहों अशाबद्दल तिची खात्री व्हायला फारसा विलंब लागला नाहीं हें सांगायला नकोच.

पण हे सगळे विचार मनांत येतांच पौर्णिमेला कसेंसेंच वाटूं लागलें. तिनें हळू हळू नेत्र मिटले. रूमीनें तिची ती स्थिति पाहून दासीला खूण केली व त्या खुणेचा अर्थ दासीच्या लक्षांत येतांच तिनें पौर्णिमेला एक उत्तेजक पेय पिण्याला दिलें, आणि त्या पेयाचा योग्य तो परिणाम झालाही.

कांहीं वेळानें रूमी बेगम मुख्य दासीला उद्देशून म्हणाली, " रेशिया! आतांच्या औषधानें हिला चांगलीच झोंप लागेल व ही उजाडल्यावांचून उठणारही नाहीं. यावेळीं मध्यरात्र होऊन गेली आहे. तेव्हां मी झोंपायला जातें. हिच्या आजाराचा जर तुला कांहीं कमज्यास्त प्रकार आढळला तर मला ताबडतोब बातमी द्यायला संकोच करूं नकोस. ''

बेगम आपल्या महालांत झोंपण्यासाठीं निघून गेल्यावर थोड्याच वेळांत पाय न वाजवितां शाहाजादा खुसरू तेथें आला व त्या रेशियाला अंगुलिसंकेतानें जवळ बोलविलें. लागलीच ती तेथें आली व सन्मानपूर्वक सलाम करून उभी राहिली. पौर्णिमा यावेळीं मादक औषधाच्या प्रभावानें गाढ झोंपलेली होती. खुसरूनें रेशियेला प्रश्न केला, " अजूनहि ही सावध झाली नाहीं का?'

रेशियेनें हळूच उत्तर दिलें, " जनाब! ही बऱ्याच वेळापूर्वी चांगली सावध झाली होती; पण तिला झोंपेची आवश्यकता आहे, असें तिच्या वारंवार झांकल्या जाणाऱ्या नेत्रांवरून आम्हांला वाटल्यामुळें बेगम साहेबांनीं सांगितलें कीं, ' हिला झोंपेचें औषध द्या!' तेव्हां तिला तें औषध दिलें आहे व त्यामुळें आतां हिला गाढ झोंप लागली आहे. ''

अद्यापही खुसरूला ही मूर्छित झालेली स्त्री कोण आहे, हें समजलें नव्हतें; पण आतां त्या रमणीच्या बिछान्याजवळ जातांच त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण त्या दुग्धफेननिभ शय्येला उज्ज्वल करीत सुंदरी पौर्णिमाच स्वस्थ झोंपलेली त्याला आहे असें दिसलें. तिच्या किंचित् उघड्या दिसणाऱ्या गौरवर्णामुळें तिचें स्वर्गीय लावण्य ज्यास्तच खुलून दिसत होतें आणि खुस-रूची ती प्रणयिनी असल्यामुळें तर त्याला ती अप्सराच वाटूं लागली. भ्रम-रासारखा दिसणारा तिचा कुरलकुंतलभार अस्ताव्यस्त पसरला होता व कांहीं केस तिच्या गोंडस बाहूंवर, मनोहर छातीवर आणि कमलासारख्या चेहे-ऱ्यावर भ्रमरांप्रमाणें खेळत होते, आणि त्यामुळें तर तिचें सौंदर्य अत्यंत हृद्-यंगम दिसत होतें. खुसरूला तर तिच्यावरून आपली दृष्टी काढून दुसरीकडे वळवावी असें मुळींच वाटेना.

आशापूर्ण हृदयानें तिचें तें अमोघ सौंदर्य तो टक लावून पहात होता, पण थोड्याच वेळांत त्यानें आत्मसंयमन केलें. रेशिया अजूनपर्यंत तिथेंच उभी होती. खुसरूला वाटलें, आपली ही चंचल स्थिती या दासीनें पाहिली तर तिला काय वाटेल! आणि तिनें आपल्या समजुतीप्रमाणें बेगमसाहेबांना कांहीं सांगितलें तर त्या मला काय म्हणतील?

एकाद्या इंद्रियविजयी वीराप्रमाणें उचंबळलेल्या वृत्तींचें दमन करून शाहाजादा खुसरू, त्या महाप्रलोभना समोरून दूर झाला. जातांना दासीला फक्त इतकेंच सांगितलें, कीं, "या हिन्दु बिबीची प्रकृति कशी काय आहे, हें मला तूं उद्यां अवश्य कळीव."

हत्तींच्या लढाईच्या त्या भीषणप्रकाराबद्दल बापाशीं खुसरूचा बराच खटका उडाला असल्यामुळें सेलिमविषयीं खुसरूचें मन शुद्ध नव्हतें. अनात्म-संयमी आणि यौवन मदोन्मत्त खुसरूनें जेव्हां पाहिलें, कीं, 'आपल्या हत्तीचा पराभव होत आहे व यांत आपला बाप अन्याय करीत आहे.' तेव्हां त्याला आत्मसंयम करणें अशक्य होऊन तो सुलतान सेलिमला असे कांहीं तीव्र शब्द बोलला, कीं, सेलीम, आपल्या मुलाचा तो उद्धटपणा व उच्छृंखलपणा पाहून अत्यंत क्रोधाविष्ट झाला. अकबरशाहा कांहीं या चाललेल्या प्रकारा-पासून लांब नव्हता. त्याचीहि खात्री झाली, कीं, आपल्या लाडक्या नातवानें आज करूं नये ती गोष्ट केली व एक प्रकारें आपल्या अतिरिक्त सवलतीचा

त्याला मिळूं नये तो फायदा मिळाला. नाहीं तर आज त्यानें इतका प्रकार करून सेलीमचा अपमान केला नसता.

संध्याकाळीं हा सगळा प्रकार शाही बेगमला समजला व ती आपल्या उद्धट मुलाला पुष्कळ बोलली. तिनें त्याच्या या गर्हणीय कृत्याचा शक्य तितक्या कठोर शब्दांनीं तिरस्कार केला, व आईचें तें बोलणें खुसरूच्या कोमल हृदयाला बरेंच झोंबलेंही. यानंतर रात्रीं सम्राट्नें खुसरूला एकांतीं बोलवून म्हटलें, " खुसरू ! अजूनही तुला स्वतःचें बरें वाईट कळूं लागलें नाहीं ओं ? मी आतां फार दिवस या जगांत राहणार नाहीं, हे तुला समजत नाहीं का ? माझ्या महालाच्या दरवाजाजवळ आसन घालून मृत्यु घटका पळें मोजीत बसला आहे. ज्या तुझ्या पित्याशीं तूं आज भांडण केलेंस तोच आतां हिंदुस्तानचा सम्राट् होणार. त्याच्या अविचारी व भयंकर रागांत तूं सांपडलास तर मी नसतांना तुला आपलें कसें बरें संरक्षण करतां येईल ? मी कबरस्तानांतील चिरशीतल व शांतिमय शय्या सोडून तुझ्या साहाय्याला धांवून येईन असें कां तुला वाटते ? आतां शेवटीं माझे तुला इतकेंच सांगणें आहे कीं, तूं कांहीं दिवस फत्तेपूर शिक्री येथील राजवाड्यांत जाऊन रहा. मी त्या मुदतींत तुझ्याबद्दल तुझ्या बापाच्या मनांतील राग घालविण्याचा प्रयत्न करतों. त्यानंतर मी तुला पत्र पाठवीन त्याप्रमाणें तूं ताबडतोब आ-ज्याला निघून ये-"

नंतर आजोबाच्या-सम्राट् अकबरशाहाच्या-हुकुमाप्रमाणें खुसरू पश्चात्तापयुक्त अन्तःकरणानें फत्तेपूरशिक्रीला येत होता, व त्याच्याबरोबर अंगरक्षक म्हणून फक्त तीनच घोडेस्वार होते. रस्त्यांत त्यानें रमणीचें केविलवाणें ओरडणें व ऐकलें तो आपल्या सेवकांसह काळोखांतूनच धांवला, आणि त्यानंतर काय प्रकार झाला तें वाचकांना माहीत आहेच.

## प्रकरण २५ वें.

--:०:--

### रूमी बेगमचा—अजीचा उपदेश.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं खुसरू, झालेल्या प्रकाराबद्दल विचार करीत आपल्या विश्रांतिमहालांत बसला होता, इतक्यांत रेशिया दासी तेथें आली आणि कुर्निस करून म्हणाली, "शहाजादेसाहेब! रुमीबेगमसाहेबांनीं आपणाला बोलाविलें आहे."

नंतर खुसरूनें त्या दासीच्या तोंडून पौर्णिमेच्या खुशालीची हकीगत ऐकली व तो उद्विग्न चित्तानें बेगम साहेबांच्या महालांत आला.

बेगमसाहेबांनीं मोठ्या प्रेमानें त्याला आपणाजवळ बसवून घेऊन म्हटलें, "खुसरू! अकस्मात् असा आग्ऱ्याहून तूं कां निघून आलास? सम्राट्‌ची प्रकृती कशी काय आहे!"

खुसरूनें उत्तर दिलें, "सम्राट् खुशाल आहेत," पण या एका वाक्यापुढें त्याच्यानें कांहीं बोलवेना. तो अकस्मात् स्तब्ध झाला. कारण आपण फत्तेपूरला कां आलों, याबद्दलची खरी हकीगत सांगतांना बऱ्याचशा आणखींहि गोष्टी सांगाव्या लागतील. अर्थात् अशा बिकट प्रसंगीं गप्प राहण्यावांचून दुसरा मार्गच नव्हता, व तोच त्यानें पत्करला.

खुसरू अकस्मात् स्तब्ध झालेला पाहून रूमीबेगम संशयित मनानें म्हणाली, "हा काय प्रकार आहे खुसरू? तूं अकस्मात् येथें येण्याचें कारण सांगण्याला असा स्तब्धपणा कां स्वीकारतोस?"

ही रूमीबेगम खुसरूला अत्यंत ममतेनें वागवीत असे. अर्थात् खुसरू तिच्याजवळून कोणतीही गोष्ट गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करीत नसे. आताही तसेंच झालें. रूमीच्या अत्यंत आग्रहानें खुसरूला झालेली हकीगत तिच्यापुढें मुकाट्यानें सांगावी लागली; आणि ती सांगतांना त्याला फार वाईटही वाटलें.

खुसरूनें सांगितलेली ही हकीगत ऐकल्यानंतर रूमीबेगम कांहीं वेळ विचार करीत स्तब्ध राहिली. नंतर म्हणाली, "हाय हाय!! खुसरू, जर तूं क्रोधांध न होऊन आपल्या बापाशीं असा विरोध न करतास तर फार

चांगलें झालें असतें. तूं हें असें भांडण करून फारच मोठी चूक केली आहेस—!"

यावर खुसरू पश्चात्ताप पूर्ण स्वरानें म्हणाला, "काय करूं दादीजी (आजी) होऊं नये ती गोष्ट झाली. अपराध झाला खरा; पण त्याबद्दल मला क्षमा नाहीं का मिळणार? ते वडील आणि मी त्यांचा मुलगा आहें. बाप मुलाला केव्हांच क्षमा करीत नाहीं का?"

रूमी-बेगमचा चेहेरा याचवेळीं कांहींसा प्रफुल्लित झाला. ती कांहींशी प्रसन्न स्वरानें म्हणाली, "होय; पण तूं ती क्षमा मागितलीस तर मिळेल कीं नाहीं, याविषयीं संशयच आहे. तुझ्यासाठीं ही क्षमेची याचना मीं करण्याचें ठरविलें आहे. सुलतानची आई खास बेगम हिच्या मृत्यूनंतर मी आणि सेलिमाबेगम हिनें, सेलिमला आईच्या जागीं होऊन त्याला लहानाचा मोठा केलें आहे. अर्थात् तुझ्यासाठीं मीं ही लहानशी भिक्षा मागितल्यास तो ती देण्याला अनमान करणार नाहीं. कारण अद्याप तो बादशाहा झालेला नाहीं आणि हिंदुस्तानचा सम्राट् अद्याप त्याच्यावर हुकूमहि चालवूं शकेल अशा स्थितींत तो आहे—"

खुसरू मध्येंच म्हणाला, "सम्राट्ची आवडती व प्रियकर बेगम माझ्यासाठीं इतकें हलकेपणाचें काम कसें बरें स्वीकारील. आजी! माझ्यासाठीं तूं इतकी कमी दर्जाची कामागिरी स्वीकारूं नकोस. माझें काय व्हायचें असेल तें होऊं दे."

इस्तंघुली अथवा रूमीबेगम हिचा चेहेरा आतां ज्यास्तच उज्ज्वल दिसूं लागला. ती स्वाभिमानपूर्ण व दृढ स्वरानें म्हणाली, "पतीजवळ अथवा मुलाजवळ कोणतीही गोष्ट मोकळ्या मनानें बोलण्याला अथवा कांहींही मागण्याला पत्नी अथवा आई यांचा अडथळा असणें केव्हांही योग्य नव्हे. तसा तो नसतोहि व मला तर केव्हांही नाहीं. तुझा बाप सुलतान सेलीम हा माझ्या उदरीं जरी जन्माला आला नाहीं, तरी सम्राट्ची मी विवाहित पत्नी आहें, अर्थात् त्याच्या मातृत्वाची जबाबदारी माझ्यावर असून त्या-लाही तीं कळत आहे."

चंचल मनाचा खुसरू, कांहींसा विद्रूपपूर्ण स्वरानें म्हणाला, "जो मुलगा पितृद्रोही झाला, तो मातृद्रोही होऊं शकणार नाहीं का दादीजी?"

यावर इस्तंबुलीबेगम क्रुद्ध स्वरानें म्हणाली, "एक शब्दही आतां बोलूं नकोस खुसरू! आणि असला हा मत्सरपूर्ण मनोभाव तूं कुठेंही व केव्हांही उघड करूं नको. इतकेंच नव्हे, तर शक्य तितक्या लवकर तो तुझ्या मनांतूनही काढून टाकण्याचा प्रयत्न कर. कारण तो भाव जर तुझ्या हृदयांत राहील तर तूं लवकर मोठ्या संकटांत पडशील. विस्तवाची ठिणगी पडतांच ती विझविण्याचा प्रयत्न न करतां तिला फुंकर घालणें हें अगदीं भयंकर मूढत्वाचें लक्षण आहे. असो. व्यर्थ तर्क वितर्क करीत बसण्यांत अर्थ नाहीं. मीर--मुन्सीला सांगून मी आज आग्र्याला जाण्याची सगळी व्यवस्था करून घेतें. आतां ही आजारी हिंदुरमणी इथें आहे, तेव्हां मी फिरून येईपर्यंत तिच्यावर योग्य मनुष्यमार्फत शक्य तितकी नजर ठेव, आणि मी आग्र्याला पोहोंचल्यानंतर जसजसें कळवीन तसतसें तूं आपलें वर्तन ठेव, व सांगेन तें काम कर. हट्टी व दुराग्रही बनून निष्कारण आपला घात करून घेऊं नकोस."

झालें आणखीं कांहीं सावधपणाचा उपदेश करावयाचा होता तो करून रूमीबेगम आग्र्याला निघून गेली. फत्तेपूर--शिक्रीहून आग्रा शहर फारसें लांब नव्हतें. अर्थात् ती तेथें योग्य त्या वेळांत पोहोंचून तिनें आपल्या कार्यालाही आरंभ केला.

---

## प्रकरण २६ वें.

—:o:—

### तूं विधवा नव्हेस, तुझें सौभाग्य कायम आहे!

इस्तंबुलीबेगम पौर्णिमेची सगळी व्यवस्था आईप्रमाणें प्रेमळपणानें करीत असे. पौर्णिमा ही एका दरिद्री क्षत्रियाची कन्या आहे, हें माहीत असूनही, अतुलवैभवशालिनी रूमीबेगम तिची स्वतःच्या मुलीप्रमाणें परिचर्या पहात असे; यामुळें पौर्णिमा मनांतल्या मनांत तिचे अत्यंत उपकार मानी व आपण आयुष्यभर हिच्याशीं कृतज्ञ राहिलें पाहिजे असेंहि मनांत म्हणे. इस्तंबुली आग्र्याला गेल्यानंतर रेहियाकडूनही तिची चांगलीच शुश्रूषा होत असे, त्यामुळें रेहियेशीं ती अगदीं जिवाची मैत्रीण बनली व त्यांचा स्नेह फारच वाढला.

रूमीबेगम जातांना पौर्णिमेला सांगून गेली होती, "या महालांत पुरु-षाला येण्याची परवानगी नाहीं. तसेंच याच महालाला लागून बाहेर एक गुलाब-बाग आहे, वाटल्यास तिथें तूं नेहमीं फिरायला जात जा. मी पांच-सहा दिवसांत आग्र्याहून मागें फिरेन असें मला वाटतें. मी परत येईपर्यंत मात्र तूं जाऊं नकोस. तुला इथें कुणीही त्रास देणार नाहीं."

जिच्याशीं आजन्म कृतज्ञ राहण्याचें पौर्णिमेनें ठरविलें होतें, तिचें हें सन्मान्य सांगणें ती कसें बरें अमान्य करील ? अर्थात् ती बेगमच्या सांग-ण्याप्रमाणें वागण्याला तयार झाली, यांत मुळींच आश्चर्य नाहीं ! बेगम निघून गेल्यानंतर रेझियेला अनेक प्रकारचीं कामें करण्याचें आंगावर पडल्यामुळें तिला नेहमीं पौर्णिमेजवळच बसून राहण्याला मिळत नसे. पौर्णिमेच्या जेवण-खाणासाठीं तिला एका निराळ्या स्वतंत्र खोलीची व्यवस्था करून देण्यांत आली होती. तसेंच एक हिंदू स्वयंपाकीण व एक नोकरही तिच्या तैना-तींत देण्यांत आला होता. तरी पण पौर्णिमा स्वयंपाकिणीच्या हातचें दुपारचें जेवीत नसे. रात्रीं फराळाचें मात्र तिच्याकडून करून घेई. कारण काय असेल तें असो; पण ती अशा रीतीनें वागत असे एवढें मात्र खरें.

गुलाब-बागेंत फिरायला जाण्याची तिला आतां संवयच झाली होती. अर्थात् ती रोजचें फिरायला जाणें कधींही चुकवीत नसे. त्या लहानशा, पण मनोहर उद्यानांत चोहोंकडे गुलाबाचेच हृदयंगम ताटवे दिसत असत व त्यांना नेहमीं बहार आलेला असल्यामुळें तर तें एक नन्दनवनच वाटे. या उद्यानांत बसण्यासाठीं पुष्कळ, संगमरवरी चबुत्रे करण्यांत आले होते व तेथें बसण्यांत फारच सुख वाटे.

आज पौर्णिमा बागेंत फिरायला आली तेव्हां चांगलीच संध्याकाळ झाली होती. नीलाकाशाला हृदयंगम असा रुपेरी रंग देत भगवान् अंशुमाली चंद्रमा नुकताच क्षितिजापासून पुढें सरकत होता. आरक्तवर्ण गुलाबसुमनांच्या सुकुमार आंगावर चंद्राचे सुधाधवल किरण पडल्यामुळें एक अपूर्वच शोभा दिसत होती. पौर्णिमा बराच वेळपर्यंत इकडे तिकडे फिरली. या वेळीं आप-ल्या शोचनीय नशिबासंबंधानें, सैतान लजपतसिंहाच्या अत्याचारासंबंधानें व रूमी बेगमसाहेबांच्या उदारतेसंबंधानें तिचे अनेक तऱ्हेचे विचार चालले होते,

पण तिच्या अशक्त मनाला व देहाला त्या फिरण्यामुळें आणि विचारांमुळें अतिशय ग्लानी आली, व ती श्रांत होऊन एका संगमरवरी चबुतऱ्यावर झोंपली. कारण सध्यां तिला बरीच अशक्तता आलेली असल्यामुळें महालांतही जाण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें.

पौर्णिमेसारख्या सौंदर्यदेवतेला शांतपणानें झोंपलेली पाहून, मलयानिलाला तिची शुश्रूषा करण्याचा लोभ आवरणें अशक्य झालें. त्यानें नुकत्याच फुललेल्या गुलाबांचा सुगंध चोरून आणून तो मोठ्या कुशलतेनें त्या सुंदरीच्या नाकाजवळ धरला, व अतिशय सावधपणानें तिचा केशभार इकडे तिकडे करण्याला त्यानें सुरवात केली. तिच्या उघड्या ललाटप्रदेशावर, मौक्तिकबिन्दुप्रमाणें घर्मबिन्दु चमकत होते; पण ते तो आपल्या सौगंधिक स्निग्ध निःश्वासानें पुसून टाकूं लागला; या परिचर्येचा परिणाम असा झाला कीं, पौर्णिमेला पूर्वीपेक्षांही ज्यास्त गाढ झोंप लागली.

याच वेळीं विलक्षण योगायोगानें आणखी एक व्यक्ति त्याच उद्यानांत आली. या बागेंत दुसऱ्या कुणाला येण्याला परवानगी नसली तरी शाहाजाद्याला हरकत नव्हती. खुसरूच्या महालाला लागूनच असलें एक उद्यान होतें; पण त्या ठिकाणीं इतर सगळीं फुलझाडें असून गुलाबाचीं मुळींच नव्हतीं. त्यामुळें कांहीं बसराई गुलाब ताजे फुलले असल्यास जमवून आणून करमणूक करावी असें मनांत येऊन तो रुमी बेगमसाहेबांच्या गुलाबबागेंत आला होता. या दोन महालांमध्यें एक लहानशी संगमरवरी दगडांची भिंत असून इतर कांहींच अडथळा नसल्यामुळें खुसरू तेथें सहज येऊं शकला. कारण त्या भिंतींत एक गुप्तद्वार बसविलेलें असून तें सम्राट् अगर शाहाजादा यांनाच उघडण्याची परवानगी होती. असो.

खुसरू उद्यानाच्या मागाहून आला होता, यामुळें चबुतऱ्यावर झोंपलेल्या पौर्णिमेच्या बाबतींत आगाऊ असें त्याला कांहींच समजलें नव्हतें; पण पुढें येतांच अकस्मात् त्याची दृष्टि त्या चबुतऱ्याकडे गेली व त्यानें कांहींसें पुढें होऊन पाहिलें तो, त्या वेदीवर झोंपलेली सौंदर्यशालिनी पौर्णिमाच त्याच्या नजरेस पडली.

अपूर्व सौंदर्यमयी पौर्णिमेच्या झोंपलेल्या शांत चेहेऱ्यावर चंद्राचा स्वच्छ प्रकाश पडला असल्यामुळें पहाणाराला वाटलें असतें, कीं, ही कोणी स्वर्गी-

खुदाच्या रूपेनें तूं लवकर शुद्धीवरही आलीस. तुला आतां जीवनाबद्दल भीती बाळगण्याचें कारण नाहीं ''

खुसरूचें नांव ऐकतांच पौर्णिमा भीतीनें चमकली; कारण आपल्या नवऱ्याच्या मृत्यूला कारण झालेला अर्थात् आपला शत्रु जो खुसरू यानें आपणाला इथें कां आणलें असावें अशी तिच्या मनांत शंका आली. तसेंच ' आपण यावेळीं फत्तेपूर शिक्रीच्या राजवाड्यांत आहों अशीही तिची खात्री झाली. कारण फत्तेपूर शिक्रीवांचून रतनगडाजवळ दुसरें कोणतेंहि राजभवन नाहीं हें तिला पक्कें ठाऊक होतें. अर्थात् आपण यावेळीं आपल्या कट्टया वैऱ्याच्या घरांत आहों अशाबद्दल तिची खात्री व्हायला फारसा विलंब लागला नाहीं हें सांगायला नकोच.

पण हे सगळे विचार मनांत येतांच पौर्णिमेला कसेंसेंच वाटूं लागलें. तिनें हळू हळू नेत्र मिटले. रूमीनें तिची ती स्थिति पाहून दासीला खूण केली व त्या खुणेचा अर्थ दासीच्या लक्षांत येतांच तिनें पौर्णिमेला एक उत्तेजक पेय पिण्याला दिलें, आणि त्या पेयाचा योग्य तो परिणाम झालाही.

कांहीं वेळानें रूमी बेगम मुख्य दासीला उद्देशून म्हणाली, " रेक्षिया ! आतांच्या औषधानें हिला चांगलीच झोंप लागेल व ही उजाडल्यावांचून उठणारही नाहीं. यावेळीं मध्यरात्र होऊन गेली आहे. तेव्हां मी झोंपायला जातें. हिच्या आजाराचा जर तुला कांहीं कमजयास्त प्रकार आढळला तर मला तावडतोब बातमी द्यायला संकोच करूं नकोस. ''

बेगम आपल्या महालांत झोंपण्यासाठीं निघून गेल्यावर थोडयाच वेळांत पाय न वाजवितां शाहाजादा खुसरू तेथें आला व त्या रेक्षियाला अंगुलिसंकेतानें जवळ बोलविलें. लागलीच ती तेथें आली व सन्मानपूर्वक सलाम करून उभी राहिली. पौर्णिमा यावेळीं मादक औषधाच्या प्रभावानें गाढ झोंपलेली होती. खुसरूनें रेक्षियेला प्रश्न केला, " अजूनहि ही सावध झाली नाहीं का ?'

रेक्षियेनें हळूच उत्तर दिलें, " जनाब ! ही बऱ्याच वेळापूर्वी चांगली सावध झाली होती; पण तिला झोंपेची आवश्यकता आहे, असें तिच्या वारंवार झांकल्या जाणाऱ्या नेत्रांवरून आम्हांला वाटल्यामुळें बेगम साहेबांनीं सांगितलें कीं, ' हिला झोंपेचें औषध द्या ! ' तेव्हां तिला तें औषध दिलें आहे व त्यामुळें आतां हिला गाढ झोंप लागली आहे. ''

असूनही खुसरूला ही मूर्छित झालेली स्त्री कोण आहे, हें समजलें नव्हतें; पण आतां त्या रमणीच्या बिछान्याजवळ जातांच त्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण त्या दुग्धफेननिभ शय्येला उज्ज्वल करीत सुंदरी पौर्णिमाच स्वस्थ झोंपलेली त्याला आहे असें दिसलें. तिच्या किंचित् उघडया दिसणाऱ्या गौरवर्णामुळें तिचें स्वर्गीय लावण्य ज्यास्तच खुलून दिसत होतें आणि खुसरूची ती प्रणयिनी असल्यामुळें तर त्याला ती अप्सराच वाटूं लागली. भ्रमरासारखा दिसणारा तिचा कुरलकुंतलभार अस्ताव्यस्त पसरला होता व कांहीं केंस तिच्या गोंडस बाहूंवर, मनोहर छातीवर आणि कमलासारख्या चेहेऱ्यावर भ्रमरांप्रमाणें खेळत होते, आणि त्यामुळें तर तिचें सौंदर्य अत्यंत हृदयंगम दिसत होतें. खुसरूला तर तिच्यावरून आपली दृष्टी काढून दुसरीकडे वळवावी असें मुळींच वाटेना.

आशापूर्ण हृदयानें तिचें तें अमोघ सौंदर्य तो टक लावून पहात होता, पण थोडयाच वेळांत त्यानें आत्मसंयमन केलें. रेशिया अजूनपर्यंत तिथेंच उभी होती. खुसरूला वाटलें, आपली ही चंचल स्थिती या दासीनें पाहिली तर तिला काय वाटेल ! आणि तिनें आपल्या समजुतीप्रमाणें बेगमसाहेबांना कांहीं सांगितलें तर त्या मला काय म्हणतील ?

एकाद्या इंद्रियविजयी वीराप्रमाणें उचंबळलेल्या वृत्तींचें दमन करून शाहाजादा खुसरू, त्या महाप्रलोभना समोरून दूर झाला. जातांना दासीला फक्त इतकेंच सांगितलें, कीं, " या हिन्दु बिबीची प्रकृति कशी काय आहे, हें मला तूं उद्यां अवश्य कळीव."

हत्तींच्या लढाईच्या त्या भीषण प्रकाराबद्दल बापाशीं खुसरूचा बराच खटका उडाला असल्यामुळें सेलिमविषयीं खुसरूचें मन शुद्ध नव्हतें. अनात्मसंयमी आणि यौवन मदोन्मत्त खुसरूनें जेव्हां पाहिलें, कीं, ' आपल्या हत्तीचा पराभव होत आहे व यांत आपला बाप अन्याय करीत आहे. ' तेव्हां त्याला आत्मसंयम करणें अशक्य होऊन तो सुलतान सेलिमला असे कांहीं तीव्र शब्द बोलला, कीं, सेलीम, आपल्या मुलाचा तो उद्धटपणा व उच्छृंखलपणा पाहून अत्यंत क्रोधाविष्ट झाला. अकबरशाहा कांहीं या चाललेल्या प्रकारापासून लांब नव्हता. त्याचीहि खात्री झाली, कीं, आपल्या लाडक्या नातवानें आज करूं नये ती गोष्ट केली व एक प्रकारें आपल्या अतिरिक्त सवलतीचा

त्याला मिळूं नये तो फायदा मिळाला. नाहीं तर आज त्यानें इतका प्रकार करून सेलीमचा अपमान केला नसता.

संध्याकाळीं हा सगळा प्रकार शाही बेगमला समजला व ती आपल्या उद्धट मुलाला पुष्कळ बोलली. तिनें त्याच्या या गर्हणीय कृत्याचा शक्य तितक्या कठोर शब्दांनीं तिरस्कार केला, व आईचें तें बोलणें खुसरूच्या कोमल हृदयाला बरेंच झोंबलेंही. यानंतर रात्रीं सम्राट्नें खुसरूला एकांतीं बोलवून म्हटलें, "खुसरू ! अजूनही तुला स्वतःचें बरें वाईट कळूं लागलें नाहीं ना ? मी आतां फार दिवस या जगांत राहणार नाहीं, हें तुला समजत नाहीं का ? माझ्या महालाच्या दरवाजाजवळ आसन घालून मृत्यु घटका पळें मोजीत बसला आहे. ज्या तुझ्या पित्याशीं तूं आज भांडण केलेंस तोच आतां हिंदुस्तानचा सम्राट् होणार. त्याच्या अविचारी व भयंकर रागांत तूं सांपडलास तर मी नसतांना तुला आपलें कसें बरें संरक्षण करतां येईल ? मी कबरस्तानांतील चिरशीतल व शांतिमय शय्या सोडून तुझ्या साहाय्याला धांवून येईन असें कां तुला वाटतें ? आतां शेवटीं माझें तुला इतकेंच सांगणें आहे कीं, तूं कांहीं दिवस फत्तेपूर शिक्री येथील राजवाड्यांत जाऊन रहा. मी त्या मुदतींत तुझ्याबद्दल तुझ्या बापाच्या मनांतील राग घालविण्याचा प्रयत्न करतों. त्यानंतर मी तुला पत्र पाठवीन त्याप्रमाणें तूं तांबडतोब आग्र्याला निघून ये-"

नंतर आजोबाच्या-सम्राट् अकबरशाहाच्या-हुकुमाप्रमाणें खुसरू पश्चात्तापयुक्त अन्तःकरणानें फत्तेपूरशिक्रीला येत होता, व त्याच्याबरोबर अंगरक्षक म्हणून फक्त तीनच घोडेस्वार होते. रस्त्यांत त्यानें रमणीचें केविलवाणें ओरडणें व ऐकलें तो आपल्या सेवकांसह काळोखांतूनच धांवला, आणि त्यानंतर काय प्रकार झाला तें वाचकांना माहीत आहेच.

# प्रकरण २५ वें.

—:०:—

## रूमी बेगमचा—अर्जीचा उपदेश.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं खुसरू, झालेल्या प्रकाराबद्दल विचार करीत आपल्या विश्रांतिमहालांत बसला होता, इतक्यांत रेशिया दासी तेथें आली आणि कुर्निस करून म्हणाली, "शहाजादेसाहेब ! रूमीबेगमसाहेबांनीं आपणाला बोलाविलें आहे."

नंतर खुसरूनें त्या दासीच्या तोंडून पौर्णिमेच्या खुशालीची हकीगत ऐकली व तो उद्विग्न चित्तानें बेगम साहेबांच्या महालांत आला.

बेगमसाहेबांनीं मोठ्या प्रेमानें त्याला आपणाजवळ बसवून घेऊन म्हटलें, " खुसरू ! अकस्मात् असा आग्ऱ्याहून तूं कां निघून आलास ? सम्राट्ची प्रकृती कशी काय आहे ! "

खुसरूनें उत्तर दिलें, " सम्राट् खुशाल आहेत, " पण या एका वाक्यापुढें त्याच्यानें कांहीं बोलवेना. तो अकस्मात् स्तब्ध झाला. कारण आपण फत्तेपूरला कां आलों, याबद्दलची खरी हकीगत सांगतांना बऱ्याचशा आणखीहि गोष्टी सांगाव्या लागतील. अर्थात् अशा बिकट प्रसंगीं गप्प राहण्यावांचून दुसरा मार्गच नव्हता, व तोच त्यानें पत्करला.

खुसरू अकस्मात् स्तब्ध झालेला पाहून रूमीबेगम संशयित मनानें म्हणाली, " हा काय प्रकार आहे खुसरू ? तूं अकस्मात् येथें येण्याचें कारण सांगण्याला असा स्तब्धपणा कां स्वीकारतोस ? "

ही रूमीबेगम खुसरूला अत्यंत ममतेनें वागवीत असे. अर्थात् खुसरू तिच्याजवळून कोणतीही गोष्ट गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करीत नसे. आताही तसेंच झालें. रूमीच्या अत्यंत आग्रहानें खुसरूला झालेली हकीगत तिच्यापुढें मुकाट्यानें सांगावी लागली; आणि ती सांगतांना त्याला फार वाईटही वाटलें.

खुसरूनें सांगितलेली ही हकीगत ऐकल्यानंतर रूमीबेगम कांहीं वेळ विचार करीत स्तब्ध राहिली. नंतर म्हणाली, " हाय हाय ! ! खुसरू, जर तूं क्रोधांध न होऊन आपल्या बापाशीं असा विरोध न करतास तर फार

चांगलें झालें असतें. तूं हें असें भांडण करून फारच मोठी चूक केली आहेस—!"

यावर खुसरू पश्चात्ताप पूर्ण स्वरानें म्हणाला, "काय करूं दादीजी (आजी) होऊं नये ती गोष्ट झाली. अपराध झाला खरा; पण त्याबद्दल मला क्षमा नाहीं का मिळणार? ते वडील आणि मी त्यांचा मुलगा आहें. बाप मुलाला केव्हांच क्षमा करीत नाहीं का?"

रूमी-बेगमचा चेहेरा याचवेळीं कांहींसा प्रफुल्लित झाला. ती कांहींशी प्रसन्न स्वरानें म्हणाली, "होय; पण तूं ती क्षमा मागितलीस तर मिळेल कीं नाहीं, याविषयीं संशयच आहे. तुझ्यासाठीं ही क्षमेची याचना मीं करण्याचें ठरविलें आहे. सुलतानची आई खास बेगम हिच्या मृत्यूनंतर मी आणि सेलिमाबेगम हिनें, सेलिमला आईच्या जागीं होऊन त्याला लहानाचा मोठा केलें आहे. अर्थात् तुझ्यासाठीं मीं ही लहानशी भिक्षा मागितल्यास तो ती देण्याला अनमान करणार नाहीं. कारण अद्याप तो बादशाहा झालेला नाहीं आणि हिंदुस्तानचा सम्राट् अद्याप त्याच्यावर हुकूमहि चालवूं शकेल अशा स्थितींत तो आहे—"

खुसरू मध्येंच म्हणाला, "सम्राट्ची आवडती व प्रियकर बेगम माझ्यासाठीं इतकें हलकेपणाचें काम कसें बरें स्वीकारील. आजी! माझ्यासाठीं तूं इतकी कमी दर्जाची कामागिरी स्वीकारूं नकोस. माझें काय व्हायचें असेल तें होऊं दे."

इस्तंबुली अथवा रूमीबेगम हिचा चेहेरा आतां ज्यास्तच उज्ज्वल दिसूं लागला. ती स्वाभिमानपूर्ण व दृढ स्वरानें म्हणाली, "पतीजवळ अथवा मुलाजवळ कोणतीही गोष्ट मोकळ्या मनानें बोलण्याला अथवा कांहींही मागण्याला पत्नी अथवा आई यांचा अडथळा असणें केव्हांही योग्य नव्हे. तसा तो नसतोहि व मला तर केव्हांही नाहीं. तुझा बाप सुलतान सेलीम हा माझ्या उदरीं जरी जन्माला आला नाहीं, तरी सम्राट्ची मीं विवाहित पत्नी आहें, अर्थात् त्याच्या मातृत्वाची जबाबदारी माझ्यावर असून त्याला ही ती कळत आहे."

चंचल मनाचा खुसरू, कांहींसा विद्रूपपूर्ण स्वरानें म्हणाला, "जो मुलगा पितृद्रोही झाला, तो मातृद्रोही होऊं शकणार नाहीं का दादीजी?"

यावर इस्तंबुलीबेगम क्रुद्ध स्वरानें म्हणाली, " एक शब्दही आतां बोलूं नकोस खुसरू ! आणि असला हा मत्सरपूर्ण मनोभाव तूं कुठेंही व केव्हांही उघड करूं नको. इतकेंच नव्हे, तर शक्य तितक्या लवकर तो तुझ्या मनांतूनही काढून टाकण्याचा प्रयत्न कर. कारण तो भाव जर तुझ्या हृदयांत राहील तर तूं लवकर मोठ्या संकटांत पडशील. विस्तवाची ठिणगी पडतांच ती विझविण्याचा प्रयत्न न करतां तिला फुंकर घालणें हें अगदीं भयंकर मूढत्वाचें लक्षण आहे. असो. व्यर्थ तर्क वितर्क करीत बसण्यांत अर्थ नाहीं. मीर--मुन्सीला सांगून मी आज आग्र्याला जाण्याची सगळी व्यवस्था करून घेतें. आतां ही आजारी हिंदुरमणी इथें आहे, तेव्हां मी फिरून येईपर्यंत तिच्यावर योग्य मनुष्यमार्फत शक्य तितकी नजर ठेव, आणि मी आग्र्याला पोहोंचल्यानंतर जसजसें कळवीन तसतसें तूं आपलें वर्तन ठेव, व सांगेन तें काम कर. हट्टी व दुराग्रही बनून निष्कारण आपला घात करून घेऊं नकोस."

झालें आणखीं कांहीं सावधपणाचा उपदेश करावयाचा होता तो करून रूमीबेगम आग्र्याला निघून गेली. फत्तेपूर--शिक्रीहून आग्रा शहर फारसें लांब नव्हतें. अर्थात् ती तेथें योग्य त्या वेळांत पोहोंचून तिनें आपल्या कार्यालाही आरंभ केला.

---

# प्रकरण २६ वें.

—:०:—

## तूं विधवा नव्हेस, तुझें सौभाग्य कायम आहे !

इस्तंबुलीबेगम पौर्णिमेची सगळी व्यवस्था आईप्रमाणें प्रेमळपणानें करीत असे. पौर्णिमा ही एका दरिद्री क्षत्रियाची कन्या आहे, हें माहीत असूनही, अतुलवैभवशालिनी रूमीबेगम तिची स्वतःच्या मुलीप्रमाणें परिचर्या पहात असे; यामुळें पौर्णिमा मनांतल्या मनांत तिचे अत्यंत उपकार मानी व आपण आयुष्यभर हिच्याशीं कृतज्ञ राहिलें पाहिजे असेंहि मनांत म्हणे. इस्तंबुली आग्र्याला गेल्यानंतर रेशियाकडूनही तिची चांगलीच शुश्रूषा होत असे, त्यामुळें रेशियेशीं ती अगदीं जिवाची मैत्रीण बनली व त्यांचा स्नेह फारच वाढला.

रूमीबेगम जातांना पौर्णिमेला सांगून गेली होती, "या महालांत पुरुषाला येण्याची परवानगी नाहीं. तसेंच याच महालाला लागून बाहेर एक गुलाब-बाग आहे, वाटल्यास तिथें तूं नेहमीं फिरायला जात जा. मी पांच-सहा दिवसांत आग्र्याहून मागें फिरेन असें मला वाटतें. मी परत येईपर्यंत मात्र तूं जाऊं नकोस. तुला इथें कुणीही त्रास देणार नाहीं."

जिच्याशीं आजन्म कृतज्ञ राहण्याचें पौर्णिमेनें ठरविलें होतें, तिचें हें सन्मान्य सांगणें ती कसें बरें अमान्य करील ? अर्थात् ती बेगमच्या सांगण्याप्रमाणें वागण्याला तयार झाली, यांत मुळींच आश्चर्य नाहीं ! बेगम निघून गेल्यानंतर रेझियेला अनेक प्रकारचीं कामें करण्याचें अंगावर पडल्यामुळें तिला नेहमीं पौर्णिमेजवळच बसून राहण्याला मिळत नसे. पौर्णिमेच्या जेवण-खाणासाठीं तिला एका निराळ्या स्वतंत्र खोलीची व्यवस्था करून देण्यांत आली होती. तसेंच एक हिंदू स्वयंपाकीण व एक नोकरही तिच्या तैनातींत देण्यांत आला होता. तरी पण पौर्णिमा स्वयंपाकिणीच्या हातचें दुपारचें जेवीत नसे. रात्रीं फराळाचें मात्र तिच्याकडून करून घेई. कारण काय असेल तें असो; पण ती अशा रीतीनें वागत असे एवढें मात्र खरें.

गुलाब-बागेंत फिरायला जाण्याची तिला आतां संवयच झाली होती. अर्थात् ती रोजचें फिरायला जाणें कधींही चुकवीत नसे. त्या लहानशा, पण मनोहर उद्यानांत चोहोंकडे गुलाबाचेच हृदयंगम ताटवे दिसत असत व त्यांना नेहमीं बहार आलेला असल्यामुळें तर तें एक नन्दनवनच वाटे. या उद्यानांत बसण्यासाठीं पुष्कळ, संगमरवरी चबुत्रे करण्यांत आले होते व तेथें बसण्यांत फारच सुख वाटे.

आज पौर्णिमा बागेंत फिरायला आली तेव्हां चांगलीच संध्याकाळ झाली होती. नीलाकाशाला हृदयंगम असा रुपेरी रंग देत भगवान् अंशुमाली चंद्रमा नुकताच क्षितिजापासून पुढें सरकत होता. आरक्तवर्ण गुलाबसुमनांच्या सुकुमार अंगावर चंद्राचे सुधाधवल किरण पडल्यामुळें एक अपूर्वच शोभा दिसत होती. पौर्णिमा बराच वेळपर्यंत इकडे तिकडे फिरली. या वेळीं आपल्या शोचनीय नशिबासंबंधानें, सैतान लजपतसिंहाच्या अत्याचारासंबंधानें व रूमी बेगमसाहेबांच्या उदारतेसंबंधानें तिचे अनेक तऱ्हेचे विचार चालले होते,

पण तिच्या अशक्त मनाला व देहाला त्या फिरण्यामुळें आणि विचारांमुळें अतिशय ग्लानी आली, व ती श्रांत होऊन एका संगमरवरी चवुत्र्यावर झोंपली. कारण सध्यां तिला बरीच अशक्तता आलेली असल्यामुळें महालांतही जाण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें.

पौर्णिमेसारख्या सौंदर्यदेवतेला शांतपणानें झोंपलेली पाहून, मलयानि-लाला तिची शुश्रूषा करण्याचा लोभ आवरणें अशक्य झालें. त्यानें नुकत्याच फुललेल्या गुलाबांचा सुगंध चोरून आणून तो मोठ्या कुशलतेनें त्या सुंदरीच्या नाकाजवळ धरला, व अतिशय सावधपणानें तिचा केशभार इकडे तिकडे करण्याला त्यानें सुरवात केली. तिच्या उघड्या ललाटप्रदेशावर, मौ-क्तिकबिन्दुप्रमाणें घर्मबिन्दु चमकत होते; पण ते तो आपल्या सौगंधिक स्निग्ध निःश्वासानें पुसून टाकूं लागला; या परिचर्येचा परिणाम असा झाला कीं, पौर्णिमेला पूर्वीपेक्षांही ज्यास्त गाढ झोंप लागली.

याच वेळीं विलक्षण योगायोगानें आणखी एक व्यक्ति त्याच उद्यानांत आली. या बागेंत दुसऱ्या कुणाला येण्याला परवानगी नसली तरी शाहाजा-द्याला हरकत नव्हती. खुसरूच्या महालाला लागूनच असलें एक उद्यान होतें; पण त्या ठिकाणीं इतर सगळीं फुलझाडें असून गुलाबाचीं मुळींच नव्हतीं. त्यामुळें कांहीं बसराई गुलाब ताजे फुलले असल्यास जमवून आणून करमणूक करावी असें मनांत येऊन तो रुमी बेगमसाहेबांच्या गुलाबबागेंत आला होता. या दोन महालांमध्यें एक लहानशी संगमरवरी दगडांची भिंत असून इतर कांहींच अडथळा नसल्यामुळें खुसरू तेथें सहज येऊं शकला. कारण त्या भिंतींत एक गुप्तद्वार बसविलेलें असून तें सम्राट् अगर शाहाजादा यांनाच उघडण्याची परवानगी होती. असो.

खुसरू उद्यनाच्या मागाहून आला होता, यामुळें चवुत्र्यावर झोंपलेल्या पौर्णिमेच्या बाबतींत आगाऊ असें त्याला कांहींच समजलें नव्हतें; पण पुढें येतांच अकस्मात् त्याची दृष्टि त्या चवुत्र्याकडे गेली व त्यानें कांहींसें पुढें होऊन पाहिलें तो, त्या वेदीवर झोंपलेली सौंदर्यशालिनी पौर्णिमाच त्याच्या नजरेस पडली.

अपूर्व सौंदर्यमयी पौर्णिमेच्या झोंपलेल्या शांत चेहेऱ्यावर चंद्राचा स्वच्छ प्रकाश पडला असल्यामुळें पहाणाराला वाटलें असतें, कीं, ही कोणी स्वर्गी-

तील अप्सराच या उद्यानांत गुलाबाचीं फुलें नेण्यासाठीं आली होती; आणि फिरतां फिरतां श्रांत झाल्यामुळें ती या वेदीवर झोंपली आहे. आणि खुसरूला पौर्णिमा म्हणजे खरोखरच एक परीच वाटत असे.

निर्जनता आणि पूर्ण एकान्त असल्यामुळें खुसरूच्या चंचल हृदयांत सैतानानें प्रवेश केला, आणि तो त्या सैतानसंचारानें अधिर होऊन आशापूर्ण मनानें ओरडून म्हणाला, "तूं अशी इतकी जवळ असूनही तुझें हें मुक्त सौंदर्य पाहण्याचा मला केव्हांहि प्रसंग आला नाहीं! पौर्णिमे, तूं किती बरें सुन्दर आहेस! हाय! माझी प्यारी जर तुझ्या इतकी सुन्दर असती तर--"

खुसरूच्या या आवेगमय ओरडण्यानें पौर्णिमा पूर्ण जागृत झाली, व घाईघाईनें वेदीवरून खालीं उतरून रुष्ट स्वरानें म्हणाली, "शाहाजादेसाहेब! आपल्या हृदयाचा मोठेपणा तो हाच का? मला अकालीं वैधव्य आणूनही तुमचं समाधान झालं नाहीं वाटतें!! आपली ती परोपकारप्रवृत्ति आतां कुठं गेली बरं? ज्यासाठीं आपण मला रस्त्यांतून मूर्छितावस्थेत येथें आणलें, त्यासाठींच आपण आतां पुढं सरलां काय? अशा निर्जन ठिकाणीं निजलेल्या तरुणीसमोर आपण जें वेड्यासारखें बडबडलां तें सम्राट्च्या लाडक्या नातवाला चांगलेंच शोभत असेल नाहीं बरं?"

खुसरू कांहींसा चमकला आणि थोडा वेळ थांबून म्हणाला, "तूं झोंपलेली असतांना आकस्मिकपणानें येथें येऊन बोलूं नये ते शब्द बोलून गेलों हें मी कबूल करतों; पण पौर्णिमे! तूं आतां आणखी काय म्हणालीस? मीं तुला विधवा केलें? तुझ्या वैधव्याला मीं कारण झालों, असाच तुझ्या बोलण्याचा अर्थ नाहीं का? पण तुला हें सांगितलें कुणीं? मी खुदाची शपथ घेऊन सांगतों, अजूनपर्यंत निष्कलंक असलेले हे माझा हात मनुष्याच्या रक्तानें केव्हांही कलंकित झालेले नाहींत."

पौर्णिमा उत्तरली, "पण मीं लजपतसिंहाच्या तोंडून ऐकलें आहे कीं, 'आपल्या हुकुमानेंच दुर्जयसिंहांना विषप्रयोग होऊन ते कैलासवासी झाले?"

खुसरू या वेळीं कांहींसा आवेशपूर्ण स्वरानें म्हणाला, "खोटी गोष्ट! तूं एका भयंकर कृष्णकारस्थानांत सांपडल्यामुळें असें कांहीं तरी बरळत

आहेस. तुझा प्रियकर दुर्जयसिंह अजूनही जिवंत आहे. पण तुझें सौभाग्य कायम आहे असें जरी मी सांगूं शकलों तरी तुझा हृदयेश्वर सध्यां कुठें आहे तें मात्र मला सांगतां येणार नाहीं. कारण मला ती चवकशी करायला सवडच मिळाली नाहीं."

"पण तुम्ही सांगतां याला आधार काय?" पौर्णिमेनें साशंकपणानें शाहाजाद्याकडे पहात प्रश्न केला. खुसरूनें चटकन् उत्तर दिलें, "आधार पाहिजे? हा पहा तर आधार. हे पत्र दुर्जयसिहानें, तुझ्याकडे गुप्तपणें देण्यासाठीं लजपतसिंहाजवळ दिलें होतें; पण सैतानजाद्या लजपतसिंहानें तें तुला दिलें नाहीं. काल मीं त्याची झडती घेतली तेव्हां त्याच्या आंगरख्यांत मला हें पत्र सांपडलें."

खुसरूनें एक लहानसें पत्र पौर्णिमेच्या हातांत दिलें. लागलीच तिनें आपल्या प्रियकराचें अक्षर ओळखलें व तें पत्रही वाचून पाहिलें. त्यामुळें शाहाजाद्याबद्दलची तिची संशयनिवृत्ति तावडतोब झाली. व त्याबरोबरच लजपतसिंहानें, आपणाला फसवून ताब्यांत घेण्यासाठीं हें कृष्णकारस्थान केलें असलें पाहिजे अशीहि तिची खात्री व्हायला वेळ लागला नाहीं.

नंतर लजपतनें दिलेली ती मुद्रिका खुसरूला दाखवून पौर्णिमा म्हणाली, "या नराधम रजपुतानें मला ही आंगठी दाखवून चांगलीच फसविण्याचा बेत केला होता, मीहि त्याच्या त्या कारस्थानानें फसत चाललें होतें. त्या दुष्ट लजपतानें हें असें कां केलें तें मला आतां चांगलेंच कळून आलें आहे. खरोखर मनुष्य आकस्मिक दुःखांत सांपडला कीं, असाच फसत असतो.

खुसरूला, या भाषणानें 'अंधारांत आपणाला एक प्रकाश किरण दिसला' असेंच वाटलें. विलक्षण योगायोगामुळें त्याच दिवशीं त्यानें लजपतसिंहाच्या अपराधाची चवकशी करून त्याला जन्मभर कैदेची शिक्षा दिली होती. लजपतनें सगळया गोष्टी खुलासेवार रीतीनें सांगितल्यामुळें त्याला त्याचें जीवन मिळालें होतें; पण जन्मभर कारागृहवासाची कठोर शिक्षा मात्र त्याला भोगण्यावांचून गत्यंतरच नव्हतें.

खुसरूनें सांगितलेली एकंदर हकीगत ऐकून, पौर्णिमेला वाटलें, 'आपण शाहाजाद्याबद्दल उगाच संशय घेतला,' व या गोष्टीचा तिला पश्चात्तापही झाला.

ती हात जोडून खुसरूला म्हणाली, "मीं आपणावर निष्कारण संशय घेत- ल्याबद्दल आपण मला क्षमा करा शाहाजादे साहेब!"

पौर्णिमेचा हा लीनपणा पाहून खुसरूला वाटलें, 'हा सुयोग चांगला आहे. तेव्हां याचवेळीं आपला हेतु साधला तर पहावा—' हा विचार मनांत येतांच तो अधिरपणानें बोलूं लागला, "तुला क्षमा करायला मी नाकबूल आहें असें नाहीं. तुझ्या समाधानासाठीं त्या दुष्ट लजपतसिंहाचें मस्तक धडा- वेगळें करून तुला नजर करायलाही मला संकोच वाटणार नाहीं, आणि पौर्णिमे! सुंदरी!! तुझ्यासाठीं मी काय करूं शकणार नाहीं? आज माझ्या हृद- याच्या वृत्ति अगदीं मोकळ्या झाल्या आहेत. त्यांना मुळींच बंध म्हणून राहिला नाहीं. मी त्यादिवशी तुझ्या स्वरूपाचा मोह सोडून निघून आलों; पण आज मात्र मी येथून हालूं शकणार नाहीं. दुर्जयसिंह कुठें गेला आहे, हें अद्याप समजलें नाहीं व शिक्षेच्या भीतीनें तो आतां इकडे येईल असेंहि वाटत नाहीं. तसेंच लजपतसारख्या एका सैतानाच्या हातून तुला मींच सोडविलें आहे. अर्थात् त्यासाठीं तूं माझ्याशीं कृतज्ञ असणें भाग आहे. त्याचप्रमाणें एका भयंकर आजारांतूनही मींच तुला उठविलें आहे. तेव्हां माझा तुझ्यावर अजूनही अधिकार चालणार नाहीं? आकांक्षा, ज्वालामय पिपासा, उत्तेजित प्रवृत्ति आणि हृदयांत गुप्तवेषी सैतान यांनीं आज मला अगदीं पिशाच्च बनवून सोडलें आहे. तेव्हां आतां विचारच नको. पौर्णिमे! तूं आतां माझ्याबरोबर माझ्या खासमहालांत चल. तुला रत्नालंकार पाहिजे असतील तर गोवळकोंड्याच्या उज्ज्वल हिऱ्यांनीं तुझा सगळा देह सुशोभित करून सोडतों. तुला राजराजेश्वरी होण्याची इच्छा असेल तर मी तुझ्यासाठीं पितृ- द्रोही बनून त्याच्या मस्तकावरील रत्नखचित राजमुकुट तुझ्या मस्तकावर ठेवतों. व मग सखे! आग्र्याचें राजसिंहासन तुझ्या सुकोमल पादस्पर्शानें थोड्याच वेळांत धन्य होऊन जाईल? तुझी पहिली भेट झाल्यापासून मीं तुझ्या विर- हाचें पुष्कळ दुःख अनुभविलें आहे व ही वासना मनांत उत्पन्न होऊं नये म्हणून मीं पुष्कळ प्रयत्नही केले आहेत; पण आज पाहिलें तों, मी प्रथम भेटीच्या वेळीं तुझ्यासाठीं जितका उत्सुक होतों तितकाच आतांहि आहे. माझ्या प्रयत्नापेक्षां तुझी सौंदर्यसम्मोहनशक्ति फारच तीव्र असल्यामुळें मला

त्यापासून दूर सरवत नाहीं. पौर्णिमे ? तूं कां बरं इतकी सौंदर्यसंपन्न होऊन या पृथ्वीवर आलीस ? खरोखर, हें तुझें सौंदर्यच मला वेडा बनवीत आहे !”

खुसरू इतकें बोलूनच न थांबतां पौर्णिमेला आपल्या विरहसंतप्त हृद्-पाशी धरावें म्हणून तो पुढें सरला; पण पौर्णिमा प्रसंग ओळखून प्रथम पासूनच सावध असल्यामुळें ती कांहींशी दूर सरली आणि आरक्त नेत्रांनीं खुसरूकडे पहात तीव्र स्वरानें म्हणाली, “ मोंगल राजवंशांत इतके नीच प्राणी जन्माला येऊं शकतात, हें मला अद्याप माहीत नव्हतें खुसरू ? तुम्हांला अकबरशाहाचे नातू असें सगळें जग मानीत आहेना ? मग तुमचें हृदय इतकं क्षुद्र कसं ? रत्नें आणि हिरे म्हणजे मी माळावरचे गोटे समजतें ! जग त्या गोट्यांना जितकी किंमत देतें तितकीच मी या तुमच्या हिऱ्यांना देतें ! तुमची ती रक्तानें माखलेली आग्र्याची मसनद कुणाला पाहिजे ? स्वधर्म-परायण अशी क्षत्रियकन्या अत्यंत गरीब असली तरी असल्या ऐश्वर्याला ती अत्यंत तुच्छ मानते आज आपण उच्चारलेले कलुषित शब्द ज्या जिव्हेच्या योगानें तुम्हांला बोलतां आले त्या जिव्हेला व ती देणाऱ्या विधा-त्याला शतशः धिक्कार असोत. त्याचप्रमाणें निराश्रिताला आश्रय आणि जीव-नदान देणाऱ्या तुमच्या त्या परोपकारीत्वालाही धिक्कार असो ! सगळ्या रज-पुत स्त्रिया म्हणजे कांहीं अम्बरच्या राजकन्या नव्हत, आणि सगळे रजपुत म्हणजे कांहीं मानसिंह नव्हत ! शाहाजादेसाहेब ! यवनवैभवाला भुलणारे स्त्रीपुरुष आमच्या आर्यसमुदायांत फारच थोडे मिळतील ! खुसरू ! तुमच्या हृदयाचा मोठेपणा तो हाच काय ? एका निराश्रित, असहाय आणि संकट-ग्रस्त अशा स्त्रीवर, ती एकाद्या भयंकर कारस्थानाच्या गुंतागुंतींत सांपडल्या-चा फायदा घेऊन तिला भ्रष्ट करण्यासाठीं पुढें सरणें हाच तुमचा शूरपणा काय ? अकबरशाहाचा वंश याच कृत्यांनीं या हिंदुस्तानांत आपलें नांव अजरामर करणार वाटतें ! अशानें कदाचित् तुम्हीं सम्राट्च्या थोर नांवाला कलंकही लावूं शकाल ! ! माझी आतां तुमच्याशीं ज्यास्त बोलण्याची इच्छा नाहीं. रस्ता सोडा. मला माझ्या मार्गानें जाऊं द्या । ”

दुसऱ्या एकाद्या प्रसंगीं जर पौर्णिमा हे शब्द शाहाजाद्याला बोलली असती तर त्या शूर खुसरूनें तिला आजन्म कारागृहांतही टाकण्याला कमी

झालें नसतें; पण यावेळीं खुसरूला सैतानानें पुरें अन्ध बनविलें असल्यामुळें, याच्या हृदयाचा नैसर्गिक मोठेपणा, शील आत्ममर्यादा आणि ज्ञान यांचा लोप झाला होता. सौंदर्याच्या उन्मादानें वेडा झालेला खुसरू, पौर्णिमेचें हें मर्मभेदक भाषण न ऐकलेंसें करून अधिरपणानें पुढें सरला आणि म्हणाला, " आतां तूं मला ज्यास्त दुःख देऊं नकोस. विषयवासनेच्या ज्वाला, अग्नीच्या ज्वालेपेक्षांहि तीव्र असतात. प्रियतमे ! मी तुला माझ्या धर्मपत्नीचे सर्व अधिकार देतों. फार काय ! माझ्या प्यारी बेगमलाहि तुझी दासी बनवितों; पण आतां एकवार तरी तुझ्या या गोंडस हातांचें, गुलाबासारख्या सुकुमार गालांचें आणि-आणि जगाला वेडें करून सोडणाऱ्या तुझ्या या अधरांचें मला प्रेमभरानें चुम्बन घेऊं दे, म्हणजे मी कृतार्थ होईन ! इतकेंच नव्हे, तर मला स्वर्गीय सुखाचा उपभोग घेतलासेंच वाटेल. नको. सुंदरी ! पौर्णिमे ! ! मला असें आतां तळमळत ठेवूं नकोस ! "

असहिष्णु खुसरूला आतां तिच्या सम्मतीची वाट पहात राहाणें अशक्य झालें. त्याने बलपूर्वक पौर्णिमेचा गोंडस व सुंदर हात आपल्या हातांत घेतला, आणि म्हटलें, " निष्ठुर प्रिये ! तुझी मीं इतकी प्रार्थना केली, तरी देखील तूं मजवर दया करीत नाहींस ना ? मी अपराधी नाहीं. माझा तिरस्कार करूं नकोस. मला तूं दोषही पण देऊं नकोस. कारण हा दोष कदाचित् माझ्या नेत्रांचा अथवा तुझ्या जगन्मोहन सौंदर्याचा असूं शकेल; मग सुंदरी! याला माझा काय बरें इलाज ? "

पौर्णिमेनें जोरानें खुसरूच्या हातांतून आपला हात सोडवून घेतला आणि ती दूर जाऊन उभी राहून म्हणाली, " पतीव्रतेच्या अभिमानाची जर कांहीं किंमत असेल, पतीव्रतेच्या तेजांत जर कांहीं सामर्थ्य असेल, व दुर्जयसिंहांना पारखी झालेली असून या पौर्णिमेनें जर त्यांच्या पायांवाचून इतर कोणाचें केव्हांही चिंतन केलें नसेल, तर खुसरू, ' मी आतां तुला जो शाप देत आहें, तो खरा होईल. मला छळणाऱ्या कामांध नराधमा, तूं शाहाजादा अस, अगर दुसरा कोणीही आपणाला श्रेष्ठ मानणारा जंतु अस; पण एके दिवशीं हे तुझे दोन्ही नेत्र दृष्टिशक्तिहीन होतील. तुला कांहीं दिसणार नाहीं. तूं अंधळा होशील, आणि खुसरू ! तुझा हा आजचा अभिमान कायमचा नाहींसा

होऊन तूं धायमोकलून रडत बसशील! आज तूं माझ्या नेत्रांतून ज्या रीतीनें अश्रुधारा वाहावीत आहेस त्याच रीतीनें कोणत्याना कोणत्या तरी दिवशीं तूं असहाय होऊन रडत बसशील आणि त्या वेळीं हा सगळा प्रसंग तुला आठवेल. समाधानी मनुष्याचा आशिर्वाद् आणि दुःखिताचा शाप केव्हांही खरा झाल्यावांचून राहाणार नाहीं, असें या अनाथ पतीव्रतेचें तुला शेवटचें आणि निक्षून सांगणें आहे! "

पौर्णिमा त्या आवेगाच्या भरांत आणखीहि कांहीं बोलली असती; पण त्याच वेळीं एक दीर्घकाय पुरुष त्या ठिकाणीं असलेल्या वृक्षछायेच्या अंधारांतून एकदम पुढें झाला, आणि त्यानें खुसरूला एवढ्या जोरानें धक्का दिला, कीं, तो आपला तोल न सांवरतां आल्यामुळें एका चबुत्र्यावर धाडकन् पडला व लागलीच त्याला मूर्छा येऊन अचेतन झाला. पौर्णिमेनें आश्चर्यानें आपल्याला साहाय्य करणाऱ्याकडे पाहिलें, तों तिला गंभीर स्वरूपांत उभा असलेला एक मुसलमान फकीर दिसला. जणुं काय आपण कांहींच केलें नाहीं असें त्याला वाटत असावेंसें दिसलें.

त्या फकिराचा चेहेरा लांचलचक दाढीमिशांनीं अगदीं झांकून गेलेला होता; तरी पण त्यांमधुनही त्याचा अग्नीसारखा तेजस्वी चेहेरा सूक्ष्मरीतीनें पहाणाराला स्पष्ट दिसत असे. नेत्रांतून तर अग्नीच्या ज्वाला बाहेर पडत आहेत कीं काय, असाच भास होत होता. पौर्णिमेला कांहींहि बोलण्याला अवसर न देतां तो तिला गंभीर स्वरानें म्हणाला, " कांहींही न बोलतां माझ्याबरोबर चल; कारण आतां तुझ्यावर भयंकर संकट येण्याचा संभव आहे. " नंतर तो चालूं लागला. फकिराकडे शाहाजाद्याच्या नांवाची मुद्रिका असल्यामुळें दरवाजावरच्या पहारेकऱ्यांनीं सन्मानपूर्वक त्याला दरवाजा उघडून दिला.

फकीर पुढें चालला होता, व पौर्णिमा त्याच्या मागुन निमूटपणें चालली होती. अर्धा कोस मार्ग चालून जाईपर्यंत कोणी कुणाशीही कांहीं बोललें नाहीं; पण या स्तब्धतेचा कंटाळा येऊनच कीं काय न कळे, पौर्णिमेनें त्या फकिराला प्रश्न केला, " महात्मन्! या अभागिनीला आपला कांहीं परिचय मिळूं शकेल का? "

फकिरानें गंभीर स्वरानें उत्तर दिलें, " पौर्णिमे ! गडबडूं नकोस. मी तुला अपरिचित नाहीं आणि माझ्याकडून तुला त्रासही होण्याचा संभव नाहीं. आम्ही ज्या ठिकाणीं जाणार, ती जागा आतां अगदीं जवळ आलेली आहे. तेव्हां तिथें पोंचल्यावर मी तुला माझी सविस्तर हकीगत सांगेन. "

या अपरिचित फकिराच्या तोंडून आपलें नांव आलेलें ऐकून पौर्णिमेला अत्यंत आश्चर्य वाटलें; पण दुसऱ्याच क्षणीं तिच्या मनांत विचार आला कीं, " हे सगळे फकीर, साधू, संन्यासी वगैरे देवभक्त महापुरुष अंतर्ज्ञानी असतात, त्यामुळें जगांतील कोणतीही गोष्ट त्यांना अज्ञात नसते. अर्थात् माझें नांव या फकिराला समजलें यांत विशेष आश्चर्य तें कसचें ! "

वरीलप्रमाणें मनाशीं विचार करीत पौर्णिमा अगदीं न बोलता फकिराच्या मागून चालली होती. चालतां चालतां माळरान संपून एका रानटी खेड्यांत त्या फकिरासह ती आली. या खेड्यांत बऱ्याचशा लहान लहान झोंपड्या अस्ताव्यस्त रीतीनें बांधलेल्या दिसत होत्या. फकीर, रस्त्याचें एक वळण संपवून एका लहानशा पण प्रशस्त घरासमोर दरवाजांत उभा राहिला आणि मोठ्यानें म्हणाला, " मृण्मयी ! अग मृण्मयी ! ! दरवाजा उघड. "

हांकेचा प्रतिध्वनी आसमंतात् भागीं विलीन होतो तोंच एका लहानशा बालिकेनें दरवाजा उघडला. तिच्या हातांत लहानसाच एक दिवा होता. फकीर, दरवाजांतून त्या घरांत गेला व पौर्णिमा आंत आलीसें पाहून त्यानें दरवाजा लावला आणि त्या बालिकेला प्रेमळ स्वरानें म्हटलें, " मृण्मयी ! आतां रात्र बरीच झाली आहे, तेव्हां तूं जाऊन झोंप. जा. "

फकिराचा हा संसार आणि त्याची ती भाषा ऐकून पौर्णिमा अत्यंत विस्मित झाली. कांहीं वेळानें तिच्यासह फकीर एका लहानशा दिवाणखान्यांत आला व आपला सगळा पोषाख उतरून ठेवून, इतकेंच नव्हे, तर लांबलचक असलेल्या दाढीमिशाही काढून ठेवून प्रसन्न चेहऱ्यानें तो पौर्णिमेला म्हणाला, " मला तूं ओळखूं शकलीस का पौर्णिमे ? "

पौर्णिमेनें एकवार त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें मात्र, तोंच ती आश्चर्यानें म्हणाली, " हें मी काय पहात आहें ! माझे प्रियकर दुर्जयसिंहच का माझ्या

समोर उभे आहेत ? अजूनपर्यंत मी आपणाला ओळखूं शकलें नाहीं. यावद्दल मी किती दुर्दैवी आहे बरें ?? असं वेषांतर करण्याचा आपला काय बरं उद्देश ?"

दुर्जयनें--फकीर हा दुर्जयसिंहच होता--उत्तर दिलें, "वेषांतर करण्यांत माझा कोणता हेतु होता, हें तुला मागाहून समजेल; पण मला असें वाटतें ईश्वराचें तुला अत्यंत सहाय्य असावें. कारण तसें नसतें तर विलक्षण योगायोगानें मी फत्तेपूर शिक्रीच्या राजवाड्यांत कसा येऊं शकलों असतों ?"

पौर्णिमेनें दुर्जयसिंहाचे चरण वंदन करून म्हटलें, "नाथ ! आपण देवस्वरूप आहांत !! मी दुर्दैवी म्हणूनच मला आपल्या चरणांशीं आश्रय मिळालेला नाहीं. पण नाथ ! माझा शोध आपण कसा लाविला ?"

दुर्जय म्हणाला, "तुला आतां थोडक्यांत सगळी हकीगत सांगतों. त्या एकांतातलि कारागृहाच्या वेदना असह्य होऊन मी एका वादळी रात्रीं रतनगडहून पळून गेलों. लजपतसिंह त्यावेळीं रतनगडावरील पहारेकऱ्याचा सहकारी होता. एकेदिवशीं पश्चात्तापपूर्ण अन्तःकरणानें त्यानें माझ्याजवळ क्षमेची याचना केली, व त्यानेंच मला कारागृहांतून पळून जाण्याचा सल्ला दिला. अर्थात् मीं एका काळोख्या व वादळी रात्रीचा फायदा घेऊन तुरुंगाचा दरवाजा फोडला आणि मोकळा होऊन बाहेरील स्वतंत्र जगांत आलों. त्यारात्रीं पुष्कळ वादळ व पाऊस असल्यामुळें माझा कुणीं पाठलाग केला नाहीं व म्हणून मला लांब जाण्याला भरपूर सवड मिळाली. दुर्दैवाची गोष्ट सांगायची म्हणजे, मी जिला कधींहि विसंबलों नाहीं, अशी ती माझी नेहमीं हाताच्या बोटांत असणारी आंगठी मीं तुरुंगांतील एका कोनाड्यांत टाकली होती, ती बाहेर पडतांना मला घेण्याची आठवण न राहून तेथेंच राहून गेली. जरी तिला मी प्राणापलीकडेहि जपत असे तरी पण त्या आंगठीसाठीं पुन्हां त्या भयंकर कारागृहांत जाण्याला कांहीं मला छाती होईना, आणि मनांतल्यामनांत मीं ठरविलें, कीं, मला कारागृहांत टाकण्याला कारण झालेल्या खुसरूचें व अन्यायानें कारागृहांत टाकणाऱ्या मानसिंहाचें सध्यां चालू असलेलें कारस्थान सुचेल त्या उपायांनीं मोडून टाकावें. मीं विचार केला, माझी शक्ति जरी सामान्य असली तरी पण कोणत्या ना कोणत्या उपायानें सुलतान सेलिमच्या आश्रयाला राहून या दोन मुख्य शत्रूंना मीं जमिनदोस्त

करावें, आणि तसें केल्याशिवाय कांहीं मला शांति मिळणार नाहीं. अर्थात् याच्यावर सूड उगविण्याचें मीं बहुतेक निश्चितच केलें आहे. आतां सुलतान सेलीमची भेट घ्यावयाची म्हणजे आपल्या हातांत या दोन शत्रूविरुद्ध कांहीं तरी कागदी पुरावा लागेल व तो पुरावा खुसरूच्या खासमहालांत लपवून ठेवलेला असला पाहिजे अशी माझी खात्री होती. तसेंच त्या कागदपत्रांत खुसरूनें, सेलिमला ठार मारण्याची केलेली व्यवस्थाहि नमूद केलेली होती अर्थात् त्या कागदपत्रांची मला विशेष आवश्यकता असल्यामुळें मीं फकिराच्या वेषानें खुसरूच्या महालांत प्रवेश करून घेतला. खुसरूनें आपल्या नांवाची आंगठी जी तुझ्याजवळ दिलेली होती ती तूं माझ्याजवळच दिलेली होतीस. त्या आंगठीचें मला त्यावेळीं जरी कांहीं कारण वाटलें नाहीं तरी पुढें केव्हां तरी ती उपयोगीं पडेल असें समजून मीं ती आंगरख्याच्या खिशांत ठेवून दिली होती, व त्या तुझ्या आंगठीनेंच मला आज शिक्रीच्या राजप्रासादाचे दरवाजे उघडून दिले. ती आंगठी नसती तर मला मोठी पंचाईत पडली असती.

"खुसरू कांहीं वेळापूर्वी उद्यानांत फिरायला गेला आहे, ही बातमी एका दासीकडून मला समजली. 'शाहाजाद्याची मला भेट घ्यावयाची आहे' असें मीं तिला सांगितल्यावरून, ती मला महालांत बसवून--मला वाटतें--मी आल्याची बातमी देण्यासाठीं ती शाहाजाद्याकडे गेली असावी. मीं अशा कांहीं बेमालूम रीतीनें वेष परिवर्तन केलें होतें, कीं, शाहाजादा कितीही चाणाक्ष असला तरी मला ओळखूं शकला नसता, आणि त्यामुळेंच मी अगदीं निश्चिंत होतों.

"विश्रांति घेण्यासाठीं मी कांहीं वेळ खुसरूच्या त्या सुशोभित महालांत बसलों आणि त्यानंतर ही वेळ चांगली आहे असें वाटल्यावरून त्याच्या कागदपत्र ठेवण्याच्या जागेंतून मला पाहिजे असलेले कागद काढण्याच्या प्रयत्नाला लागलों. त्याठिकाणीं कोणीहि नव्हतें त्यामुळें मी आपलें काम फार सावकाश व शोधपूर्वक करीत होतों; पण पुष्कळ प्रयत्न करूनहि मला कांहींही कागदपत्र मिळवितां आले नाहींत. याचवेळीं त्या महालाच्या पुढच्या भागीं कांहीं लोकांचे पदशब्द व बोलणें ऐकल्यामुळें मी त्या महालांतून घाईघाईनें बाहेर पडलों व मागील उद्यानांत येऊन एका झाडाच्या आश्रयानें

लपून राहिलों. तुझें बोलणें व ओरडणें मीं इथूनच ऐकलें व एकदम पुढें सरलों. पुढें काय झालें तें सगळें तुला माहीत आहेच. ”

पौर्णिमा, विस्मयविव्हल मनानें दुर्जयचें बोलणें ऐकत होती; पण त्याचें बोलणें संपतांच तिनें घाईघाईनें ती दुर्जयची आवडती आंगठी आपल्या ओढणींतून काढून त्याच्या समोर धरली आणि ती गंभीर स्वरानें म्हणाली, “ही आंगठी लजपतनें मला माझ्या वैधव्याचें प्रमाण म्हणून दिली होती; पण नाथ ! ईश्वर अत्यंत करुणामय आणि दुःखितांचा वाली आहे यांत संशय नाहीं. तसं नसतं तर माझा सौभाग्य-तिलक मला इतक्या लवकर तरी निदान सौभाग्यमंडित व भाग्यशाली करता ना. प्राणेश्वर ! घ्यां! ही आपली आवडती आंगठी आपण घ्या ! ! लजपत अत्यंत भयंकर माणूस आहे बरं का !”

असें सूत्रमय वाक्य बोलून पौर्णिमेनें दुर्जयसिंहाला लजपतच्या हातून घडलेला सगळा व्यवहार खुलासेवार रीतीनें सांगितला, तेव्हां पौर्णिमा फत्तेपूर प्रासादांत कशी आली, हें गूढहि त्याला स्पष्टपणें उलगडलें गेलें. लजपतच्या सैतानी कृत्याची हकीगत समजतांच दुर्जयसिंहाच्या मुठी वळल्या गेल्या; पण त्यानें आत्मसंयमन करून मनांतील राग मनांतच जिरविला.

कांहीं वेळ स्तब्धपणांत गेल्यावर दुर्जयनें एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हटलें, “धन्य त्या भगवान् एकलिंगजीची ! त्यानेंच आज तुझें पातिव्रत्य संरक्षण केलें, पौर्णिमे ! माझ्या लाडक्या प्रिये ! आतां माझ्याबरोबर येण्याला तुला तयार झालें पाहिजे. मला वाटतें माझ्या गुरुदेवांच्या आश्रयाला तूं राहिलीस तर तुझ्यावर आतां कोणतेंहि संकट येणार नाहीं. त्या ठिकाणींच तूं कांहीं काल राहावें अशी माझी इच्छा आहे. गुरुजी तीर्थ-यात्रेला जाणार आहेत व हरिद्वारापासून पंचवटी पर्यंत ते कदाचित् जातीलही. कारण तीं ठिकाणें पाहण्याचा त्यांचा उद्देश आहे. उद्यां पहाटेसच आम्हां दोघांना हा गांव सोडून जाणें भाग आहे. हें माझ्या एका मित्राचें घर आहे व त्याच्या या एकट्या मुलीवांचून या घरांत दुसरें कोणीही नाहीं. इथेंहि तुला लपवून ठेवूं शकलों असतों; पण या गांवापासून फत्तेपूराशिकी अत्यंत नजीक असल्यामुळें तो निलाजरा व अविचारी खुसरू आणखीहि तुझ्यावर एखादें संकट आणूं शकेल. ”

यानंतरहि पौर्णिमा व दुर्जय यांच्यांत बऱ्याच सुखदुःखाच्या गोष्टी झाल्या; पण रात्र केव्हांच संपत आल्यामुळें त्यांना आपलें बोलणें आवरावें लागलें. चौथ्याप्रहर रात्रीच्या शेवटच्या घटकेला पडलेल्या स्निग्ध प्रकाशानें सगळी सृष्टि जाग्रत आणि टवटवीत दिसूं लागली. गतरात्रीचा एकंदर प्रकार आठवतांच दुर्जयला वाटलें, आपण मोठ्या दुःस्वप्नांतून आज मुक्त झालों आहों, पौर्णिमा मात्र त्या रात्रीच्या उत्तर कालीं सगळीं सुखस्वप्नेंच पहात होती. उजाडतांच तिला वाटलें 'आजचा सूर्य माझ्या सौभाग्याचा असून हा जीवनांतलि सगळ्या अंधाराचा नाश करून मला आपल्या दर्शनानें पुनीत करण्यासाठीं उगवला आहे.' याला म्हणतात 'दैवाची इच्छा ! !'

# प्रकरण २७ वें.

—:o:—

## दुःखीस्नुषा–पतिव्रतापत्नी–पुत्रवत्सल जननी !

श्यामलशालिला यमुनेच्या दुसऱ्या तीरावर सुलतान सेलीमचा एक मनोहर उद्यान प्रासाद होता, व या प्रासादाचें नांव " शाही–मंजील " सेलिमची मुख्य बेगम शाही जोधाबाई हिच्या नांवावरून या प्रासादाचें नामकरण करण्यांत आलें होतें.

पित्याशीं दुसऱ्यांदा प्रेमळपणें मलिन झाल्यानंतर सेलीम, बरेच महिने आग्र्याच्याच राजवाड्यांत राहिला होता; पण कृष्णस्थानांनीं भरून गेलेल्या राजप्रासादांत ज्यास्त दिवस निःसहाय स्थितींत राहाणें त्याला धाडसाचें वाटूं लागलें. व असलें धाडस करणें योग्य नव्हे असेंहि त्याचें मन त्याला सांगूं लागलें. यानंतर कांहीं दिवसांनीं हत्तींची लढाई झाली व त्यांत त्याचा मनक्षोभ होण्यासारखीं बरींचशीं कारणें घडलीं. तसेंच सेलिमच्या तीक्ष्ण नजरेला असेंहि दिसून आलें कीं, 'आपण स्वतः आजारी असल्यामुळें अकबरशाहानें बहुतेक सर्व राज्यसूत्रें आपला दुधभाई अजीमखान याच्या हातांत दिलीं असून तो आपणाला चांगल्या नजरेनें पहात नाहीं.' अजीमखान म्हणजे खुसरूचा सासरा हें वाचकांना माहीत आहेच. शिवाय तो मानसिंहाचाहि अभिन्नहृदयी मित्र आहे हेंहि पण वाचक विसरले नसती-

:. अर्थात् तो सुलतान सेलिमला चांगल्या नजरेनें कसा पहाणार. फार
च, सुयोग मिळाल्यास सेलिमचें सुखस्वप्न एका क्षणांत नाहींसें करण्यासहि
कमी करणार नाहीं. मग सुलतान सेलिमला, राजसूत्रें त्याच्या हातांत
लीं कशीं पसंत पडावीं.

आगेमागें असणाऱ्या उमरावांचा उद्देश लक्षांत आणून व निरनि-
ळ्या बाजूकडून येणाऱ्या संकटांचा व सुखांचा विचार करून सेलिमनें
त्या मनाशीं ठरविलें, कीं, 'यमुनेच्या परतीरावर असलेल्या 'शाही
ील' मध्येंच कांहीं दिवस राहाणें आपणाला निष्कंटक व सुखाचें होईल'
रा–प्रासादांत बरेचसे श्रेष्ठ दर्जाचे उमराव व अमीर त्याच्या बाजूकडचे
, व त्यांच्याकडून त्याला प्रतिक्षणीं राजवाड्यांत घडणाऱ्या गुप्त गोष्टी
जत होत्या. तसेंच या शाही मंजील मधून सम्राट्‌ची प्रकृति पहाण्यासाठीं
: राजप्रासादांत येणेंहि त्याला अडचणीचें होत नसे. एवंच शाही मंजील-
: येऊन त्याला बरेंचसें मनस्वास्थ्य मिळालें असें म्हणावयास हरकत नाहीं.

या शाही मंजीलमध्यें फक्त सुलतान सेलीम आणि त्याची प्रियतम
ी जोधाबाई हीं दोघेंच राहात असत. याशिवाय त्यांना जरूर असलेले
ाम व दासी तेथें होत्याच. सम्राट्‌च्या हुकुमाप्रमाणें शाहाजादा खुसरू
ोरात फत्तेपूरशिक्रिला निघून गेला, हें या दोघांनाही माहीत होतें. सुल-
: सेलिमला याबद्दल थोडेंसुद्धां वाईट वाटलें नाहीं; पण खुसरूची आई
ीबेगम हिला मात्र फारच दुःख झालें व ती दुःसह मर्मवेदनांनीं तळमळूं
ाली. जोधाबाईला विशेष दुःख वाटण्याला अनेक कारणें होतीं. सम्राट्‌चें
ुखणें बहुतेक अखेरचें होईल अशी तिची मनोदेवता तिला सुचवीत होती.
ेच्या लढाईचा शोचनीय प्रकार तर तिला फारच अस्वस्थ करीत होता
ण खुसरू आणि सेलीम यांचें पुन्हां ऐक्य होईलच असें तिला वाटेना
ि यामुळेंच ती विशेष दुःखित दिसत होती.

शाहीबेगमचा आपल्या भावावर--मानसिंहावर-बिलकुल विश्वास नव्हता.
दुनियेंत खुसरूचें मस्तक बिघडविण्याला जर कोणी कारण झाला असेल,
च त्याच्या चंचल हृदयांत सम्राट् होण्याची राक्षसी महत्वाकांक्षा जर
णीं उत्पन्न केली असेल, त्याचप्रमाणें प्रबल सेनासामर्थ्य आणि

भरपूर पैसा देतों असें सांगून त्याला बंडालाहि कोणी जर उत्सुक केलें असेल तर तें राजा मानसिंहानेंच होय. मानसिंहाचा साहाय्यक अजीमखान तो प्रत्येक कामांत त्याला मदत करीत असे. अर्थात् खुसरूला बिघडविण्याला कांहीं अंशीं तोहि कारण झाला होता. तेव्हां त्याच्यावरही शाहीबेगम फारच रागावलेली असे; पण या तिच्या रागाचा आणि अविश्वासाचा त्याच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं.

सुलतान सेलीमची आणखी एक रजपूत पत्नी असून तिचें नांव जगत्बाई असें होतें. ती मारवाडच्या उदेसिंगाची मुलगी असून इतिहासांत ही 'जगत्-गोसांईजीबेगम' या नांवानें ओळखली जाते. ही जगत्बाई नांवाची बेगमच हिंदुस्तानचा भावी सम्राट् शाहाजादा खुर्रम ( शाहाजहान ) याची आई होय; तरी पण इतर सर्व बेगमांपेक्षां सुलतान सेलीमचें, त्याची पहिली पत्नी अम्बर राज-कन्या व मानसिंहाची बहीण जोधाबाई अथवा शाहीबेगम हिच्यावर अत्यंत प्रेम होतें. कारण ही जोधा स्वरूपानें, गुणानें व पतिप्रेमानें अतुलनीय होती. अकबरशाहाही हिलाच फार ममतेनें व आदरानें वागवीत असत. हिंदुस्तानची भावी सम्राज्ञी हीच शाहीबेगम होणार याच-द्दल कुणालाही संशय नव्हता; पण इतक्या श्रेष्ठ सुखांत असूनही, ही कीर्ति-मती, पतिप्रेमाला वाहिलेली, व पतीच्या प्रेमाला पात्र झालेली शाहीबेगम मानसिक दुःखानें रात्रंदिवस सारखी तळमळत असे. या मानसिक दुःखाचें कारण दुसरें कांहीं नसून तिचा, तिची अवज्ञा करणारा व उच्छृंखल मुलगा खुसरू, स्वार्थपर असें मानसिंहाचें गर्हणीय वर्तन व अजीमखानाचें कृष्ण कारस्थान या तीहींचें घातक एकीकरण होय.

सुलतान सेलीम शाही मंजिल मधून रोजच्या रोज यमुनेच्या अलीकडे येऊन सम्राट्ला भेटण्यासाठीं व त्यांची प्रकृती पहाण्यासाठीं जात असे. तसेंच संध्याकाळीं फिरून तो आपल्या प्रियकरणीच्या भेटीसाठीं उत्सुकतेनें शाहीमंजिलमध्यें येत असे. एके दिवशीं राजवाड्यांतून मंजिलमध्यें येण्याला सेलिमला बराच उशीर झालेला पाहून शाहीबेगम फारच अस्वस्थ झाली व तिला कांहीं सुचेना.

ती अधिर हृदयानें व उत्कंठित मनानें कसाबसा वेळ घालवूं लागली. 'मन चिंती तें वैरी न चिंती' या म्हणप्रिमाणें तिचें हृदय निरनिराळ्या

भयंकर विचारांनीं अगदीं अत्यंत अस्वस्थ होऊन गेलें. नेहेमीं हास्यलहरीनें विकासित होणारा जोधाचा चेहेरा, जणुं काय प्रलयकालीन कृष्णामेघाप्रमाणें विषादपूर्ण दिसत होता. तिची करमणूक व्हावी म्हणून संगीतकुशल अशा दासींनीं वीणा आणि सारंगी यांच्या मधुर सुरांत संगिताचे मधुरालाप घेण्याला सुरवात करून जोधाच्या चेहेऱ्यावर प्रफुल्लता आणण्याचा प्रयत्न चालविला; पण तिला तें गायन मुळींच आवडेना. ती अस्थीर हृदयानें आणि तळमळणाऱ्या मनानें महाला समोरच असलेल्या हवाखान्यांत येऊन, लांचवर पहात उभी राहिली; पण त्या चंद्रालोकसमुज्ज्वलनिशीथकालीं, कालिंदीच्या शीतल जलकणांनीं युक्त असा स्निग्ध समीरही तिच्या हृदयाची तळमळ कमी करूं शकला नाहीं.

नेत्रांसमोर, अनन्त दिशांना पसरलेलें नक्षत्रखचित व नीलिमामय विस्तीर्ण आकाश असून सुनिर्मल चंद्रकिरणाच्या सुधाधवल प्रकाशानें, शाही मंजिलचे गगनस्पर्शी कळस व स्तंभ मनोहर दिसत होते. निष्कलंक अशी रजत दीप्तिमय व अत्यंत शुभ्र अमृतवर्षी सुधांशुकर लेखा, जिच्यांत नीलिमापूर्णजल आहे अशा मृदुकलनादिनी यमुनेच्या चंचल तरंगांवर पडल्यामुळें चूर्ण झालेल्या हीरकखंडाप्रमाणें दिसत होती व मनुष्याचें भाग्यही इतकेंच चंचल व मधून मधून चमकणारें असतें असें सुचवीत होती. त्यामुळें तेव्हां काय होईल हें कोणालाही सांगतां येणार नाहीं, असें स्पष्ट दिसून येत होतें. सृष्टिदेवीच्या या मूकलीला जोधाला दिसत होत्या व त्यांचा तिला अर्थही समजत होता.

ती मनांतल्या मनांत विचार करीत होती, " हाय ! मी कां बरें अम्बरच्या राजवंशांत जन्माला आलें. ' तसंच अकबरबादशहाची सून होण्याचं तरी माझ्या नशिबांत कां लिहिलं होतं ? बरं झालं तें होऊन गेलं, पण असा कुलांगार पुत्र तरी मला देवानें कां दिला ? तसंच अशा कृष्णकारस्थानी भावाची मी बहीण तरी कां झालें ? दिल्लीश्वराची सून होण्यांत हेंच का सुख ? हा यमुनेच्या परतरीवर हजारों उज्ज्वल दीपकांनीं प्रकाशित झालेला आग्र्याचा राजप्रासाद दिसत आहे. प्रासादांतील सर्वोच्च ठिकाणीं बादशहाचा झोंपण्याचा महाल असून असंख्य, दीप्तिमय प्रकाशाचे स्फाटिक दीपक, हा राजमहाल तेथें पौर्णिमेचा आभास उत्पन्न करीत आहेत. तसेंच ती अगणित

व सुगंधी दिव्यांची प्रभा यमुनेच्या तरंगयुक्त वारिराशींवर पडून एक प्रकारचें मनोरम दृश्य नेत्रांना आनंदविण्याचा प्रयत्न करीत असते; पण आज हा सगळा देखावा, निष्प्रभ असा का बरं दिसत आहे ! हाय ! माझा सर्वस्वी घात झाला असं मी समजावं काय !! कृष्णकारस्थानी नीचांच्या जाळ्यांत सांपडून सुलतान सेलीम कैद तर झाले नसतील ना ? आणि माझ्या, आड-मार्गानें जाणाऱ्या उच्छृंखल मुलानें—मोंगल राजकुलकलंक खुसरूनें–आपल्या मातेला अकालीं वैधव्य आणावें म्हणून रक्तानें लाल झालेल्या हातांनीं राजमुकुट तर मस्तकावर धारण केला नसेल ना ? हाय ! हतभागी पोरा ! घात केलास ! सर्वस्वी घात केलास !! ”

याच वेळीं त्या हवाखान्याच्या किंचित् अंधकारमय अशा मागील बाजूच्या एका खांबामागुन जोधाबाईच्या वरील बोलण्याचा कुणीं अदृश्य व्यक्तीनें प्रतिध्वनी केला, “ हतभागी खुसरू ! खरोखरच का तूं सर्वस्वी घात केलास ? ’’

शाहीबेगमनें चकीत नेत्रांनीं व कम्पित हृदयानें मागें वळून पाहिलें, तों जवळच्या लालसंगमरवरी खांबामागून एक व्यक्ती पुढें सरली व ती हळू-हळू तिच्याकडे येऊं लागली. शाही संशयित मनानें व भयचकित स्वरानें म्हणाली, “ कोण आहे बोला ! ” नंतर ती कांहींशी पुढें होऊन पहाते तों तिला स्वतः सुलतान सेलीमच आपल्या ससोर उभा असल्याचें दिसून आलें.

तिची ती स्थिती पाहून सेलीम हंसून म्हणाला, “ शाही ! तूं भ्यालीस कीं काय ? ”

शाहीबेगम आनंदानें सेलिमला आलिंगन देऊन प्रसन्न चेहऱ्यानें म्हणाली, “ अहाहा ! माझं हृदय आतां शांत झालं ! आणि आपण आल्या-मुळें माझी सगळी भीतीही नाहींशी झाली. आपणाला येण्याला उशीर झालेला पाहून माझ्या हृदयाची भयंकर तळमळ होऊं लागली, आणि कुठं कसंच चैन पडेना. नाहीं नाहीं त्या कल्पना मनांत येऊं लागल्या व येऊं नये त्या कुशंकांनीं मला संतापून सोडलं. खरोखर, प्रियतम ! मी त्या कल्पनामय वातावरणांत सांपडून अगदीं भिऊन गेलें होतें–’’

सेलीम म्हाणाला, " कदाचित् तुला वाटलें असेल, 'मानसिंह व अजीमखान यांच्या कारस्थानांत सांपडून मी कैद झालों असेन आणि तुझा औरस व लाडका मुलगा खुसरू यानें बापाच्या रक्तानें आपले हात कलंकित करून आपल्या डोकीवर राजमुकुट घातला असेल. अर्थात् आपणाला वैधव्य आलें–' कां अशीच कीं नाहीं तुझी कल्पना ? "

शाहीनेंहि कांहीं आडपडदा न ठेवतां उत्तर दिलें, " होय. नाथ. मला अगदीं असंच वाटलं. हाय ! पण माझ्या मनाची अशी स्थिती कां वरं झाली. खुदा ! मला या वेदनांतून मुक्त कर !! माझ्यानें आतां ही तळमळ नाहीं सहन करवत !!! "

सुलतान सेलीम शाहीच्या मनाला लागण्यासाठीं कठोर स्वरानें म्हणाला, " नाहीं. शाही, ही तुझी भीती इतक्यांत कमी होणार नाहीं. माझ्यांत आणि खुसरूंत जोंपर्यंत मोंगल मसनदीसंबंधानें अखेरचा निकाल लागला नाहीं, तोंपर्यंत तूं अशीच तळमळत राहाणार, व खुसरूला कैद करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत पाठवीपर्यंत तुझी भीतीहि कमी होणार नाहीं. कदाचित् अकबरशहाच्या मृत्यूपर्यंत तूं अशीच भयभीत अन्तःकरणानें प्रत्येक दिवस घालविशील. बरं आतां तें सगळं असूं द्या; पण जोधा खरं सांग, सम्राट्पत्नी होण्यांत ज्यास्त आनंद, ज्यास्त सुख आणि ज्यास्त जीवनसार्थकता, कीं, राजमाता होण्यांत ज्यास्त आनंद ? "

शाही बेगम कम्पित स्वरानें म्हणाली, " नाहीं मला कोणीच व्हायचं नाहीं. मला फक्त आपलं शांतिमय, विपद्शून्य आणि उत्साही जीवन पाहिजे. अकबरशाहाची सून होऊन व आपली शाहीबेगम होऊन जें सुख, सन्मान, आणि ऐश्वर्य मी भोगीत आलें तेंच मला आजन्म पाहिजे. मला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं. नाथ ! खुदा, आपलं जीवन निष्कंटक करो, आणि हीच त्याच्या जवळ माझी नेहमींची प्रार्थना असते. "

आपल्या प्रियकरणीचें हें बोलणें ऐकून सेलिमनें एकवार मेघावृत्त, चंद्रानें प्रकाशित आणि विस्तीर्ण अशा आकाशाकडे पाहिलें आणि नंतर श्यामलसलिला व मृदुतर तरंगमयी यमुनेकडे पाहून एक दीर्घ निःश्वास सोडून म्हटलें, " नाहीं. शाहीबेगम ! खुदा तुला भविष्य काळीं इतकें सुख देईल कीं नाहीं याची मला शंकाच वाटते. माझा उद्धट मुलगा मला सर्वांसमोर अप-

मानित करून ज्यास्तच गर्विष्ट बनला आहे, हें तूं ऐकलेंच असशील. तसेंच या केलेल्या अपराधाबद्दल तो माझी क्षमा मागावयाची सोडून आज राजा मानसिंह आणि अजीमखान यांना जाऊन मिळाला आहे. 'मी तुला असंख्य रजपुत सैन्य देऊन साहाय्य करीन.' असें मानसिंहानें त्याला वचन सुद्धां दिलें आहे. तसेंच एके दिवशीं जो रस्त्यावरून भिकाऱ्यासारखा भटकत होता आणि शेवटीं नाइलाज होऊन जो माझ्या वडलांकडे डोळ्यांत अश्रू आणून व काकुलतीनें आश्रयाची भिक्षा मागण्यासाठीं आला होता—तो खुसरूचा, हलक्या मनाचा सासरा अजीमखान कोको, आज सुदैवानें राजभांडारी (ट्रेझरर) झाल्यामुळें सम्राट्च्या आजाराचा फायदा घेऊन सगळा राजकारभार आपणाकडे घेऊं पहात आहे. इतकेंच नव्हे, तर आपल्या जांवयाला साहाय्य करण्यासाठीं त्यानें मोंगल राजकोषाची चावीही मिळविली आहे. पितापुत्रांतील या वादाचा निकाल होणाऱ्या शुभदिवसाचीच मी आतां वाट पहात आहें, प्रिये! मी माझें स्वतांचें पापकृत्य भोगीत आहें यांत संशयच नाहीं; पण मीं त्या माझ्या उदात्त हृदयी व प्रेमळ पित्याचे पाय धरून जेव्हां दीनपणानें कृतापराधाबद्दल क्षमा मागितली तेव्हां ती मला आनंदानें मिळाली आहे. पण शाही, तूं मात्र पक्कें लक्षांत ठेव कीं, सम्राट्च्या अन्त:करणांत जितकी क्षमा आहे, तितकी माझ्या अन्त:करणांत नाहीं. माझें हृदय मुळींच क्षमाशील नाहीं."

आपल्या प्रियकराच्या तोंडून या सगळ्या भयानक गोष्टी ऐकून शाही बेगमचें अन्त:करण खुसरूसाठीं फारच कळवळलें. ती कांहीं वेळ थांबून खिन्न स्वरानें म्हणाली, "तर मग आपण, अपराधी आणि वेड्या अशा खुसरूला, त्यानें क्षमेची याचना केली तरीही क्षमा करणार नाहीं?"

सेलिमनें एक दीर्घ निःश्वास सोडून गंभीरपणानें म्हटलें; "नाहीं प्रिये! माझी इच्छा असली, तरीही मी त्याला क्षमा करूं शकणार नाहीं."

अभागी शाही बेगम आपल्या प्रियकराच्या तोंडचें हें वाक्य ऐकून फारच भ्याली आणि आपला लाडका खुसरू आतां अगदीं निराधार झाला असें तिला वाटलें. कांहीं वेळापूर्वी जी शाही आपल्या पतीबद्दल अनिष्ट कल्पना मनांत आणून तळमळत होती, तीच शाहीबेगम आपल्या मुलाला आतां

कुणाचाही आधार नाहीं हें मनांत येतांच नाहीं नाहीं त्या वेडया वांकडया कल्पनांनीं अगदीं अधीर होऊन गेली.

तिच्या उत्तेजित मस्तकांतील कल्पनाचक्षूंना भावी प्रकारचे चित्रपट दिसूं लागले, " आपल्या उच्छृंखल मुलाचें–खुसरूचें–सिंहासन मिळविण्याचे सगळे प्रयत्न निष्फळ झाले असून सुलतान सेलीमच आग्र्याच्या मसनदीवर विराजमान झाला आहे, व खुसरू शृंखलाबद्ध स्थितींत अश्रुपूर्ण नेत्रांनीं पि-त्यासमोर उभा आहे व अपराधी माणसांना ठार मारणारे घातक आपल्या हातांत लखलखीत कुऱ्हाडी घेऊन चोहोंकडे उभे असून नवे सम्राट्, अपरा-ध्याचें शिर, धडावेगळें करण्याबद्दल केव्हां हुकूम देतात त्याची वाट पहात आहेत. त्यानंतर ? त्या नंतर काय ! खुसरूचें धडा वेगळें झालेलें व रक्तानें माखलेलें मस्तक दिवाणी खास मधील संगमरवरी जमिनीवर धाडकन् खालीं पडलें. सभासदांनीं, तो भयंकर प्रकार पाहून भीतीनें आपले डोळे मिटून घेत-ले. हाय ! किती भयंकर हा देखावा ! " आपल्या मस्तकांतच कांहीं तरी विकार झाला असावा असेंहि शाही बेगमला एकवार वाटलें. तिनें हें काल्पनिक चित्र पाहतांना डोळे मिटलेलेच होते.

पण तेवढ्यानें तिचें समाधान न होऊन आपले दोन्ही हात तिनें दोन डोळ्यांवर ठेविले आणि भीतीनें थरथर कांपत ती ओरडून म्हणाली, "नाथ ! आपण प्रभू आहां आणि सामर्थ्यवान्ही आहां. आपल्याच पुढें मी यःकश्चित् स्त्री ती काय बोलणार ? पण मला सुख अगर दुःख देणें हें आपल्या स्वाधीन आहे. मी संकटांत असतां शांती देणारेहि आपणच आहां. स्वामिन् ! दयामय आणि प्रेममय प्रियकरा ! माझें रक्षण करा ! मला वांचवा !! माझ्यानें हें दुःख आतां सहन करवत नाहीं. माझें हृदय अगदीं छिन्नविच्छिन्न होऊन गेलें आहे. माझ्या सर्वांगांत प्रखर ज्वालामय विजेची ज्योत संचार करीत आहे, आणि मी तिच्या या उष्णतेनें क्षणोक्षणीं ज्यास्त ज्यास्त क्षीण होत चाललें आहे. प्रियकरा ! माझी ही भीती घालवा आणि माझें रक्षण करा !! "

पण डोळे उघडून शाही बेगम सभोंवार पहाते तों तिला तेथें सेलीम मुळींच दिसला नाहीं. तो तिथून पायही न वाजवितां केव्हां निघून गेला होता तें शाहीला समजलें सुद्धां नाहीं. ती एक मर्मभेदक दीर्घ निःश्वास सो -

हून म्हणाली, " आपण माझ्या बाबतींत अत्यंत करुणामय होतां, मग आज इतके निष्ठुर कां बरं झालां ? आपलं प्रेम, यत्न, आदर, गौरव आणि सत्कार या योगानं मी अभिमानी रजपुतांचें तेज, मोंगल सम्राट्ची सून झाल्याचा हीनपणा विसरून गेलें होतें. आज अशा स्थितींत माझ्या या हृदयवेदनांची शांति आपल्यावांचून कोण बरें करील ? हिंदुस्तान आपलं होऊं दे, राजेश्वरही आपणच व्हा आणि मोंगलांचें राजभांडार आपल्याच राजछत्रावर सुवर्णधारांची वृष्टि करूं दे. आपण नवकोट नारायण असून लाखों लोकांच्या जिवांचे मालक आहां; पण मी आपणाकडे विशेष अशी कोणतीहि भिक्षा न मागतां केवळ आपल्या मुलाच्या–खुसरूच्या–जीवनाचीच भिक्षा मागत आहे. माझ्या खुसरूला फिरून माझ्याकडे द्या. त्याला कैदेंत टाकूं नका आणि त्याला निष्ठुरपणानें ठारही मारूं नका. या हट्टी, चंचल आणि अपराधी बाळाला, व्याधाच्या भीतानें भ्यालेल्या पक्षिणीप्रमाणें मी त्याला हृदयाशीं लपवून घेऊन केवळ या एका वस्त्रानिशीं मी आपल्या ऐश्वर्ययुक्त राजवाड्याचा त्याग करीन आणि नुसत्या भिक्षेवर उदरनिर्वाह करून त्या माझ्या बाळाला मी जगवीन. मी आणि माझा हा वेडा मुलगा यापैकीं कोणीही आपल्या कृपेची भिक्षा मागण्यासाठीं या राजवाड्याशीं येणार नाहीं, हें मी खात्रीपूर्वक सांगतें. "

शाहीला आतां त्या हृदयवेदना सहन न होऊन ती स्वतःच्या खास महालांत आली आणि जमिनीवरच धाडकन् पडून रडत रडत म्हणाली, " अकबरशहाची सून होण्यांत खरोखर हेंच का सुख आहे ? पवित्र रजपुत कुलांत जन्मूनही मी हेंच का सुख मिळविलं ? राज्यासाठीं हपापलेल्या आणि मुलाशीं द्रोह करणाऱ्या पतीची पत्नी होण्यांत हेंच का सुख ? भलत्याच मार्गानें जाणाऱ्या हट्टी आणि दुराग्रही मुलाची आई होण्यांत हेंच का सुख ? हाय ! सुख. देवा ! मी आतां सुख म्हणून तरी काय समजूं. सुख कशांत आहे ? माझ्या दैवांत सुखच लिहिलेलं नाहीं, कीं, मनुष्य केव्हांही सुखी होऊं शकणार नाहीं ? माझं दैव मला अशा प्रकारें छळून पुढें माझी गत काय करणार ! ! "

दुधासारख्या शुभ्र आणि अत्यंत मृदु अशा शय्येवर पडून ही शाहीबेगम झोपूं शकली नाहीं. त्या शय्येवर जणुंकाय अग्निकण पसरले आहेत कीं काय,

असा तिला भास होत होता. तिच्या त्या खास महालांत रुप्याचें तयार केलेलें गुलाबपाण्याचें एक कारंजें होतें. त्या कारंजामधून येणाऱ्या पाण्याच्या फवाऱ्याबरोबर गुलाबाचा मधुरवास चोहोंकडे पसरत होता. इतरवेळीं हा वास व हें कारंजे पाहून शाहीबेगम कितीतरी खुष होत असे, व तिला एक प्रकारचें समाधान वाटे; पण त्या दिवशीं तिला तो वास इतका कांहीं उग्र आणि त्रासदायक वाटला, कीं, तिनें दासीकडून तें कारंजें तावडतोब बंद करविलें.

आतां बाहेर चोहोंकडे भयंकर उष्मा माजला असावा असें शाहीला वाटूं लागलें, व तिची स्थिती आपल्या मनानें जाणून कांहीं दासी सुवासीक वाळ्याच्या पंख्यानें तिला वारा घालूं लागल्या; पण त्या वाऱ्यानें तिला समाधान न वाटतां तिची तळमळ ज्यास्तच वाढली. तेव्हां तिनें रागाऊन त्या सर्व दासींना दुरुत्तरें बोलून तिथून घालवून दिलें. दासीहि खिन्नपणानें तेथून बाहेर आल्या.

बेगमसाहेबांची ही दुःखद स्थिती पाहून एक संगीतकुशल अशी सुंदर दासी हातांत वीणा घेऊन महालांत आली. आणि बसराई गालिचावर बसून तिनें त्या वीणेच्या मधुर सुरावर गाण्याला सुरवात केली.

शाम घुंगटपट खोलो ॥
जोराजोरी रे ॥ शाम ॥ धृ० ॥
सास नणंद मोरी-जनमकी बैरन ॥
नाहक बैया क्यौं मरोरी ॥
जोराजोरी रे शाम ॥ १ ॥

या दासीचें गाणें ऐकणें शाहीबेगमला नेहमीं फारच आवडत असे, पण त्या रात्रीं त्याच दासीचें गाणें तिला इतकें बेसूर आणि भेसूर वाटूं लागलें कीं, तिच्यानें ऐकवेचना. वीणेचा झंकार तर तिला रडक्या सुराचाच वाटला. लागलीच शाहीनें तिरस्कारानें दासीच्या हातून ती वीणा जोरानें ओढून घेतली आणि दूर फेकून दिली. सुकोमल हातांनीं जरी ती फेकली गेली होती तरी मंजूळ सुराची ती वीणा तेवढ्याच आघातानें छिन्नविछिन्न होऊन गेली. शाहीनें तिकडे लक्षही न देतां दासीला एक लाथ मारून कठोरस्वरानें म्हटलें, "सैतानजादी कुठची! कशाला इथें रडायला आलीस? दुसरी जागा नव्हती कां?"

शाहींबेगमला माहीत होतें, कीं, पुष्कळ मोठ्या रात्रीं बाहेरच्या महालां-तील एका एकांताच्या खोलींत बसून आपला प्रियकर सुलतान सेलीम, आ-पल्या अनुयायांची व हेरांची भेट घेऊन पुढील कामगिरी बद्दल खलबत करींत असतो. अर्थात आजही तसाच कांहीं तरी प्रकार असून तो तिकडेसच असला तर अर्थात आजच्या रात्रीं आतां भेट होण्याची आशाच नको.कारण खलबत झाल्यानंतर त्यारात्रीं लालमदिरा, आणि विषयविलासी रमणी यांच्या योगानेंच सेलीमचें संतप्त मस्तक शांत होऊन त्याला झोंप लागत असते. अर्थात त्यारात्रीं प्रियकराची येण्याची अथवा आपण त्यांच्या महालांत जाण्याची आशा सोडून शाहींबेगम तशीच तडफडत पडली आणि त्यामुळें तर तिची तळमळ इतकी वाढली कीं, तिला मुळींच चैन पडेना.

ती हृदयाच्या वेदना व मनाची तळमळ शांत व्हावी म्हणून बिछान्याव-रून उठून मोकळ्या खिडकीजवळ येऊन उभी राहिली, सगळ्या आकाशभर फिरून अगदीं श्रांत झालेला चंद्रमा त्यावेळीं झोंक जाऊन एका कोंपऱ्यांत निस्तेज होऊन पडला होता. जणुंकाय यमुनेच्या अथांग जलांत बुडून जा-ण्याचा अगर स्नान करण्याचाच त्याचा विचार असावा. खिडकीच्या खालीं असलेल्या गुलाबबागेंतून, गुलाब चमेलीचा मिश्रगंध मलयवाहित होऊन त्या-खिडकींवाटे महालांत प्रवेश करीत होता, पण त्या सुवासानें आनंद अगर स-माधान यांपैकीं एकाही गोष्टीचा लाभ शाहींबेगमला झाला नाहीं. खरोखर ! मनुष्यत्चें मन जर स्वस्थ नसेल तर त्याला कशांतही गोडी वाटणार नाहीं. स्वर्ग, नरक, सुख, दुःख, शांति, अशांति, समाधान हे सगळे कांहीं स्थीर मनाचे व्यापार आहेत.

शाही मनांतल्या मनांत विचार करीत होती, " हा चंद्र यमुनेच्या अथांग जलांत हळुहळू उडी घेण्याचा कां बर प्रयत्न करीत आहे ? त्याच्या मनाची स्थिती माझ्यासारखी अस्वस्थ तर झाली नसेल ना ? या खिडकी-पासून जवळूनच यमुना आपलें निनादन गीत गात चालली आहे ! या य-मुनेचें हें पाणी किती खोल, किती शांतिकारक, आणि किती शीतल आहे रे ! यांत बुडून मरण आलं तर काय वाईट ? खरोखर, मी असं केलं तर माझी तळमळ तरी नाहींशी होईल. आपला मृत्यू आपल्या हातांत आहे ! ! यमुनेच्या अथांग जलांत बुडालं कीं, संपलं सारं ! मग या निष्कारण

काळजीरूपी चिंतानलांत कां बरं जळून मरावं ? छे. मृत्यूचं दार इतकं जवळ असतां मी अशी कां बरं तळमळत राहूं !"

कांहीं वेळ थांबल्यावर पुन्हां तिच्या मनांत नवीन विचार घोळूं लागले, "या जगांत येऊन व संसार करून जो कांहीं सुखाचा व सौभाग्याचा परिचय करून घ्यावयाचा, तो मीं घेतला आहे. जर इतक्या सुखांत असूनही मी दुःखी, आणि दुःख सहन करण्यासाठीं जर या जगांत यायचं असेल, तर मरण काय वाईट ? कारण पती हृदयहीन; मुलगा नेहमीं अवज्ञा करणारा आणि नेहमीं मनाची तळमळ सुरू मग जगण्यांत तरी काय अर्थ ? देवा, अशा विपत्काली मरणच चांगल नाहीं का ?

"नाहीं. मला इतक्यांत मरून जातां येणार नाहीं. यमुनेच्या तरंगमय आणि चंद्रबिंबाशीं खेळणाऱ्या काळ्याकुट्ट पाण्यांत मला बुडून मरतां येणार नाहीं. या माझ्या हौसेच्या मरणांत मला कोण बरें अडथळा करीत आहे ? दुसरा कोण असणार ? माझा खुसरू ! ! तो दीनवाणीनें म्हणत आहे, 'आई ! तूं मरूं नकोस. तूं मेल्यावर मला किती वाईट स्थिती येईल, याचा तूं थोडा-सा विचार तरी केला आहेस का ? तुझ्या ममतेला पात्र झालेला हा तुझा लाडका खुसरू आपल्या निष्ठुर बापाच्या हुकुमानें कैदी होऊन कारागृहांत-पडेल. इतकेंच नव्हे तर विषप्रयोगानें अथवा गुप्तमारेकऱ्याच्या शस्त्रानें तुझ्या या खुसरूला अत्यंत शोचनीय असा मृत्यू येईल. तूं जिवंत असलीस तर माझ्या त्या निष्ठुर बापाचे पाय धरून त्या भयंकर मृत्यूपासून माझं तूं संरक्षण करूं शकशील. नको आई तूं मरूं नकोस ! मी उच्छृंखल, पितृद्रोही, चंचल वाईट मार्गानं जाणारा कसाही असेन; पण मातृद्रोही नाहीं. सगळीं माणसं मला टाकूं शकतील, इतकेच नव्हे तर खुदाही आपल्या आश्रयापासून मला दूर करील; पण आई ? तूं मला तसा दूर करशील काग ? तूं माझी आई आहेस, तूं रजपुतरमणी आहेस, आणि तूं मोंगलांची राजकुल लक्ष्मी आहेस ! तुझ्यानं असा निष्ठुरपणा करवेल का ?"

"मग, असं त्यानं म्हटल्यावर मला मरतां येईल ? माझ्या हृदयांत आज हे असे विचार आणि नसती काळजी उत्पन्न होण्याचं काय कारण ? नाहीं. मी मरणार नाहींच. मीं कां मरावं ? आणि मला कसलं दुःख आहे ?

मी सम्राट् अकबरशाहाची सून आहे, व भावी राजराजेश्वर आणि या विशाल हिंदुस्तानचे मालक सुलतान सेलीम यांची मी पत्नी आहे. राजराजेश्वरीच्या श्रेष्ठासनावर बसून मी भिकारिणीसारखी इथून निघून जाऊं ? छे. नाहीं. मरायचं नाहीं. ज्या योगानें अकबरशाहाच्या देहांतानंतर मी या हिंदुस्तानची राजेश्वरी होऊं शकेन अशाच प्रकारचे मला आतां प्रयत्न केले पाहिजेत. नंतर मी सम्राज्ञी म्हणून व आई म्हणून माझ्या खुसरूचें पाहिजे तसं संरक्षण करूं शकेन."

अशा प्रकारच्या सुष्टदुष्ट विचारानंतर शाहीबेगम खिडकीजवळून बाजूला झाली आणि आपल्या मृदु बिछान्यावर येऊन पडली. यावेळीं दुःखनाशिनी, शांतिदायिनी, सर्व संतापहारिणी आणि स्वप्नजननी अशी सुखकर निद्रा शाहीबेगमचें शांतवन करूं लागली, थोडयाच वेळांत शाहीबेगम चांगलीच झोपी गेली. ती जोंपर्यंत जागृत होती तोंपर्यंत हृदयवेदनांनीं तळमळत होती; पण झोंप लागतांच तिला शांती मिळाली.

दुसरे दिवशीं सकाळीं उठतांच शाहीनें पुढीलप्रमाणें खुसरूला पत्र लिहिलें, " तुझे अजोबा फारच आजारी आहेत. तुला भेटतील कीं, नाहीं याचाही संशय आहे. तरी हें पत्र वाचतांच आग्र्याला निघून ये. आईची आज्ञा उल्लंघन करूं नको. शहरांत आल्यावर तूं माझ्या महालांत ये, म्हणजे त्या ठिकाणीं मी तुला भेटेन."

सेलिमला न समजतां आपल्या एका विश्वासू रजपुत सैनिका बरोबर शाहीनें तें पत्र खुसरूकडे फत्तेपूर शिक्रीला पाठवून दिलें,आणि त्याचवेळीं तिला बरेंचसें समाधान वाटलें. अरेरे ! आईचें मुलावरील केवढें हे प्रेम !! पण या प्रेमाचा योग्य उपयोग झाला का ?

---

# प्रकरण २८ वें.

—:०:—

## अकबरचा अंतकाळचा आशिर्वाद ?

ज्या दासीला फकिराचा वेष घेतलेला दुर्जयसिंह भेटला होता, तीच दासी खुसरूला सांगण्यासाठीं उद्यानांत गेली होती, व 'एक म्हातारा फकीर

आपली भेट घेण्यासाठीं राजवाड्यांत आला आहे,' असें ती त्याला सांगणार होती; पण उद्यानांतून गुलाब बागेंत तो गेलला असल्यामुळें उद्यानांत तिला भेटला नाहीं व ती तशीच परत गेली.

इकडे रेशियेला बराच वेळपर्यंत पौर्णिमा न भेटल्यामुळें ती तिला पहाण्यासाठीं गुलाबबागेंत आली-तों त्या ठिकाणीं पौर्णिमा न दिसतां चवुऱ्या मागें शहाजाद्याला मूर्छनावस्थेंत पडलेला पाहून तिची मोठी धांदल उडाली. तिनें ती बातमी सर्वांना तावडतोब कळविली व थोड्याच वेळांत नोकरांनीं शहाजाद्याला उचलून महालांत नेलें.

या गोष्टीला तीन आज दिवस होऊन गेले. खुसरूची प्रकृती आतां चांगलीच सुधारली होती; पण तो अपरिचित फकीर कोण याबद्दल कांहींच निर्णय ठरवितां न आल्यामुळें त्याला एक प्रकारची अस्वस्थता वाटत होती.

सध्यां खुसरूच्या मनाची स्थिति अत्यंत चमत्कारिक झालेली असून ती कितीही विचार करूनही त्याला पूर्वावस्थेंत आणतां येत नव्हती. तो नेहेमीं पौर्णिमेसंबंधाचाच विचार करी. ज्या वस्तूची मनुष्याला उत्कट आशा वाटत असते, ती वस्तू न मिळाल्यास त्याची ती अतृत इच्छा ज्यास्तच उत्कट होते. पौर्णिमेच्या या वियोगामुळेंच खुसरूचा अनुराग ज्यास्त वाढत चालला होता. तो मनांत विचार करूं लागला, ' मला लवकरच आग्र्याला जावें लागेल. सम्राट् अत्यंत आजारी असून त्यांच्या जीवनाबद्दलही हकिमांची मनें संशयित झालेलीं आहेत. राजा मानसिंहानेंहि फार आग्रहपूर्वक मला आग्रा येथें जाण्याबद्दल सुचविलें आहे. जर दैवाच्या विचित्र लीलेनें मोंगलांची मसनद मला मिळाली, तर या सैतानजादी पौर्णिमेला मी अवश्य माझ्या दासीची दासी बनविल्यावांचून राहाणार नाहीं ! '

एकांतीं, आपल्या महालांत बसून खुसरू ज्यावेळीं वरीलप्रमाणें पौर्णिमेवर सूड उगविण्याचें ठरवीत होता, त्याचवेळीं शाहीबेगमनें पाठविलेलें तें जरूरीचें पत्र त्याला मिळालें, व तें वाचून पहातांच त्याचें मन अत्यंत अस्वस्थ होऊन गेलें. कारण फत्तेपूरशिक्री सोडून लवकर आग्र्याला निघून येण्याबद्दल राजा मानसिंहाचेंहि त्याला असेंच एक जरूरीचें पत्र नुकतेंच

आलें होतें. अर्थात् या दोघांच्याही आकस्मिक व घाईच्या गोलविण्यांत कांहींतरी गूढ प्रकार असला पाहिजे असें वाटून, खुसरू मुळींच वेळ न घालवितां त्याच दिवशीं, पांचशें शूर घोडेस्वारांसह आग्र्याला जाण्यासाठीं फत्तेपुराहून निघाला.

याचवेळीं आग्र्याच्या राजप्रासादांत एका अत्यंत महत्त्वाच्या घटनेला सुरवात होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं होतीं, व आरंभही लवकरच होण्याचा रंग दिसत होता.

× × × × ×

सम्राट्चा रोग फारच झपाट्यानें वाढत असून हकीम अगदी घाबरून गेले होते. सम्राट्ची प्रकृती पहाणारा मुख्य हकीम अली मिर्झा याची तर विलक्षण तारांबळ उडाली होती. त्याला समाधान वाटण्याला फक्त एकच जागा होती, आणि ती म्हणजे सम्राट्ची शक्ति अद्याप म्हणण्यासारखी कमी झाली नव्हती. आणि असे सामर्थ्य असल्यामुळे ते आठदहा दिवसांतच आपोआप उठतील असें मिर्झा याला वाटल्यामुळें त्यानें विशेष असे कांही औषधोपचारही केले नव्हते. या स्थितीत आठदिवस निघून गेले. नवव्या दिवशीं अली हकीम, सम्राट्ला म्हणाला, "जहांपनाह! आपण जर परवानगी देत असाल तर आतां कांही विशेष औषधोपचार करावा असें माला वाटत आहे. वार्धक्यावस्थेतील क्रमाक्रमानें वाढणाऱ्या रोगाची उपेक्षा केल्यास शेवटीं तोच रोग फार कष्टसाध्य होऊन बसतो."

सम्राट्लाही आतां आपण बरेच अशक्त झालोसें वाटूं लागलें होतें. अर्थात् हकिमाच्या सांगण्याला त्यानें मुळींच अडथळा केला नाहीं. नंतर राजवैद्याच्या औषधानं आमाशय सुधारला, पण भयंकर तापानें, सम्राट्चें सर्वांग आपलेंसे करून टाकलें, आणि हकिमाचा चेहेरा अगदीं खिन्न झाला. हकीम अली, सम्राट्चा संरक्षक असून मोंगलदरबारचा मुख्य हकीम होता. अर्थात् त्याच्यावर तशीच महत्त्वाची जबाबदारीही होती. सम्राट्चा हा आकस्मिक ज्वर पाहून त्याला वाटलें, कीं, सम्राट् अकबरशाहा आतां या आजाराच्या तोंडांतून कांही सुटत नाहीं. निदान हा ज्वर अत्यंत कष्टसाध्य तर आहेच. हकिमानें नाइलाज होऊन आपणाला समजलेली ही गोष्ट, सम्राट्

च्या अत्यंत विश्वासाच्या व कळकळीच्या अशा दोघां उमरावांना सांगितली. या दोन उमरावांपैकीं एक अजीमखान कोको हा असल्यामुळें त्याच्याकडून ती बातमी राजा मानसिंहाला तेव्हांच समजली. कारण दोघांचेंहि ध्येय आणि कारस्थान एकच असल्यामुळें ते एकमेकांचे मित्र बनले होते. याच संधीला दैवानें सोडलेल्या नियतिचक्राच्या फेऱ्यांत सांपडून मोंगलराजवंशावर एका नवीनच संकटाची छाया दिसूं लागली.

*        *        *

सम्राट् अकबरशाहा, मखमलीच्या मनोरम शय्येवर पडून आजाराच्या वेदनांनीं तळमळत होता. वेळ सायंकाळची होती. राजमहालाच्या खिडक्या उघड्या असल्यामुळें यमुनेच्या पात्राचा लहरीयुक्त हृद्यंगम देखावा तेथून दिसत होता; पण वेळ आणि स्थळ जरी इतकें चित्तवेधक होतें तरी सम्राट् अकबरशाहाच्या मनाला यापासून थोडासुद्धां आनंद होत नव्हता. कारण 'आपल्या जीवनसूर्याचा अस्त व्हायला आतां फारसा अवधी नाहीं.' हें त्याला केव्हांच समजून चुकलें होतें.

बिछान्यावर तळमळत भावीस्थितीचा विचार करीत पडलेल्या सम्राट्ला हल्लीं एकांत फारच आवडूं लागला होता. कोणीहि मनुष्य त्याच्या समोर आला कीं, त्याला राग येत असे. जनानखान्यांतील कोणाही रमणीला आंत येण्याचा हुकूम नव्हता. सम्राट्च्या बिछान्याजवळ फक्त चार जुन्या आणि विश्वासू दासी खडा पहारा करीत उभ्या असत. सम्राट्नें त्यांना मात्र हरकत घेतली नव्हती.

सम्राट् अकबरशहा, आपले डोळे मिटून घेऊन विचार करीत होता, "या सायंकालीन मनोवेधक शोभेमुळें हंसत असलेल्या प्रकृतीदेवीच्या हृदया-वर, ज्याप्रमाणे रजनीची कृष्णछाया लवकरच पडण्याचा संभव आहे व त्यावेळीं उज्ज्वल दिसणारी मेदिनी, जशी लवकरच अंधकारमयी होऊन मृत्यूच्या आधीन होणार आहे, त्याप्रमाणेंच एके दिवशीं अशा एका सूर्यास्ताबरोबरच माझाही जीवनसूर्य कालाच्या अंधकारमय उदरांत कायमचा अस्तंगत होऊन जाईल. हें धनजयसंपन्न व सुदैवी आग्रा शहर तसेंच तांबड्यालाल दगडांनीं बांधलेला हा पर्वतासारखा उंच किल्ला व राजप्रासाद, हा असंख्य सुंदरींच्या मधुररवानें व विलासांनीं भाग्यशाली बनलेला रंगमहाल, आणि हे क्षत्रिय-

चर्गानें पूर्णतेस आणलेले व अमीरउमरावांनीं शोभिवंत दिसणारे दिवाणी आम आणि दिवाणी खास या नांवाचे महाल इथें आणखी कांहीं नियमित कालपर्यंत असेच राहातील; पण मी–मी मात्र आतां एकटाच निघून जाणार. निरनिराळ्या राज्यांवर विजय मिळवून व सभ्यरीतीची लुटालूट करून मिळविलेले कोट्यावधी रुपये आणि बहुमोल हिरे जवाहीर आज माझ्या राजभांडारांत आहे; पण त्यापैकीं कांहींच आतां माझ्याबरोबर येणार नाहीं. माझ्या सुदैवानें मीं आपल्या पराक्रमावर व बुद्धिबलावर हें हिंदुस्तान आंपलेंसें केलें, आणि त्यामुळें '**दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा**' असेंही लोकाकडून म्हणवून घेतलें. तसेंच अपार आनंदमय असा समरविजयाचा '**अल्ला हो अकबर**' हा मनेवेधक सूरही मीं ऐकला, पण आज तो माझ्या मनाचें समाधान करूं शकत नाहीं. कारण मला आतां आपल्या विजयदुंदुभीचें कांहीं वाटेनासेंच झालें आहे. हाय! मृत्यो!! तूं इतका का भयंकर आहेस? रुक्ष खोरासनच्या वायुप्रवाहांत एकें दिवशीं जो निश्वास वाहात होता, त्या निःश्वासाचें, या दीपमालांनीं विभूषित, रत्नालंकारांनीं अलंकृत, आणि दुर्मिळ कुसुमगंधानें दरवळलेल्या राजप्रासादांत आतां, पर्यवसान परिसमाप्ति-होणार काय?

"माझे, पराक्रमी असे तीन मुलगे असून ते मला अत्यंत आनंद देणारे, शूर, साहसी आणि सुंदर असल्याबद्दल चोहोंकडे गाजत आहेत. त्यांचा केव्हांही पराभव झालेला नाहीं; पण माझ्या दुर्दैवानें, माझ्याच समोर, त्यापैकीं दोघांना मृत्यूच्या स्वाधीन व्हावें लागलें, आणि आतां एकच सेलीम सेवटा काय तो राहिला आहे. तो जरी माझ्याशीं बऱ्याच उच्छृंखलपणानें वागत आहे, तरी पण तो प्रेमळ असून माझेंहि त्याच्यावर अत्यंत प्रेम आहे. तो माझा सर्वांत वडील मुलगा असून माझे त्यानें हजारों अपराध केले आहेत, पण माझें पुत्रवात्सल्य, त्याचे ते अपराध लहानमुलाप्रमाणें आहेत असें मानून, हृदयांत कधीं न संपणारी क्षमा उत्पन्न करीत आहे. त्यामुळें त्याच्या कोणत्याही अपराधाकडे मी चिकित्सक अगर कठोर दृष्टीनें न पहातां क्षमाशील दृष्टीनेंच पहात आलों आहें. सेलिमासारखा आवडता, सुंदर, पितृभक्त आणि प्रेमळ असा दुसरा मुलगाच नाहीं. मीं स्वतःच्या पराक्रमावर मिळविलेलें हें हिंदुस्तान सेलिमलाच देऊन मी या जगाचा अखेरचा निरोप घेणार व असें केल्यानेंच मरणाच्यावेळीं खरी शांति मिळेल."

"आणि हतभागी खुसरू! हो. खुसरू तर माझा आवडता नातू आहे. तो सेलिमचा मुलगा असल्यामुळें सेलिमापेक्षांहि माझें त्याच्यावर ज्यास्त प्रेम आहे; पण तो अवज्ञा करणारा आणि पितृद्रोही असून त्यानें मी असतांना माझ्या समोर हिंदुस्तानच्या भावी सम्राट्चा-आपल्या बापाचा-सुलतान सेलीम याचा—भयंकर अपमान करून सर्वांना व मलाही तो अप्रिय बनला आहे. माझ्या मुलाची माझ्या समोर अशा रीतीनें मानहानी करणारा कोणीहि असो, मी त्याला माझ्या दृष्टीनें त्याज्य समजतों. त्याच्या इतका मी दुसऱ्या कोणाचाही तिरस्कार करणार नाहीं. मीं या खुसरूला सगळ्या दुनियेचा एकछत्री अधिकारी करण्याचें ठरविलें होतें व दुनयेचा निरोप घेतांना त्याला मी तो अधिकार देणारही होतों; पण झालेल्या या प्रकारामुळें मी आतां त्याचें तोंडही पाहूं इच्छित नाहीं. माझ्या दृष्टीसमोरही तो आतां नको. माझ्या स्नेहशील हृदयांतून त्याला आतां मीं कायमचें हद्‌पार केलें आहे. तो मला पूर्वी कितीही प्रिय असेल; पण आतां नाहीं—"

आजाराच्या वेदनांनीं बिछान्यावर तळमळत असतांना मोंगलसम्राट् अकबरशाहा याच्या मनाची स्थिति वरीलप्रमाणें होती. अशा स्थितींतच असतांना एका दासीनें येऊन त्याला कळविलें कीं, 'शहाजादी बेगम जोधा उर्फ शाही बेगम सम्राट्ची भेट घेऊं इच्छीत आहे.'

सम्राट्नें हें ऐकतांच तिला आंत बोलविण्याबद्दल दासीला हुकूम केला. लागलीच, रत्नालंकारांनीं विभूषित झालेली आणि अपूर्व लावण्यमयी अशी सम्राट् अकबरशाहाची आवडती सून अम्बर राजकन्या जोधाबाई आंत आली व दासींना तेथून जाण्याबद्दल तिनें खूण केली. दासी बिचाऱ्या तेथें कशाला उभ्या राहातात! शाही बेगमचा संकेत पहातांच त्या तावडतोब बाहेर निघून गेल्या.

तिथें परिजन कोणी नाहीं असें पाहून शाहीबेगमनें यथायोग्य रीतीनें सम्राट्ला कुर्निस करून खिन्न स्वरानें म्हटलें, "दयामय खुदा, हिंदुस्तानच्या बादशाहाला चिरजीवित करो!"

अकबरशाहा आपल्या सुनेच्या खिन्न चेहेऱ्याकडे पहात स्नेहपूर्ण स्वरानें म्हणाला, "आलीस का मुली, चांगलें झालं बैस. मी तुझ्याशीं एका महत्वाच्या गोष्टीबद्दल बोलण्यासाठीं फारच उत्सुक झालों होतों. माझ्यासंबंधी तूं आतां खुदाला केलेली प्रार्थना त्याच्या चरणांशीं बहुतकरून पोंचणार नाहीं.

त्या दयामय जगच्चालकानें मला पुष्कळ दिलें आहे; पण मीं त्याला अद्याप कांहींच दिलेलें नाहीं. वीरत्वाचा अभिमान, ऐश्वर्याचा गर्व, बाहुबलाचा ताठा आणि 'हिंदुस्तानचा मी बादशाहा आहें' ही अधिकाराची धुंदी यांतच मीं इतके दिवस मोहित होऊन राहिलों होतों; पण आतां माझा तो भ्रम समूळ नाहींसा झाला आहे. जोधा! तूं माझी फार आवडती आणि आतां मोठ्या अधिकारावर विराजमान होणारी सून आहेस. हिंदुमुसलमानांत एकी होऊन त्यांच्यांत प्रेमबंधन व्हावें आणि अशा व्यवस्थेमुळें मोंगलांची सत्ता हिंदुस्तानांत दृढ व्हावी म्हणून मीं तुला फार आदरपूर्वक मोंगलराजवंशांत आणून हिंदुस्तानची भावी राजराजेश्वरी बनविलें. सुलतान सेलीम हा या समग्र हिंदुस्तानचा भावी सम्राट् आहे. अर्थात् तूं सम्राज्ञी होणार हें निःसंशय आहे. फार काय, या चालू आठवड्यांत हें परिवर्तन होऊं शकेल अशी भविष्यवाणी सुद्धां माझ्या कानांशीं गुणगुणत आहे."

जोधाबाईनें, हृदयाला जाऊन भिडणारें असें हें सम्राट्चें बोलणें ऐकून घेतलें; पण तिला आनंद न होतां, आतां आपल्याला आपल्या प्रेमळ सासऱ्याचा वियोग होणार याबद्दल अत्यंत दुःख झालें. सम्राट्चा तो तेजस्वी आणि विशाल देह, मृत्यूची छाया पडल्यामुळें निस्तेज होत चाललेला तिला दिसत होता. मग तिला कसा बरें आनंद वाटणार! शिवाय सम्राज्ञी होण्यांत तिला सुख तरी कसलें होतें! कारण आपला प्रियकर—सुलतान सेलीम क्षमाशील नाहीं, हें तिला समजत होतें, आणि पुत्र खुसरू भयंकर अपराधी असल्याचें सेलिम जाणून होता. अर्थात् सेलिमचें राज्यारोहण म्हणजे खुसरूचें मरण हें ठरलेलेंच. मग जोधाला कसें सुख वाटावें!

शाही बेगमचे कमलासारखे तेजःपुंज टपोरे नेत्र अश्रुपूर्ण झाले. इतकें नव्हे, तर त्यांतील एक उष्णाश्रुबिन्दु अकबरशाहाच्या हातावरही पडला तेव्हां सम्राट् तिच्याकडे वळून तिच्या चेहेऱ्याकडे पहात, मृदुस्वरानें म्हणाला "मुली! तूं कां बरें रडतेस? तूं समग्र हिंदुस्तानची राजराजेश्वरी आहेस. मग तुझ्या नेत्रांत अश्रू कां बरें! जोधा! मला शांतपणानें मरूं दे! तुझे हे अश्रुपूर्ण नेत्र पाहिले तर स्वर्गांत जाऊनही मी सुखी होणार नाहीं. मोंगलवंशाच्या ऐश्वर्याची तूं दीपिका आहेस. तसेंच या जगांतील संसार नश्वर

असून वियोग आणि मीलन हे प्रकार यांत नेहेमीं चाललेले असतातच. **नव्याला आपली जागा देऊन जुन्यानें निघून जावें हा तर सृष्टी-च्या नियम आहे.** माझ्यासाठीं तूं कोणत्याही प्रकारचें दुःख अगर काळजी करूं नको. आपल्या मनाला सामर्थ्यवान् बनीव आणि रजपुतांची चिरसांगा-तीण दृढता अंगीं आणण्याचा प्रयत्न कर."

एक दीर्घ निःश्वास सोडून जोधाबाई करुणवाणीने म्हणाली, "भारते-श्वर ! शाहानशहा !! आपण हिंदुस्तानचे दयाळू बादशाहा आहां, तेव्हां माझी एक लहानशी प्रार्थना आपण पूर्ण करूं शकाल का ?"

जोधाबाईच्या तोंडून ही करुणवाणी ऐकतांच सम्राट् तिच्याकडे विस्मित नेत्रांनी पाहून म्हणाला, "मुली ! काय बरं माझ्याकडे तुझी प्रार्थना आहे ? कोट्यावधी रुपयांचें जवाहीर तुमच्या दोघांच्या स्वाधीन मीं केलें आहे. तसेंच ज्या सिंहासनावर बसून अजूनही मी हिंदुस्तानचा सम्राट् म्हण-वीत आहे तें सिंहासनही मीं सेलिमला दिलें आहे; पण होय, आणखी एक अमोलिक वस्तू अद्याप तुला मीं दिलेली नाहीं." असें म्हणून अकबरशाहा आपल्या बिछान्यावरून अर्धवट उठून त्यानें गादीखालीं असलेली एक लहा-नशी चावी बाहेर काढली आणि ती जोधाबाईच्या हातांत देऊन म्हटलें, "मागच्या खास महालांत एक हस्तीदंती पेटी आहे, तिची ही चावी. या चावीनें ती उघडतांच तिच्यांत आणखी एक लहानशी पेटी मिळेल, ती लहान पेटी माझ्याकडे घेऊन ये. जा."

लागलीच शाहीबेगम उठून जवळच्या खोलींत गेली, आणि थोड्याच वेळांत ती बाहेरही आली; मात्र येतांना तिनें एक लहानशी पेटी आणून ती सम्राट्च्या हातांत दिली, व सम्राटनें ती उघडून त्यांतून एक हिऱ्यांचा हार आणि एक मोत्यांची माळ असे दोन उंची दागिने काढून ते शाही बेगमच्या हातांत देऊन म्हटलें, "तूं भारतवर्षाची भावी सम्राज्ञी आहेस, तेव्हां तूं प्रथम सिंहासनावर बसण्याच्या वेळीं हा माझा आशीर्वादमय मंगलहार म्हणून तूं आपल्या गळ्यांत घाल. गोवळकोंड्याच्या विजयानंतर तेथील बहु-मोल हिऱ्यांचा मीं हा तुझ्यासाठींच हार बनवून ठेविला होता. याची किंमत एक कोटी रुपये आहे. तसेंच ही मोत्यांची माळही कांहीं कमी किंमतीची

नाहीं. ही तूं आपल्या मुलाची बेगम प्यारी हिला नेहेमीं वापरण्यासाठीं दे. कारण तिला मोत्यांची माळ वापरणें फार आवडतें."

सम्राट्कडून मिळालेल्या या वस्तू इच्छा नसतांही शाही बेगमनें आदर-पूर्वक आपल्या हातांत घेतल्या, आणि नंतर मी दृढ स्वरानें म्हणाली, "प्रिय मामंजी, सम्राट्! ती या रत्नाच्या आशेनें आपल्या पायाशीं आलें नव्हतें. स्त्रीजीवनाचें अत्यंत अमोलिक असलेलें एक अमोल रत्न मला भिक्षारूप असें पाहिजे आहे व तें आपल्याकडूनच मिळेल अशी माझी खात्री आहे!"

अकबरशाहा मोठ्या गूढांत पडला आणि कांहींवेळ विचार करून म्हणाला, "मुली! सगळें हिंदुस्तान तर तुला दिलें आहे!! इतकी मोठी देणगी दिली असतांही तूं आणखी कशाची बरें अपेक्षा करीत आहेस बाळी"

आतां स्पष्ट बोलल्यावांचून समजणें अशक्य आहे असें वाटल्यावरून जोधाबाईनें हातजोडून दीनवाणीनें म्हणाली, "सगळ्या हिंदुस्तानच्या अधिकाराची मला मुळींच आवश्यकता नाहीं जहापनाह! दक्खनमध्यें अथवा बंगाल्यांत कुठेंहि असो, मला एक लहानशी जहागीर देण्याची व्यवस्था करा, म्हणजे मी खुसरूला घेऊन त्या ठिकाणीं जाऊन राहाण्याची तजवीज करतें."

अकबरशाहाच्या निस्तेज चेहेऱ्यावरील भृकुटी किंचित् वक्र झाल्या. तो तीव्रस्वरानें म्हणाला, "शाहीबेगम! इतक्या वेळानंतर तुझ्या मनांतील गोष्ट मी जाणूं शकलों. मला वाटतें मानसिंहाच्या कपटीवर्तणुकीला तूंहि बळी पडली असावीस. खुसरूनें, मानसिंह आपल्या पाठीशीं आहे असें समजूनच, माझ्या राज्याधिकारी मुलाचा—आपल्या जन्मदात्या बापाचा, अत्यंत नीचतेनें अपमान केला, आणि तोहि माझ्या डोळ्यांसमोर! बोलायचें नाहीं असें ठरविलें होतें; पण आतां बोलतोंच; माझा आजार आज इतका विकोपाला जाण्यास हेंच कारण मुख्य झालें. शाही! फक्त तुझ्या दीनवाण्या तोंडाकडे पाहूनच मीं खुसरूला त्याच्या अपराधाची क्षमा केली. शाही! मी अजूनही या विशाल हिंदुस्तानचा मालक अकबरशाहा आहे, हें तूं समजून आहेस. मीं आज हिंदुस्तानचें काय पाहिजे तें करूं शकेन. कोणालाही शिक्षा अथवा बक्षिस देण्याचा अधिकार अद्याप माझ्याकडे आहे. तसेंच दुसरीहि गोष्ट तुला स्पष्ट समजून असूं दे, कीं, हिंदुस्तानचें हें सिंहासन मोंगल सम्रा-

ट्चा वडील मुलगा सेलीम यालाच मिळणार. खुसरूला तर नाहींच आणि त्याला साहाय्य करणाऱ्या मानसिंहासारख्या राजद्रोही माणसांनां सुद्धां त्याचा स्पर्श दुर्लभ आहे!"

याचवेळीं एक अत्यंत सुंदर असा तरुण त्या ठिकाणीं आला आणि सम्राट्‌ला म्हणाला, "भारतेश्वर! आपलं म्हणंणच खरं आहे; पण सम्राट्, हा अधम खुसरू, हिंदुस्नानच्या सिंहासनाची इच्छा करीत नाहीं. जें आपल्या अधिकाराचें नव्हे, तें घेण्याला मी कधींही पुढें सरणार नाहीं. माझ्या प्रेमानें तळमळणाऱ्या आईचे अश्रू पुसून तिला शांती द्यावी, एवढीच माझी इच्छा आहे. तिचा खिन्न दिसणारा चेहेरा प्रफुल्लित दिसावा, यावांचून माझी दुसरी कोणतीही इच्छा नाहीं."

सम्राट्‌नें पाहिलें, तों, शहाजादा खुसरू आपल्या बिछान्याजवळ गुडघे टेकून बसला असून कळवळ्यानें बोलत आहे. खुसरूला पाहातांच वास्तवीक अकबरशाहाला आनंद व्हावयाचा; पण खुसरूच्या दुर्दैवानें म्हणा अथवा अन्य कांहीं कारणानें म्हणा, आजच्या खुसरूच्या दर्शनानें सम्राट् आनंदित झाला नाहीं. रागानें अनुरागाला दूर सारलें आणि प्रेमाची जागा तिरस्कारानें पटकाविली. त्यामुळें यावेळीं खुसरूला तेथें तशा स्थितींत बसलेला पहातांच अकबरशाहाला अतिशय राग आला.

तो क्रुद्धस्वरानें आपल्या नातवाला म्हणाला, "कुणाच्या हुकुमानें तूं फत्तेपूर शिक्रीहून येथें निघून आलास बोल!"

खुसरू स्वाभिमानपूर्ण स्वरानें म्हणाला, "ही माझी खिन्नपणानें बसलेली आई! जिच्याच स्तनपानानें हा माझा देह वाढला; ही माझी प्रेमळ माता! कीं जिच्या उदरीं जन्माला आल्यामुळें आज मी मोंगल सम्राट् अकबरशाहाचा नातू झालों; ही माझी गुरु माउली—कीं, जिच्या उपदेशामुळें मला आज असन्मार्गालाहि पाऊल टाकण्याची भीति वाटत आहे—ती माझी ही जननी! हिच्याच हुकुमानें, पितामह, मीं आज येथें येण्याचें धाडस केलें."

खुसरूचें हें स्वाभिमानपूर्ण उत्तर ऐकून अकबरशाहाचा क्रोध ज्यास्तच वाढला, तो पूर्वीपेक्षांहि ज्यास्त जोरानें म्हणाला, "राजकारणाशीं, व्यक्तीच्या हकीगतीचा कांहींही संबंध लक्षांत घेतला जात नाहीं. राजनीती-

च्या कांहीं गूढ उद्देशानेंच मीं तुला फत्तेपूरा शिक्रीला पाठविलें होतें, व जातांना तुला मुद्दाम बजावलें होतें कीं, 'माझा दुसरा हुकूम येईपर्यंत तूं फत्तेपूरचा राजवाडा बिलकूल सोडूं नको.' भारत सम्राट्चा हुकूम अमान्य करणाराला कोणती शिक्षा सांगितलेली आहे, हें तूं जाणतोस काय खुसरू?"

कांहीं वेळापूर्वी दाराच्या आड राहून खुसरूनें बादशाहाचें व आपल्या आईचें सगळें संभाषण ऐकलें होतें, व त्याचवेळीं त्याचें मस्तक अगदीं बिघडून गेलें होतें. अर्थात् अकबराचा यावेळचा तो प्रश्न ऐकून तो उत्तेजित स्वरानें म्हणाला, "या हुकूम अमान्य ते बद्दल कैद अथवा मृत्यूची शिक्षा मिळते हें मीं जाणून आहें, आणि हें जाणून असल्यामुळेंच तर मी परवानगीवांचून आपल्या खास शयनगृहांत येण्याचें धाडस केलें; पण राजराजेश्वर, आपणहि अत्यंत मातृभक्त असल्याबद्दल आपली प्रख्याती आहे. माझ्या बापाला, कैद करण्यासाठीं आपण अलाहाबादला चालला होतां, आणि तें एक थोर राजकारण होतें, मग, 'आपली आई अत्यंत आजारी आहे' असें मार्गांत समजतांच पुढें जावयाचें सोडून आपण घाईघाईनें आग्रा शहरांत कां बरें परत आलांत? राजनीतीचा कुटिलमार्ग सोडून व कौटुंबिक आणि व्यक्तिविषयक बातमीनें अस्वस्थ होऊन ममतेच्या समुज्ज्वल राज्यांत कां बरें प्रवेश केलात? आणि मातृवियोगानंतर असल्या म्हातारपणींही सात दिवसपर्यंत आपल्या आईसाठीं एकांतांत आपण रडत बसलां, त्यांत कोणतें बरें राजकारण साधावयाचें होतें? आपल्या हातांत आज सत्ता असून आपण राजेश्वर आहां, हें मला कबूल आहे. तसेंच, मीं म्हणजे एक आपला गरीब प्रजाजन आहें हेंहि पण मी विसरलों नाहीं. याउपर मी अपराधी आहें असें आपणाला वाटत असल्यास आपण कायद्याप्रमाणें मला शिक्षा द्यावी. मीं ती भोगण्याला तयार आहें."

रोगांनीं जर्जर झालेला अकबरशाहा दुसऱ्या एकाद्यावेळीं आपल्या नातवाचें जर हें युक्तिसंगत बोलणें ऐकता, तर खुसरूला जवळ घेऊन प्रेमभरानें त्याचें चुम्बन घेण्यालाही त्यानें कमी केलें नसतें; पण आजची स्थिति कांहीं वेगळीच असल्यामुळें खुसरूचें हें बोलणें ऐकून त्याला वाटलें, 'आपला नातू फारच उद्धट, वाचाळ आणि उच्छृंखल बनला आहे, व आज तो प्रत्येक शब्दानें राजशक्तीशीं विरोध करून तिचा अपमान करीत आहे. तसें नसतें

तर माझ्या समोर–अकबरबादशाहा समोर राहून इतकें बोलण्याचें धाडस त्याच्यानें करवलेंच नसतें.' असा विचार मनांत येतांच सम्राट्‌ला फारच राग आला आणि तो क्रुद्ध स्वरानें म्हणाला, "खुसरू! तूं फारच उद्धट आणि गर्विष्ठ झाला आहेस. तुला मर्यादा अशी कांहीं राहिलेलीच नाहीं. तुझ्या या उद्धटपणाचें बक्षिस मी तुला आतांच देतों." असें म्हणून सम्राट्‌नें 'अजीमखाना'ला मोठ्यानें हाक मारली.

राजकार्याची जबाबदारी अंगावर असल्यामुळें केव्हां कसलें कारण पडेल याचा अंदाज नसे. यासाठीं खुसरूचा सासरा अजीमखान रात्रंदिवस खास महालाला लागूनच असलेल्या मोठ्या दिवाणखान्यांत रात्रंदिवस बसून असे. अकबरशाहाची जोराची हाक ऐकतांच तो बिचारा घाबरून धांवत धांवतच आंत आला आणि चकितपणानें इकडे तिकडे पहात कुर्निस करून म्हणाला, "बंदा हजर आहे. हुकूम व्हावा."

अकबरशाहा दृढस्वरानें खानाला म्हणाला, "हा समोर उभा असलेला शाहाजादा खुसरू, यानें राजाज्ञेचें उल्लंघन केलेलें असल्यामुळें तो अपराधी ठरला आहे. तेव्हां याला याच्याच महालांत त्याला योग्य अशा इतमामानें वागण्याची परवानगी देऊन नजरकैदेंत ठेवा. माझ्या परवानगीवांचून यानें राजवाड्याबाहेर जातां कामा नये. आणि खान अजीम! याच्या संरक्षणाच्या बाबतींत सर्व जबाबदारी मीं तुमच्यावर सोंपविली आहे."

अजीमखान एकही शब्द न बोलतां आपल्याशींच आश्चर्यचकित होऊन खुसरूसह राजमहालांतून बाहेर पडला. इकडे शाही बेगमही, अलंकारांची हस्तिदंती पेटी तेथेंच टाकून एकाद्या वेडीप्रमाणें घाईघाईनें तेथून बाहेर पडली.

आपल्या महालांत आतां कोणी नाहीं, असें पहातांच अकबर शाहानें एक दीर्घ निश्वास सोडून आपल्याशींच मोठ्यानें बोलण्याला सुरवात केली. 'एमा आतां योग्य तेंच केलें. कारण मी आतां अगदीं मृत्यूच्या जवळ येऊन पोंहोंचलों आहें. अर्थात् यावेळीं मला सेलिमच्या फायद्यावांचून दुसरी कोणतीही गोष्ट दिसेनाशी झाली आहे. आज झाला हा प्रकार उत्तमच झाला. कारण आतां राजा मानसिंह आणि अजीमखान यांच्या कुष्णकारस्थानापासून खुसरूला सहजच दूर राहतां येईल. शाहीबेगम! तुझी प्रार्थनाही मीं

एकप्रकारें पूर्ण केली आहे. आतां सुलतान सेलीम याच्या रागांतून खुसरूला सोडविण्यासाठीं मला अशाच राजनैतिक प्रकारानें चालावें लागत आहे; पण याचें मर्म जर तूं जाणूं शकली नाहींस तर तें दुर्भाग्य होय. त्याला मी काय करूं ? "

होऊन गेलेला प्रकार जरी फारसा महत्त्वाचा नव्हता तरी मनाची स्थिती अस्वस्थ करण्याला तो पुरेसा होता, यांत संशय नाहीं, आणि अकबरसारख्या आजारानें दुर्बल झालेल्या मनाच्या पुरुषाला तर तो फारच जाणवला. त्यानें लागलीच दासीला जवळ बोलवून उत्तेजक पेय आणण्याचा हुकूम केला. कारण यावेळीं त्याला तशा पेयाची फारच आवश्यकता वाटली.

सरबत घेतल्यानंतर त्याच्या मादकतेमुळें सम्राट्‌ला बराच वेळपर्यंत चांगली झोंप लागली, आणि त्या झोंपेंत त्यानें स्वप्न पाहिलें, कीं, खुसरू, आग्र्याचा राजप्रसाद सोडून पळून गेला असून राजा मानसिंह व अजीम-खान कोको याच्या सहाय्यानें तो असंख्य सैन्य घेऊन आपणाला व आपला भावी वारस सेलीम याला कैद करण्यासाठीं येत आहे.

या स्वप्नाच्या भ्रमिष्टावस्थेंतच सम्राट्‌नीं ' सेलीम ! सेलीम ! ' म्हणून मोठमोठ्यानें आरडण्याला सुरवात केली.

यावेळीं सेलीम, झोंपलेल्या सम्राट्‌च्या बिछान्यावर बसून हळूहळू त्यांच्या पायांवर हात फिरवीत होता; पण आपल्या बापाचें तें भीतिजनक ओरडणें ऐकतांच तो त्या समोर उभा राहून म्हणाला, " पिताजी ! आपणाला कांहीं वाईट स्वप्न पडलं वाटतं ? मी हा इथें उभा आहे."

अकबरशाहानें आपले डोळे उघडले आणि सेलीमकडे पहात उत्तर दिलें, " होय. फारच दुःखकारक स्वप्न मीं पाहिलें, बाळ सेलीम ! इतकें भयंकर आणि तापदायक स्वप्न मला अद्याप कधीं पडल्याचें आठवत नाहीं. स्वप्नांत मी असं पाहिलं कीं, असंख्य सैन्य घेऊन खुसरू आग्रा दुर्गावर चालून येत आहे, व मीं हौसेनें वसविलेली अकबराबाद स्मशानांत परिणत होऊन गेली आहे. तसेंच तुला आणि मला ठार मारण्यासाठीं तो रंगमहाल शोधीत आहे; पण सेलीम, आज दुपारीं मीं त्याला नजर कैदेंत ठेविल्याचें मला स्पष्ट

आठवतें.--तुझ्या स्वार्थसंरक्षणासाठींच मीं त्याला तसा ठेवला आहे, हें तुला सांगायला नकोच—तेव्हां जा. सेलीम ! खुसरू आपल्या खोलींत आहे कीं नाहीं हें पाहून ये. ''

त्या दिवशीं हा जो महत्त्वाचा प्रकार घडला होता, तो सर्व सेलिमला, सम्राट्च्या मुख्य दासीकडून समजलाच होता. अर्थात् बापाचा हुकूम होतांच निष्कारण विशेष चौकशी न करतां तो बाहेर पडला आणि थोडयाच वेळांत फिरून येऊन म्हणाला. " आपलें तें भयंकर दुःस्वप्न खोटें ठरलें, हें कळविण्याला मला आनंद वाटत आहे. खुसरू–नजर कैदेंत असलेल्या--आपल्या महालांत झोंपला आहे. या आग्रा किल्ल्यांतून पळून जाणें त्याला शक्य नाहीं. "

सम्राट्नें एक दीर्घ निःश्वास सोडून आनंदानें म्हटलें, " हां–सुटलों एकदांचा; पण माझी एक विनंति मान्य करशिल कां तूं सुलतान सेलीम ! ! "

सेलीमनें उत्तर दिलें, " विनंति कसली पिताजी ? अज्ञा व्हावी."

" चूक तर सर्वांच्याच हातून होते. मनुष्य चुकीला पात्रच आहे. तूंहि एकदां अविचारानें बंडखोर बनला होतास, आणि त्यावेळीं ' ही एक बाल—लीला ' आहे असें समजून मीं तुला क्षमाही केली होती. कां मी म्हणतों हा प्रकार तुझ्या लक्षांत येतो ना ? '' यावर सेलीम म्हणाला:—

" आपणासारखे उदार अन्तःकरणाचें आणि क्षमाशील सम्राट्, या जगांत फारच क्वचित् असतील. " " असेल. तसेंहि असेल. तूं माझा फारच लाडका आणि सर्वांत वडील मुलगा आहेस. मग तूंहि माझ्यासारखा क्षमाशील कां नाहीं होणार ? तुझा मुलगा खुसरू याला नजरकैद करण्याचा हुकूम देतेवेळीं माझें हृदय अगदीं अस्वस्थ आणि विव्हल झालें होतें. तरीही मी पाषाण बनून तुझ्या हितासाठीं तेंहि कटुकर्तव्य करून चुकलों. सेलीम विसरण्यासारखी गोष्ट नव्हे, रजपुताचें उष्ण रक्त या खुसरूच्या प्रत्येक धमनींतून वाहात आहे. फार उग्र, अत्यंत दीर्घद्वेषी, अतिशय स्वतंत्र, आणि खडतर असिव्रतधारी अशी ही रजपूत जात आहे. याचा प्रत्यय मेवाडच्या महारणयज्ञाच्या वेळीं तुला आलाच असेल. जीवनाच्या या अन्ध-

कारपूर्ण सायंकाळीं मी दिव्य नेत्रांनीं पहात आहें, खुसरू हा, तूं आणि मी मिळून त्याचा केलेला अपमान व त्यापासून होणाऱ्या निराशेच्या वेदना फार कालपर्यंत सहन करूं शकणार नाहीं. तूं सिंहासनावर बसतांच तो खात्रीनें बंड करील. याच साठीं तुला माझी अशी विनंति आहे, त्यावेळीं तूं क्षमाशील सम्राट् बनून व प्रेमळ बाप होऊन त्याचे सगळे अपराध क्षमा कर. त्याला मारूं नको, किंवा कैदेंतही टाकूं नको. बाळ सेलीम, मीं सांगितल्याप्रमाणें वागेन अशाबद्दल मला तूं शपथेवर सांग अथवा वचन दे. भारत सम्राट् अकबरशाहानें कधींहि कुणाकडे भिक्षेची याचना केली नाहीं; पण हा खुसरू ज्यावेळीं तुझ्या प्रचंड राजशक्तीच्या विरुद्ध वागेल, यावेळीं मी शिकंदराबाद्च्या शांतिमय भुयारांत–कबरस्तानांत–अक्षयच्या शांतिमय निद्रेंत गढून गेलेला असणार. मग त्यावेळीं या वेड्या खुसरूला कोण बरें वांचवील ! म्हणून मी तुला विनंति करतों, सेलीम ! माझ्या पायांना स्पर्श करून तूं तशी शपथ घे, तुझी खुसरूला वांचविण्याबद्दलची ती शपथ ऐकल्यावांचून मला शांतपणें मरण सुद्धां येणार नाहीं. "

खरोखर खुसरूबद्दल सम्राट्च्या मनांत अनिवार प्रेमभाव वसत होता, आणि म्हणूनच ' आपल्या मरणानंतर त्याची काय स्थिती होईल ' ही काळजी त्याच्या अन्तःकरणांत कायमचें ठाणें देऊन बसली होती. अस्तु.

आपल्या बापाचें तें हृदयाला स्पर्श करणारें भाषण ऐकून सेलीमचें अन्तःकरण कळवळलें, आणि त्यानें तशी शपथ घेतली, तेव्हां अकबरशाहानें प्रेमभरानें त्याचें चुम्बन घेऊन आशिर्वाद देत म्हटलें, " सुलतान सेलीम ! माझ्या आवडत्या मुला ! खुदा तुझें कल्याण करील ! माझ्या हृदयावरचें एक फारच मोठें ओझें तूं आज खालीं उतरून टेविलेंस ! ! "

---

## प्रकरण २९ वें.

—:०:—

### दुःखपूर्ण राजसंसारा, तुला धिक्कार असो !!

" किसवास्ते ? दुनियाकी सारी खुँशियाकि खात्मा हो गई है. फिर किस् उमेदपर जिन्दगी बसर करूंगी ? आये रब् ! मुझे अपनी कद्मोंपर

पनाह् दे. आये मौत् ! आये रफिक !! तूं मेरी सारी दर्दोंको मिटा कर मुझे हामाशात् के लिये राहह् पोंच्छा."

शाही बेगम निराश झाली. तिचीं सगळीं आशाबंधनें ताडकन् तुटलीं. त्याच बादशाहानें केलेली अवज्ञा आणि राग, तसेंच खुसरूच्या नशिबीं आलेली नजरकैद, या सगळ्या गोष्टींनीं, तिच्या मनानें गुंफलेलें भावी आशेचें सूत्र-जाल छिन्नविच्छिन्न होऊन गेलें. तिचा सगळा भरंवसा आणि शेवटची आशेची जागा काय ती भारत सम्राट् अकबरशाहा हीच होती. कारण तिनें आजपर्यंत केलेल्या सगळ्या प्रार्थना सम्राट्नें पूर्ण केल्या होत्या. पण हाय ! तोही शेवटीं निष्ठुर होऊन त्यानें तिला गोता दिला. 'हाच का हिंदुस्तानच्या सम्राट्चा न्याय ? माझ्या लाडक्या व प्राणापेक्षांहि ज्यास्त असलेल्या खुसरूचा अपराध क्षमा करण्याला योग्य असतां, त्याला एकाद्या साध्या मनुष्याप्रमाणें नजरकैदेंत ठेवलें, हें सम्राट्चें कृत्य योग्य असेंच जग म्हणेल का ?"

दारुण मनस्तापांत आणि प्रचंड निराशेच्या अग्नींत पोळत असतां शाहीबेगम बडबडत होती. आपला मनोभाव उघड करून मृत्यूला बोलवावें हाच तिचा आतां शेवटचा हेतु शिल्लक राहिला होता. जिच्या जीवनांतील सगळे हेतू भस्मीभूत झाले आहेत, सगळ्या आशांचेंहि समूळ उच्छेदन झालें आहे, सुखाच्या सर्व कल्पना हवेंतील प्रासादांप्रमाणें जागच्याजागींच गुप्त झाल्या आहेत, संसार हा जिला त्रासदायक वाटत आहे, सुखसंपद्मयी सरस शय्याहि जिला रूक्ष आणि स्मशानासारखी वाटत आहे, मलयसमीरणही जी विषाप्रमाणें त्याज्य मानीत आहे, जिच्या हृदयांत चोहोंकडून वृश्चिकदंशनाच्या वेदना तिची तळमळ वाढवीत आहेत, तिला त्या पुत्रवत्सलमातेला अशा प्रसंगीं जगण्याची इच्छा केव्हां तरी होईल काय ?

त्या दिवशीं जोधाच्या नशिबाप्रमाणेंच प्रकृतिदेवीनेंहि भयंकर रणदेवीचा वेष घेतला होता. संध्याकाळपासून आकाशांत अत्यंत काळ्या मेघांची हालचाल सुरू झाली. आणि प्रहर रात्रीनंतर जोराचें वादळ होऊन पावसाला सुरवात झाली. वीज तर जोराजोरानें चमकत होती आणि भीम प्रभंजनाच्या तडाक्यानें पृथ्वी हादरली जाऊन महाप्रलय आला कीं काय, असाच भास उत्पन्न होत होता.

जोधा यावेळीं अस्पष्ट स्वरानें म्हणाली, " हीच योग्य वेळ आहे. झोंपलेल्या पृथ्वीच्या हृदयावर मेघ, वृष्टी आणि वज्रनाद यांचें तांडव नृत्य चालू असून चोहोंकडे भीतिकारक अंधकार पसरला आहे. मेघांचा, हृदयाला थरारून सोडणारा गडगडाट, घनदाट कृष्णमेघमालेतील चमत्कृतिजनक विद्युत्स्फुरण आणि सोसाट्याचा वारा हे प्रसंग मृत्यूला फारच बहारीचे असतात आणि त्यामुळेंच तो अंधकाराचा विस्तीर्ण पडदा मेदिनीवर सोडीत असतो. चाकर, नोकर, गुलाम खोजे सगळे कांहीं या वेळीं शांतपणानें झोंपले आहेत आणि मी मरणासाठींच जणुं काय जागी राहिल्ये आहे. "

शाही-बेगम निराशापूर्ण अन्तःकरणानें प्रसादाच्या आंगणांत येऊन उभी राहिली. आकाशभर पसरलेल्या काळ्याकुट्ट मेघांच्या हृदयावर थैमान करणाऱ्या विजेनें याच वेळीं भयंकर हास्य केलें. कारण यमुनेच्या खोल उदकांतून कोणी एक कालपुरुष निघून तो तिच्याच तरंगयुक्त हृदयावर उभा राहून शाहीला म्हणत होता. " ये. शाही बेगम, ये. जर तुला चिरशांति पाहिजे असेल तर माझ्या राज्यांत ये. अकबरशाहाची सून होऊन तुला कसलें बरें सुख मिळालें शाही ? आजन्म तळमळण्यांत आणि धाय मोकलून रडण्यावांचून मला वाटतें तुला येथें कांहींच लाभ झाला नसेल. सुखासाठीं जन्म घेऊन आजीवन दुःख भोगणें हें अगदीं असहनीय होय ! नको. शाही-बेगम हें दुःख भोगण्याला तूं आतां येथें राहूंच नको. "

अशरीरी कालपुरुषाचें तें कठोर बोलणें ऐकून शाहीबेगमचें हृदय थरथर कांपूं लागलें. पुन्हां आकाशांत वीज चमकली. शाहीला तेथें उभें राहवेना त्यामुळें ती आपल्या कोमल करपल्लवानें डोळे झांकून घेऊन झरझर चालत आपल्या खास महालांत आली. हाय ! किती बिचारी दुर्दैवी !! घरांत, बाहेर, कुठेंहि तिला पुत्रप्रेमाच्या तळमळीमुळें विश्रांति नाहीं !!!

बेगमनें निरनिराळ्या बाजूंकडून पुष्कळ विचार करून पाहिला; पण मरणावांचून श्रेयस्कर असें तिला कांहींच वाटेना. मृत्यू म्हणजेच शांती हें तत्व तिला अगदीं पटत चाललें. नवजीवन आणि कायमची विश्रांति मृत्यूमुळेंच लाभते. पण तिला अशी पंचाईत पडली, ' मरणाला चांगला उपाय

कोणता ? आणि तो मला कोण बरें सांगेल ? यमुनेच्या उदरांत प्रवेश करून मरणें हें कांहीं माझ्याच्यानें होणार नाहीं. तसें मरण फारच लज्जाकारक आणि कमीपणा आणणारें आहे. कारण अशा रीतीनें मरण पत्करल्यास मोंगल राजकुलांतील एक पडदानशीन थोर स्त्री सर्वांच्या नजरेला पडेल आणि तसें तर कधींहि होतां नये. मरून मरायचं मग हा असला कलंक लावून तरी कां घ्यावा अशानें मी सर्वांच्या तिरस्काराला पात्र होईन. छे. छे. पाण्यांत बुडून मरणानंतर देहाची काय जी लज्जास्पद स्थिती होते ती उच्चारवत सुद्धां नाहीं! अर्थात् बादशाहाच्या भावी राजराजेश्वरी होणाऱ्या सुनेला असला मृत्यु गौरव जनक नाहीं—"

कांहीं वेळ स्तब्धपणानें विचार केल्यानंतर शाहीबेगमला उपाय सुचला व ती आपल्याशींच म्हणाली, "वा: चांगलाच उपाय सुचला. उगाच मीं इतकी काळजी करण्यांत वेळ घालविला. अंबर प्रासादांतून बाहेर पडतांना संरक्षक वस्तू म्हणून जें मीं एक प्रकारची तीव्र विष आणलें आहे तें मी अजूनपर्यंत अगदींच विसरून गेल्यें होतें. तें वीष चट्कन् प्रसंगीं उपयोगीं पडावें म्हणून मीं माझ्या पेटींतच ठेवून दिलें आहे, तें सरबताबरोबर घेतलें म्हणजे झालें. बादशाहाच्या रंगमहालांत असे प्रकार नेहेमींच होत असतात. मग मी असें करणार त्यांत नवीन तें काय असणार ? "

पुन्हां कांहीं वेळानें शाहीची बडबड सुरू झाली, "ती म्हणाली, आज सम्राट्चा आजार बराच वाढलेला असल्यामुळें हिंदुस्तानचे भावी राजराजेश्वर कांहीं इकडे येऊं शकणार नाहींत.ते आज राजप्रासादांतच राहातील.तसेंच माझा लाडका खुसरू तर नजरकैदेंतच आहे. तो कसचा इकडे येतो ! दासदासी तर यापूर्वींच झोंपीं गेल्या आहेत. शिवाय आजच्या वादळी हवेनें व पावसानें सगळ्या विश्वाला एक प्रकारची बधिरता उत्पन्न केली आहे म्हटलें तरी चालेल. असल्या या सुवेळीं आपण मुकाट्यानें जाऊन तें हलाहल विष घ्यावें म्हणजे झालें. उद्यां मी कदाचित् सुलतानच्या नजरेला पडेन व 'मी झोंपलेली कां' असें विचारण्यासाठीं ते माझ्या बिछान्याजवळ येऊन मला विचारतीलही; पण माझा चेतनाहीन आणि प्राणहीन देह त्यांना काय उत्तर देईल बरें !! त्या वेळीं महानिद्रेनें माझे नेत्र झांकलेले असतील, अर्थात् थोड्याच वेळांत

पुत्राच्या दुःखामुळें मातेचें पुत्रवात्सल्य हृदय कसें करपून जातें वगैरे सगळा प्रकार त्यांना कळून येईल-"

जोधाबाईचा विचार कायम झाला. आणि तिनें एका लहानशा पेटीमधून, पूर्वीच ठेवलेलें जलाल विष बाहेर काढलें. नंतर तिनें, शिराजीमिश्रित सरबत तयार केलेलें होतेंच त्यांत तें ओतलें. या भीषण समयीं पुन्हां एकदां मेघांचा भयंकर गडगडाट झाला, त्यामुळें विष ओततांना तिचा हात कांपत होता; पण विषपात्र तयार होतांच तिला एक प्रकारची भीति वाटून ती त्या भांड्याजवळून उठून दूर उभी राहिली. त्याच वेळीं तिनें ऐकलें कीं, कोणी मनुष्य दरवाज्याबाहेरून आपणाला दीन स्वरानें हांक मारीत आहे.

तो स्वर खुसरूचा आहे असें जोधाबाईनें ओळखलें व ती हांक मारणारी शुभ्रवसनावृत व्यक्ति आंत येतांच तर तिला त्यांची चांगलीच ओळख पटली; पण वाचकहो, तो सर्व भास होता. आलेली व्यक्ति खुसरू आहे अशी शाहीची खात्री होतांच तिनें त्याच्याकडे निरखून पहाण्याला सुरवात केली. तोंच त्याच्या शुभ्रवस्त्रावर चांगले मोठाले रक्ताचे डाग पडलेले तिला आढळले. त्या व्यक्तीचे डोळे अगदीं खोल गेलेले होते, चेहेरा निस्तेज झालेला होता, आंग अगदीं चेतनाहीन होतें. निश्चल पाषाणमूर्तिप्रमाणें, भिंतीच्या आधारानें ती उभी असलेली, खुसरूचा भास उत्पन्न करणारी व्यक्ति पाहून शाहीच्या आंगावर शहारे आले.

त्या भासमान व्यक्तीचे-छायामूर्तीचे ओंठ हालले-आणि तिनें थोड्या वेळानें अस्पष्ट स्वरानें बोलण्यालाही सुरवात केली, "आई! आतां काय आहे? कोणत्या सुखासाठीं तूं या राजमहालांत आतां राहिली आहेस? मी आज मरण पावलों हें तुला समजलें नाहीं का? गुप्त मारेकऱ्याच्या तीक्ष्ण शस्त्रानें माझें हृदय छिन्नभिन्न झालें आहे. ज्याच्या आशेनें तूं अजूनही जिवंत राहिली आहेस, त्या तुझ्या खुसरूला तूं आतां विसर. त्याचाच सूक्ष्म देह आज यावेळीं तुझ्या नजरेला पडत आहे, आणि तुझा निरोप घेण्यासाठींच तो येथें आला आहे. अहाहा! आई! मरणानंतर किती शांति मिळते म्हणून सांगूं! मृत्यु हा सर्वांचा कायमचा मित्र आहे. त्याच्या शीतल, सुखकारक, आणि शांतिमय स्पर्शानें अपूर्व सुखाचा लाभ होतो, यांत संशय नाहीं. महापापी, पुण्यवान्, सम्राट्, भिकारी कोणीही असो, तो सर्वांना

समानतेनें शांति देतो. त्याच्याकडे कसलाच भेदभाव नाहीं. आई! आणखी ऐक. ज्या सम्राट् अकबरशाहानें मला कैदेंत घातलें होतें तोहि कांहीं जिवंत राहिला नाहीं. त्याचा आत्माही आतां माझ्यासारखाच स्वैरसंचारी बनला आहे. खरोखर या जगांत जर कांहीं सत्य असेल तर तो हा मृत्युच होय. माया ही खोटी आहे आणि प्रत्येक मनुष्याला त्याच्या जीवनांत ती त्याला फसवीत असते. आई! तो सुखकारक मृत्यु यावेळीं तुझ्या समोर सहज येऊन उभा राहिला आहे. मग तूं त्याला आतां कां बरं भितेस? चिरशांति-मय महानिद्रेचा तूं आतां खुशाल उपभोग घे. कारण तूं मरण पावल्यावांचून तुझा खुसरू कांहीं तुला दिसणार नाहीं—"

बोलणारी छायामूर्ति अकस्मात् बोलेनाशी होऊन ती विद्युद्वेगानें निघून अदृश्य झाली. पुन्हां एकदां वीज चमकली, आणि मेघांचाही गडगडाट शाहीला ऐकूं आला. शाहीबेगमनें नंतर एक क्षणभरही विचार न करतां आपल्या खुसरूस सम्राटूनें मारलें अशीच कल्पना केली व पुत्राभावीं जगून काय करायाचें असें ठरवून विलंब न लावतां, तें विषमिश्रित सरबत घेतलें आणि दुधासारख्या पांढऱ्या शुभ्र शय्येवर ती झोंपीं गेली. तिचे डोळे केव्हांच मिटले गेले. ही तिची झोंप म्हणजे शेवटच्या महानिद्रेचीच पूर्वसूचना होती म्हटलें तरी चालेल!! वाचकहो, निरासक्ती मा; किंवा **मातृहृदय** म्हणतात तें यालाच!!!

दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावरही तिनें डोळे उघडले नाहींत. या काय-मच्या झोंपेंतून जागृत करण्याचें सामर्थ्य ईश्वरावांचून दुसऱ्या कुणाला अस-णार? झालें. संपलें. शाहीची तळमळ आणि आशा यांचा लोप झाला. आणि विचारही संपले. हाय! हतभागी शाही–बेगम, तूं राजस्नुषा असतांना, भावी सम्राटेश्वरी असूनही पुत्रशोकवेदनेमुळें तुझा असा अंत व्हावा काय? वैभव-शाली पण दुःखपूर्ण राजसंसारा, तुला धिक्कार असो!!!

— —

पडलेला पहातांच सेलिमच्या मनाची स्थिति काय झाली असेल तें त्या स्थितींतील एकादा मजासारखा विधुरच जाणूं शकेल! शाहीच्या अंगावर मृत्यूची मलिन छाया पडल्याचें मुळींच दिसत नव्हतें. ती निश्चिंतपणानें झोंपलेली आहे, असेंच पहाणाऱ्याला वाटत असे.

सेलीम जड अन्तःकरणानें हळू हळू त्या बिछान्याजवळ गेला, आणि वेड्याप्रमाणें चोहोंकडे पहात आवेगपूर्ण स्वरानें तो शाहीच्या देहाला—ती जिवंत आहे, असें मानून—म्हणाला, "तूं माझ्यावर रागावलीस होय? मी काल आलों नाहीं म्हणून तुला राग आला नसेल ना? मीं तुला त्रास दिला, तुझी विनंति ऐकली नाहीं, म्हणून तर तूं मला झोंपेच्या मिषानें फसवीत नाहींस ना? पण इतकी तूं निष्ठुर होशील असें मला वाटत नाहीं."

हिंदुस्तानचा भावी सम्राट् आणि पत्नीच्या अमूल्य प्रेमाची उपेक्षा करणारा सुलतान सेलीम, बोलतां बोलतां शाहीबेगमच्या देहावर पडला; पण भीतीनें लागलाच उठला, आणि लांब जाऊन उभा राहून निराशेनें वेड्याप्रमाणें ओरडत मोठ्यानें म्हणाला, "नाहीं. ही जिवंत नाहीं. हा तिचा देह प्रेतरूप आहे; पण हा आपोआप आलेला मृत्यु नसून आत्महत्या आहे. शाही! माझ्या लाडके! मला फसवून शेवटीं तूं गेलीस ना? आतां हा राजसंसार तुझ्या अभावीं मला कसचा सुखावह होणार?"

"दयाळू ईश्वरानें आपल्या अमोघ कृपेनें मला हें अमूल्य रत्न दान केलें होतें; पण मी वेडा आणि मूर्ख बनून त्या रत्नाला न ओळखतां गारगोटीचा तुकडा आहे असें मानून भयंकर कालसमुद्रांत त्याला फेंकून दिलें. हाय! मला आतां मरणापर्यंत शांति मिळणार नाहीं, आणि पुढें तरी मिळेल कीं नाहीं, कुणाला माहीत! खुदा! माझ्यावर दया कर आणि माझी ही शाहीबेगम मला फिरून दे! मी तिच्या अर्ध्या वचनांत वागेन आणि क्षमाशील होईन. मला सिंहासन नको, जगाचें ऐश्वर्य नको, अधिकार नको, आणि तो अधिकाराचा नसता गर्वही नको. फार काय आग्र्याचें राजभांडार लाथाडून यमुनेंत फेंकून देण्यालाहि मी तयार आहें; पण मला माझी शाही फिरून दे. ती आपल्या कमलासारख्या प्रफुल्ल नेत्रांनीं माझ्याकडे पाहून एकदां तरी स्मित हास्य करूं दे! मी तिला माझ्या हृदयांतील दोन गोष्टी विचारणार आहें!!

" जिवंत असतां जिचा मी अनादरच करीत आलों. मरणानंतर जिच्याकरितां मी रडत आहें, चिरशीतल कबरस्तानांत जिच्या शेवटच्या विश्रांतीची जागा तयार करून देऊन गतस्मृती मीं विसरूं शकत नाहीं तिला खुदा ! तूं कांहीं वेळापुरती तरी निदान जिवंत कर. मला एकवार तिचं दर्शन घेऊं दे. "

सेलीमनें शेकडोंवेळां त्या मृत्युमलीन अधरांचें व्याकुलपणानें चुम्बन घेऊन आपलें अत्यंतिक प्रेम व्यक्त केलें, तरी शाहीनें अधिरतेनें उठून त्याला आलिंगन दिलें नाहीं. त्यानें तिला करुणपूर्ण शब्दांनीं किती तरी हाका मारल्या; पण तिनें मुळींच केव्हां त्याला उत्तर दिलें नाहीं, किंवा एकवारही त्याच्याकडे डोळे उघडून पाहिलें नाहीं.

अशाप्रकारें सेलीम आपल्या प्रियेची आराधना करण्यांत गुंतला असतां अकस्मात् त्या महालाच्या दरवाजांत कुणाचासा पादरव त्याला ऐकूं आला. चट्कन् त्यानें तिकडे पाहिलें. त्याला वाटलें शाहींच आली; पण पहातो तों तिसरीच व्यक्ती !! आलेलें माणूस शाही नसून तिची मुख्य दासी रुबिया होती.

सेलीमला अतिशय राग आला. त्यानें कर्कश स्वरानें तिला विचारलें. " कोण तूं ? "

" जनाब अली ! मी दासीचीहि दासी आहे. माझें नांव रुबिया. "

" रुबिया ? तूं कसली रुबिया ? सैतानी आहेस, आणि माझी थट्टा करण्यासाठीं या ठिकाणीं आली आहेस. "

" तसं धाडस या क्षुद्र दासीला कसं होईल शाहाजादेसाहेब ? "

तरी पण या उत्तरानें सेलीमचें समाधान झालें नाहीं. त्यानें अत्यंत क्रुद्ध स्वरानें एका तातार स्त्रीला उद्देशून हांक मारली. " जुमरान् ? "

हाकेचें शेवटचें अक्षर पुरें होतें न होतें तोंच एक काळी कुट्ट आणि मांजरासारख्या डोळ्यांची तातारी तेथें येऊन कुर्निस करून उभी राहिली, तेव्हां सेलीम तिला उद्देशून तीव्र स्वरानें म्हणाला, " ही दासी रुबिया, मी असा दुःख करीत असलेला पाहून माझी थट्टा करण्यासाठीं येथें आली आहे, तेव्हां हिला तूं आपल्या खोलींत घेऊन जा आणि दहा कोरडे लगावून शाही-मंदिरांतून घालवून दे. "

हा विलक्षण हुकूम ऐकतांच तातांरीनें आश्चर्यानें सेलिमच्या तोंडाकडे पाहिलें. रुबियाला तर वाटलें कीं, खरोखरच सेलीम वेडा झाला असला पाहिजे. ती नम्रतेनें हात जोडून म्हणाली, " शहाजादे साहेब! आपल्या कल्याणासाठीं मी मरायलाही तयार आहें; मीं आतां जी येथें आलें ती मूर्तिजाखानाचा निरोप घेऊन आलें आहें. एक अत्यंत जरूरीची अशी बातमी त्यांनीं आणली असून ते आपली वाट पहात दिवाणखान्यांत बसले आहेत. "

मूर्तिजाखानाचें नांव ऐकतांच सेलिम चांगला शुद्धीवर आला, व रुबियेला जायला सांगून तो त्या खास महालाच्या बाहेर पडला. दिवाणखान्यांत येऊन पाहतो तों, बादशाहाचा सेनापती आणि आपला अगदीं जिवाचा मित्र मूर्तिजाखान खिन्न चेहेऱ्यानें एका कोचावर बसलयाचें त्याला आढळून आलें.

त्याचा तो निस्तेज आणि काळजीयुक्त चेहेरा पहातांच सेलिमच्या शोकमग्न हृदयाला धक्का बसला. त्यानें अस्वस्थतेनें विचारलें, " काय बातमी आहे ? "

मूर्तिजाखान उत्तरला, " कसली बातमी! चोंहोकडे अशुभताच पसरलेली दिसत आहे. सम्राट्चा आजार फारच वाढला असून या संधीचा फायदा घेऊन मानसिंह आणि अजीमखान यांनीं खुसरूला सिंहासन मिळवून देण्याचें कृष्णकारस्थान चालविलें आहे. आपण आग्रा प्रासादांत सम्राट्ला पहाण्यासाठीं जातांच खात्रीनें ते आपल्याला कैद करतील. यापेक्षां आणखी अशुभ बातमी ती काय असायची सेलीम!! "

या बातमीनें सेलिमाचा चेहेराही बराच विचारयुक्त दिसूं लागला. त्यानें काळजीयुक्त स्वरानें उत्तर दिलें, " होय. तूं म्हणतोस तें खरें आहे. "

सेलीमची ती खिन्नावस्था पाहून मूर्तिजाखान त्याला धीर यावा या उद्देशानें म्हणाला, " तरी पण सुलतान सेलीम! आपणाला इतकें खिन्न होण्याचें कारण नाहीं. शाही मंदिराच्या छावणींत आपलें निमकहलाल पांचहजार मोंगल सैनिक आजपर्यंत बसूनच चैन करीत आहेत कीं, नाहीं? त्यां

ना आतांच्या आतां तयार राहण्याचा हुकूम द्या. म्हणजे ते दौलतबागेचा घाट पार होऊन आग्र्यापासून एक कोसावर छावणी देऊन राहतील. दुसरी एक गोष्ट शाहीबेगमच्या या शोचनीय मृत्यूची बातमी अद्याप आमा शहरांत पोंचली नाहीं, तेव्हां शक्य तितक्या गुप्तपणानें तिला दौलतबागेंत कबर द्या. ती मृत्यू पावल्याचें कुठेंच जाहीर होतां कामा नये. सुलतानसाहेब रडण्याला वेळ पुष्कळ आहे. ही वेळ अशी रडत बसण्यांत घालविल्यावर अक्षयच रडावें लागेल. तसेंच आणखीही आपणाला एक मोठा थोरला शोक करावयाचा आहेच. आरण या बाबतींत आधीं पुढें सरा. मीही आपलें सर्व सैन्य घेऊन आपणाला लागेल तें साहाय्य करण्याला तयार आहे. ”

इतकें बोलून मूर्तिजाखान घाईघाईनें तेथून निघून गेला. मृत्यूच्या वेद-नांबरोबरच महत्संकट येऊन कोसळलें. जणुं काय धडाडयानें पेटणाऱ्या अग्नींत कुणीं तरी तूपच ओतलें असावेंसें सेलीमला वाटलें.

अनेक प्रकारच्या विचारांनीं आपल्या मनाला कांहींसें पूर्णस्थितीवर आणून व मनांतील शोक मनांतच दाबून ठेवून, छाती दगडासारखी करून आणि सतत वाहणाऱ्या अश्रुप्रवाहाला धैर्याचा बांध बांधून सेलीम त्याच दिवशीं मध्य रात्रीं दौलतबागेंत आपल्या प्रियतमेच्या प्राणविमुक्त देहाला शीतल कबरस्तानांत ठेवून जड अन्तःकरणानें शाहीमंदिरांत परत आला. झालें. चालता बोलता प्राणी निघून गेला आणि मातींत माती मिसळली गेली. फक्त राहिली काय ती आठवण, आणि ही आठवणच वियोग आणि विरह-वेदना यांच्या कात्रींत घालून नेहेमीं मनुष्याला रडवीत असते. आठवण न-सती तर जग चाललेंच नसतें.

ती उरलेली रात्र सुलतान सेलीमनें अश्रुविसर्जन करण्यांत घालविली. तो महाल, त्या मिन्याचें काम केलेल्या भिंती, तो अपूर्व शृंगार, तेथें प्रका-शणारे ते असंख्य स्फटिकदीपक, गवाक्षांतून येणारा तो शीतल वायुप्रवाह, वगैरे प्रकारांनीं सुख होण्याची गोष्ट तर दूरच राहिली; पण ते उलट दुःखाला कारण होऊं लागले. कारण जिच्यामुळें या महालाला शोभा यावयाची तीच नाहींशी झालेली. मग इतर उपांगांचा तेथें काय उपयोग? प्राणावांचून अस-लेल्या देहाला पुष्कळ शृंगार केला; पण तो सगळा प्रकार शोभेच्या ऐवजीं विशोभाच उत्पन्न करावयाचा. हाय! शाही गेली; पण तिची आठवण राहिली.

पक्षी गेला; पण त्याचा पिंजरा तसाच राहिला, आणि फूल सुकून झडून पडलें, पण त्याच्या सुगंधाची जाणीव तशीच राहिली. हाय! गेली ती गेलीच, ती फिरून कसची येते.

असो. दुसऱ्या दिवशीं मध्यान्हीं बातमी आली कीं, ' मानसिंह आणि अजीमखान यांचें कारस्थान फुकट गेलें असून महाप्रतापशाली उमराव व सेनापती सैयद्‌खान हा या दोघांच्या विरुद्ध उभा राहून त्यानें त्यांच्या सगळ्या गुप्त हकीगती चव्हाट्यावर आणल्यामुळें ते अगदींच हतबल झाले आहेत. शिवाय सम्राटनें त्यांना आपापल्या प्रासादांत ताबडतोब निघून जाण्याचा सक्त हुकूम केला आहे. या बातमीनें सेलिमला दुःखांतही थोडेसें सुख वाटलें व आनंद झाला.

---

# प्रकरण ३१ वें.

--:०:--

## अकबर बादशाहाचा अंतकाल.

मखमालीनें मढविलेल्या स्वर्णखचित पलंगावर आजारानें अगदीं जर्जर झालेला सम्राट् झोंपला होता. आज बरेच दिवसांनीं त्याला चांगली झोंप लागलेली असल्यामुळें चोंहोंकडे विलक्षण स्तब्धता पसरली होती. नाडी अतिशय मंद चालली असून श्वासोच्छ्वासही अस्पष्टच होत होता. ही झोंप आहे, कीं, बेशुद्धावस्था आहे याचीच प्रथम प्रत्येकाला शंका वाटत होती. हकीमअल्ली, सारखी टक लावून सम्राट्च्या तोंडाकडे पहात बसला होता. तसेंच पलंगाजवळ असलेल्या कोचावर सचिंतावस्थेंत सम्राट्चे निकटचे आप्त राजा मानसिंग, अजीमखान व सम्राट्चा बालमित्र कादिरजहान मुफ्ती हेहि तिथें बसलेले होते.

' सुलतान सेलीम हा विलासी, व्यसनासक्त, अमीरउमरावांचा अपमान करणारा, महापंडित अबुलफजल यांचा खून करणारा, ' वगैरे अनेक गोष्टींची आठवण करून देऊन मानसिंह आणि अजीमखान या दोघांनींही आग्र्यांतील बड्या लोकांना सेलिमाविरुद्ध उठण्याला उत्तेजन देण्याचा यत्न केला होता; पण वीर सैय्यद्‌खानानें अशी कांहीं चतुरपणाची युक्ति

लढविली कीं, त्या कल्पनेच्या प्रभावानें मानसिंहाचें हें सगळें कारस्थान व्यर्थ गेलें.

तो सर्व अमीरउमरावांना म्हणाला, " असेल. सुलतान सेलीम यथेच्छाचारी, उच्छृंखल आणि उद्धट स्वभावाचा असेल; पण सम्राट् बनविणारे कांहीं आम्ही नाहीं. अकबरशहानूशहाचा तो वडील मुलगा असल्यामुळें तोच आम्हां सर्वांचा भावी बादशाहा आहे. त्याच्यावांचून दुसऱ्या कोणालाही आम्ही बादशाहा म्हणतां नये—न्याय, धर्म, कर्तव्य यांना अनुसरून व अकबरशाहाशीं निमकहलाल होऊन त्याच्या वडील मुलालाच आम्हीं अनुकूल होऊन मदत केली पाहिजे. मी सम्राट्चा सेवक असून सेनापती आहें, माझें आतांच सांगणें जर तुम्हांला मान्य नसेल तर तें मला,—याची उपेक्षा न करतां—तावडतोब बादशाहाला सांगणें भाग पडेल. आणि तसें झालें म्हणजे तुम्ही सर्व राजद्रोही ठरून भयंकर शिक्षेला पात्र व्हाल हें मी आधींच सुचवीत आहें. तसेंच राजा मानसिंग आणि अजीमखान ! तुम्हां दोघांनाही माझें असेंच सांगणें आहे, कीं, तुह्मी जर आमच्या विरुद्ध जाऊन अन्याय करण्याचें धाडस कराल तर मी सर्व अमीरउमरावांच्या मदतीनें जीव असेपर्यंत तुमच्याशीं लढेन. सम्राट्चा वडील मुलगाच बादशाहा झाला पाहिजे. मुलगा असतांना नातवाला गादी मिळणें अशक्य आहे. "

सैय्यदखानाच्या या निस्पृह बोलण्याची भीति वाटून बरेचसे अमीरउमराव मानसिंहानें भरविलेली ती गुप्त सभा सोडून दुसरीकडे निघून गेले. अर्थात् मानसिंहाची बाजू बरीचशी दुर्बल झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. बाजूच घसरल्यावर मग आशा कसल्या करणार ! आणि मनोरे तरी कसले रचणार ? सैय्यदखानाच्या हुकुमाप्रमाणें राजा रामदास कछवाहा त्याच वेळीं आपल्या सैन्यासह राजकोषाचें संरक्षण करण्याला निघून गेला. असो. या सगळ्या गोष्टी इतिहासानें सर्वांना सांगितल्याच आहेत. तेव्हां त्या अशाच सोडून, आतां आपण सम्राटाकडे वळूं. कारण सम्राट्ची अवस्था उत्तरोत्तर अगदींच शोचनीय होत चालली होती.

अकस्मात् सम्राट्चे निस्तेज ओंठ हालले, तेव्हां राजवैद्य अलीखान मृदु स्वरानें—कानाजवळ तोंड नेऊन—म्हणाला, " जहांपनाच्या मनांत कोणता हुकूम करावा असें वाटत आहे ? "

अकबरशाहानें क्षीणस्वरानें उत्तर दिलें, “ अझी ! आतां कसला हुकूम ! ! माझी या मर्त्यजगांत राहाण्याची मुदत आतां संपत आली. खुदा मला बोलवीत आहे; पण सेलीम कुठें आहे? अजूनही तो इथें येऊन पोंहोचला नाहीं काय ? हाय ! माझें आतां शेवटचें कर्तव्य करावयाचें तसेंच राहणार असें मला वाटतें. ”

याच वेळीं सुलतान सेलीम तेथें येऊन पोहोंचला आणि हकिमाच्या हुकुमाप्रमाणें सम्राट्च्या बिछान्याजवळ उभा राहून अश्रुपूर्ण नेत्रांनीं बापाच्या तोंडाकडे पहात मृदु स्वरानें म्हणाला, “ शाहान्शाहा ! आपला हा नराधम मुलगा हा आपल्या पायांशीं उभा आहे. आज्ञा व्हावी. ”

सेलीमचा शब्द ऐकतांच अकबरशाहाला आनंद झाला. तो स्नेहपूर्ण स्वरानें त्याला म्हणाला, “ प्रेमळ पिता, कोणत्याही मुलाला उद्धट किंवा उडखोर समजत नाहीं. जो मनुष्य नांवाला अयोग्य असा मुलगा असेल, अशालाही त्याचा बाप निस्सीम प्रेमानें वेडा होऊन त्याला सगळ्या अपराधांची क्षमा करतो. फार काय सांगूं सेलीम ? मुख्य अशा तीन काळज्या करण्यांतच माझें जीवन संपलें. पहिली काळजी, ज्या दयाळू खुदाच्या कृपेनें मला हें राज्य मिळालें त्या खुदाच्या इच्छेप्रमाणें मला हें चालवितां येईल कीं नाहीं, दुसरी, मला या माझ्या आवडत्या हिंदुस्तानासाठीं काय करतां येण्याजोगें आहे व काय केलें असतां याला ऊर्जितावस्था येईलही आणि तिसरी—तिसरी काळजी तुझी तूं कसाही असलास तरी प्रेमानें तुला हें माझें सिंहासन देऊन मी निघालों. मला आतां या दुनियेंत राहण्याला खुदाचा हुकूम नाहीं. तेव्हां माझें हें उदाहरण डोळ्यासमोर ठेवून तूं पुढें राज्य चालीव. हा सर्व भार आतां तुझ्या मस्तकावर ठेवून जात आहें. अजीजखान ! माझ्या हुकुमाप्रमाणें सर्व अमीरउमरावांना तूं बोलाविलेंस का ? ”

अजीमखानानें हात जोडून उत्तर दिलें, “ जहांपनाहाच्या हुकुमाप्रमाणें सगळी मंडळी जमून मागील खोलींत बसली असून ते आदेशाचीच वाट पहात आहेत. ”

अकबरशाहानें म्हटलें, “ बहोत आच्छा त्या सर्वांना मी इथें बोलवीत आहें म्हणून सांग. विलंब लावूं नको. ”

अजीजखानानें ताबडतोब त्या सर्वांना आंत बोलविलें, आणि त्या सूचनेसरशी ती राजनिष्ठ मंडळी आंत आली व परलोकवासी होणाऱ्या सम्राट्ला अभिवादन करून अधोमुखानें उभी राहिली—सर्वांच्याच चेहेऱ्यांवर एक प्रकारचा गंभीरपणा पसरला असून त्यांत खिन्नतेची झांक मारीत होती.

अकबरानें एकवार सर्वांच्या चेहेऱ्यांकडे पाहिलें त्याच्या चेहेऱ्यावर या वेळीं एकप्रकारचें दैवी तेज विलसत होतें. कांहीं वेळपर्यंत सर्वांकडे पाहून झाल्यावर सम्राट्नें क्षीण स्वरानें पण गंभीरपणानें सर्वांना उद्देशून बोलण्याला सुरुवात केली, " आतां मला ज्यास्त बोलण्याचें सामर्थ्य राहिलेलें नाहीं. माझी जीभ क्रमशः आंत ओढली जात आहे. नेत्रांतील पाहाण्याचें सामर्थ्य नष्ट होत चाललें आहे. तरी पण तुम्हांला अखेरच्या म्हणून दोन गोष्टी मला सांगावयाच्या आहेत. त्या सांगण्याचा प्रयत्न करतोंच—

" तुम्हीं सगळे शूर व विश्वासू असून माझ्या आश्रयानें प्रतिपालित झालेले आहां आणि प्रत्येकाजवळ द्रव्यही भरपूर आहे. तसेंच माझ्या हाताखालीं राहून भयंकर रणक्षेत्रांतही आपल्या जिवाची परवा न करतां अपूर्व समरकौशल्य दाखविण्यांत कसूर केलेली नाहीं. तेव्हां तुम्ही आपल्या तरवारी म्यानांतून बाहेर काढून मला सन्मान देण्यासाठीं त्या आपल्यासमोर ठेवा आणि गुडघे टेकून माझ्याजवळ बसा. मी आतां तुमचा अगदींच थोड्या वेळाचा सोबती आहें.—"

लागल्याच असंख्य तरवारी कोषयुक्त होऊन दीपप्रकाशांत विजेप्रमाणें चमकल्या. सम्राट्नें सांगितल्याप्रमाणें तरवारी ठेवून सगळे उमराव गुडघे टेकून बसले आणि उत्कंठेनें हुकूम ऐकण्यासाठीं उत्सुक होऊन राहिले.

यावेळीं सम्राट्चे दोन्ही डोळे अश्रुपूर्ण झालेले होते. त्यांना सर्वांना शेवटचा निरोप द्यावयाची वेळ आलीसें पाहून गहिंवर आला होता व त्यामुळें त्याच्या तोंडून शब्दही उमटेना. कांहीं वेळ अशा मुग्धावस्थेंत व भीषण स्तब्धतेंत गेल्यावर बादशाहानें बोलण्याला सुरवात केली. ते म्हणाले, " माझे सगळे हुकूम तुम्हीं नेहमीं देवाच्या आदेशाप्रमाणें आदरपूर्वक मानीत आलां आहां. जोंपर्यंत हें नश्वरजीवन आहे, जोंपर्यंत जीवकोषांतील जीवाचें

अत्यंत क्षीण स्पंदन चालू आहे तोंपर्यंतच मी अकबरशाहा, आणि तोंपर्यं-तच 'हें माझें हिंदुस्तान' असें मला म्हणतां येईल; पण नंतर? तेंच आतां ऐका मनःपूर्वक एका. मीं माझा वडील मुलगा सेलीम याला माझ्या सिंहास-नाचा वारस केलें आहे. सेलीम राहाणार, तुमचें वचन राहणार आणि अक-बरशाहाचा शेवटचा आदेश राजनिष्ठ मंडळीच्या कानांत सारखा गुणगुणत राहणार. जोंपर्यंत तुमचें अस्तित्व असेल, तोंपर्यंत तुम्ही माझ्या सेलिमला सांभाळा. तुम्हींच आतां माझ्या या उच्छृंखल मुलाला बापाप्रमाणें, भावाप्रमाणें आणि मित्राप्रमाणें आहां. तेव्हां 'आम्ही असेच सेलिमशीं वागूं' अशी तुम्हीं, माझ्या या शेवटच्या शय्येला स्पर्श करून शपथ घ्या. तुमचें हें वचन ऐक-तांच माझा तळमळणारा आत्मा शांत होणार आहे. एवढी माझी शेवटची इच्छा पूर्ण कराच."

सम्राट्च्या हुकुमाप्रमाणें सर्वांनीं सद्गदित अन्तःकरणानें शपथ घेतली. लागलीच सम्राट्नें आपल्या हातानें सेलीमच्या डोक्यावर राजमुकुट ठेवून त्याच्या कमरेला तरवार लटकावून दिली. सम्राट्ची परलोकीं जाण्याची मुदत आतां अगदीं जवळ येत चालली होती.

हां हां म्हणतां त्या जीवनदीपाचें तेल संपत आलें. नेत्रांचें तेज कमी कमी होत चाललें. चोहोंकडे निबिड अंधकार पसरत असल्यासारखें सम्राटाला वाटूं लागलें. सामर्थ्य संपत आलें. श्वासोच्छ्वास कमी होतां होतां अकस्मात् बंद झाला. झालें. जगांत येतांच घेतलेला पहिला श्वास सम्राट्नें उच्छ्वास-रूपानें जगाचा जगांत सोडून दिला आणि रिकाम्या हातानें परलोकची वाट धरली. जातांना अगदीं क्षीण स्वरानें त्याच्या तोंडून फक्त पुढील शब्द निघाले, "सेलीम! शाही बेगमकडे लक्ष दे. आणि खुसरू, खु–स–रू! खुदा खु–दा!!–"

पुढें एकही शब्द ऐकूं आला नाहीं. दिवा विझलाच. तारा गळून पडला. एक प्रकारें धरणीकंप झाला म्हटलें तरी चालेल. कारण तिच्या-वरचें एक अमोलिक रत्न हरपलें होतें. या वेळीं आकाशांतील नक्षत्रेंहि तेज-हीन दिसूं लागलीं होतीं. चंद्राला तर इतकें दुःख झालें कीं, त्यानें आपलें तोंड केव्हांच एका काळ्या मेघाआड लपविलें होतें. प्रकृति देवी आपलें गं-भीर निःश्वास सोडीत अकबरशाहाच्या प्राणविमुक्त देहाकडे पहात होती. ति-

च्यानें हालचालही करवेना. मारवाडच्या रखरखीत मैदानांतील उष्ण श्वासोच्छवास आग्र्याच्या प्रासादांत येऊन असंख्य दिव्यांच्या प्रकाशांत कायमचा निघून गेला. कदाचित् तो पृथ्वीवरच्या वातावरणांतही मिसळला असेल, आणि अजूनही जगांत वावरत असेल, पण मूर्तता गेली ती गेलीच. अकबरशाहाच्या मरणानंतर सेलीम '**अबुल मुजफर नूरउद्दिन महंमद जहांगीर**' हें नांवधारण करून हिंदुस्तानचा सम्राट् झाला. अर्थात् खुसरू, मानसिंह आणि अजीमखान यांच्या आशा हवेंतच विरून गेल्या हें सांगावयास नकोच. खुसरू आपल्या कैदखान्यांत स्वस्थ पडला होता; त्यामुळें आपण मातृहीन व पितामहहीन झालों आहों हें बिचाऱ्याला समजलें सुद्धां नाहीं. सेलीम तरी यांत त्याला काय कळविणार?

---

# प्रकरण ३२ वें.

—:०:—

## बाबा, आई कुठें आहे हो?

अकबराच्या मृत्यूनंतर सगळें हिंदुस्तान विशेषत: राजधानी आग्रा शहर अगदीं शोकग्रस्त होऊन गेलें होतें. जहांगीर आणि शहरांतील सगळे मुसलमान उमराव यांनीं सम्राट् अकबरशहाचा देह, खांद्यावर घेऊन पायांत कांहीं न घालतां व डोकीं उघडीं ठेवून शिकंदराबादच्या अंधकारपूर्ण कबरस्तानांत नेऊन ठेविला. जणुं काय त्याला अनन्त कालपर्यंत विश्रांतीच दिली. यावेळीं विशेष सांगावयाचें म्हणजे, या मंडळीबरोबर हतभागी शाहाजादा खुसरूही होता. त्याचे डोळे भरून आले होते व त्याच्या तोंडून शब्दही उमटत नव्हता. गरीब बिचारा खुसरू! कारण त्याला आतां कुणाचाच आधार राहिला नव्हता.

खरोखर कालचक्रासारखा वैद्य दुसरा कोणीही नसेल! दिवसामागून आठवडे, आठवड्यांमागून पंधरवडे आणि पंधरवड्यांमागून महिने सारखे जात होते. जहांगीर बादशहा, आपल्या बापानें घालून दिलेल्या कित्याप्रमाणें राज्य चालवून सर्वांची प्रीती संपादन करीत होता.

जहांगीरच्या जागीं दुसरा कोणी असता तर मानसिंह आणि अजीमखान

यांना त्यानें ठार मारलें असतें; पण जहांगीरनें, आप्तांच्या रक्तानें आपले हात कलंकित करावयाचे नाहींत असें ठरविलें होतें. त्यानें सर्वांना अन्तःकरणपूर्वक क्षमा करून आपल्या उदार अन्तःकरणाचा जास्त परिचय देण्यासाठीं राजा मानसिंहाला पूर्वीपेक्षांहि जास्त उच्च पदवीची जागा दिली, व बंगालच्या जमिनदारांचीं भांडणें तोडण्याच्या कामावर त्याची नवी नेमणूक करून त्यास मोठया सन्मानानें तिकडे पाठविलें. तसेंच अजीमखान याला पंचनदचा कारभारी नेमून त्यालाही सन्मानानें तिकडे रवाना केलें. अबूल फजलचा खून करणारा अच्छोरचा राजा वीरसिंहदेव यालाही त्यानें भरपूर बक्षीस व जाहागीर देऊन आनंदित केलें.

जहांगीरनें, सम्राट्च्या मृत्यूनंतर दुसरे दिवशींच खुसरूला पूर्ण स्वतंत्रता देऊन त्याला पाहिजे तिकडे फिरण्याला मोकळीक दिली होती. अद्याप, आपण मातृहीन झालों आहों हें खुसरूला समजलें नव्हतें. जहांगीरची गुप्त मसलत किती जोरदार असे याचें हें पहिलेंच उदाहरण होय; पण त्याला त्यांत कल्पने पलीकडे यश आलें होतें. खुसरूला अलाहाबादचा सुभेदार नेमण्याची जहांगीरची इच्छा होती; पण खुसरूनें आपण होऊनच ती जबाबदारीची कामगिरी नाकारली. जहांगीरला त्याबद्दल विषाद वाटला नाहीं. कारण खुसरूवरचा सगळा राग तो विसरला असून त्यावर पूर्ववत् प्रेम करूं लागला होता. कदाचित् आई वेगळा मुलगा म्हणूनही त्याचें मन वळलें असेल— नाहीं कुणीं म्हणावें ! !

राज्याभिषेक उत्सवानंतरही आपली आई शाहीबेगम आग्रा शहरांत आली नाहीं असें पाहून खुसरूचें मन अत्यंत संशयांत पडलें, व आपल्या संशयाचा खुलासा व्हावा म्हणून एके दिवशीं तो जहांगिरला म्हणाला, " बाबा ! माझी आई सध्यां कुठें आहे ? " खुसरूचा त्या वेळचा तो प्रश्न फारच करुणपूर्ण आणि दीनवाणा होता. तो प्रश्न ऐकून जहांगीर काय बोलतो ! त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले, चेहरा व्याकूळ आणि खिन्न झाला, ओंठ थरथर कांपूं लागले आणि तो अधोमुख झाला. आपल्या बापाची ही करुणास्पद स्थिति पाहून खुसरूनें अगदीं करुणस्वरानें पुन्हां प्रश्न केला, " जहांपनाह ! माझी आई कुठं आहे ? "

खुसरूच्या या प्रश्नानें तर जहांगीरच्या नेत्रांतून झरझर अश्रूच वाहूं लागले, व त्यापैकीं कांहीं अश्रुबिन्दु खुसरूच्या हातावरही पडले. तेव्हां त्यानें चमकून आपल्या बापाच्या तोंडाकडे निरखून पाहून म्हटलें, " तुम्ही रडतां कां बरं बाबा ? माझी आई आतां मला भेटायचीच नाहीं का ? "

जहांगीरला आतां ती बातमी गुप्त ठेवतां येणें अशक्य होतें. हृदय-भेदक शोचनीय बातमी दोन महिनेंपर्यंत त्यानें गुप्त ठेविली होती, ती आतां तशी ठेवतां येईल असें सेलिमला वाटेना. कारण त्याच्या नेत्रांतून वाहाणाऱ्या अश्रूंनीं ती बातमी केव्हांच बाहेर फोडली होती. अर्थात् त्याला बोलणेंच भाग होतें. तो म्हणाला, " माझ्या लाडक्या मुला खुसरू ! तुझी आई शाही-बेगम आतां या मृत्युलोकांत राहिली नाहीं. ती केव्हांच परलोकीं निघून गेली; पण तिच्या या अकालिक मृत्यूला आम्हीं तिघेहि–तूं, मी, आणि सम्राट् अकबरशाहा–कारण झालों आहों, हें विसरतां येत नाहीं. "

नंतर जहांगीरनें त्या दिवसाची एकंदर झालेली हकीगत सविस्तर रीतीनें आपल्या मुलाला सांगितली. इतकेंच नव्हे त्याच्या आईचें प्राणविमुक्त कलेवर अगदीं कांहीं गाजावजा न करतां दौलतबागेंत कां पुरण्यांत आलें तेंहि तो सांगायला विसरला नाहीं.

ही शोचनीय हकीगत ऐकतांच खुसरू अगदीं शोकमग्न होऊन गेला. आणि शेवटीं एखाद्या पोरक्या मुलाप्रमाणें बराच वेळपर्यंत आपल्या बापाच्या चेहेऱ्याकडे पाहात तो एक दीर्घ निःश्वास सोडून म्हणाला, " तर मग बाबा ! आतां मला आपलें असें म्हणायला या जगांत कोण आहे बरं ? "

यावेळीं जहांगीरला मृत सम्राट्जवळ घेतलेली शपथ आठवली. तसेंच " माझ्यासारखा क्षमाशील हो ! ! " हेंहि त्याचें वाक्य त्याच्या कानांत गुणगुणूं लागलें. तेव्हां कांहीं वेळानें जहांगीरनें खुसरूचे डोळे पुसले आणि त्याला आपल्या जवळ ओढून घेऊन त्याच्या तोंडावरून हात फिरवीत म्हट-लें, " खुसरू तूं कां बरं असं म्हणतोस ? मी आहे ना ? सगळ्या हिंदुस्तानची ही बादशाही एकीकडे आणि तूं एकीकडे ! ! मी तुला केव्हांही कांहीं कमी पडूं देणार नाहीं. "

बापाचे हे शब्द ऐकतांच खुसरू त्याचे पाय धरून अश्रुपूर्णनेत्रांनीं व कम्पित स्वरानें म्हणाला, "बाबा ! मी आपणाशीं अगदीं कृतघ्नपणानें वागणारा

मुलगा आहे.तेव्हां माझी आणखी एक विनंति आपण मान्य करा.कारण ती प्रार्थना आपण मान्य न केल्यास माझ्या मनाला बिलकुल शांतता मिळणार नाहीं. तेव्हां आपण मला दौलतबागेंतील महालांत कांहीं महिने राहण्याची परवानगी द्या. आणि तसें झालें म्हणजे आईच्या व आजोबांच्या कबरांचें दर्शन घेऊन मी आपला काळ घालवीन. मला आतां या ठिकाणीं राहाण्यानें सुख होणार नाहीं. कारण मातृवियोगाच्या दुःखामुळें मला कसलेच राजविलास आवडणार नाहींत."

जहांगीरनें खुसरूची ही योग्य प्रार्थना पूर्ण करण्याचें ठरविलें. त्यानें त्याला अडथळा केला नाहीं. अर्थात् खुसरू त्याच दिवशीं आग्रा प्रासाद सोडून यमुनेच्या परतीरीं असलेल्या "दौलतबागेंत" निघून गेला. शाही मंदिराजवळून दौलतबाग दोन कोस लांब होती. खुसरू बरोबर कांहीं नोकर व प्यारी बेगम इतकीच काय ती मंडळी तिकडे गेली. शिवाय त्याला ज्यास्त मंडळीचें कारणही नव्हतें.

---

## प्रकरण ३३वें.

—:o:—

### एकच प्याला!

मागील प्रकरणांत निवेदन केलेल्या गोष्टीस कांहीं महिने लोटले. खुसरू हल्लीं फारच अव्यवस्थित रीतीनें वागूं लागला होता. तो नेहमीं कांहींना कांहींतरी व्यसनांत गुंग झालेला असे. कित्येक दिवस अजीमखान आणि मानसिंह यांनीं त्याच्या डोक्यांत हिंदुस्तानच्या सम्राट्त्वाची कल्पना भरविण्याचा प्रयत्न चालविला होता; पण अकबरशाहाच्या निधनाबरोबरच त्या कल्पनेचेंहि निधन होऊन खुसरूला मद्यपानाचें भयंकर व्यसन जडलें. मातृवियोगाच्या शोकाची विस्मृति व्हावी म्हणून शिराजीच्या आराधनेला त्यानें प्रथम सुरवात केली; पण लोंचट वेश्येप्रमाणें ती त्याला कायमचीच आपलासा करून बसली. तिच्या हातून त्याला आपली सुटकाच करून घेतां येईना.

खुसरूला पुष्कळ स्वार्थी व व्यसनी मित्र मिळाले होते, आज तो बादशहाचा मुलगा म्हणून पांच हजारी मनसबदार बनला होता व शाहाजादा म्हणून पूर्वी ज्या सर्व जहागिरींचें उत्पन्न जहांगीरला मिळत असे त्या सर्व जहागिरींचा वसूल आतां खुसरूला मिळूं लागला होता.

अगोदर, कोणत्याही समारंभावांचून खुसरु मद्याला स्पर्श करीत नसे; पण तो कितीहि संयमी झाला तरी जहांगिरचा मुलगाच कीं, नाहीं ? बापाच्या शासनांतून मोकळा होतांच तो आपल्या भर तारुण्यांतील स्वातंत्र्याचा मन मानेल तसा उपभोग घेऊं लागला. शिराजी, विलासिनींचें गायन, विलासाचें तांडवनृत्य वगैरे प्रकारांनीं दौलतबागेंतील तो लहानसा खुसरूचा महाल अगदीं दणाणून जात असे, आणि मातृवियोगाचें हें चाललें शोकप्रदर्शन खुसरूला सुखदायक झाल्यामुळें त्याला मित्रांचीही वाण पडेनाशी झाली. अर्थात् शांत व मूकस्थितींत असलेला तो महाल आतां राजविलासांनीं अगदीं गजबजून गेला होता, हें सांगणें नकोच.

प्यारी बानूला हें सगळें दिसत होतें व समजतहि होतें. जो शाहाजादा पूर्वी तिला एक घटकाभरही दूर होऊं देत नसे, तो आतां दिवसांतून एकदांही तिला भेटत नसे; तरी पण ती त्याला पुष्कळ प्रकारें समजुतीच्या गोष्टी सांगे. आपले वडील सम्राट् असून आपण पुढें हिंदुस्तानचे मालक होणार आहां, हेंहि सांगायला ती कधीं विसरली नाहीं; पण तिच्या त्या गोष्टी ऐकतो कोण ? पत्नीच्या या रोज रोज चालणाऱ्या भाकड कथा ऐकून ऐकून खुसरूला इतका कंटाळा आला होता कीं, त्यानें तिच्या महालांतच येण्याचेंच सोडून दिलें. प्यारीबेगम रोज आपल्या अभिरेला खुसरूला बोलाविण्यासाठीं पाठवी; पण तो तिला शिव्या देऊन अगर तिचा उपहास करून तिथून घालवून देत असे. अशा प्रकारें सम्राटूच्या मृत्यूनंतर एकदोन महिन्यांतच खुसरूचें अशा प्रकारें अधःपतन होत चाललें.

खुसरूला ज्यावेळीं आपण करतों हें बरें नव्हे, असें वाटे, तेव्हां त्याला आईची आठवण होई आणि तो सगळे विलास सोडून एकटाच तिच्या कबरेजवळ जाई आणि एखाद्या लहान मुलाप्रमाणें रडत बसे. फुलांच्या पुष्कळ माळा आणवून त्या तिच्या समाधी भूमीवर पसरी, तसेंच सुंगधी अत्तरा-

च्या दिव्यांच्या रांगाच रांगा लावून सगळीकडे सुगंधच सुगंध करून सोडी. कारण आई म्हणजे त्याला ईश्वरासारखी वाटे. बराच वेळ रडून झाल्यावर तो सद्गदीत होऊन मृत आईला उद्देशून म्हणे, " आई ! तूं कुठं ग गेलीस ? जातांना मला सांगितलंस तरी ? मीं तुझे अनेक अपराध केले असतील; पण तुझें अन्तःकरण अत्यंत दयाळू व क्षमाशील होतें. मला तूं सगळ्या अपराधांची क्षमा केली होतीस, आणि माझ्यावर तुझें अत्यंत प्रेम होतें. तूं राजराजेश्वरी झाली आहेस; पण माझ्या बाबांजवळ तूं नसल्यामुळें सिंहासनाची एक बाजू अगदींच उघडी दिसत आहे, तेव्हां तूं एकवार येऊन सिंहासनावर तरी बैस. मी तुझ्या पायांशीं बसेन. मीं तुझ्यासाठीं या समाधीवर किती अश्रूंचा वर्षाव केला आहे, हें तूं पहातेस काय ?—"

" तर मग आतां या जगांत माझें असें कोणीच नाहीं, असें मी समजूं का ? कारण या दुःखाच्या वेळीं माझें शांतवन करण्यासाठीं कोणीच मायेचें माणूस पुढें झालें नाहीं. सर्व दुःख नाहींशी करणारी, ममतेची पवित्र मंदाकिनी आई ज्याला नाहीं, त्याला जगांत कोणीच नाहीं काय ? कां बरं ! माझी प्यारी बेगम मला नाहीं काय ? छे; पण तिच्यांत आतां ती पहिली प्रेमलीला राहिली नाहीं. कदाचित् ती आतां माझा तिरस्कारही करीत असावी, कारण तिच्या नेत्रांत चमकणारी ती पूर्वीची जादू मला आतां बिलकूल दिसत नाहीं. मला वाटतें, सगळें, जगच माझ्याशीं निष्ठुरतेनें वागत असावें. मला त्रास झाला, माझी अधोगती झाली आणि मी दुःखानें तळमळत राहिलों म्हणजे या जगाला आनंद होत असावा; पण या जगाला कधीं मरण नाहीं का ? खरोखर त्याला जर एखाद्या कबरेंत लोटतां आलें असतें तर उत्तम झालें असतें. "

बराच वेळ बोलत राहिल्यामुळें खुसरू अगदीं श्रांत झाला आणि एक दीर्घ सुस्कारा टाकून व डोळे पुसून तो तिथून निघाला. दौलतबागेंतील फुलें फारच मनोरम सुगंधी आणि सुशोभित असल्याची प्रसिद्धि होती. अर्थात् खुसरूलाही ती सर्व बाग फिरून पहावी अशी इच्छा झाली व तो सावकाश फिरूं लागला. फिरतां फिरतां विशेष श्रांत झाल्यामुळें आतां थोडी विश्रांति घ्यावी असें वाटून तो एका चबुतऱ्याजवळ आला तों त्या ठिकाणीं कोणी एक अप्सरातुल्य सुंदरी झोंपलेली असल्याचें त्याला आढळून आलें.

खुसरू चबुऱ्याजवळ जातांच त्याच्या पद्ध्वनीनें अथवा दुसऱ्या कशानें म्हणा, त्या सुंदरीची झोंपमोड होऊन ती उठून बसली; पण त्या चंद्रप्रकाशांत तिनें समोर पाहिल्यावर खुसरूच आपणाकडे येत असल्याचें तीला आढळलें व ती चबुऱ्यावरून खालीं उतरली. खुसरूनेंहि त्याचवेळीं तिला ओळखलें. प्यारी अशा प्रकारें आपणाला इथें भेटेल,अशी त्याला कल्पनाही नव्हती. त्यामुळें प्रथम आश्चर्य आणि मग त्याला तिचा राग आला.

तो तीक्ष्ण दृष्टीनें तिच्याकडे पहात तीव्र स्वरानें म्हणाला, " तूं येथें कशाला आलीस प्यारी ? "

" नाथ ! मला इथेंहि येण्याची बंदी आहे काय ? "

" बंदी आहे कीं नाहीं तें नाहीं मला ठाऊक ! पण तुला असें रात्रींचें एकटें बाहेर फिरायला भीती नाहीं का वाटत ? "

"माझी जी काय सगळी भीति ती आपणासाठीं. आपलं पूर्वीं माझ्याशीं अशाच तिरस्कारानं वागायचं होत असे का ? आणि त्यावेळीं आपणाला कसलं तरी व्यसन होतं का ? अलीकडे आपण दिवसरात्रं मद्यपानांत दंग असायचं, शेंकडों वेळां बोलविण्याला पाठविलं तरी यायचं नाहीं, आणि उलट माझा तिरस्कार करायचा. मीं उजाडेपर्यंत आपली वाट पहात बसावं, नाथ ! पूर्वीं असं होत असे का ? माझी आपणाला मुळींच का दया येत नाहीं ? मी आपल्या पायाच्या आश्रयानें राहाणारी प्यारीबेगम आहे, हेंही आपण विसरायचं का ? शहाजादेसाहेब, आपण मला एकेकाळीं आत्मसर्वस्व मानलेली आहे, तेव्हां मला थोडासा आपणाला सन्मार्ग सुचवण्याचाही अधिकार पोंचतो. अजून तरी आपण चांगल्या मार्गानें जाण्याला सुरवात करावी. आपण जें जें कांहीं करायचं होतं तें तें सर्व आपल्या वडलांना तावडतोब समजतं. त्यांनीं पैशांनीं विकत घेतलेल्या दासी आणि गुलाम या महालांत गुप्तपणें राहून सर्व बातमी मिळवीत असतात, हें आपणाला कदाचित् माहीत नसेल म्हणून सुचवितें, अजून तरी सावध व्हायचं गडे ! निराशेचे कष्ट आणि आशेचा लोभ सोडून देऊन आम्ही दोघंही आनंदानं राहूं. आपण व्यसनी बनून सर्वस्वाचा नाश करूं नये. कारण आपणाला एके दिवशीं हिंदुस्तानचे सम्राट् व्हायचं आहे. सम्राट् ! "

प्यारीचें हें बोलणें खुसरूला आवडलें नाहीं. तो रागानेंच म्हणाला,

" हं. आणि त्यावेळीं तूं राजराजेश्वरी होऊन माझ्याजवळ बसशील नाहीं का प्यारी! हेंच. तुझें सुखस्वप्न काय तें हेंच. मागें एके दिवशीं तूं आपल्या बापाच्या सांगण्यावरून हेंच हलाहलवीष माझ्या हृदयांत ओतून रक्ताशीं मिसळून ठेविलें आहेस, आणि राक्षसी स्त्रिये, त्याच तुझ्या हलाहल विषाची तळमळ आज मला चैन पडूं देत नाहीं, हें तुला माहीत नाहीं का ? चांडाळ-णी ! नुसत्या लोभांत गुतवून तूं मला वेडें केलेंस आणि त्यामुळें माझा आतां सर्वस्वी घात होत आहे. नाहीं. आतां तुझ्या या उपदेशाचा उपयोग होणार नाहीं. तूं फारच उशिरा सावध झालीस ! "

असें रागारागानें बोलून खुसरू जाऊं लागला तेव्हां प्यारी त्याचे पाय धरून म्हणाली, " नाथ ! हृदयेश्वर ! ! निष्ठुर होऊन मला सोडून जाऊं नये. आपल्यावांचून मला आणखी कोण आहे बरं ? "

खुसरूच्या सर्वांगांत त्यावेळीं सैतान संचारला असल्यामुळें व मद्यपा नासाठीं त्याचा घसा सुकत चालला असल्यामुळें तो तिथें थांबणें शक्य नव्हतें. कारण सैतानानें ज्याचा अंगिकार केला, तो नरकांतच जावयाचा अर्थात् खुसरू, प्यारी बानूला स्पष्टपणें म्हणाला, " रस्ता सोड. मला नि ष्कारण त्रास देऊं नकोस. आपला अपमान करून घेण्याची तुला आवड आहे का प्यारी बेगम ? "

प्यारी समजली, आतां आपलें येथें कांहीं चालणार नाहीं. आपल्य वर अत्यंत प्रेम करणारा आपला पती आपणाविषयीं जर इतका निष्ठुर त आणखी दुर्दैव तें कोणतें ? तरी पण प्यारीला राहावेना. तिला आशा वाटलें आणि तिनें पुन्हां त्याचे पाय धरून म्हटलें, " माझा मान अपमान सर्व कांहं आपणच आहां नाथ ! अर्थात् आपला अनुराग व राग मला काय करणार मी आपल्या पायांची दासी असून आपले पाय धरले आहेत. जर आपणाल मी नको असेल तर–तर—"

पण खुसरू तिचे पुढचे शब्द ऐकून घ्यायला तिथें थांबतो कशाला ! जिच्यावर एका काळीं तो अत्यंत अनुरक्त होता, त्या आपल्या शोकम प्रियतमेची करुणापूर्ण विनवणी मुळींच न ऐकतां निष्ठुरपणानें एक जोरा लाथ तिच्या मस्तकावर हाणून तो रागारागानें, मद्य प्राशन करून शां

मिळविण्यास तिथून निघून गेला. आपल्या निष्ठुरतेचा परिणाम पहाण्यासही तिथें थांबला नाहीं.

खुसरूच्या त्या जोराच्या पदाघातानें ती सुकुमार सुंदरी प्यारी-बानू मातींत पडली. कांहीं वेळ तिला कसेंसेंच वाटलें; पण ती लवकरच भानावर येऊन व डोळे पुसून दीनवाणीनें म्हणाली, " मेहेरबान् खुदा ! ऐश्वर्यमदानें प्रमत्त झाल्यामुळें मीं तुला भक्तिपूर्ण अन्तःकरणानें कधींहि हांक मारली नसेल; पण आज ही निराधार झालेली दीन अबला, तुला हाक मारीत आहे ! माझा सगळा अभिमान आणि भ्रम आतां अगदीं नाहींसा झाला. रुपासागरा ! मी माझ्यासाठीं तुझ्याकडे कांहीं मागत नाहीं आणि प्रार्थनाहि करीत नाहीं; फक्त मद्य प्राशनांत तुल होऊन भलत्याच मार्गानें जाणाऱ्या माझ्या प्रियकराला तूं चांगल्या मार्गाला लाव आणि त्यांना तूं आपला मंगलकारक आशीर्वाद दे. या जगांत माझें असें आणखी कोणीहि नाहीं. मी जहांगीर बादशाहाची वडील सून असून मला आज ही अशी स्थिती प्राप्त झाली आहे. हेंच का राजसंसारांतील माझें श्रेष्ठ सुख ? छे खुदा ! मी फारच हतभागिनी आहें यांत संशय नाहीं. तसें नसतें तर मला ही स्थिति येती ना !!! "

बराच वेळ अशा प्रकारें खुदाची करुणा भाकून व डोळे पुसून थरारणाऱ्या हृदयानें विफल मनोरथ होऊन प्यारी बेगम आपल्या महालांत आली. आणि खुसरू ! खुसरू या वेळीं शिराजी मद्याचे प्यालेवर प्याले झोंकण्यांत अगदीं गुंग होऊन गेला होता. कारण त्याचे मित्र व मैत्रिणी त्याला दुसरा विचारच सुचूं देत नव्हत्या. मग पागल (वेडा) बनल्यावर तो तरी काय करणार ?

---

## प्रकरण ३४ वें

—:०:—

### अंध शहाजादा !

पहातां पहातां अशाच स्थितींत आणखी तीन महिने निघून गेले. खुसरूंत ईश्वरानें जे सगळे मानवदुर्लभ सद्गुण ठेविले होते ते सगळे स्वार्थी आणि

आणि दुष्ट मित्रांच्या संगतीनें व मद्यपानानें नाहींसे होऊन तो आतां अगदीं वेडाच बनण्याच्या पंथाला लागला होता. विवेक या नांवाची जगांत कांहींतरी एक चीज आहे हें त्याला माहीतही नव्हतें. आपमतलबी मित्रांच्या संगतीला लागून त्यांच्या सल्ल्याप्रमाणें तो चालत असल्यामुळें त्यांनीं त्याला भलभलतेच मार्ग दाखवायला सुरवात केली. हां हां म्हणतां खुसरूनें अविवेकी बनून गुप्तपणें सैन्य जमविण्याला सुरवात केली व तीन चार शूर सेनापतींनीं त्याला असली बदसल्ला दिली, त्यांत अफगाण अब्दुल रहीम व सेनापती हसनबेग हे मुख्य होते.

या सगळ्या सैतानजाद्या लोकांनीं शहाजादा खुसरू याला प्रथम पंजाब आपल्या ताब्यांत घेण्याला सल्ला दिली. कारण पंजाब ताब्यांत आला म्हणजे भरपूर द्रव्य आणि सैन्य आपल्याला मिळेल असा त्यांचा अंदाज होता, व त्याचीच त्यांनीं शहाजाद्याला लालूच दाखविली होती. शिवाय अशा रीतीनें आपण प्रयत्नाला सुरवात केली, कीं, मानसिंह व अजीमखान आपणाला गुप्तपणानें भरपूर मदत करतीलच. अर्थात् आपण मग जगालाही भारी होऊं. हिंदुस्तानचें सिंहासन तर आपल्या हातांत आपोआप येईल. वगैरे नसत्या गोष्टी खुसरूच्या अविवेकी डोक्यांत त्याच्या मित्रमंडळीनें भरपूर भरवून दिल्या होत्या.

इकडे जहांगीर कांहीं स्वस्थ बसला नव्हता. तो आपल्या उच्छृंखल मुलाची एकंदर वृत्ति संशयित नजरेनेंच पहात होता, आणि अशा प्रसंगीं एके दिवशीं चांगली संधी पाहून दुर्जयसिंह गुप्तपणें त्याला भेटला व बऱ्याचशा महत्त्वाच्या गुप्त गोष्टी त्यानें जहांगीरला सांगितल्या. तसेंच दोन महत्त्वाचीं पत्रें मानसिंहानें फार दिवसांपूर्वी त्याच्याजवळ ठेवायला दिलीं होतीं व तो तीं कांहीं दुसऱ्या कामांत गुंतल्यामुळें दुर्जयसिंहाजवळून घ्यायला विसरला होता. आणि हीं दोन पत्रें म्हणजे खुसरू विरुद्ध एक भयंकर पुरावाच होता. यापैकीं एका पत्रांत खुसरूनें मानसिंहाला लिहिलें होतें, ‘ जर आपण माझ्या बापाला नजरकैद अथवा कैद करूं शकाल तर मी त्याला ठार मारणार नाहीं. फक्त आंधळा करून ठेवीन आणि या कामगिरीबद्दल तुम्हांला बक्षिस म्हणून अर्धें हिंदुस्तान देईन.”

हीं पत्रें फार दिवसांपूर्वीचीं होतीं त्यामुळें जहांगिरनें त्याबद्दल दुर्जयसिंहाला पुष्कळ निरानिराळे प्रश्न केले व त्यांत त्याला पाहिजे होती ती माहिती मिळाल्यावर मुलाविषयीं त्याच्या मनांत भयंकर मत्सरबुद्धि जागृत झाली व त्याचा केव्हां सूड उगवीन असें त्याला होऊन गेलें. इतकेंच नव्हे, तर त्याच दिवशीं त्यानें मनाशीं ठरविलें, कीं, 'खुसरूला कैद करून आतां ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत ठेवलेंच पाहिजे. नाहीं तर कोणत्याना कोणत्या दिवशीं तो माझा खून केल्यावांचून राहणार नाहीं.' या महत्वाच्या कामगिरीबद्दल दुर्जयसिंहाला मोंगल सैन्यांत त्याच दिवशीं दुय्यम सेनापतीची जागा मिळाली, व खुसरूचें निवासस्थान जी दौलतबाग ती त्याच दिवशीं भीमकाय व शूर मोंगल सैनिकांनीं वेढून टाकली. पहारा सुरू झाला.

पण खुसरू दुर्दैवानें म्हणा अथवा सुदैवानें म्हणा, एका काळोखांत व वादळाच्या रात्रीं दुष्टबुद्धि मित्रांसह गुप्त वेषानें बागेच्या बाहेर पडून लांब निघून गेला. कुणीही त्याला पकडूं शकलें नाहीं. असो.

आपल्या कडक पहाऱ्यांतून खुसरू पळून गेला ही बातमी दुसऱ्या दिवशीं सकाळींच जहांगीरला समजली. शिवाय, गुप्त हेरानें हेंहि सांगितलें कीं, 'पंजाबांत जाऊन बंड उभारण्याचा त्याचा विचार आहे' तसेंच खुसरूच्या एका विश्वासू सेवकाकडून, सम्राट्नें बरीचशी महत्वाची बातमी काढून घेतली, व त्या बातमीसाठीं त्याला त्या सेवकाचा भयंकर छळही करावा लागला. जहांगीरला ही सगळी बातमी समजतांच त्यानें सैन्याला एकत्र होण्याचा हुकूम दिला व सर्व सैन्य घेऊन खुसरूवर स्वारी करण्यासाठीं झपाट्यानें तो पंजाबाकडे निघाला.

खुसरूला सुचलेल्या म्हणा अथवा त्याच्या मित्रमंडळानें सुचविलेल्या म्हणा या बंडाच्या कल्पनेंमुळेंच त्याचा सर्वस्वी घात होऊन तो पूर्ण अधोगतीस पोहोंचला. अस्तु. खुसरूनें पंजाबांत पाऊल ठेवतांच जमलेल्या सैन्याकडून त्यानें लाहोरला वेढा देवविला व आपण लुटालूट करून पैसा आणि सैन्य जमवूं लागला; पण त्याला कांहींही करतां आलें नाहीं. पहिल्याच चकमकींत जहांगिरानें त्याचा पराभव करून त्याला कैद केलें, व त्याच्यासह तो आग्र्याला आला. आग्रा प्रासादांत येतांच खुसरूची रवानगी लगेंच कारागृहांतच झाली!

खुसरू कारागृहांत पडल्यानें, त्याच्या मागच्या सर्व यातना सुटल्या असें कित्येकांना वाटत होतें; पण तसेंहि झालें नाहीं. मृत सम्राट्च्या पायांची शपथ घेऊनही जहांगीर मुलाच्या बाबतींत क्षमाशील न बनतां कठोर बनला. कारण खुसरूनें त्याला अन्ध करण्याबद्दल जें पत्र मानसिंहाला लिहिलें होतें तें त्याच्या हातांत असून तो तें रोज वाचीत असे. त्यामुळें मुलाबद्दल त्याचें मन अगदीं ममताहीन बनत चाललें होतें. शेवटीं त्याच्या हृदयांतील खुसरू-च्या बाबतींत असलेला पुत्र वात्सल्याचा झरा पार आटून गेला व तो क्रोधा-न्ध होऊन त्यानें आपल्या एकेकाळीं अत्यंत **प्रिय असलेल्या मुलाचे डोळे काढून त्याला कायमचें अंध करून सोडलें.** खुसरूची त्यावेळीं काय स्थिति झाली असेल, ती वर्णन करणें आमच्या लेखणी बाहेर आहे. हा प्रकार पाहिल्यावर नको हा राजसंसार असें कोणीहि म्हणेल.

मुलगा कायमचा आंधळा बनला असें पक्कें कळून आल्यानंतर जहांगी-रनें खुसरूला कांहींसें स्वातंत्र्य दिलें. व राजप्रासादांतील कांहीं खोल्या त्याच्या स्वाधीन करण्यांत आल्या.

हाय ! निष्ठुर मनाच्या जहांगीरा ? बापाच्या पायाला स्पर्श करून तूं कसली शपथ वाहिली होतीस ? ‘ मी तुमच्यासारखा क्षमाशील बाप होईन ’ हेच ना तुझे ते शब्द ? पण तूं तरी काय करणार ? मनुष्यानें सहन तरी किती करावें ? खरोखरच खुसरूच यांत दोषी. विधात्यानें त्याला जन्माला कां घातलें होतें कुणाला माहीत ? कारण त्याच्याइतकी भयंकर महद्दशा दुसऱ्या कुणींच भोगली नसेल ? जो हिंदुस्तानचा भावी सम्राट् व्हायचा, ज्याच्यावर सम्राट् अकबर शाहाचें अत्यंत प्रेम, जो शाहीबेगमचें जीवनसर्वस्व, महापरा-क्रमी कृष्ण कारस्थानांत कुशल असा राजा मानसिंग ज्याचा राहितकर्ता मामा, त्याला शेवटीं ही अशी शोचनीय अंधत्वाची स्थिति यावी हें केवढें बरें दुर्दैव !। ही जीवन्मृतावस्था विधात्यानें तरी त्याच्या मस्तकावर कशी बरें लिहिली ! ! ! छे. पण एवढें होऊन तरीं त्याच्या दैवांतील यातना कुठें सं-पल्या ? बरेच दिवसपर्यंत अशा आंधळेपणांत राहिल्यानंतर यापेक्षांहि कित्येक अत्यंत अनुकंपनीय व भयंकर प्रकार घडून आले बरं असो. घा कमी नका करूं. वाचकांना पहायला मिळेल.

आपणाला दृष्टीहिनत्व आलें याबद्दल खुसरू तिळमात्र दुःखित झाला नाहीं. कारण त्याच्या पश्चात्ताप युक्त मनाला असें वाटलें, कीं, आपल्या पापाचें प्रायश्चित्त आणि पितृद्रोहाचें योग्य फळ आपणाला मिळालें आहे. असो. खुसरूच्या या अंधावस्थेंत त्याच्या सगळ्या गोडबोल्या मित्रांनीं त्याला लगेंच सोडलें. कुणीहि त्याच्याकडे ढुंकून पहायला तयार होईना; पण त्यानें पदाघातानें दूर सारलेली प्यारीबेगम मात्र आनंदानें त्याच्याबरोंबर राहिली. तिनें आपले सगळे सुखोपभोग सोडून दिले आणि ती शक्य तितकी त्याला आनंदांत ठेवण्याचा प्रयत्न करूं लागली. अकबरशाहाची विधवा बेगम रुमी हिनेंहि खुसरूला सोडलें नाहीं. ती त्याला आपल्या मुलांप्रमाणें पावलोपावलीं जपूं लागली व पूर्वीपेक्षांहि त्याच्यावर ज्यास्त प्रेम करूं लागली. रुमीच्या दीनवाण्या प्रार्थनेनेंच, जहांगीरनें खुसरूला ठार न मारतां कायमचा आंधळा करून सोडलें होतें. नाहींतर तो त्याला जिवंतच ठेवणार नव्हता. अस्तु. रुमी आणि प्यारीबेगम यांच्या प्रेमळ संगतींत खुसरू आपल्या आयुष्याचा एकेक दिवस अत्यंत शोचनीय रीतीनें घालवूं लागला. पतिपरायण साध्वी प्यारीचें मधुर व प्रेमयुक्त भाषण हेंच काय तें आतां खुसरूचें सुख सर्वस्व होऊन राहिलें होतें.

एके दिवशीं रात्रीं खुसरू आपल्या खोलीच्या मागच्या बाजूला असलेल्या उघड्या खिडकींत हवा खात बसला होता. ती रात्र पौर्णिमेची असून धवलप्रकाशी चंद्रही बराच वर आलेला दिसत होता. चंद्रिकेच्या शुभ्रत्वामुळें यमुनेचें काळें पाणीही रुप्यासारखें चमकत होतें, आणि खुसरूचें तोंडही पाण्याकडेसच होतें; पण त्याला ती मौज कशी दिसणार ? यमुनेचें कलनिनादन गति मात्र त्याला कांहींसें आनंदवीत होतें.

तो तिथें त्यावेळीं एकटाच होता. प्यारी कांहीं वेळापूर्वी त्याच्याजवळ आली होती. पण त्यानेंच सांगितल्यावर आपली वीणा आणण्यासाठीं ती आंत आली होती. कारण खुसरू आपले हे आंधळेपणाचे दिवस, दुःखाचे दिवस, आपल्या सुखदुःख भागिनीचें मधुर गायन ऐकण्यांत घालवीत असे. त्याला तिचें गायन फारच आवडे. प्यारी नेहमीं नवीन नवीन गीतें म्हणे, पण तीं सर्व जग चालकाच्या प्रार्थनेची अगाध महिमा दाखविणारीं असत. तिचें गजल ऐकून खुसरूच्या मनाला अनुपम शांतीचा लाभ होई.

खुसरू कांहीं वेळानें खिडकीच्या बाहेर येऊन उभा राहिला. आणि वर आकाशाकडे तोंड वळवून हात जोडून बोलूं लागला, नेहेमीं प्रकाशांत असणाऱ्या आकाशा! माझ्या नेत्रांतील ज्योती बाहेर पडूं दे. तूं ज्योतिर्मय असल्यामुळें माझ्या नेत्रांसमोर तुला नवीन तेज निर्माण करायला कांहींच कठीण पडणार नाहीं. किती दिवस तरी मला नीलाकाशांतील तारकांचें तेज दिसलें नाहीं, आणि मेघांशीं चंद्राचा चालणारा लपंडावाचा खेळही पाहून मला बरेच दिवस होऊन गेले. गुलाबाचा आरक्तपणा आणि चमेलीचा शुभ्रपणा आतां फिरून माझ्या नजरेला पडेल का? तसेंच किती दिवसांत तरी मीं माझ्या प्रियतम प्यारीबानूचा चेहेरा पाहिला नाहीं. खुदा! मेहेरबान! वासनेचा लोप झाला, प्रवृत्तीची समाधी लागली, आणि आकांक्षेचें विसर्जन करावें लागलें. तेव्हां कुठें एक प्रकारचें—स्मशान वैराग्यासारखें-समाधान मिळालें. पण त्या समाधानापासून व्हावें तसें सुख न होतां हृदयांत एक प्रकारच्या हाहाकाराचा सूर प्रतिध्वनित होत आहे. सैतानी पौर्णिमे! आतां तरी तुझा अभिशाप पूर्ण झालाना. ज्या नेत्रांवाटे मी तुझें स्वरूप पाहून वेडा झालों होतों त्या, पापकर्माला दूत रूपानें पुढें सरणाऱ्या प्रकाशाला, मी आज कायमचा मुकलों आहें. खुदा! मी आतां तुझ्याजवळ कांहीं मागत नाहीं; पण कांहीं क्षणपर्यंत तरी मला दृष्टी दे. मला एकदां जगाकडे पाहून घेऊं दे. मला अकस्मात अंधत्व प्राप्त झाल्यामुळें मी जगाकडे पुरतें पाहिलें सुद्धां नाहीं. खुदा! माझ्यावर कृपा कर आणि मला.—"

याचवेळीं, छायेप्रमाणें त्याच्या बरोबर फिरणारी प्यारी तेथें आली आणि प्रेमपूर्ण स्वरानें म्हणाली, "नाथ! असें टक लावून कुठें पहावचं बरं?"

खुसरू, खिन्नतेनें हंसून व तिला आपल्या जवळ घेऊन मन्द स्वरानें म्हणाला, "प्यारी! अजूनही तुझा भ्रम गेला नाहीं का? मला दृष्टी नाहीं, मी अंध आहें हें अजूनही तुला समजलें नाहीं! मी काय पहाणार बरें! आणि मीं पाहिलें तरी मला काय दिसणार? तुझें हें चंद्रवदन एकवार तरी पहावें अशी इच्छा होती; पण खुदावांचून ती कोण पुरविणार बरें? माझी बाह्यदृष्टी संपली आणि अंतर्दृष्टीला जें दिसतें तें सगळें अनुतापपूर्ण; त्यामुळें

तूं जवळ नसलीस कीं, मला कसें तें चैन पडेनासें होतें. विराट् विश्वाचा माझ्या बाह्य दृष्टीस अंत झाला खरा; पण अंतर्दृष्टी तितकीच तीव्र झालेली आहे, त्यामुळें हृदयांत मंगलमय विश्वपतीचें विराट् रूप मला दिसूं लागलें आहे. खरोखर प्यारी, मला आतां डोळ्यांचें मुळींच कारण नाहीं. सुखदुःखांत आनंद मानून पतिसेवातत्पर, अशी तुझ्यासारखी प्रेमळपत्नी जोंपर्यंत माझ्या जवळ आहे तोंपर्यंत ' मी अंध असूनही डोळस माणसासारखें सुख भोगीत आहें ' असेंच मला वाटेल. "

असें म्हणन खुसरूनें प्यारीला पुन्हां प्रेमभरानें आलिंगन दिलें. विश्व प्रकृतीला या अंध प्रेमाभिनयाचें अत्यंत कौतुक वाटून ती आनंदानें पुलकित झाली व प्यारीलाही ' आपणाला असेंच जन्मभर सुख मिळावें ' असें वाटलें. **कारण पतिव्रतेला पतिप्रेमावांचून दुसऱ्या कशांतही सुख वाटत नसतें.**



ॐ नमः श्रीरामचंद्राय.

# आर्यमहौषधालय मु. पो. आंजर्ले.

## मदनविलासामृतसंजीवनी,

वीर्यस्तंभक, रक्तशोधक, अत्यंत कामोत्तेजक, चित्तोत्साह-
बुद्धिकांतिवर्धक व पूर्ण धातुपौष्टिक, सुवर्णमाक्षिक मौक्तिक
कस्तूरी-प्रवालादिमिश्र **अपूर्व गुटिका.**

या गोळ्यांनीं क्षयरोग, पांडुरोग, जीर्णज्वर, मस्तकशूळ, मेंदूचे विकार, बाळंतरोग, संततीस अपाय करणारे गर्भाशयस्थ विकार, संधिवातादि अनेक वातरोग, कडकी, नेत्रविकार कटिशूल इत्यादि नवीन अगर जुनाट असलेले नानाविध रोग तावडतोब दुरुस्त होऊन चित्तोत्साह, बुद्धि आणि कांति वाढते व अंगांत परिपूर्ण शक्ति येते. शरीरस्थ रस, रक्त, अस्थि, मज्जा, शुक्र वगैरे सप्त धातूंची वृद्धि होऊन मनुष्यास सर्व प्रकारें संसारसुखाचा उत्तम लाभ होतो. वरील एकंदर रोग त्वरित व निखालस जाऊन सर्व प्रकारें देह अगदीं जोमदार आणि आयुष्यमान् होण्यास या गुटिका हेंच अगदीं प्रतिज्ञेचें औषध होय. त्यामुळें यांचे लक्षावधि लोक नित्य ग्राहक होत आहेत. गोळ्या रुपयाच्या आंत मिळणार नाहींत. एकदम सहा रुपयांच्या किंवा त्याहून ज्यास्त घेणारास टपालखर्च माफ. त्याच्या आंत घेणारास ट. ख. वेगळा ८४ आणे पडेल. ३२ गो० १ रु० ७० गो० २ रु; १६० गो० ४ रु०; २६० गो० ६ रु० आणि ५२० गो० १० रुपये.

**थंडगार नेत्रांजनः**—यानें वडस, सारा, फुलें, खुरऱ्या, बिंदु, काच इ० डोळ्यांचे एकंदर विकार तावडतोब बरे होऊन दृष्टि तीव्र व थंडगार रहाते. ड० १॥ रुपया.

**कर्णस्रावनाशक अप्रातिम तेलः**—यानें कानाचे सर्व प्रकारचे व्रण व तत्संबंधीं इतर विकार त्वरित बरे होतात, बा० १ रु.

**परम्यावर अपूर्व मिश्रणः**—हें कसलाही नवा किंवा जुना परमा त्याच्या सर्व विकारांवर अगदीं जलद बरा करण्याचे कामीं रामबाण आहे. बा० १ रुपया.

# ग्राहकांना कांहीं सूचना.

—:०:—

( १ ) मागील पुष्पें—२७ पासून पुढील पुस्तकें जमल्यास लौकर लौकर छापवून तीं जलद् प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे व अशावेळीं कदाचित् दोन खेपेचीं पुस्तकें एकदमही आपणाकडे रवाना होतील. तरी त्या वाढत्या किंमतीच्या व्ही. पी. असा गैर समज करून न घेतां, तीं दोन खेपेचीं पुस्तकें समजून ( सुमारें तीन, सव्वातीन रुपायांच्या व्ही. पी. च्या ) स्वीकारावींत. अशी पुस्तकें पाठविण्यापूर्वी आगाऊ सूचना पुढें देऊं, ( २ ) तसेंच १७ वें पुष्पापासूनही नेहमींप्रमाणें आगाऊ २७ ते ३२ पुस्तकांबद्दलहि सवलत देण्याचा मानस आहे. तरी त्या सवलतीचा ग्राहकांनीं त्यावेळीं आवश्य फायदा घ्यावा. ( ३ ) मालेचीं पुस्तकें प्रसिद्ध होतांच तीं लगेंच ग्राहकांकडे रवाना होतात. त्यांत मुळींच कसूर होत नाहीं; पण प्रेसच्या दिरंगाईमुळें जाहीर केलेली वेळहि जेव्हां संपते, तेव्हां उशीराबद्दल पुष्कळ वर्गणीदारांच्या रोषास आम्हांस पात्र व्हावें लागतें; तरी अशावेळीं थोडा आणखी धीर धरण्याविषयीं आमची सर्व ग्राहकांना विनंती आहे. कारण पुस्तक तयार झालें, कीं, तें क्षणभरहि आम्ही जवळ ठेवीत नाहीं. ( ४ ) कित्येक वेळां ग्राहक गांवीं हजर नसल्यानेंहि पुस्तकें परत येतात; पत्ते न बदलविण्यानेंहि पुस्तकें वक्तशीर ग्राहकांच्या हातीं पडत नाहींत, तरी पत्ते नीट आहेत कीं नाहींत, तें पाहून त्यांत चूक आढळल्यास ती दुरुस्त करण्यास कळविण्याची तसदी घेत जावी. ग्राहकांचा रजिष्टर नंबर ( र. नं. ) व्ही. पी. च्या लेबलावर लिहिलेला असतो, तो प्रत्येक ग्राहकानें नीट लक्षांत ठेवावा व तो पत्रव्यवहार करतांना कळवावा म्हणजे चटकन् व्यवस्था होऊन उत्तर मिळतें. (५)कांहीं ग्राहकांच्या बेफिकीर वृत्तीमुळें प्रत्येक खेपेस बऱ्याच व्ही. पा. परत येऊन त्याबद्दलचा पोस्टेज खर्चाचा बराच भुर्दंड आम्हांस व्यर्थ भरावा लागतो. ग्राहकांनीं पुस्तकें मागवून मग तीं परत करण्यांत, त्यांनीं आमचा कां छळ करावा व व्यर्थ कां खर्चांत आणावें तें कांहीं समजत नाहीं. त्यांनीं एकादें कार्ड पाठऊन 'नको' असल्याचें कळविल्यास आम्ही तशी तजवीज करूं शकतो पण व्यर्थ ८० ते ८९ पोस्टेज फुकट दवडलें जाण्यांत लाभ

कोणचा ? अतएव अशा सर्व ग्राहकांना विनंति आहे, कीं, त्यांनीं व्ही. पी स्वीकारण्याची कृपा करावी. यापेक्षां अशा सुज्ञास अधिक तें काय लिहावें ? ( ६ ) कित्येक वेळीं छापखान्यांत बाइंडरच्या नजरचुकीनें पुस्तकांत चुकून चुकीचीं पानें पुस्तकांत बांधलीं जातात. अशा वेळीं ८/- चे व्ही. पी. नें केव्हांहि आमच्याकडे तें पुस्तक परत करावें. लगेच त्या वेळीं बिनचुकीच्या पानांचें चांगलें पुस्तक त्या त्या ग्राहकाकडे रवाना करण्यांत येईल. या बाइंडरच्या चुकीमुळें कोणी व्यर्थ गैरसमज करून घेऊं नये. ( ७ ) एक वेळ घेतलेली प्रवेश फी पुनः कोणत्याही कारणानें परत दिली जात नाहीं. मात्र मालेचीं ( चालू असें तोंवर ) पुस्तकें ( फक्त एकच वेळ ) सर्व ग्राहकांना सतत निम्मे किं. नें मिळतील. ( ८ ) पुस्तकांत सोबत जोडलेल्या यादींतील मागील शिल्लक पुस्तकांपैकीं पुस्तकें, नमूद केलेल्याच कि. च्या निम्या किंमतीनेंच 'फक्त एकच वेळ' ग्राहकांस मिळतात. ( ९ ) पुनः त्यांनीं तीं मागविल्यास त्यांनाच म्हणून तीं २५ टक्के कमीशननें मिळतील. शिवाय ट. ह. इतरांस भर किंमत पडेल. ( १० ) पुष्कळ नव्या ग्राहकांकडे प्रेम शृंखला किं. १ रु हें पुस्तक, तयार नसल्यामुळें आजवर तें पाठविलें गेलें नाहीं. तें आतां विक्रीस तयार आहे. गरजूंनीं त्याची अवश्य मागणी करावी. ( ११ ) ज्या नवीन ग्राहकांनीं मागील पुस्तकें मुळींच घेतलीं नसतील त्यांनीं तीं लौकर लौकर मागवावींत. कारण इकडे हीं शिल्लक पुस्तकें संपल्यावर पुनः दुसरी आवृत्ति काढण्याचा योग लौकर येणार नाहीं. ( १२ ) कापडी प्रतीस सहा आणे अधिक पडतात. ( १३ ) याप्रमाणें वरील सूचना लक्षांत घेण्याविषयीं सूचना आहे. असो.

# सरसवाङ्मयरत्नमाला

—:०:—

उत्तम भाषण, गायन किंवा बरवा विलास तरुणींचा ॥
रमवी चित्त न ज्याचें पशु किंवा मुक्त तो मनुज साचा ॥

—कै. चिपळूणकरकृत.

एक रुपाया ' प्रवेश फी ' भरून कायम ग्राहक होणाऱ्यांनाच खालील पुस्तकें पुढील किं. च्या निम्मे आकारणीनें मिळतील व चालू व पुढील सर्व पुस्तकें निम्मे किं. स मिळतील. ट. ह. निराळें व इतरांस भर आकार पडेल.

१ गांधींचा बंदिवास ॥= — १३ अल्ला हो अकबर २।- रु.
२ स्वर्गीय प्रेम. १॥ रु. — १४ प्रेमळसवत २॥- रु.
३ वनज्योत्स्ना-सुभेदार २ रु. — १५ गुर्जरवीर अणहिल ४ रु.
४ जीवनलता १॥- रु. — १६ साठवर्षांपूर्वी २॥- रु.
५ गृहलक्ष्मी-शरयू २।- रु. — १७ सैतानीचक्कर २॥- रु.
६ रणरंगचंडसौदामिनी २।- रु. — १८ व्रतपालन रंगमहाल २॥=रु.
७ ताजमहाल-काव्यरत्न २॥- रु. — १९ अस्तनींतील निखारा २॥रु.
८ पतित-जर्मननाश २॥- रु. — २० राष्ट्रगुरु बालब्रह्म० २॥- रु.
९ रत्नकंकण-कृपणकन्या २॥- रु. — २१ अमृतशोध इंद्रजजय २॥रु.
११ तीन शिलेदार ४ रु. — २२ सौभाग्यतिलक २॥- रु.
१२ दुर्गादास प्रेमशृंखला २।- रु. — २३ शापित राजवंश २॥- रु.
२४ कर्मविपाक प्रभूपाठिराखा. ३ रु.

कापडी प्रतीस सहा आणे अधिक पडतात.

लंडन येथील बड्या लोकांचीं गुप्तकृत्यें गोष्ट ३ री किं. रु. ५
पण सवलतीनें ट. ह. सह ३-॥- रु.

(१०) शापितमहाराष्ट्र ३रु. विहंगवृंद १॥रु. हीं पुस्तकें शिल्लक नाहींत.

वरील प्रती थोड्या शिल्लक आहेत. तरी ज्या नव्या ग्राहकांना हीं पुस्तकें हवीं असतील त्यांनीं तीं त्वरित मागवावीं. महागाईमुळें पुस्तकांच्या निम्मे किंमतींत ४४-६ आणे वाढ केली आहे. ट. ह. वेगळें. शिवाय नूतन पुस्तकांच्या पुनरावृत्त्याही छापणें अशक्य आहे. पत्रव्यवहाराचा पत्ता:—

सेक्रेटरी,—सरसवाङ्मयरत्नमाला—मुंबई.

— जगद्धितेच्छु प्रेस, शनवार ४३२, पुणें. —

सुवाङ्मयेन गीतेन युवतीनां च लीलया । यस्य न द्रवते चित्तं स वै मुक्तोऽथवा।

सरसवाङ्मयरत्नमालेचें २५ वें रत्न

# पातिव्रत्याची कसोटी.


लेखिका

सौ. जानकीबाई देसाई,

" ताजमहाल, प्रेमळ सवत, सौभाग्यतिलक " इ. कर्त्री.



प्रकाशक

तात्या नेमिनाथ पांगळ,

प्रोप्रायटर, सरसवाङ्मयप्रसारक मंडळी—गिरगांव—मुंबई.

डॉ. भालचंद्रसमोर, रा. भांडारे यांचा दगडी बंगला, चर्नीरो.





मुद्रक

रा. रा. केशव रावजी गोंधळेकर, ' जगद्धितेच्छु प्रेस '

४३२ शनवार पेठ, पुणें.

इ. स. १९१९. फेब्रुवारीचा अंक. | किंमत रु. १—०—० | वर्ष पांचवें. आवृत्ति पहिली.



# पातिव्रत्याची कसोटी ! !

## प्रकरण १ लें.

### ग्रहदशेचा फेरा !

" नको. इंदिरे, जाऊं नकोस ! "

" न जाऊन कसें चालेल नाथ ? आपल्याला बरं वाटलं पाहिजे ना ! "

" ईश्वराची कृपा असली, तर सर्व कांहीं चांगलें होईल. "

" माझाहि कांहीं ईश्वरावर विश्वास नाहीं, असें नाहीं. मी तर रोज त्याच्याच पायांशीं धरणें धरून बसतें; पण तो स्वतःच्या हातानें असा कधींच कांहीं करीत नाहीं, हें आपल्याला माहीत आहे ना ? त्यानें मनुष्याला बुद्धि दिली आहे, आणि त्या बुद्धीच्या जोरावरच त्यानें आपली जिवन-नौका चालवावी अशी त्याची इच्छा दिसते. ' प्रयत्नांतीं परमेश्वर ' ही म्हणही यामुळेंच प्रचारांत आली असावी. "

" तसें जरी असलं इंदिरे, तरी या मुसिराबाद शहरांत तुला अनेक शत्रु आहेत. या शहरांतच नव्हे तर असमंतांतसुद्धां तुझ्या इतकी सौंदर्य-संपन्न स्त्री कोणीहि नाहीं, हें तूं विसरलीस काय ? तुला स्वतःला कदाचित

कोणी शत्रु नसतील; पण तुझ्या या अप्सरातुल्य स्वरुपाला तरी निदान पुष्कळ शत्रु आहेत. शिवाय—"

' शिवाय आणखी काय नाथ ? "

" आम्हीं जातीनें हिंदू नाहीं का ? या देशांत सर्व वस्ती मुसलमानांची असून आमचा जरी त्यांच्याशीं पुष्कळ व्यवहार असला व ते आमचे स्नेही असले तरी ते आमच्याकडे तिरस्कारयुक्त नजरेनेंच पहातात. "

" पाहिनात कां ! आम्हांला त्यांच्याशीं काय करायचं आहे ! या विशाल जगांत आम्हीं दोघेंच एकमेकांला आधार आहों, आणि आमचें दोघांचे सुख वाढविण्यासाठीं आम्हांला दुसऱ्या कोणाच्याहि मदतीची आवश्यकता नाहीं. आम्हांला कोणाशीं शत्रुत्व करावयाचें नाहीं कीं, मित्रत्वही करावयाचें नाहीं; पण मला माहीत आहे नाथ ! या जगांत आमचे शत्रु कोणी नसून मित्रच पुष्कळ आहेत. आपण लोकांना नडी-अडचणीच्या वेळीं पैसा देऊन पुष्कळ उपकार केले आहेत, त्यामुळं लोकच आमचे ऋणी असून आम्हीं कुणाचेंहि कांहीं देणें लागत नाहीं. आपण आजारी पडल्याला आज सहा महिनें झाले; पण दुसऱ्या कुणाकडेहि हात न पसरतां जवळ कांहीं किडूकमिडूक होतें, त्यावरच गुजराण चालविली आहे; पण नाथ ! असें करून आणखी किती दिवस चालणार, याचा कांहींच विचार करायला नको का ? "

वरील संभाषण पतिपत्नीमध्यें चाललें होतें. बापूसाहेब जसे सुंदर होते, तशीच त्यांची प्रियपत्नी इंदिरा हीहि सौंदर्यसंपन्न होती. बापूसाहेबांच्या वरील बोलण्यांत तिच्या स्वरूपासंबंधानें जो उल्लेख आला आहे, तो सर्वस्वीं खरा असून इंदिरेच्या अलौकिक सौंदर्याबद्दल मुसिराबादेच्या आसपासही बरीच प्रख्याति होती. अर्थात तीं दोघेंहि ज्या आळींत राहात होतीं, त्याच्या आसपासहि ती किती असेल, याची वाचकांनींच कल्पना करावी.

बापूसाहेब कांहीं गरीब स्थितींत दिवस काढणारे गृहस्थ नव्हते व ते गरीबहि नव्हते. त्यांचा वाडा जरी लहानच होता, तरी तो टुमदार असून फारच सुंदर दिसत असे. वाड्याचें फाटक राजरस्त्यावरच असून फाटकांतून आंत शिरतांच गुलाबी ताटव्यांचा लहानसाच पण सुंदर बगीच्या

मनाला आनंदवीत असे. वाड्यासभोंवार आणखींहि बरीच मोठी मोकळी जागा असून त्यांतहि फलपुष्पांनीं अलंकृत झालेले मोठमोठे वृक्ष मदभरानें डोलत आपल्या प्रभूचे गुणानुवाद गात उभे होते.

बापूसाहेब हे खानदानीच्या घरण्यांतले असून पडता काळ आल्यामुळें त्यांनीं जवाहिऱ्याचा धंदा करण्यास सुरुवात केली होती, व व्यापारी लोकांत त्यांच्या दर्जाला अनुरूप असा त्यांना फारच मोठा मान मिळत असे. बाहेरील लांबलांबच्या देशांतून उत्तमोत्तम माल आणून ते तो आपल्या गिऱ्हाईकांना फारच सोयीनें देत असल्यामुळें सर्व गिऱ्हाइकें त्यांच्यावर खुष असत. मोटमोठे मुसलमान अधिकारीहि बापूसाहेबांशिवाय इतर कुणाकडूनहि माल घेत नसत, त्यामुळें या व्यवसायांत त्यांना चांगलाच पैसा मिळूं लागला व पतहि वाढत चालली, इतकेंच नव्हे तर थोड्याच दिवसांत ते बड्या व्यापारी वर्गांत मोडूं लागले. भाग्यदेवतेनें त्यांच्यावर कृपा केली आणि ' अनन्त हस्तें कमलावरानें देतां किती घेशिल दों करानें ' या वाक्याचीहि त्यांना प्रचीतीहि आली.

बापूसाहेबांप्रमाणेंच आणखी कांहीं व्यापारी, याच व्यवसायांत आपल्या भाग्याची परीक्षा पहात होते; पण त्यांना यावें तसें यश येत नसे व बापूसाहेबांचेंच नांव चोहोंकडे गाजूं लागलें. मुसलमान व्यापाऱ्यांना, हिंदूचा होत असलेला हा उत्कर्ष सहन होत नसे; पण करतात काय ! सर्वांना बापूसाहेब हेच सचोटीचे वाटून ज्यास्त किंमत पडली तरी ते त्यांच्याकडच्याच माल घेत आणि त्याच मालाची ते तारीफ करीत.

या व्यवसायाला आरंभ केल्यानंतरच बापूसाहेबांचा विवाह झाला व त्यांना पत्नीहि मनासारखी व अत्यंत सुंदर अशीच मिळाली. तिच्या सौंदर्यामुळें त्यांच्या जवाहिराला शोभा येऊं लागली. तिनें नुसतें मंद हास्य केलें तरी, ' आपलें सर्व जवाहीर हिच्या या कुंदकळ्यांसारख्या दिसणाऱ्या दंतपंक्तीवरून ओंवाळून टाकावें' असेंच त्यांना वाटे. ती जितकी सौंदर्यसंपन्न होती तितकीच स्वभावानें मधुर व गुणांनीं श्रेष्ठ होती. इंदिरेची मूर्ती घडवितांना ब्रह्मदेवानें आपलें सर्व चातुर्य आणि तीन्ही लोकाचें सर्व सौंदर्य खर्ची घातलें असावें, असें बापूसाहेबांनाच नव्हे, तर जो तिला पाहील त्याला वाटे व तें तो प्रांजलपणें कबूल करीत

असे. तिच्या सौंदर्यदर्शनानेंच कांहीं दिवस सर्वांना वेड लागलें होतें, व लग्नाचे वेळींच इंदिरेचें, सर्वांना काय दर्शन झालें असेल तेंच; बाकी ती केव्हांहि कुणाच्या नजरेला पडली नाही. कारण मुसलमानांच्या वस्तींतच नेहमीं राहावें लागत असल्यामुळें बापूसाहेबांनाहि आपल्या ' जनान्या ' च्या बाबतींत त्यांचाच कित्ता गिरवावा लागत असे, आणि इंदिरेलाहि पण उघड्या चेहेऱ्यानें बाहेर पडवत नसे. कारण सर्व लोक आपापला धंदा सोडून तिच्याकडे टवकारून पाहूं लागत; आणि तिनें ह्या त्रासामुळेंच बाहेर जायचें सोडून दिलें. दोघांहि पतिपत्नींचें एकमेकांवर अप्रतिम प्रेम असून तें सुखी दंपत्य अत्यंत सुखसमाधानानें आपला संसारशकट चालवीत होतें. दुःखाची अगर दारिद्र्याची त्यांना कल्पनाहि नव्हती; पण सगळे दिवस कांहीं सारखेच नसतात. भरतीनंतर ओहोटी, प्रकाशानंतर काळोख आणि उदयानंतर अस्त हे हे प्रकार जगांतील कालचक्राप्रमाणें अबाधित चालावयाचेच.

चांदण्याच्या प्रकाशानें सुस्नात झालेल्या पौर्णिमेच्या आल्हादकारक रात्रीनंतर दुसरेच दिवशीं कृष्णपक्षाचा काळा बुरखा चांदण्याची आठवण नाहींशी करण्याचा प्रयत्न करूं लागतो. बापूसाहेबांचे शुक्लपक्षाचे दिवस मोठ्या आनंदानें आणि हां हां म्हणतां निघून गेले व नियमाप्रमाणें कृष्णपक्षानें आपला अधिकार चालविण्यास सुरुवात केली. सृष्टीचे कायदे व नियम हे असेच अबाधित चालावयाचेच.

बापूसाहेब कट्टे हिंदुधर्मी असून तेथील इतर सर्व वस्ती मुसलमानांची होती. हाताच्या बोटांवर मोजण्यासारखीं कांहीं हिंदूंचीं घरें होतीं; पण बापूसाहेबांना व्यवसायामुळें मुसलमानांतच सबंध दिवस घालवावा लागे. हिंदूंची आणि त्यांची बहुतेक गांठच पडत नसे.

व्यापाराच्या चलतीमुळें बापूसाहेबांचा इतर मुसलमान व्यापारी व यवन अधिकारी द्वेष करूं लागले. वास्तविक द्वेष करण्याचें कांहीं कारण नव्हतें व बापूसाहेबहि सर्वांशीं शक्य तितकें मिळून मिसळून वागत, त्यांच्या उपयोगीं पडत, वेळोवेळीं त्यांना उसनवार रकमा देत; पण मनुष्यांच्या एका विशिष्ट मनोवृत्तीला अनुसरून ते सर्व मिळून बापूसाहेबांना पाण्यांत पहात. 'दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें' हा कित्येक

माणसांचा स्वभावधर्मच असतो; आणि त्यांत धर्मवैचित्र्याची भर पडली, म्हणजे तर विचारतांच नये. मत्सराचें रूपांतर द्वेषांत आणि मग सूडांत परिणत होतें.

आपल्या यवन मित्र-मंडळीस खुष ठेवावें व त्यांनीं आपल्याशीं द्वेष करूं नये म्हणून बापूसाहेब त्यांना मधून मधून मोठमोठ्या मेजवान्या देत, व खानाहि करवीत. या कृत्यांत ते आपल्या पैशाचा अपव्यय करीत, नाहीं असें नाहीं; पण एक दोन हिरे अगर एकादी मोत्यांची माळ विकली गेली, कीं, त्यांचा तो खर्च भरून येत असे. तरी पण एकंदरींत केलेल्या खर्चाचा व्हावा तसा उपयोग होत नसे.

व्यापार करतां सोळाबारा व दैवाशीं झगडतांना बरेवाईट दिवस येणें हें चालावयाचेंच. नेहमींच कोणाचाहि धंदा सुरळीत चालत नाहीं. त्याप्रमाणेंच बापूसाहेबांचें झालें. त्यांची खरेदीविक्री कमी कमी होत चालली; पण इतकें होत होतें तरी आपल्या मानमान्यतेला व दर्जाला कमीपणा येईल म्हणून त्यांनीं आंतील स्थिति गुप्तच ठेविली आणि त्यामुळें तर चालू व्यवहाराला जास्तच ताण बसूं लागला. इंदिरेच्या लक्षांत हा प्रकार येतांच तिनें त्यांना असें न करण्याबद्दल शक्य तितकें समजावून सांगितलें; पण त्या सांगण्याचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. आपली खरी स्थिति उघड व्हावी हें बापूसाहेबांना फारच लाजिरवाणें वाटूं लागलें.

पण कळशींतील पाणी ओततां ओततां संपणारच, मग बापूसाहेबांच्या खजिन्याचीहि तशी स्थिति कां होऊं नये ? शिवाय त्यांच्यांत फारच दयाळूपणा व कांहींसा भिडस्तपणा असल्यामुळें त्यांनीं मित्रत्वाखातर आणि आपला मान व दर्जा वाढण्यासाठीं पुष्कळ लोकांना मोठमोठ्या रकमा उसन्या दिल्या होत्या. 'शितें असतील तेथे भुतें जमावयाचींच' त्याप्रमाणें बापूसाहेबांच्या या उदारपणामुळें त्यांना मित्रहि पुष्कळ मिळाले होते. ' सौंदर्यदर्शन ' आणि ' धनलाभ ' या दोन गोष्टी ज्या एकाच जागीं सांपडतात त्या ठिकाणीं टोळधाडीप्रमाणें मित्र ( ! ) जमा होऊं लागले तर त्यांत आश्चर्य कसचें ? तसें झालें नाहीं तरच आश्चर्य ! ! बापूसाहेबांनीं आपल्या उदार धोरणाला अनुसरून सर्वांना मित्र मानून

वेळोवेळीं मोठमोठ्या रकमा उसन्या दिल्या खऱ्या पण त्या ते योग्य वेळीं वसूल करूं शकले नाहींत. मित्रांना तगादा करणें अगर त्यांच्या दारांशीं धरणें धरून बसणें हेंहि त्यांना लाजिरवाणें वाटूं लागलें.

यांतच आणखी एक नवें संकट आलें. असलेली स्थिति बदलूं लागली, विपत्ती येऊं लागली आणि प्रत्येक कृत्यांत अडथळा होऊं लागला, कीं, मनुष्याला एक प्रकारची उद्विग्नता उत्पन्न होऊन मन निरुत्साही व काळजीयुक्त बनतें, वेळोवेळीं होत चाललेल्या निराशेमुळें वारंवार दीर्घ सुस्कारे निघूं लागतात, खाल्लेलें अन्न पचत नाहीं, आणि तो रोगी बनतो. बापूसाहेबांचीहि तीच स्थिति झाली. काळजीनें अशक्तता उत्पन्न होऊन त्यांना बारीक बारीक ताप येऊं लागला व थोड्याच दिवसांत ते बिछान्याला खिळले गेले. त्यांना उठतांच येईना. दिवसेंदिवस त्यांची स्थिति फारच शोचनीय होत चालली. आरंभीं आरंभीं ते टांग्यांतून अगर मेण्यांतून फिरत असत; पण पुढें पुढें तसेंहि त्यांच्यानें होईना. तोहि मार्ग बंद झाला. ज्यांना त्यांनीं हातउसने व कर्जाऊ पैसे दिले होते त्यांना आपल्या असहाय व दीन स्थितीचीं पत्रें लिहून लवकर पैसे आणून देण्याबद्दल विनंति केली, पण ज्यांना तीं पत्रें गेलीं होतीं ते मोठे चाणाक्ष असल्यामुळें त्यांनीं बापूसाहेबांच्या पडत्या काळाचा फायदा घेतला व मित्रपणा वगैरे गुंडाळून ठेवून पत्रांचीं उत्तरें न देतां कांहीं कामासाठीं कोणी जवळच्या खेड्यांत, तर कोणी व्यापारानिमित्त मोठ्या शहरीं निघुन गेले. अर्थात बापूसाहेबांच्या पत्रांचा व विनवण्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

भरभराटीच्या काळांत बापूसाहेबांचे चाकरनोकर पुष्कळ होते; पण आपला विपत्तिकाळ जाणून त्यांनीं नाइलाजानें सर्वांना रजा दिली; पण पूर्वीच्या इमानाला जागून दोघांना नोकरीवर राहूं देणें भाग पडलें. गोविंदा आणि नर्मदा मोलकरीण हीं दोघेंहि फारच चांगल्या स्वभावाचीं, इमानी आणि धन्यावर प्रेम करणारीं माणसें होतीं. अशा विपत्तीच्या वेळीं मालकाला सोडून जाण्याला त्यांचें मन तयार होईना. नर्मदेनें इंदिरेला व गोविंदानें बापूसाहेबांना स्पष्ट सांगितलें कीं, आम्हीं कांहीं तुम्हांला सोडून जाणार नाहीं; तुमची जी स्थिति होईल तीच आमची.'

अर्थात बापूसाहेबांनीं व इंदिरेनें त्यांना ठेवून घेतलें. असल्या प्रेमळ माणसांना सोडणें त्यांना बरें वाटेना, व इंदिरेलाहि आपल्या हाताखालीं कोणी तरी माणूस पाहिजेच होतें. शिवाय बाहेरच्या कामालाहि गोविंदासारखा इमानी माणूस पाहिजेच होता. अर्थात असलेल्या स्थितींत समाधान मानून राहणारीं हीं नोकर माणसें इंदिरेला व बापूसाहेबांना असल्या विपत्तींतहि समाधानाचा उपभोग घेण्याला कारण झालीं हें सांगावयास नकोच. अस्तु.

बापूसाहेबांनीं गोविंदाच्या हातीं पत्रें देऊन त्याला निरनिराळ्या ठिकाणीं तगाद्याला पाठविलें. गोविंदाला पाठवितांना ते आशेनें मनांत म्हणत, ' हा आज कांहीं तरी रक्कम घेऊन येईल; पण तो रिकाम्या हातानें व खिन्न चेहऱ्यानें घरीं परतून आला, म्हणजे ते मर्मभेदी असा एक दीर्घ सुस्कारा सोडीत व अशक्ततेनें कण्हत कण्हत बिछान्यावर पडत व त्यांचे नेत्रहि या वेळीं पाण्यानें भरून येत. गोविंदालाहि वाईट वाटे, पण तो काय करतो बिचारा ! आपले डोळे पुसण्यापलीकडे अगर नर्मदेला सांगण्यापलीकडे त्याच्यानें कांहींहि करवत नसे.

पतीच्या सुखदुःखाशीं तादात्म्य झालेली इंदिरा आपल्या हृदयेश्वराची होत असलेली ही निराशा व त्यापासून त्यांना वाटणारें अपरिमित दुःख पाहून ती मनांतल्यामनांत फार झुरत असे आणि ती यापेक्षां ज्यास्त तें काय करणार होती ? येणें असलेल्या मोठमोठ्या रकमा वसूल करायला तिला तर बाहेर जातां येणें शक्य नव्हतें, मग दीर्घ सुस्कारे सोडण्यापलीकडे व आपल्या अकलेप्रमाणें पतीचें समाधान करण्याला झटण्यापलीकडे ती काय करणार ? ईश्वरानेंच मनुष्याची कसोटी पहाण्याला सुरवात केली म्हणजे मग मनुष्याचा काय इलाज चालणार ?

पण हीहि स्थिति कायमची राहणारी नव्हती. ईश्वराला वाटलें, आणखीहि या कुटुंबाची परिक्षा पहावी. बापूसाहेबांची शिल्लक पुंजी संपत आली, हाताला पैसा नाहींसा झाला. बाहेर जाण्याला सामर्थ्य राहिलें नाहीं. मनुष्यांना रंजविण्यासाठीं व नांव मिळविण्यासाठीं बापूसाहेबांनीं पाण्यासारखा पैसा खर्च केला व तेवढ्यापुरती लोकांनीहि त्यांची भरपूर स्तुती केली; पण आतां प्रसंगाच्या वेळीं ते एका पैशालाहि महाग झाले.

त्यांचें स्वतःचें येणें येईना मग मदत तरी कोण करतों! मनुष्य वैभवसंपन्न असला व सर्व सुखें त्याला अनुकूल असलीं, कीं, ईश्वर जगांत आहे; अगर त्याच्याच कृपेनें जग चाललें आहे एवढेंहि तो विसरतो. ईश्वराचें अस्तित्वहि त्याला मान्य नसतें; पण ईश्वराची तीक्ष्ण नजर चोहोंकडे सारखी फिरत असल्यामुळें व मनुष्यप्राण्यावर त्याचें फारच प्रेम असल्यामुळें तो त्याला शुद्धीवर आणण्यासाठीं कमालीच्या हीन स्थितीला त्याला नेऊन पोंचवितो आणि तसें झालें म्हणजे मनुष्याचे डोळे चटकन उघडतात, आपलें अत्यल्प सामर्थ्य त्याला कळून येते व तो ईश्वराचा पुरा दासानुदास बनतो. असो; बापूसाहेबांनीं पुष्कळवेळां संकटांत पडलेल्यांना मदत केली होती; पण आज ते संकटांत पडतांच, त्यांना विपत्ति येतांच, त्यांच्या मदतीला कोणीहि पुढें सरेना ! आप्त, इष्ट, मित्र सगळे तोंडें लपवूं लागले आणि यामुळें तर बापूसाहेबांना ज्यास्तच दुःख होऊं लागलें.

हा सगळा प्रकार पाहून इंदिरेला आतां वाटूं लागलें होतें कीं, सगळी भीडभाड बाजूला ठेवून आपण देणेकऱ्याकडे जावें व तगादा करून पैसा वसूल करावा. पैसा वसूल होऊन आपल्या चालू व्यवहाराला त्याचा उपयोग होऊं लागल्यावांचून बापूसाहेबांना बरें वाटावयाचें नाहीं, हें ती जाणून होती, व त्यांच्या बरेपणासाठीं आपणावर याही पेक्षां भयंकर प्रसंग आला तरी तो आपण सहन करूं असा तिनें निश्चय केला. आपण ज्या वेळीं बाहेर जाऊं त्यावेळीं आपल्याबरोबर नर्मदा येईलच .अर्थात एकमेकींचा एकमेकींला तितका धीर येईल अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून भीरु हृदयाला सामर्थ्यवान् बनाविलें.

इंदिरेनें आपल्याकडून इतकी तयारी केली तरी बापूसाहेब तिला तसें करण्याला परवानगी देत ना, आणि त्यामुळें ती बरीच खिन्न झाली. आपल्या प्रियकराची आज्ञा तिला प्राणांपेक्षांहि ज्यास्त वाटे, त्यांची अवज्ञा तिनें कधींच केली नव्हती. अर्थातच या वेळीं कात्रींत सांपडलेल्या कागदाप्रमाणें तिची अवस्था झाली; पण प्रसंग मोठा बिकट आहे असें जाणून ती अधोमुख होऊन मृदु स्वरानें म्हणाली, ' नाथ, आपण जर कांहींच प्रयत्न केला नाहीं, आणि ईश्वरावर विश्वासून घरांतच बसून राहिलों तर ते लोक कर्जाऊ नेलेला पैसा आपोआप येथें आणून देतील असें का

आपल्याला वाटतें ? आज घरांत कांहीं नाहीं ! मग आतां अशी वाट पाहून कसं चालायचं बरं ? आपलं व माझं असो; पण हीं बिचारीं दोन माणसं आम्हांला धरून राहिलीं आहेत त्यांच्या पोटाला नको का कांहीं ? तसंच, नाथ ! आपणाला औषधपाणी अगर पथ्याचें करायला नको का ? पुढं कसं होणार ? माझे जे कांहीं डागडागिनें होते ते सर्व नर्मदेमार्फत विकून आजपर्यंत कसेबसे दिवस घालविले. पण गडे, माझ्या जवळ आतां खरो-खरच कांहीं नाहीं. गाझ्याबद्दलचं मेलं एक असो; पण आपले हाल ! हाय ! नाथ ! आपले हे हाल माझ्यानें नाहीं पहावत, आणि मी जो इतका निर्भीडपणा करायला तयार झालें तो त्या साठींच ! "

आपल्या पत्नीचें हें कळकळीचें बोलणें ऐकून बापूसाहेब बिछान्यावरून अर्धवट उठून इंदिरेचा हात आपल्या हातांत घेऊन एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाले, " नको, माझ्या लाडके, तूं इतके श्रम घेऊं नकोस. तूं आपल्या जवळचे सर्व दागिने विकलेस हें ऐकून माझ्या मनाला ज्या वेदना होत आहेत त्या मी तुला काय सांगू ? हाय ! मी एवढा श्रीमंत; पण सर्वस्वाला मुकून आतां, प्रिये, तुझे दागिनेहि संपविले कीं ग !! " बोलतां बोलतां बापूसाहेबांना श्वास लागला व ते पुन्हां बिछान्यावर पडले. त्यांच्या नवनीतसदृश मृदु हृदयाला हजारों विंचू चावल्याप्रमाणें वेदना होऊं लागल्या, चेहरा अगदीं निस्तेज झाला, आणि डोळ्यांत अश्रुबिंदु चमकले. इंदिरेला त्यांचे ते अश्रु पाहावेनात. तिचेहि नेत्र कांहीं कोरडे नव्हते; पण तिनें आत्मसंयमन करून आपल्या प्रियकराचे डोळे पुसले, तेव्हां बापूसाहेब थोडेसे भानावर येऊन बोलूं लागले, " लाडके ! आम्हीं दोघांनीं किती सुख भोगलें; पण ते दिवस कसे चटकन निघून गेले आणि हे वारंवार दुःखाचे चटके देणारे दिवस किती तरी सावकाश चालले आहेत ! ईश्वरा ! मीं तुझा अपराध केला खरा. सुखाच्या दिवसांत तुझी मला आठवण झाली नाहीं; पण कृपाघना ! आतां तुझें सामर्थ्य मला कळून आलें आणि तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास बसला. माझ्या या लाडकीसाठीं तरी निदान मला या विपत्तींतून वर काढ !! " कांहीं वेळ थांबून बापूसाहेबांनीं पुन्हां आपल्या पत्नीच्या तोंडाकडे पाहून बोलण्याला सुरवात केली. " तूं ज्या उद्देशानें माझ्या कृतघ्न मित्रांच्या दाराशीं जाणार

आहेस, त्याला मी कबुली द्यायला तयार नाहीं; पण मला वाटतें, कीं, या बाबतींत आपणाला निराश व्हावें लागणार नाहीं, व कधींहि आम्हांला उपाशी मरावें लागणार नाहीं. मनाला आणखी थोडें निश्चयी आणि सहनशील बनवून आम्हीं त्या जगन्नियन्त्यावर प्रेमपूर्ण विश्वास ठेवूं या. त्याच्यावांचून आमच्या दुःखाचें निरसन करणारा दुसरा कोणीहि नाहीं. आम्हीं सामान्य माणसें. आमच्यावर त्या प्रेममय आणि चिरदयामय ईश्वरानें करुणा केल्यावांचून आम्हीं मनुष्याचें प्रेम कसें आकर्षण करूं शकणार ! त्याच्यावरच विश्वासून राहूं या. कदाचित् आयुष्यांतील कांहीं दिवस उपास करावे लागतील! पण लाडके, आम्हीं ते उपासहि आनंदानें सहन करूं या. जगाचा पालनकर्ता ईश्वर कीटपतंगांनासुद्धां उपाशी ठेवीत नाहीं, तो त्यांच्याहि जेवण्याखाण्याची तजवीज करतो; मग तो आम्हांलाच उपाशी ठेवील हें संभवतें तरी कसें ! नको तूं निष्कारण कसलीहि काळजी करूं नकोस. स्वस्थ रहा. ”

अहाहा ! देवावर केवढा हा विश्वास !! मनुष्यानें अशा प्रकारें देवाला आत्मसमर्पण केलें तर आणखी काय पाहिजे ! पण वेडें मानव-मन चोहोंकडे भटकत असतें त्याला काय उपाय !

आपल्या प्रियकराचें तें पवित्र आणि निग्रहाचें बोलणें ऐकून इंदिरेला कांहींसें समाधान वाटलें व थोडेंसें धाडसहि उत्पन्न झालें. ती म्हणाली; “ चांगलें फार चांगलें. तसेंच होऊं द्या. आपण ज्या वेळीं जें सांगितलें तें मीं वेदाज्ञेप्रमाणें मानलें. मग आज तरी मी आपल्या आज्ञेबाहेर कां वागेन ! पण नाथ ! आपलें हृदय फारच थोर व उदात्त आहे. मी बायकोमाणूस, आणि ‘ पती हेंच स्त्रियांचें सर्वस्व ’ या वेदवचनापलीकडे माझी बुद्धि जाऊं शकत नाहीं. देहाचें अस्तित्व जसें प्राणांवर अवलंबून असतें तसें माझें अस्तित्व आपल्यावरच अवलंबून आहे. म्हणून माझें क्षुद्र हृदय तळमळतें. आपणाला जर ईश्वरावर विश्वास ठेवावा असें वाटत असेल तर माझा त्याला अडथळा नाहीं. तोच आम्हां सर्वांचें कल्याण करणारा आहे. ”

आपल्या पतीचा ईश्वरावरील तो दृढ विश्वास पाहून इंदिरेला समा-

धान वाटलें; थोड्या वेळापूर्वी तिला वाटत असलेली तळमळ आतां बरीच कमी झाली आणि ती मोकळ्या मनानें घरांत निघून गेली.

ती गेल्यानंतर बापूसाहेब मनांतल्यामनांत विचार करूं लागले. ते अस्पष्ट स्वरानें म्हणाले, " पूर्व जन्मींच्या जबरदस्त पुण्याईच्या जोरावर मला असली ही सद्गुणी पत्नी मिळाली. माझ्या जवळचें सगळें जवाहीर जरी तूर्त संपलें आहे, तरी या स्त्रीरत्नाच्या लाभामुळें मी स्वतःला श्रीमंतच समजत आहें. मी या स्वर्गीय रत्नाला योग्य नाहीं, पण परमेश्वरानें मला तें दिलें, याबद्दल मी त्याचा फार आभारी आहें, कितीहि त्रास, कितीहि दारिद्र्य आणि कितीहि दुःख असो, पण देवा ! माझी प्रिय इंदिरा जर माझ्याजवळ असली तर मला कशाचेंहि दुःख वाटणार नाहीं. माझें आयुष्य तिच्या आयुष्याबरोबरच संपीव एवढीच माझी तुला आतां नम्र विनंति आहे. "

बोलतां बोलतां बापूसाहेबांनीं आपले हात छातीवर ठेविले आणि ते वर छताकडे पहात स्तब्ध झाले जणूं काय ईश्वर काय सांगतो तें ते ऐकतच असावेत ! डोळ्यांतून अश्रुप्रवाह चाललाच होता. बराच वेळ अशा स्थितींत गेल्यावर त्यांना कांहींसें हलकें वाटलें व सुखाचा त्यांनीं एक दीर्घ सुस्काराहि सोडला.

याच वेळीं बाहेरून कुणीसें म्हटलें, "बापूसाहेब घरांत आहेत का ?" बापूसाहेबांना हा स्वर परिचित नव्हता तरी ते घाई घाईनें उठून बसले आणि त्यानीं पत्नीला हांक मारली.

त्यांचा शब्द पुरा होतो न होतो तोंच इंदिरा तेथें आली आणि विनीत स्वरानें म्हणाली, " मला कोणी हांक मारली ? "

बापूसाहेब अस्वस्थ मनानें म्हणाले, " मींच ! गोविंदा किंवा नर्मदा कोणी असेल त्याला म्हणावें बाहेर ओटीवर जा, कोणी इसम पैसे द्यायला आला असावा. त्याला इकडेसच बोलावायला सांग; पण तो इथें असेपर्यंत तूं इकडे येऊं नकोस जा लवकर. "

पतीच्या आज्ञेप्रमाणें इंदिरा माडीवरून खालीं उतरत होती इतक्यांत गोविंदा तिला भेटला. तेव्हां ती त्याला म्हणाली, " बाहेर कोण आले आहेत पहा व त्यांना तुझ्या मालकांना भेटायचें असल्यास माडीवर घेऊन

जा.'' नंतर ती दुसरीकडे आपल्या गृहकृत्याला निघून गेली, आणि गोविंदानें बाहेर आलेल्या इसमाला बापूसाहेबांना भेटण्यासाठीं माडी-वर नेलें.

---

## प्रकरण २ रें.



### सुखाची आशा.

जगांत सुष्ट-दुष्ट दोन्हीं प्रकारचे लोक आहेत; तरी पण दुष्ट लोकांचीच संख्या जास्त आहे, असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं. शिवाय एकवेळ दुष्ट मनुष्य परवडेल; पण जे बाहेरून साधुत्व दाखवून मनांत आपल्या नीचत्वाचें कारस्थान जुळवीत असतात, अशा भोंदूंना फारच भ्यावें लागतें; कारण ते फारच भयंकर असतात. त्यांना वरून सोन्यासारखे पिंवळे जर्द दिसणारे व हृदयांत हलाहल धारण करणारे कृष्णसर्पच म्हणणें योग्य ! कारण ते ज्याला दंश करतात तो जगणें फारच कठीण असतें.

आज बापूसाहेबांना भेटायला आलेले गृहस्थ ' मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम् ' अशापैकींच असून सुखाच्या दिवसांतील हे अभिन्न हृदय मित्र म्हणून मानले गेले होते; इतकेंच नव्हे तर बापूसाहेबांनीं यांना दोन हजार रुपये हातउसने म्हणून दिलेले होते, पण यांचें खरें अंतरंग कसें आहे हें मात्र बापूसाहेबांना मुळींच माहित नव्हतें. इंदिरा तर या बाबतींत अगदींच अनभिज्ञ होती. अस्तु.

भेटायला आलेले गृहस्थ जातीनें यवन असून युनानी वैद्यकीचा धंदा करणारे अर्थात् हकीम होते. यांचें नांव हाफीज असें असून यांना द्रव्य-लोभ फार होता, आणि रोग्याच्या आप्तेष्टांकडून पैसे काढण्यांत हे फारच क्रूरपणानें वागत असत. यांच्या हृदयाला दयेचा ओलावा मुळींच नव्हता म्हटलें तरी चालेल, आणि याच त्यांच्या एकदोन विशिष्ट गुणांमुळेंच श्रीमंत लोकांवांचून त्यांना फारसें कुणी बोलावीत नसत.

हाफीजसाहेब, बापूसाहेबांचे देणेकरी होते व व्याजाची बाकीहि बरीच येणें होती तरी त्यांच्या आजारांत ते त्यांना पहायला आले म्हणजे फी घेत असत, व बापूसाहेबही ती त्यांना देत. औषधाची किंमतहि आपल्या शिरस्त्याप्रमाणें ते दुप्पट तिप्पट घेत. पैसा जवळ असेपर्यंत बापूसाहेबांनीं या बाबतींत मुळींच हात आंवरला नाहीं, व व्याजाच्या पैशांबद्दलहि त्याला त्यांनीं एका शब्दानेंहि विचारलें नाहीं; पण आतां मात्र आणिबाणीची वेळ आली होती आणि पैशांची मागणी करणें भाग झालें होतें.

बापूसाहेबांशीं हकीमसाहेब अगदीं घरगुती नात्यानें वागत असल्या-मुळें त्यांना घरांत येण्याला परवानगी होती व तिचा ते 'मित्र' या नात्यानें उपयोग करीत असत; त्यामुळें इंदिरेचें अप्रतीम लावण्य त्यांना बरेच वेळां पहायला सांपडत असे व इंदिराहि हकीमसाहेब हे आपल्या नवऱ्याचे हितचिंतक मित्र आहेत असें जाणून कधीं कधीं त्यांच्याशीं जरूरीप्रमाणें बोलतहि असे. 'मधुमुख विष घटिं भरलें' अशी हकीम साहेबांची स्थिति आहे हें त्या साध्वीला मुळींच माहिती नव्हतें.

बापूसाहेबांच्या रोगावर हेच औषध देत असत; पण पुढें पुढें त्यांनीं कांहीं अडचण सांगून बापूसाहेबांकडे येण्याचें टाळलें होतें व औषधहि बंद केलें होतें. मग याचें कारण बापूसाहेबांची आत्यंतिक गरीब स्थिति कीं, दुसरें कांहीं होतें तें न कळे. पण सध्यां बरेच दिवस बापूसाहेबांना त्याचें औषध मिळत नसे हें मात्र खरें. बापूसाहेबांनीं साधारणपणें याचें कारण जाणलें होतें. ते एके दिवशीं काकुळतीनें हाफीजसाहेबांना म्हणाले होते, 'भाई! तुम्हीं माझे अभिन्नहृदय मित्र म्हणवतां आणि माझ्या या विपन्नावस्थेंत औषधाचे पैसे दुप्पटचौपट घेतां हें तुम्हांला शोभतें का? माझी चांगली स्थिति असती तर मीं तुम्हाला एका शब्दानेंहि विचारलें नसतें; पण आज मी अन्नालाहि महाग झालेला असतांना, व तुमच्या जवळ माझे पैसे आणि व्याज येणें असतांना इतके रुपये नुस-त्या येण्याच्या फीबद्दल घेतां हें तुम्हांला शोभतें का? माझ्यानें असें तुम्हांला बोलवत नाहीं; पण काय करूं? माझा आतां अगदींच नाइ-लाज आहे!—"

हें बोलणें ज्या दिवशीं झालें त्याच्याच दुसऱ्या दिवसापासून हकाम-

साहेब बापूसाहेबांकडे आले नाहींत व त्यांनीं औषधहि पाठविलें नाहीं. गोविंदाकरवीं त्यांना बोलावणें पाठविलें; पण कांहींतरी कारण सांगून त्यांनीं येण्याची टाळाटाळी केली. बरेच वेळां आग्रहपूर्वक बोलावणें गेल्या-मुळें ते एकदोनदां आले, पण अगदीं थोडावेळ थांबून व कार्याकारण बोलून निघून गेले. मनापासून पहाणें व औषध देणें हें त्यांनीं बंद केलें. या झालेल्या एकंदर प्रकारावरून बापूसाहेबांना जरी हकीमसाहेबांची चांगलीशी ओळख पटली नाहीं तरी त्यांचा इमानी नोकर गोविंदा यानें मात्र त्यांना चांगलेच ओळखलें होतें, व हाफीजसाहेब किती राक्षसी वृत्तीचे आहेत हें त्याला कळून चुकलें होतें.

त्यानें आज जेव्हां 'हकीमसाहेब आले आहेत' म्हणून आपल्या मालकाला जाणविलें तेव्हां बापूसाहेबांनीं मनांत म्हटलें, 'मी त्याच्या औषधाची योग्य किंमत व येण्याची फी देऊं शकणार नाहीं म्हणूनच ही स्वारी इतके दिवस आली नसावी; पण मी त्याचा सावकार असून त्याच्याजवळ माझे दोन हजार रुपये यावयाचे आहेत. व्याजाचा हिशोब केल्यास कितीतरी रुपये होतील, पण ते देण्याचें हे राजश्री नांवच काढीत नाहींत. औषधाची किंमत मिळत नाहीं हें दिसतांच वेड्यानें येण्याचेंहि सोडून दिलें; असा स्वार्थी मनुष्य आज आपण होऊन माझ्याकडे आला आहे, तेव्हां त्याचा कांहींतरी हेतु असला पाहिजे, पाहूं तरी आतां काय बोलतो तें ! कदाचित झाल्यागेल्या गोष्टींचा त्याला पश्चात्ताप झाला असला तर ! तसें होणेंहि संभवनीय आहे."

हा विचार मनांत येतांच, बापूसाहेब आपल्या सरळ स्वभावाला अनु-सरून हाफीजवरचा सगळा राग विसरले. 'तो आपण होऊन जर मा-झ्याकडे आला आहे तर त्याच्याशीं बेफिकीरपणानें वागणें योग्य नव्हे' असेंहि त्यांनीं मनांत म्हटलें; पण अशक्ततेमुळे हकीमसाहेबांना उत्थापन देण्यासाठीं मात्र त्यांच्यानें बिछान्यावर उठूनही बसवत नव्हतें; त्यामुळें त्यांनीं नोकराकडून हकीमसाहेबांना आपल्या शयनमंदिरांतच बोलाविलें.

हकीमसाहेब गोविंदासह आंत आले, व मलिन शय्येवर निःशक्ताव-स्थेंत पडलेल्या बापूसाहेबांना त्यानीं सन्मानपूर्वक सलाम करून नोकरानें आणून ठेवलेल्या खुर्चीवर बसतां बसतां म्हटले, "दोस्त ! ही काय बरें

आपली अवस्था झाली आहे ? हाय ! तुमच्यानें उठवतसुद्धां नाहीं ना ! पण दोस्त, तुमची इतकी स्थिति झाली आहे हें मला एका शब्दानेंहि तुम्ही कळवूं नये काय ? ''

लोकस्वभावाला व मित्रांच्या खुशामतीला बरेचसे परिचित झालेले बापूसाहेब किंचित हास्य करून घोगऱ्या स्वरांत म्हणाले, ''मित्रा, घर फिरलें म्हणजे घराचे वासेहि फिरतात. माझ्या जन्मस्थ ग्रहांनीं माझ्याकडे वक्र-दृष्टीनें पहायला सुरवात केल्याबरोबर इतर कोणीहि, माझ्याकडे सरळ नज-रेनें पाहीना. पूर्वी मी दोन्ही हातांनीं सोन्याच्या मोहरा उधळल्या पण आज मी एका मोहेरालाहि नाहीं एका पैशालासुद्धां महाग होऊन बसलों आहें कीं हो ! कांहीं दिवस असे होते, कीं, आपल्यासारखे सन्मान्य मित्र मी न बोलवितां माझ्या घरीं येत असत; पण आज प्रत्यक्ष माझा मृत्यु आपणासारख्याला बोलवायला गेला तरी आपण टाळाटाळी करूं लागलां आहां ! खरोखर हकीमसाहेब ! मी आतां या आपत्कालांत कोणा-च्याहि नजरेला न पडतां ईश्वराच्या घराकडे जाण्याचें ठरविलें आहे. ''

हकीमसाहेब प्रथम कांहींसे ओशाळले; पण चट्कन् आपल्या चेहे-ऱ्यावर आश्चर्याचा आविर्भाव आणून इकडे तिकडे पहात म्हणाले '' हें आपण आज काय बोलत आहां बापूसाहेब ! आपला नोकर मला बोल-वायला आला आणि मी आलों नाहीं हें मी आजच ऐकत आहें. माझ्या व्यवसायामुळें मला नेहेमीं निरनिराळ्या ठिकाणीं जावें लागतें हें आपण जाणतच आहां. शिवाय शहरांत दुसरा कोणी हकीम नसल्यामुळें व एक होता तोहि फार वृद्ध झाल्यामुळें सर्व ठिकाणीं मलाच जावें लागतें आणि त्यामुळें पाणी पिण्यालाहि फुरसत मिळत नाहीं. तसेंच मी केव्हां कुठें असेन हेंहि सांगतां येणार नाहीं; पण तें कांहीं असो. आतां मला आपण क्षमा करावी. आपल्यासारखे सहृदय मित्र फारच थोडे आढळतात.

यावर बापूसाहेब एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाले, '' आपण अजू-नहि माझ्याशीं स्नेह ठेवूं इच्छितां, हें ऐकून मला फारच समाधान वाटत आहे ! हकीमसाहेब ! दुःखाच्या दिवसांत, दारिद्र्याच्या दिवसांत आणि सुखाच्या दिवसांत मित्राची सहानुभूती फारच मधुर वाटते. असो. या जगांत पूर्वपुण्याईनें मला कांहीं सुखाचे दिवस लाभले होते व त्या

दिवसांत मी अनेकांना मित्र मानून त्यांना बऱ्याचशा रकमा हातउसन्या दिल्या होत्या; पण आतां जर त्यांच्याकडे ते रुपये मागायला पाठविलें तर माझ्या मनुष्याचा ते अपमान करून त्याला रिकाम्या हातानें वापस करतात. हकीमसाहेब ! याच कृतीला कलियुगाचा धर्म आणि कृतघ्नता असें म्हणतात बरें का ! ! मला आतां याचें फारसें दुःख वाटत नाहीं म्हणा, पण या ठग लोकांनीं मला हातोहात फसविलें याचेंच फार वाईट वाटतें, आणि माझ्या मनावर आज जो आघात बसला आहे तो हाच. हेंच पहाना ! आपल्याचकडे माझे दोन हजार रुपये रोख येणें आहेत, पण मी आपल्याला कधींतरी तगादा लावला होता का ? मला माहीत होतें कीं आपल्या हातांत येतांच मला आपण ते न मागतांच द्याल. मनुष्याला कांहीं तरी योग्यता म्हणून असतेच कीं नाहीं ? "

हकीमसाहेब आपली दाढी गोंजारीत डोकें हालवीत म्हणाले, " अगदीं बरोबर बोललांत बापूसाहेब ! आज जो मी हजार कामें बाजूला सारून आपली भेट घ्यायला आलों तो यामुळेंच. शिवाय आपली प्रकृति पाहून औषधहि बदलून द्यावें हाहि उद्देश आहेच. आज थोडेसे व्याजाचे रुपयेहि बरोबर आणले आहेत. परवां मी सुलतानपूरला जाणार. कारण तेथील सुभेदार फारच आजारी असल्यामुळें मला बोलावणें आलें आहे. इतकेंच नव्हे तर त्यांनीं एक हजार रुपये फीहि पाठवून दिली आहे, आणि ते मी आपल्याला देण्यासाठीं म्हणून तसेच ठेवून दिले आहेत. तसेंच त्या ठिकाणीं जाऊन मी जर त्यांना औषध वगैरे दिलें तर आणखीहि एक हजार रुपये मिळण्याचा संभव आहे. अर्थात लवकरच आपल्या ऋणांतून मुक्त होण्याची मी व्यवस्था करीन; पण साहेब ! मी मित्रत्वाच्या नात्यानें मात्र आपला कायमचा ऋणीच राहणार. रुपयांची जमवाजमव न झाल्यामुळें मला आपल्याकडे यायला इतके दिवस लाज वाटत होती. आमच्या बिबीशीं आपल्या पत्नीची चांगली ओळख आहे व ती आपल्याकडे जरी कधीं आली नाहीं तरी ती आपल्याला नांवानें ओळखत आहे. मी जातांना तिच्याकडेसच रुपये ठेवून जातों. आपण आपल्या पत्नीला पाठवून सवडीनुसार आणविण्याची तजवीज करावी. मित्रत्वाच्या नात्यानें या दिलेल्या तसदीबद्दल आपण मला क्षमा कराल अशी मी आशा करतों

मी आजच रुपये आणणार होतों, पण सर्व रकमेची जुळवाजुळव झाली नसल्यामुळें आणले नाहींत. संध्याकाळपर्यंत सर्व रकमेची तजवीज होईल पण उद्यां मला इकडे येतां येणार नाहीं. कारण परवां लांबच्या गांवीं जावयाचें असल्यामुळें तशीच तयारीहि करावी लागेल. असो. आपण परवां ते रुपये आणण्याची तजवीज करालच; पण आज थोडेसे व्याजाचे रुपये आणले आहेत त्यांचा स्वीकार करावा. " असें फार नम्रतापूर्वक बोलून हकीमसाहेबांनीं आपल्या खिशांतून पंचवीस रुपये काढून ते बापूसाहेबांकडे दिले.

रुपये हातांत घेऊन बापूसाहेब मनांत म्हणाले, " या हकीमाला लोक कृपण म्हणतात, पण आज बाजारांत, ज्याची ' दाता ' म्हणून प्रसिद्धि आहे, व मान आहे त्यापेक्षां हा कृपण माणूसच मला श्रेष्ठ वाटतो. कारण माझ्या या विपत्तीच्या वेळीं हा आगंतुकाप्रमाणें माझा पैसा देण्यासाठी आला !! आजकाल इतका मोठेपणा मिळविणारा सभ्य गृहस्थ तरी कुठें आहे ? " हे विचार मनांत येतांच, या घटकेपर्यंत हकीमसाहेबां-बद्दल जो तिरस्कार मनांत उत्पन्न झाला होता तो नाहींसा झाला व त्यांचें आधींच शुद्ध असलेलें मन हकीमसाहेबांच्या बाबतींत गंगाजलाप्रमाणें शुद्ध झालें.

हकिमानें दिलेले रुपये गादीखालीं ठेवीत बापूसाहेब म्हणाले, " भाई दोस्त ! ! तुमच्या या उपकारांबद्दल मी तुमचा अत्यंत ऋणी आहें. असो; पण हकीमसाहेब ! माझ्या या व्याधीवर एखादें चांगलें औषध तुमच्याकडे नाहीं काहो ? "

हाफीजनें उत्तर केलें, " साहेब ! आपला हा रोग एका दिवसाचा नव्हे आणि एकाच दिवसांत तो बरा होण्यासारखाहि नाहीं. मी सुलतान-पूरला जात आहें तिकडून आल्यावर आपल्याला चांगलें औषध देऊन दहापंधरा दिवसांत उत्तम गुण येईल असें करतों. मी असल्यावर तुम्हाला प्रकृतीसंबंधानें काळजीच नको. " असें म्हणून हकीमसाहेब खुर्चीवरून उठले आणि अगदीं अदबीनें बापूसाहेबांना सलाम करून म्हणाले, " बरें तर मी आतां येतों. परवांचे दिवशीं तुम्ही आपल्या पत्नीला आमच्या बिबीसाहेबांकडे पाठवा. कारण आपण जितक्या लवकर

ते रुपये आणाल, तितकें चांगलें. जास्त दिवस घरांत पैसा राहिला, म्हणजे तो बाहेर काढूं नयेसा वाटतो, आणि आमच्या बिबीसाहेब तर फारच द्रव्यलोभी आहेत. त्यामुळें तुम्हीं ते रुपये आणण्यास एकदोन दिवस जास्त लावल्यास ती, नाहीं म्हणून सुद्धां सांगण्याला कमी करणार नाहीं, आणि तसें झालें म्हणजे तुम्हांला रुपये मिळण्याला वेळ लागेल.''

सरळ मनाच्या बापूसाहेबांनीं उत्तर दिलें, "हो तें सगळें मी जाणतों. बायकामाणसांचें नवऱ्यावर जितकें प्रेम असतें, त्याच्या दुप्पट प्रेम पैशावर असतें. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. मी ते रुपये आणण्याची तजवीज करतों. तहानेल्या मनुष्याकडे कांहीं पाणी चालून येत नाहीं. त्यालाच पाण्याकडे जावें लागतें. परवांचे दिवशीं मी खात्रीपूर्वक इंदिरेला तुमच्या बिबीसाहेबांकडे पाठवीन."

हकीमसाहेब समाधानपूर्ण अन्तःकरणानें मान हालवून हंसतच म्हणाले, "वाः तुम्हांला उपमाहि फार चांगल्या येतात ! बरें सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करण्याला मात्र चुकूं नका हो." असें म्हणून हकीमसाहेब, बापूसाहेबांचा निरोप घेऊन निघून गेले. ते तिथून निघून जातांच आपल्या सौंदर्यानें ती खोली प्रकाशित करीत व मृदुमृदु हंसत हंसत इंदिरा तेथें आली, आणि नवयौवनेला साजेल असा एक कटाक्ष बापूसाहेबांच्या अन्तःकरणावर फेंकून अप्सराविनिंदित स्वरानें म्हणाली, "मी दाराआड उभी राहून सर्व कांहीं ऐकलं. पण मी असं आडून ऐकल्याबद्दल मला क्षमा करायची गडे !"

बापूसाहेबांनीं इंदिरेला आपल्याकडे ओढलें व तिचें चुम्बन घेऊन तिच्या तोंडावरून हात फिरवीत प्रेमपूर्ण स्वरानें म्हटलें, "तें असो; पण लाडके, तूं काय ऐकलेंस तें आधीं सांग पाहूं."

इंदिरा पुनः हंसली, व त्या तिच्या प्रसन्नतेनें बापूसाहेबांचें अंतःकरण ज्यास्त प्रसन्न झालें; नंतर ती थोडा वेळ आपल्या हृदयेश्वराकडे पाहात मधुर स्वरानें पण लडिवाळपणानें त्याच्या गळ्याभोंवतीं आपल्या मृणालसम सुकुमार हाताचा विळखा घालून म्हणाली, "हाफीज हकीमसारखा कृपण मनुष्य जेव्हां आमचा पैसा देण्यासाठीं आपण होऊन आमच्या घरीं आला, तेव्हां मला वाटतें कीं, आतां आम्हांला सुखाचे दिवस लव-

करच येतील. नाथ ! आपल्याला माहीत नाहीं का ? मनुष्याचे दुःखाचे दिवस निघून जाऊन जेव्हां त्याला सुखाचे दिवस येऊं लागतात, तेव्हां असंभवनीय गोष्टीहि संभवनीय झालेल्या दिसतात. ज्या हकीमाच्या हातून पाणीहि सांडणें कठीण तो जर इतक्या लवकर सगळे पैसे द्यायला तयार झाला, तर आमचे वाईट दिवस संपविण्याचें ईश्वराच्या मनांत आहे, असें नको का मानायला ? ”

या स्वार्थपर जगांतील कपट, अविश्वास, धर्मज्ञानशून्यत्व आणि मनुष्यस्वभाव यांचीं बरीचशीं उदाहरणें बापूसाहेबांनीं पाहिलीं होतीं अर्थात् या आकस्मिक होणाऱ्या द्रव्यलाभाच्या बाबतींत त्यांनीं विचार केला कीं, “ अजून विश्वासार्ह असें कांहींच मानतां नये. कारण केव्हां कुणाची कशी बुद्धि फिरेल तें सांगतां येत नाहीं. अर्थात जोंपर्यंत येणारी वस्तु आपल्या हातांत आली नाहीं तोंपर्यंत तिच्याबद्दल आनंद मानणें व्यर्थ आहे. हकिमाकडचे पैसे जेव्हां माझ्या या तिजोरींत येतील तेव्हांच त्याच्याबद्दल आनंद मानणें बरें. नाहीं तर आधीं मानलेला आनंद कदाचित् दुप्पट दुःखालाहि कारण व्हायचा–”

आपला प्रियकर, विचारांत गढून गेलेला पाहून इंदिरेनें विचारलें, “ विचार कसला करायचा नाथ ? ”

“ तुझ्या या अत्यंत लावण्यसंपन्न मुखचंद्रम्याचा ! ” बापूसाहेब हंसून म्हणाले. इंदिरा लाजून पुन्हां मृदुस्वरानें म्हणाली, “अगदीं खोटें ! रुपयांबद्दलचाच कांहीं तरी विचार चालला असावा. माझ्यासंबंधाचा विचार करायचा असता तर आपला चेहेरा नुकत्याच फुललेल्या फुलाप्रमाणें दिसला असता ! ”

“ खरेंच इंदिरे !! तूं अगदीं योग्य परीक्षा केलीस ! ”

“ पण आतां त्या रुपयांबद्दल काळजी करण्याचें कारणच नाहीं. हकीमसाहेबांच्या बिबीची आणि माझी फारच चांगली मैत्री आहे. ती मला खात्रीनें रुपये देईल. ”

“ पण इंदिरे ! ती त्याची पत्नी फारच द्रव्यलोभी आहे म्हणे ! तिचें तुझ्यापेक्षां आणि नवऱ्यापेक्षां पैशावरच जास्त प्रेम आहे ! ” बापूसाहेब शंकेखोरपणानें म्हणाले.

" पाहूं काय होतें तें; हालच्या कांकणाला कांहीं आरसे नकोत. फक्त एकच दिवस काय तो मध्यें आहे पण—" इंदिरा मध्येंच थांबली, तिचे बोलणारे ओंठ मिटले गेले, आणि ती नुसती बापूसाहेबांकडे पहातच राहिली; पण ते तसें तिला सोडतात थोडेच. ते म्हणाले ' पण ' काय तें मला सांगितलेंच पाहिजे.

इंदिरेनें पुष्कळ आढेवेढे घेऊन हंसत म्हटलें, " आपणाला आतां दोन हजार रुपये मिळणार आणि मी आणणार परंतु ते मिळतील कीं नाहीं, याबद्दल आपणाला संशय वाटत आहे, तेव्हां मी असं म्हणतें ते रुपये जर मी आणूं शकलें तर मला त्यांतून एक हजार रुपये मिळाले पाहिजेत. "

यावर बापूसाहेबांनीं हंसून उत्तर दिलें, " एवढेंच ! पण तूं अर्धे घेऊन काय करणार इंदिरे ? सगळेच घे. जगांत मला स्वतःला असें कांहीं नको. तुला जें वाटेल तें तूं त्या पैशांचें कर. तुझा प्रफुल्लित चेहेरा मला नेहेमीं पहायला मिळाला म्हणजे झालें. माझे या रोगावरचें दिव्य औषध तेंच. मागचे ते सुखाचे दिवस आतां आठवतात का इंदिरे ? त्या वेळीं तुझ्या सेवेला दहावीस दासी होत्या नाहीं का ? माझा हा बिछाना आणि ही खोली त्या वेळीं कशी होतीं बरें ? मनुष्याला विपत्ती आली म्हणजे त्याची स्वतःची काया पालटते; पण आजूबाजूच्या स्थिर-चर पदार्थांवरहि त्याच्या त्या पालटलेल्या कायेच्या छायेचा परिणाम झाल्यावांचून राहत नाहीं ! हाय ! लाडके ! पूर्वींचे ते सुखाचे दिवस आतां कुठें गेले बरें ? ते दिवस पुनः येतील का ? "

इंदिरेनेंहि एक मर्मांतिक दीर्घ निश्वास सोडून म्हटलें, " नको गडे ती आठवण ! त्या आठवणींनेंच आपली ही दशा झाली. दुःखाच्या दिवसांत, गतसुखोपभोगाची आठवण अग्नीच्या ज्वालांपेक्षांहि तीव्र वेदना देणारी असते, तेव्हां नाथ ! भूतकाळाकडची नजर आतां वर्तमानकाळाकडे वळवून आपली स्थिति पाहाणें भाग आहे. आमचें नव्हतें काय ? सगळें होतें आणि पुढेंहि फार चांगलें चाललें असतें; पण आपणच बुद्धिभ्रंश होऊन करूं नये तीं कृत्यें हातानें केलीं; पण आतां काय त्याचें ? झाल्या

गेल्या गोष्टींची क्षमा करणार ईश्वर समर्थ आहे. त्याचेंच नेहमीं स्मरण करीत राहिलें कीं, तोच सर्व दुःखांचें निरसन करील."

---

# प्रकरण ३ रें.



## भयंकर प्रसंग !

आशेच्या आनंदांत एक प्रकारची तीव्र मादकता आहे. असंभवनीय उपायांनींहि कांहीं साध्य होऊन आपलें भाग्य परिवर्तन होईल असें एकाद्या दरिद्री मनुष्यास सांगतांच तो त्याच आनंदांत मग्न होतो व तो उपाय आपण करावयाच्या तजविजीस लागतो. एवंच चुकलेल्याचें मन चोहोंकडे, अशी त्याची स्थिति झालेली असल्यामुळें बुडत्यास जसा काडीचा आधार तसा त्याला तो उपाय वाटतो. ईश्वरानें जर ही आशा उत्पन्न केली नसती तर पुष्कळ दरिद्री लोक हताश होऊन आत्महत्या करते अगर विरक्त होऊन कायमचे तपस्वी बनते यांत संशय नाहीं. बापूसाहेब आणि इंदिरा या दोघांना याच आशेनें सांवरलें आणि आनंदाच्या बातमीची थोडीशी चुणूक दाखवून त्यांचा गेलेला उत्साह परत आणला, व तींहि बिचारी आशेच्या या हुलकावणीला फसली आणि पुढील योजना करण्यांत गढून गेली. असो.

दैनंदिन गतीप्रमाणें तो दिवस, ती रात्र, आणि दुसरा दिवसहि संपला. तिसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं जेवण वगैरे आटोपून साध्वी इंदिरा आपल्या विश्वासू व निमकहलाल नोकराला बरोबर घेऊन बाहेर पडली; पण हकीमसाहेबांच्या अंतर्गृहांत नोकराला नेतां येणार नाहीं असें वाटल्यावरून दासीलाच तिनें बरोबर घेतलें व गोविंदा घरींच राहिला.

बापूसाहेबांच्या घरापासून हकीमसाहेबांचें घर एक मैल होतें पण हा प्रवास बुरख्याच्या गाडींतूनच होत असल्यामुळें इंदिरेला त्याबद्दल श्रम वाटले नाहींत व ती अर्ध घटकेंतच हाकीमाच्या घरीं आली. ती पूर्वी

बरेच वेळां तेथें आलेली असल्यामुळें अंतर्गृहांत जायला तिला फारसे श्रम पडले नाहींत. ती आपल्या दासीसह अगदीं थोड्या वेळांत जनानखान्यांत आली. त्या ठिकाणीं शयनगृहाच्या तोंडाशींच तिला एक दासी भेटली तिला, आपण आल्याचें तुझ्या मालकिणीला कळीव ' असें तिनें सांगितलें व ती दासी निघून जातांच ती आपल्या दासीला म्हणाली, " नर्मदे ! तूं एथेंच राहा; मी चटकन् काम आटोपून येतें. "

थोड्याच वेळांत पूर्वी आंत गेलेली दासी आली व तिनें इंदिरेला ' आपल्या बरोबर येण्याला सांगितलें व ती चालूं लागली. इंदिराहि विश्वासूमनानें व आशापूर्ण हृदयानें तिच्या मागून निघाली. एकामागून एक याप्रमाणें बरींचशीं दालनें ओलांडल्यावर ती दासी एका खोलीपुढें उभी राहिली व इंदिरेला तिनें त्या खोलींत बसायला सांगितलें.

खोलीचें दार उघडेंच होतें. इंदिरा आंत गेली व दासी दुसरीकडे निघून गेली. इंदिरेला वाटलें, ती आपल्या मालकिणीला बोलवायला गेली असेल; पण थोड्याच वेळांत तिचा तो भ्रम दूर झाला व बिबीसाहेबांऐवजीं हकीमसाहेबच झकपक पोषाख करून हंसत हंसत आंत आले. इंदिरेला भीति वाटली इतकेंच नव्हे तर तिला दुसरीच एक बिलक्षण शंका आली, पण तिनें आत्मसंयमन करून मनाला आंवरलें व ती मर्यादेनें डोकीवर पदर घेऊन उभी राहिली.

हकीमसाहेब मिष्ट स्वरानें बोलूं लागले, " आपण उभ्या कां इंदिराबाईसाहेब ! बसा, कांहीं विशेष कारणामुळें माझें आज सुलतानपुरला जाणें झालें नाहीं, व सासरा फारच आजारी असल्यामुळें आमच्या बिबीसाहेबहि आतांच माहेरीं गेल्या आहेत. त्या तिकडून आणखी दोन दिवस तरी येणार नाहींत. तुम्हांला शब्द दिल्यामुळें मला आज घरीं राहाणें भाग पडलें. कारण आपली खेप निष्कारण व व्यर्थ होऊं नये, हा माझा हेतु. आपणाला आश्चर्य अगर कसलीहि शंका वाटण्याचें कारण नाहीं. आपला योग्य मान ठेवण्यांत माझ्याकडून कसूर होणार नाहीं. "

कांहीं तरी उत्तर दिलें पाहिजे असें पाहून इंदिरेनें उसनें अवसान आणून मृदु स्वरानें म्हटलें, " आपल्या या दक्षतेबद्दल व कृतज्ञतेबद्दल आम्हीं दोघेंहि आपले आभार मानतों. साहेबांना बरें वाटत नाहीं

व त्यांना नेहेमीं दुसऱ्या मनुष्याची गरज लागते हें तुम्हांला माहीतच आहे. अर्थात मला लवकर गेलें पाहिजे जास्त वेळ इथें थांबतां येणार नाहीं. "

यावर हकीमसाहेब हास्यपूर्ण स्वरानें म्हणाले, " माझ्या एकुलत्या एका मित्राच्या पत्नीचे पुण्यपाय माझ्या या गरिबाच्या झोंपडीला लागल्यामुळें मला आज धन्यता वाटत आहे. माझ्या सामर्थ्यानुरूप मी आपला आदरसत्कार करायला मुळींच कमी करणार नाहीं. "

हकीमसाहेब इंदिरेच्या घरीं वारंवार जात असत त्यामुळें इंदिरेशीं जास्त बोलण्याला त्यांना बिलकुल संकोच वाटत नव्हता. इंदिराहि एकबार विषमज्वरानें भयंकर आजारी असतांना याच हकीमसाहेबांनीं औषध देऊन तिला बरें केलें होतें. त्यामुळें इंदिरेला हकीमसाहेब घरगुती मनुष्याप्रमाणें वाटत असत; पण आपल्या नवऱ्यासमोर ती हकीमसाहेबांशीं बोलत असे व तेथें ती आपल्या घरांत असे पण आतां ती एकटी परक्याच्या घरीं होती. अर्थात् या ठिकाणीं हकीमसाहेबांशीं जास्त वेळ बोलत उभें राहणें तिला प्रशस्त वाटलें नाहीं. ती मृदु स्वरानें म्हणाली, " आम्हांसर्वांवर आपली अत्यंत कृपा आहे आणि सर्वांशीं आपण प्रेमळपणानें वागतां, हें मला माहित आहे. मी आपल्या एका सावकार मित्राची पत्नी आहें. अर्थात आपल्याशीं मला संकोचानें वागण्याचें कारण नाहीं. तसेंच माझा विशेष आदरसत्कार करण्याचेंहि कारण नाहीं. माझी कार्याकडे व घराकडे विशेष नजर आहे. चटकन् तेवढे रुपये मोजून द्या म्हणजे मी घरीं जातें. साहेबांचें पथ्याचें वगैरे करायचें आहे, आणि मी गेल्यावांचून कांहीं होणार नाहीं. "

हकीमसाहेबांचें बोलणें चालणें व एकंदर हावभाव पाहून इंदिरेला त्यांचा एकप्रकारचा तिटकारा येत चालला होता. शिवाय आपल्या आजपर्यंतच्या सबंध आयुष्यांत ती परकी पुरुषाशीं इतका वेळपर्यंत अशा प्रकारें बोलत कधींच उभी राहिली नव्हती. अर्थात या वेळीं, ' एकदां आपण इथून केव्हां जातों ' असें तिला होणें साहाजिक होतें.

इंदिरेचें बोलणें ऐकतांच हकीमसाहेबांनीं पेटी उघडली आणि त्यांतून हजार हजार रुपयांच्या तीन थैल्या काढून बाहेर ठेवल्यावर त्यांच्या-

कडे बोट दाखवून ते इंदिरेला म्हणाले, " मी आपल्या नवऱ्याकडून अर्थात् बापूसाहेबांकडून केवळ दोनचार हजार रुपये घेतले होते; पण आपल्यासारख्या सुकुमार सौंदर्यलतिकेनें इथपर्यंत येण्याची तसदी घेतल्यावरून मी आणखी एक हजार रुपये केवळ आपल्या सन्मानासाठीं देत आहें. "

इंदिरेला हा बाष्कळपणा आवडला नाहीं. ती असहिष्णुपणानें म्हणाली, " अं हं ! तें कांहीं नाहीं. आमचे यावयाचे आहेत तेवढेच रुपये द्या. ज्यास्त रुपये घेण्याचा अधिकार मला नाहीं. मला आतां लवकर जाऊं द्या कशी "

हकीमसाहेब आतां अधीर झाले. त्यांचें आत्मसंयमन लटपटलें. ते इंदिरेजवळ येऊन तिच्याकडे आसक्तदृष्टीनें पाहात म्हणाले, " इंदिरे ! सौंदर्यवती स्त्रियांचें हृदय फुलाप्रमाणें मृदु आणि कोमल असल्याचें मी ऐकलें आहे. तेव्हां माझ्यावर तूं निष्ठुर होऊं नको. कृपा कर. तुझें हें परीसारखें सौंदर्य पाहून व बुलबुल पक्षाप्रमाणें भाषण ऐकून आज पुष्कळ दिवस मी अशा एकांतांत तुझ्याशीं बोलण्याच्या संधीची वाट पहात होतों. तूं नेहमीं माझ्याजवळ असावेंस असें मला वाटत होतें; पण तशी वेळ अद्याप मिळाली नाहीं. तहानेनें व्याकूळ होऊन मी भरून चाललेल्या नदी तीरीं उभा आहें, पण मला त्या पाण्याचा एक बिंदुहि मिळत नाहीं. तहानेनें तडफडून मरत आहें. तोंड उघडून बोलवत नाहीं आणि बोलल्यावांचून हृदयाला होत असलेल्या वेदनांचा उपशम होणें शक्य नाहीं. तुझ्या या कुसुमकोमल हाताला स्पर्श करण्याची मला परवानगी दे. तूं हा आपला तोंडावरचा बुरखा काढ. मेघाआड लपलेला चंद्र बाहेर पडूं दे. तुम्हां हिंदुना बुरख्याचें कारण नाहीं. आम्हीच तो वापरावा. तुझ्या मुखचंद्राच्या प्रकाशानें माझी ही खोली उज्ज्वल होऊं दे. तुझ्या या अनुग्रहाबद्दल एक हजारसे काय, पण दहा हजार रुपयांचे तोडे मी आतां मोजून ठेवतों. पण एकवार माझ्यावर कृपा कर. "

इंदिरेच्या तोंडाकडे पहातांच हकीमसाहेब दचकले व थांबले. त्यांना पुढें बोलवेना. कारण इंदिरा या वेळीं वाघिणी सारखी खवळली होती. तिचा चेहरा लाल बुंद झाला असून नेत्रांतून जणूं काय अग्नीच्या ठिण-

ग्याच बाहेर पडत होत्या. कांहीं वेळ तिच्या तोंडून शब्दच उमटेना; पण थोड्याच वेळांत ती कांहीं दूर सरून बोलूं लागली, " हकीम ! तुला आणि तुझ्या त्या घाणेरड्या वाचेला धिक्कार असो. तुझ्या सारख्याला मुका केलें नाहीं, ही ईश्वरानें मोठीच चूक केली. तुझ्या तोंडून हे शब्द बाहेर निघालें तरी कसे ? मला तूं ओळखलीस काय ? मी कोण काय याचा तूं विचार केलास काय ? मी एक कुलस्त्री असून तुझ्या मित्राची पत्नी आहें हें तूं विसरलास काय ? अशा प्रकारचें कृष्णकारस्थान रचून माझा असा अपमान करण्यापूर्वीं तूं आपल्या सदसद्विवेकबुद्धीला एक तरी प्रश्न विचारला होतास का ? आज तुझी पत्नी येथें असती तर तूं अशा तऱ्हेचें वर्तन माझ्याशीं केलें नसतेंस. कारण ती फारच चांगली आणि सत्कुलोत्पन्न असून सारासार विचार म्हणजे काय हें तिला चांगलें समजतें—"

हकीमसाहेब सांवरले. त्यांनीं आपल्या मनाला धीर दिला आणि ते निर्लज्ज्यासारखे हंसत हंसत तिच्याकडे पहात मध्येंच म्हणाले, "वाः इंदिरे ! या वेळीं तूं किती सुंदर दिसत आहेस ? तुझ्या या सौंदर्याला कशाचीच उपमा देतां येणें शक्य नाहीं. तें अगदीं निरुपम प्रेम आहे. तूं जसजशी क्रुद्ध होत आहेस तस तशी तुझी रूपकांती वाढत आहे ! अहाहा !! खुदानें तुला किती सुंदर बनविलें आहे !!! असलें हें अप्रतिम सौंदर्य तूं त्या कायमच्या रोगी होऊन मरणाच्या पंथास लागलेल्या भिकारड्या बापूसाहेबास कशाला बरें अर्पण करतेस ? सुंदरी, तुला भिण्याचें कारण नाहीं माझ्या मनांत बरेच दिवस असलेली गोष्ट अशा तऱ्हेच्या कौशल्यानें मीं तडीस नेली. तुझ्यासाठींच मी माझ्या बायकोला माहेरीं पाठविलें. अहाहा ! ही एकांत वेळ आणि हें सौंदर्य मी व्यर्थ घालवीन असें का वाटतें तुला इंदिरे ? नाहीं. इतक्या खटपटीनें मिळविलेली ही संधी मी केव्हांहि व्यर्थ घालविणार नाहीं. "

हें त्याचें निर्वाणीचें आणि मदांधपणाचें भाषण ऐकून ' आपण मोठ्याच संकटांत सांपडलों ' असें इंदिरेला वाटलें. मनुष्य आपलें मनुष्यत्व विसरून पशु बनला म्हणजे त्याला उपदेश करून अगर रागावून ताळ्यावर आणणें हें काम बरेंच जोखमीचें असतें. इंदिरेनें हें जाणलें

आणि आपण आतां ' ठकास महाठक ' बनून तरी कांहीं उपयोग होतो का पहावें, असाहि तिनें विचार केला; व ती मनांत आलेल्या नवीन विचाराच्या धोरणानें आपलें शब्दजाल विणूं लागली. प्रसंगच मनुष्याला बुद्धि सुचवितो. नाहीं तर साध्याभोळ्या व अननुभवी इंदिरेला हे डावपेंच कुठून सुचायचे ? अस्तु. ती गंभीरपणाचा उसना आव आणून मृदु-स्वरानें म्हणाली, " हकीमसाहेब ! चिकित्सा करून रोग्याचा रोग घालविणें अथवा त्याचें निदान करणें या गोष्टी सोप्या असतात; पण असल्या प्रेमविषयक गोष्टींचा निकाल इतक्या घाईनें व तडकाफडकी लावतां येणें अशक्य असतें. या देहाचे मालक अद्याप जिवंत आहेत ! मला इथें थोडासा ज्यास्त वेळ लागतांच त्यांच्या मनांत विपरीत संशय येण्याला मुळींच वेळ लागणार नाहीं. तसेंच दुसरें; स्वरूपाची निशा आणि खरें प्रेम यांत जमीन अस्मानाचा फरक आहे. आज माझें हें सौंदर्य पाहून तुम्हीं माझे सेवक बनायलाहि तयार व्हाल; पण हें नश्वर सौंदर्य कायमचें टिकणारें नव्हे. ही विजेची चमक आहे. क्षणभरच तिचें अस्तित्व. ती कायमची राहाणारी नाहीं. तेव्हां तुमचें माझ्या सौंदर्यावर जडलेलें प्रेम सौंदर्याच्या विनाशाबरोबर विलयाला जावयाचें. शिवाय आज माझ्या जीवन सर्वस्व असलेल्या प्रियकराची, जी स्थिति आहे, त्यावरून पाहतां त्याचें या जगांतील अस्तित्व किती आहे, हें तुमच्या सारख्या तज्ज्ञाला मी सांगितलें पाहिजे असें नाहीं. तेव्हां होऊं नये तें झालें, आणि जर आकाशाची कुऱ्हाड कोसळली—तर—तर—तर हकीम साहेब तुमच्या बोलण्याचा मी—" पुढें इंदिरेच्यानें बोलवेना. तिचा गळा भरून आला. आणि तिनें पदरानें आपले डोळे पुसले. भावी कल्पनेनेंच तिचें हृदय थरारलें. ती अत्यंत शोकाकूल झाली.

हकीमसाहेब मोठे चतुर माणूस होते, आणि त्यांचें हृदयहि अत्यंत कठोर व निर्ढावलेलें होतें. ' इंदिरा आपणाला फसवून निसटून जाऊं पहात आहे ' हें त्यांनीं चट्कन् ओळखलें. तिच्या या लांब लचक व्याख्यानानें आपण पुष्कळ आयासानें मिळविलेल्या या सोन्यासारख्या वेळेची माती होऊन जात आहे असें त्यांना वाटलें व ते अगदीं अधिरतेनें पुढें सरकत सरकत म्हणाले, " इंदिरे ! या हकिमानें, अनेक मृत

मनुष्यांना काळाच्या भयंकर जबड्यांतून सोडविलें आहे, तसेंच अनेकांना त्यानें हंसत हंसत काळाच्या विक्राळ दाढेंत फेंकूनहि दिलें आहे. तुझ्या नवऱ्याकडून मीं आणलेले रुपये परत द्यावे असा माझा केव्हांहि हेतु नव्हता व नाहीं, हें तूं खात्रीपूर्वक समज. या वेळीं केवळ माझ्या इच्छा-तृतीसाठीं म्हणूनच मी तुला हजार रुपये द्यायला तयार झालों आहें ही वेळ गेली, कीं, माझ्याकडून तुला एक कवडीसुद्धां मिळणार नाहीं. तुझ्या नवऱ्याला भयंकर क्षयाचें दुखणें जडलें असून तो आणखी केवळ कांहीं आठवड्यांचा सोबती आहे. तसेंच तो आज भिकारी व कर्जबाजारी अस-ल्यामुळें त्याच्या मरणानंतर तुला भिक्षाच मागावी लागेल. मला वाटलें तर मी त्याला एकदोन घटकांतही या जगांतून नाहींसा करूं शकेन. आणि तसें झालें म्हणजे तूं भयंकर दारिद्र्यानें, असहाय्य व दीन होऊन रस्तो-रस्तीं भटकूं लागशील. त्यांत तुझ्या जातीची तर इथें कोणीच मंडळी नाहीं. अशा वेळीं तूं खात्रीनें माझ्याच दारीं येशील आणि मग—पण नको, त्यापेक्षां तूं माझी विनंति आतांच मान्य कर. ही वेळ आहे. तूं सामोपचारानें न ऐकशील तर मला नाइलाजानें—"

पण याच वेळीं अकस्मात् त्या खोलीचें दार उघडून दोन स्त्रिया एकदम आंत आल्या. या स्त्रियांपैकीं एक, हकीमसाहेबांची पत्नी असून दुसरी इंदिरेची दासी नर्मदा होती. नर्मदेनें एकवार इंदिरेकडे पाहिलें व ती कळवळ्यानें हकीमसाहेबांच्या पत्नीला म्हणाली, "बिबीसाहेब! पाहिलेंत का आपल्या स्वामींचं कृत्य!! एका कुलस्त्रीला कपटजालानें बांधून आणून तिचा असा अपमान करणें व त्रास देणें योग्य का? मी प्रथमपासूनच दरवाजाच्या बाहेर उभी राहून हा सगळा प्रकार पहात होतें. सुदैवानें तुमचें माहेर याच बाजूला असून तें मला माहीत असल्या-मुळें तुम्हांला मी ही बातमी योग्य वेळीं देऊं शकलें. नाहीं तर त्या बिचाऱ्या माउलीची काय बरें स्थिति झाली असती? मीं सगळी हकीकत तुम्हांला सांगितलीच आहे, आणि तुम्हीं खानदानीच्या घराण्यांतल्या असून अन्तःकरणानेंहि कनवाळू आहां. तसेंच तुमचे हे पातिराज हकीम असल्यामुळें विश्वासानें प्रत्येक मनुष्य यांना आपल्या अन्तर्गृहांत नेतो, पण माझ्या सारख्या एकाद्या फटकळ तोंडाच्या बायकोमाणस जर

ही हकीगत जाहीर केली तर यांची ही हकिमी चालेल का ? तुम्हींच विचार करा ! ! ”

नर्मदा फारच हुशार दासी असून तिनें जगांत अनेक पावसाळे घालविले होते. व तोंडाचीहि ती बरीच उदार होती. आपल्या धनिनीचा झालेला अपमान तिला बिलकुल खपला नाहीं, आणि त्या रागाच्या भरांत ती जें तोंडाला येईल तें बोलली; पण बिबीसाहेबांच्या कोमल अन्तःकरणावर त्याचा चांगलाच परिणाम झाला. आणि त्यामुळें या प्रसंगांतून इंदिरा सुटली.

एकादी कितीहि चांगली पत्नी असो, ती आपल्या पतीच्या सगळ्या अपराधाची क्षमा करील, पण दुसऱ्या स्त्रीवर आपल्या पतीची नजर आहे हें समजतांच ती खवळते. इथेंहि तसेंच झालें. शिवाय हकीम साहेबांच्या पत्नीला इंदिरेच्या केविलवाण्या स्थितीचीहि कींव आली. नर्मदेचें बोलणें ऐकून आपल्या नवऱ्याचा तिला राग आला असल्यामुळें ती क्रुद्ध स्वरानेंच हकीमसाहेबांना उद्देशून बोलूं लागली, “ या साठींच कांहीं तरी कारण लढवून मला आपण माहेरीं पाठविलें काय ? ”

“जिचें स्वरूप पाहून आपण आंधळे बनलां ती एक कुलस्त्री व प्रसंगीं आपल्या, उपयोगीं पडलेल्या मित्राची पत्नी आहे हें आपण विसरलां काय ! ज्या मित्राचे तुम्ही ऋणी आहां, त्याच्याच साध्वी स्त्रीशीं तुम्हीं असें वर्तन ठेवतां काय ? मग आपल्यांत आणि पशूंत भेद आहे असें मानणें चुकीचें नाहीं का होणार ? जर या साध्वीनें या संबंधानें येथील काजीकडे फिर्याद केली तर आपली अब्रू चव्हाट्यावर येऊन आपणाला आपल्या धंद्याला मुकावें लागणार नाहीं काय ? क्षणाच्या सुखासाठीं दुसऱ्याच्या व आपल्या जन्माची माती करून टाकण्यांत तुम्हां पुरुषांनां कसला पुरुषार्थ वाटतो बरें ! बायका बेअकली आणि तुम्हीं अक्कलवान्, ते अशाच कृत्यांत वाटतें ! छी. छी. किती बरें ही लाजिरवाणी आणि कमीपणा आणणारी गोष्ट आपण आज केली ? ”

लाथेनें झिडकारलेला कुत्रा ज्याप्रमाणें गुरगुरत तेथून जातो त्याप्रमाणें हकीमसाहेब आपल्या पत्नीच्या वाग्बाणांनीं विद्ध होऊ तेथून बाहेर निघून

गेले. कारण आपल्या पत्नीला ते नेहेमींच वचकून असत, आणि आज तर ते अपराधी, मग काय विचारतां !

ते निघून गेल्यानंतर त्यांच्या पत्नीनें इंदिरेचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले व मृदु स्वरानें म्हटलें, " इंदिराबाई ! तुम्हांला फारच त्रास झाला, पण थोड्यांत निभावलें एवढ्यांतच सुख माना. आतां झालेल्या प्रकाराबद्दल खंती बाळगू नका. आतां मी तुम्हांला इथें जास्त वेळ बसवून घेत नाहीं कारण नर्मदेच्या सांगण्यावरून बापूसाहेबांची स्थिति फारच काठिण आहे असें वाटतें. रुपयांसंबंधानें तुह्मीं आतां निश्चिंत राहा. ते स्वतः आपल्या हातानें तुमचे रुपये तुमच्या घरीं आणून पोंचवितील अशी मी व्यवस्था करतें. "

इंदिरा जास्त काय बोलणार ! तिनें योग्य वेळीं केलेल्या मदतीबद्दल बिबिसाहेबांचे आभार मानले व नर्मदेला घेऊन ती त्या वाड्यांतून बाहेर पडली. रस्त्यावर आल्यानंतर तिला थोडेसें समाधान वाटलें व तिनें एक दीर्घ सुस्काराहि सोडला. झालेल्या प्रकाराबद्दल तिला वाईट वाटत होतेंच. रस्त्यावर उभ्या असलेल्या घुरख्याच्या गाडींत दोघींहि बसल्यानंतर कांहीं वेळानें इंदिरा नर्मदेला म्हणाली, " नर्मदे, खरोखर आज तूं होतीस म्हणूनच मी निभावलें. या विपत्तीच्या दिवसांत सर्वांनीं आम्हांला सोडलें; पण तुमची दोघांची आमच्यावर फारच माया असल्यामुळें कांहीं पगार न घेतां अर्धपोटी तर कधीं उपाशीं राहूनहि आमच्या उपयोगीं पडत आहां. नर्मदे, तूं माझी दासी नसून आईच आहेस असें मला वाटतें. आज तूं नसतीस तर माझी कायग दशा झाली असती ! ! नको ती आठवण ! नर्मदे इतकें केलंस तसं आणखी एक काम कर अशी माझी तुला विनंति आहे. "

नर्मदा कळवळून म्हणाली, " छे, छे बाईसाहेब ! असं काय बर. आपल्या हुकुमाची मी ताबेदार. आपण काय तो हुकूम करावा. विनंति कसली ? काय हुकूम आहे ? "

" आतां जो प्रकार झाला, त्यापैकीं एक अक्षरहि तिकडे समजतां नये. हें ठक्षांत ठेव बरं ! "

नर्मदेनें आश्चर्यानें म्हटलें, " वा: इतकी का आपण मला वेडी समजतां ? हें आपण मलां सांगायलाच नको होतं! मी जर इतकी निर्बुद्ध असतें–"

इंदिरेनें तिच्या तोंडावर हात ठेवून म्हटलें, "तसं नव्हे ग. मीं म्हटलें तूं वेडी नाहीस ! म्हणूनच तर मी आज एका भयंकर प्रसंगांतून निभावलें. तिकडची तब्यत सध्यां किती नाजूक झाली आहे, हें तूं जाणतच आहेस. त्यांतच त्यांना जर ही हकीगत समजली तर आधींच असलेली उदासीनता जास्त वाढणार नाहीं का ? कदाचित् त्यांच्या प्रकृतीवरहि परिणाम व्हावयाचा ! "

" हो तें तर खरेंच. माझी परीक्षा तर पहा बाईसाहेब ! ! मी यांतलं एक अक्षरहि त्यांना कळवीत नाहीं, तरी पण झालेला प्रकार इतक्यावरच सोंपाविणं मला बरं वाटत नाहीं. निदान मला तरी अगदीं चैन पडणार नाहीं. "

" आणि चैन पडेल कुणाला ? पण करणार काय ? आम्ही पडलों बायकामाणसं, त्यांतून हिंदु ! मग आमचं ऐकणार कोण ?

" या हकिमाला चांगले चाबकाचे फटके देववून याच्याकडून येणें असलेले पैसे वसूल केले पाहिजेत ' बायका माणसं ' ' बायका माणसं ' म्हणून रडगाणें गाण्यांत अर्थ नाहीं. बायकाहि कांहीं कांहीं अचाट कृत्यें करूं शकतात हें बाईसाहेबांना माहित नाहीं वाटतें. "

" आहे माहीत सगळं मला समजतं; पण तूं या वेळीं काय करावें म्हणतेस ? "

" काय करावें याचाच विचार करावयाचा. या नीच माणसाला असा सोडतां नये. कारण तसें केल्यास अशीं नीच कृत्यें करण्याला त्याला उत्तेजन दिल्यासारखेंच होईल. शिवाय जें करावयाचें तें याच वेळीं झाले पाहिजे, म्हणजे एका धोंड्यानेंच दोन फळें पाडतां येतील. "

" असल्या गूढ भाषेंत बोलूं नको. काय करावें म्हणतेस तें स्पष्ट तरी बोल. गप्प बसूं नकोस ! "

" बाईसाहेब ! गूढ काय उघड असावयाचें ! तुम्हीं आतां अशाच्या अशाच काजीकडे चला.त्याचें घर येथें जवळ आहे.येथील काजी अगदीं निस्पृह असून तो कुणाचीहि भीडभाड ठेवणार नाहीं.हकिमानें केलेल्या गुन्ह्याची दाद

मागणें हें आपलें कर्तव्य आहे. अर्थात या काजीला आपण झालेली हकीकत सांगावी म्हणजे सर्व कांहीं रीतसर होऊन अपराध्याला योग्य शिक्षा होईल. हें समोर जें दुमली घर दिसतें हेंच काजीचें. तो मोठा दयाळू, हुषार आणि जबाबदारीनें काम पहाणारा असा असल्याबद्दल त्याची प्रसिद्धि आहे. या काजीच्या घरांतील मुख्य दासीशीं माझा चांगलाच परिचय असल्यामुळें ती चट्कन् काजीची भेट करवून देईल. " नर्मदा आपलें लांबलचक बोलणें संपवून इंदिरेकडे पाहूं लागली.

नर्मदेचें बोलणें थांबल्यावर इंदिरा बराच वेळपर्यंत विचारांत गढून गेलेली दिसत होती; पण नंतर किंचित् हास्य करून ती उद्विग्नतेनें म्हणाली, " नर्मदे ! खरंच, सौंदर्य हें संकटांत लोटणारें आहे, तेव्हां मला आतां कुठेंहि जाण्याचें धाडस करवत नाहीं. आपला काल फिरलेला आहे अर्थात जावें तिकडे संकटेंच असायचीं ! '

यावर नर्मदा गंभीर स्वरानें म्हणाली, "काजीसाहेब हे स्वतः धर्मशील असून निस्पृह न्यायाधीश आहेत, तसेंच ते वयानेंहि प्रौढ आहेत, तेव्हां ते आपलें सौंदर्य पाहून केव्हांहि चंचल होणार नाहींत. शिवाय सर्वच पुरुष कांहीं हकिमासारखे नसतात. बाईसाहेब, तुम्हीं नसते संशय घेऊन या बाबतींत माघार घेऊं नका. अपराध्याला योग्य शासन हें झालेंच पाहिजे. या चौकशींत हकिमाकडे येणारा पैसाहि वसूल करून घेतां येईल. "

" पण असं केल्यानें घरीं जायला फार उशीर होईल, आणि तसा उशीर झालेला लक्षांत येतांच तिकडून काळजी करायचं होईल, " इंदिरा दीर्घ निश्वास सोडून म्हणाली.

" त्याची काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण मी त्या काजीच्या घरच्या दासीला चांगलीच ओळखतें. आह्मी तेथें गेलों म्हणजे तेथून तिच्या मार्फत धनीसाहेबांना असा निरोप पाठवूं कीं, हकिमानें सामोपचारानें रुपये न दिल्यामुळें आम्ही काजीला सगळी हकीगत सांगण्यासाठीं त्यांच्या घरीं जात आहों. ' आणि हा निरोप त्यांना पोंचला कीं उशिराबद्दल ते काळजीहि करणार नाहींत व रागावणारहि नाहींत. इतकेंच नव्हे, तर बाईसाहेबांच्या हुषारीचें ते कौतुकच करतील. शिवाय आपल्यावर

त्यांचें अत्यंत प्रेमहि आहे. काजीसाहेबांबद्दलहि त्यांची विलक्षण पूज्यबुद्धि आहे अर्थात त्यांच्या घरीं जाण्यामुळें तर त्यांना मुळींच राग येणार नाहीं."

इंदिरेलाहि कीं, आपल्या अपमानाचा सूड घेतला पाहिजे. असेंच वाटत होतें अर्थात् नर्मदेच्या या प्रोत्साहनानें तिची ती इच्छा जास्तच प्रबल झाली. ती उत्तेजित स्वरानें म्हणाली, "तर मग तसेंच करूं या; पण काजीची भेट घेण्यापूर्वी त्या दासीच्या मार्फत घरीं निरोप पाठविण्याची मात्र तजवीज कर. विसरूं नको."

नर्मदेनेंहि 'होय' म्हणून सांगितलें. थोड्याच वेळांत काजीसाहेबांचा वाडा नजीक आला. लागलीच नर्मदेनें गाडीवाल्याला मोठ्या दरवाजांतून गाडी आंत नेण्याला सुचविलें. देवडीवरील पहारेकऱ्यांनींहि गाडी बुरख्याची असल्यामुळें अडविली नाहीं, कारण जनानखान्यांतील कारस्थान शोधून काढण्यात काजीसाहेब फारच कुशल असल्याबद्दल त्यांची ख्याती होती. शिवाय अशा बुरख्याच्या गाड्या नेहमींच काजीसाहेबांकडे येण्याचा परिपाठ होता.

काजीसाहेबांच्या वाड्यासमोरच पुढील मार्गी एका कंपौंडांत त्यांची अदालत असल्यामुळें त्यांना घराबाहेर पडण्याचा प्रसंग क्वचितच येत असे. अदालत व घर यांच्यासमोर अत्यंत शोभिवंत अशी फुलबाग असून त्यांत ठिकठिकाणीं मनोहर कारंजीं उभारलेलीं होतीं.

जनान्याच्या गाड्या थांबण्याच्या जागीं इंदिरेची गाडी उभी राहिल्यावर दोघीहि खालीं उतरल्या आणि अंतःपुरच्या परिचित मार्गानें आंत गेल्या. जनानखान्यांत जाण्याला बायकांना केव्हांहि परवानगी नसेच, अर्थात त्या ठिकाणींहि त्यांना कोणी अडविलें नाहीं; महालांत जाण्याच्या दरवाजांतच सुदैवानें नर्मदेला तिची ओळखीची दासी भेटली. लागलीच नर्मदेनें तिला सांगितलें:—

"तुमच्या येथील एका नोकराला आमच्या घरीं पाठविला पाहिजे. कारण आमच्या धनीसाहेबांना समजलें पाहिजे कीं, 'आम्हांला यायला थोडा उशीर होईल.' नाहीं तर ते निष्कारण काळजी करीत बसतील." लागलीच एका नोकराकरवीं योग्य तो निरोप बापूसाहेबांना पाठविण्यांत

आला. नंतर नर्मदा त्या दासीला म्हणाली ' जुलेखे ! तुझे धनीसाहेब कुठें आहेत. '

" कां ? त्यांच्याकडे तुमचें काय काम आहे ? "

" या आमच्या बाईसाहेब आहेत हें तू जाणतच आहेस.यांचा एका दुष्ट व नीच वृत्तीच्या मनुष्यानें करूं नये तो अपराध केलेला असल्यामूळें त्या, मनुष्यावर काजीसाहेबांकडे, फिर्याद करणार आहेत. "

" पण या वेळीं ते विश्रांती घेत असतात; यावेळीं अदालतीचें काम ते मुळींच पहात नाहींत. तुम्हीं आणखी कांहीं वेळानें आलां असतां म्हणजे बरें झालें असतें. "

" तें खरं ग; पण आम्हांला कांहीं उघड्या अदालतींत फिर्याद मांडावयाची नसून गुप्तपणानेंच सांगावयाची आहे. कारण मोठ्या लोकांच्या बायकांना अशा तऱ्हेनें उघड चवकशी होणें अपमानकारक वाटतें, हें तुला माहीत नाहीं का ? " नर्मदेनें आपल्या मैत्रिणीची समजूत केली.

" बरं आतां मी समजलें. साहेब या वेळीं आपल्या दिवाणखान्यांतच बसले आहेत. मी त्यांना तुम्हीं आल्याची बातमी देतें. पाहूं काय उत्तर मिळतें तें. "

ती दासी निघून गेल्यानंतर इंदिरा, नर्मदेला म्हणाली. " काजीसाहेबांनीं जर ' आतां आपली भेट घेतां येत नाहीं ' म्हणून सांगितलें तर इथें न थांबतां आपण घरींच जाऊं-- "

पण तिचें बोलणें संपतें न संपतें तोंच गेलेली दासी परत आली व उल्हासपूर्ण स्वरानें म्हणाली, " बाईसाहेब ! चला. काजीसाहेब आपला अर्ज ऐकून घ्यायला तयार आहेत. "

झालें इंदिरेला आंत जाणेंच भाग होतें, व ती निघालीहि. नर्मदा तिच्या मागोमाग जात होती; पण तिच्या त्या ओळखीच्या दासीनें तिला म्हटलें, " अं हं तूं जाऊं नको. या वेळीं ते कुणाचीहि भेट घेत नसतात; पण बापूसाहेबांच्या पत्नीची, म्हणूनच त्यानीं भेट घेण्याची कबूली दिली. तूं तेथें गेल्यास त्यांना राग येईल. बाईसाहेब जाऊन येईपर्यंत आपण दोघीहि येथेंच बोलत बसूं. "

अर्थातच नर्मदेला आपल्या मालकिणीबरोबर जातां आलें नाहीं. इंदिरेला एकट्यानें जाण्याची भीती वाटूं लागली; पण नर्मदेनें पुन्हां एक-वार तिची समजूत घातली, व नंतर इंदिरा अगदीं नाखुषीनें काजीसाहेबांच्या दिवाणखान्याकडे निघाली. तिचें धडधडणारें हृदय तिनें आपल्या दोन्हीं हातांनीं दाबून धरलें व ती हळू हळू त्या मार्गदर्शक दासीबरोबर दिवाणखान्याच्या दरवाजाशीं आली.

## प्रकरण ४ थें.



### नर्मदेची सूचना.

आंत येण्याची सूचना मिळतांच इंदिरेनें भीत भीत आंत पाऊल टाकलें तेथील पद्धतीप्रमाणें तिचा चेहेरा झांकलेलाच होता; तरी पण तिनें एकवार सगळ्या दिवाणखान्याभर नजर फिरविली. शहरांतील मुख्य न्यायाधिशाची जागा ज्याप्रमाणें शृंगारलेली असावयाची त्याप्रमाणेंच होती, व काजीसाहेबांची उच्च पदवी आणि ऐश्वर्य यांचा परिचय एवढ्यावरच होण्यासारखा होता. आपल्या पातळ बुरख्यांतून तिनें एकवार उच्चासनावर बसलेल्या काजीसाहेबांकडे पाहिलें आणि तिनें तेथील रिवाजाप्रमाणें अदबीनें लवून त्यांना सलाम करून म्हटलें, " धर्मावतार, ईश्वर आपलें कल्याण करो. मज गरीबाचा अर्ज ऐकून घेण्याची कृपा करावी. "

काजीसाहेबांनीं तिच्या त्या सलामाचा स्वीकार करून एका कोचाकडे बोट दाखविलें आणि प्रशांत स्वरांत म्हटलें, " बाई ! तुम्हीं त्या कोचावर बसा. मी तुमची सगळी हकीकत ऐकून घेतों. "

काजीचा तो प्रेमळ व शांत स्वर ऐकून इंदिरेची बरीचशी भीती कमी झाली. कारण काजीसाहेब म्हणजे कोणी तरी भयंकर मनुष्य असावा असें तिला वाटत होतें, आणि त्यामुळेंच ती प्रथमपासून फार भीत होती; पण काजी म्हणजे खरोखरच धर्मावतार आहे अशी तिची खात्री होतांच ती कांहींशी पुढें झाली आणि पुन्हां काजीसाहेबांसमोर आपलें मस्तक नमवून म्हणाली, " गोस्ताकीची माफी असावी. आपल्यासारख्या महामान्य

पुरुषासमोर कोचावर बसण्याची संवय नाहीं. मी उभीराहूनच माझी हकीगत सांगेन. ”

या वेळीं काजीसाहेबांचें धूम्रपान चाललें होतें आणि इस्तंबूली तंबाखूच्या सुगंधी धुरानें तो दिवाणखाना दरवळून गेला होता.

कांहीं वेळानें हातांतील नळी बाजूला करून ते गंभीर स्वरानें म्हणाले, “ बाई, तुम्हांला व बापूसाहेबांना जरी मीं कधीं प्रत्यक्ष पाहिलें नाहीं तरी नांवानें ओळखतों. आणि म्हणूनच मला भेटण्याची,अशा अवेळींहि मीं तुला परवानगी दिली. सांग, तुझी जी कांहीं हकीगत सांगावयाची असेल ती मनमोकळें करून सांग. कायद्याप्रमाणें करावयाचें म्हणजे तुझा अर्ज ऐकून घेण्याची ही वेळ नव्हे; पण खासगी मित्रत्वाच्या नात्यानें व तुम्हां स्त्रियांचा पडदानशीनपणा लक्षांत घेऊन तुझी हकीगत येथेंच ऐकून घ्यायला मी तयार आहें. ”

यावर इंदिरेनें उत्तर दिलें, “ या शहरांत हाफीज या नांवाचा एक हकीम आहे–”

महाप्रतापान्वित धर्मावतार व साक्षात् कालस्वरूप अशा या काजीसाहेबांना, एक फार वाईट खोड होती. दुसरा कोणी आपली हकीगत सांगू लागला कीं मध्येंच ते ‘ मग पुढें ! ’ असा प्रश्न करीत असत. यावेळींहि तसेंच इंदिरेनें बोलायला सुरवात करतांच त्यांनीं, ‘मग पुढें ? ’ असा प्रश्न केलाच.

इंदिरा पुढें बोलूं लागली, “ ज्या वेळीं आम्हांला काळ अनुकूल होता, आमची चलती होती, त्यावेळीं हे हकीमसाहेब मित्रत्वाच्या नात्यानें आमच्या घरीं नेहमीं येत असत, व त्या वेळींच स्नेहाखातर म्हणून आम्हीं त्यांना दोन हजार रुपये कर्जाऊ दिले होते—”

“ मग पुढें ? ”

“ पण आतां ते हें कर्ज देण्याबद्दल इनकार दाखवितात. पुष्कळ तगादा केला तरी सध्यांचा आमचा प्रतिकूल काळ व सामर्थ्यहीनत्व पाहून ते आम्हांला कस्पटाप्रमाणें मानून आमचा पाहिजे तसा अपमान करतात. ”

“ मग पुढें ? या संबंधी कांहीं कागदपत्र वगैरे झाला आहे काय ? ”

" त्या वेळीं हकीमसाहेबांशीं फारच मित्रत्व असल्यामुळें तसें करण्याची आवश्यकता वाटली नाहीं. अर्थात सगळा व्यवहार विश्वासूपणाच्या जोरावर झाला."

" मग पुढें ? मला तर हा पुष्कळच भानगडीचा खटला दिसतो. शिवाय तो हकीमसुद्धां अत्यंत द्रव्यलोभी असल्याचें प्रसिद्ध आहे. आपल्या बापाला औषध द्यायला गेला तरी तो दुप्पट फी घ्यायला कमी करीत नाहीं. तुम्हीं कागदपत्र वगैरे कांहींच केलेलें नसल्यामुळें जर त्यानें 'नाहीं' म्हटलें तर पैसे वसूल करतां येणें अशक्य आहे. मी न्यायाधीश असल्यामुळें पुराव्याशिवाय आम्हांला कांहींच दिसत नाहीं. पुरावा हेच आमचे डोळे म्हटले तरी चालेल. अर्थात त्यावांचून आम्हांला– पण पुढें ?"

" होय. आपण म्हणतां ही गोष्ट खरी आहे; पण 'धर्म' आणि 'ईश्वर' म्हणून जर कांहीं या जगांत असेल, तर त्याला हा अन्याय सहन होणार नाहीं. एक दोन दिवसांपूर्वीं तो आमच्या घरीं येऊन आजला रुपये देण्याचें कबूल करून आला, आणि त्यासाठींच मी आज त्याच्या घरीं गेलें होतें."

" मग पुढें ? पण तुमचा नवरा असतांना तुम्हींच त्याच्या घरीं कां गेलां ? तुमच्यांत पडदा वगैरे बेताचाच जरी मानीत असलां तरी एका परधर्मीय मनुष्याच्या घरीं तुमच्या सारख्या बायकोमाणसानें आणि तेंहि नवरा असतांना जाणें म्हणजे विलक्षणच–पण–मग पुढें ?"

" काजीसाहेब ! या शरिराचे मालक आज सहा महिने बिछान्यावर पडून असून आतां तर त्यांच्यानें उठूनहि बसवत नाहीं. मग अशा स्थितींत ते कसे बरें बाहेर जाणार ?"

" हं आतां आलें माझ्या लक्षांत. मग पुढें ?"

" आपण अशा तऱ्हेनें उत्तरें देत राहिल्यास दोन दिवसहि लागतील असा विचार करून इंदिरेनें थोडक्यांत सगळी हकीगत काजीसाहेबांना सांगितली. 'मग पुढें' असा प्रश्न विचारायला त्यांना मुळीं सवडच दिली नाहीं. झालेला सगळा प्रकार त्यांच्या लक्षांत येतांच हकीमाचा

त्यांना इतका राग आला कीं, त त्या रागाच्या भरांत मोठ्यानें ओरडून म्हणाले, " हरामखोर, पाजी हकीम–"

त्याचा त्या भव्य चेहऱ्याला अति भयंकर बनविणारा तो क्रोध आणि त्या भरांत त्यांनीं उच्चारलेले ते भीषण आवाजाचे शब्द ऐकून, अशा प्रसंगाला अनभिज्ञ असलेल्या इंदिरेचें सर्वांग थरारलें व त्या बेभानास्थितींत तिचा तात्पुरता व संवयीचा नसलेला, बुरखाहि बाजूला सरकला पण थोड्याच वेळांत तिनें तो सांवरला; तरी पण काजीसाहेबांच्या काक दृष्टीला त्या तेवढ्या वेळांतच तिच्या अप्रतिम लावण्याचें दर्शन झालें. असलें दिव्य सौंदर्य त्यांनीं अद्याप कधींच पाहिले नसल्यामुळें, त्यांना आपण स्वप्नांत असून आपणाला पऱ्यांचेंच दिव्य दर्शन होत आहे असा भास झाला; पण थोड्याच वेळांत वस्तुस्थिति त्यांच्या लक्षांत आली, आणि त्यांना कधींहि वाटला नाहीं, इतका विस्मय वाटला. ते मनांत म्हणाले, " खरोखर, असलें सौंदर्य या मृत्यु लोकीं फारच विरळा; पण स्वर्गलोकीं तरी असेल कीं नाहीं कोण जाणें !! बापूसाहेबासारख्या दरिद्र्याच्या झोंपडीला शोभा आणण्यासाठीं–खरोखर–हें रत्न निर्माण झालें नसावें. निजामसाहेबांच्या जनानखान्यांतहि असल्या रूपवती परी नसतील. या सौंदर्याचा खरा उपभोक्ता कोण असेल बरें ? "

ज्ञानवृद्ध, पन्नाशीच्या जवळ जवळ आलेले व नेहेमीं गंभीर स्वभानें असणारे काजीसाहेब, इंदिरेच्या सौंदर्यदर्शनानें अगदीं विमोहित होऊन गेले. विचार व परिस्थिति यांना ते पूर्ण विसरले. अकस्मात् चमकलेली वीज पाहून प्रकाशानें जसे डोळे दिपून जातात, तशी स्थिती काजी साहेबांची झाली. त्यांचे ओठ विलग झाले, नेत्र विस्तृत झाले, हात जशाच्या तसेच राहिले आणि श्वासोच्छ्वासहि बंद होण्याची वेळ आली. आपण कोण हेंहि ते विसरलें म्हटलें तरी चालेल.

अशा प्रकारची जरी काजीसाहेबांची क्षणभर स्थिति झाली तरी ते आत्मसंयमन करण्यांत फारच कुशल असल्यामुळें त्यांनीं चट्कन् आत्मसंयमन केलें, व गंभीरपणानें म्हटलें, " बाई ! त्या हकीमानें तुमचा फारच अपमान केला आहे, ही गोष्ट खरीच; पण या शहरांत माझा इतका दरारा असून त्याला त्याची कांहींच भीति वाटली नाहीं हा

माझाहि एक प्रकारचा अपमानच नाहीं काय ? खरोखर बाई, त्याच्या या अमानुष उद्धटपणाबद्दल मी त्याला योग्य प्रायश्चित्त देणारच. मी त्याला कठोर शिक्षा केल्यावांचून सोडल्याचें जर निंजामसाहेबांना समजलें तर ते माझ्यावर फारच रागावतील ! ''

आपणाला बोलायला ही योग्य संधि आहे असें लक्षांत आणून इंदिरा म्हणाली, '' आपण निजामसरकाराप्रमाणेंच न्यायनीतिकुशल असल्याचें प्रसिद्ध आहे, आणि म्हणूनच मीं आपल्याकडे माझी हकीकत सांगितली आहे. तेव्हां याबद्दल योग्य तो न्याय आपण करालच. ''

काजीसाहेबांनीं इंदिरेचें बोलणें ऐकलें; पण उत्तर मात्र दिलें नाहीं. कारण मनांतल्या मनांत त्यांचा निराळाच विचार चालला होता. बऱ्याच वेळानें ते झोंपेंतून जागृत झाल्यासारखे करून म्हणाले, '' होय. मग पुढें ? बरं--ऐका. बाई, अजूनपर्यंत मी या तुमच्या हकीगतीचाच विचार करीत होतों. त्या बदमाष हकिमाला कायद्याप्रमाणें नोटीस काढूनच बोलविला पाहिजे आणि तसें करायला, खटल्याची मांडणी रीतसर करावयाची असल्यामुळें कांहीं विलंब लागेल. आज सायंकाळीं मी ती सगळी व्यवस्था करीन. तेव्हां तुम्ही उद्या याच वेळीं या. मी येथें बसून तुमच्या खटल्याची चवकशी करीन. उघड्या अदालतींत तुम्हाला जावें लागणार नाहीं. ''

इंदिरेला आनंद झाला. ती त्यांचे आभार मानून म्हणाली, '' आमचे रुपये येतील व माझ्या केलेल्या अपमानाबद्दल त्याला योग्य शिक्षा मिळेल अशी काय ती व्यवस्था झाली म्हणजे झालें. आह्मांला आज पैशांची अत्यंत जरूरी आहे, तेव्हां ते वसूल करण्याचा उपाय मात्र आधीं व्हावा हीच विनंति आहे. ''

आपल्या अर्धवट पिकलेल्या दाढीवरून हात फिरवीत काजीसाहेब उत्तरले, '' अगदीं तुमच्या मनासारखेंच करतों. तो हरामजादा माझ्यापुढें येतांच थर थर कांपत आपला अपराध कबूल करील व ताबडतोब रुपये आणून देईल. एकदां पहा तरी माझा दरारा !!! ''

आपलें आतां येथें विशेष काम नाहीं आणि परवानगी घ्यायलाहि ही संधि उत्तम आहे असें पाहून इंदिरा ह्मणाली, '' मला परवानगी मिळा-

त्यास मी जाईन ह्मणतें. कारण माझी दासी बाहेर वाट पहात उभी आहे व घराहून निघूनहि मला बराच वेळ झाला. ”

काजीसाहेबांनीं विशेष आढेवेढे न घेतां तिला परवानगी दिली; पण ती तेथून निघून जाईपर्यंत तिच्यावरची त्यांची रोंखलेली दृष्टी क्षणभरहि बाजूला सरकली नाहीं. त्या दृष्टींत एक प्रकारचा आरक्तपणा व विमोहितपणा आढळत होता.

आपल्या मालकिणीला यायला बराच वेळ लागलेला पाहून नर्मदेला फारच काळजी वाटूं लागली; पण तितक्यांत प्रफुल्लित चेहेऱ्यानें येणाऱ्या बाईसाहेबांकडे पहातांच तिला फार आनंद वाटला. कारण ‘ आपल्या कार्याची कांहीं तरी सफलता झाल्यावांचून बाईसाहेबांना इतका आनंद व्हायचा नाहीं ’ अशी तिची मनोदेवता तिला सांगत होती.

मालकीण जवळ येतांच नर्मदेनें घाईघाईनें तिला प्रश्न केला, “ बाईसाहेब ! कसं काय झालं ? ”

“ मनासारखं कांहीं अद्याप झालं नाहीं, तरी पण निराश कांहीं व्हायला नको. काम होण्याची आशा आहे. उद्यां आणखीं मला आलं पाहिजे. ” असें म्हणून तेथें झालेलें सर्व बोलणें इंदिरेनें नर्मदेला सांगितलें.

नर्मदा वयातीत असल्यामुळें तिला या विश्वरंगभूमीवरील बरेच खेळ पहाण्याचा व अनुभवण्याचा प्रसंग आला होता. अर्थात् ती बरीचशी अनुभवजन्य शहाणी असून सारासार विचार करण्याचीहि तिला संवय होती. मनुष्याच्या बाह्य वर्तनावरून ती त्याच्या अंतरंगाची परीक्षा करीत असे व ती सहसा चुकत नसे. काजीसाहेबांच्या खासगी चरित्राची तिला बरीच माहिती असल्यामुळें त्यांचें मनुष्यत्व किती उत्कृष्ट आहे हें ती जाणून होती, अर्थातच आपल्या मालकिणीचें बोलणें ऐकून गंभीरपणानें म्हणाली, “ झालेला प्रकार म्हणण्यासारखा फायदेशीर झाला नाहीं. काजीसाहेबांचा पराक्रम सर्वांना माहीत आहे अतएव याच वेळीं त्यांनीं एखाद्या शिपायाला पाठवून जर हफीजला बोलावून आणलें असतें तर ताबडतोब कामाचा निकाल लागला असता. असें असून मग त्यांनीं इतकी दिरंगाई कां बरें लावली ? ”

दासी नर्मदा हिच्या मनांत संशय आला होता; पण इंदिरेच्या सरळ व पवित्र मनाला बिलकुल संशय आला नाहीं. कारण ती मानवी वभावाला पारखी होती व तिच्या गत आयुष्यांत असला गुंतागुंतीचा एकहि प्रसंग तिला अनुभवावा लागला नव्हता. लहानपणीं आईबापांच्या व नंतर पतीच्या मधुर व सात्विक प्रेमांतच तिचे दिवस गेले होते. अर्थात जगांतील भानगडीला ती अपरिचित होती हें सांगायला नकोच. सध्यांच्या प्रतिकूल परिस्थितीमुळें व साडेसातीच्या भयंकर फेऱ्यामुळें तिला बाह्यजगाच्या कृष्णकारस्थानाचा परिचय करून घ्यावा लागत होता. ती अद्याप पडद्यांतच होती. विश्वरंगभूमीवरील उघड्या राजपथावर हें तिचें प्रथमचेंच पाऊल पडत होतें म्हटलें तरी चालेल. आज ती पूर्वीसारख्या स्थितींत असती तर हकीमाच्या येथें व या काजीच्या येथें कशाला आली असती ? इंदिरेला असें वाटूं लागलें, " आपण आतां ही हकीकत घरीं सांगितल्यावर तिकडून म्हणायचं होईल, ' माझं न ऐकतां कां बरें तूं तिकडे गेलीस ?' त्या वेळीं मी काय बरें उत्तर देऊं ? आणि झालेल्या प्रकारानें तिकडे वाईट वाटणार नाहीं का ? " इंदिरा अशा प्रकारचा विचार करीत अगदीं एवढेंसें तोंड करून बसली आहे असें पाहून नर्मदा तिला प्रफुल्लित करण्याच्या हेतूनें म्हणाली, " बाईसाहेब, आपण इतकी कसली काळजी करतां ? दयाळू ईश्वरावर विश्वास ठेवा. हें सगळें वादळ आणि धुकें त्याची कृपा होतांच आपोआप नाहींसें होईल; पण मी असें विचारतें, उद्यां आणखी आपण त्या काजीसाहेबांकडे जाणार का ? "

" तें मी अजून कांहींच ठरविलें नाहीं नर्मदे. "

" मला वाटतें, जाऊं नये. "

" कां बरें ? " इंदिरेनें आश्चर्यानें प्रश्न केला.

" आपणाला नव्हे पण आपल्या या सुंदरपणाला अनेक शत्रु उत्पन्न होत आहेत. "

" पण मी कधींहि कुणाचं मन दुखाविलं नाहीं, कीं कुणाचा कांहीं अपराध केला नाहीं. तिकडच्यानं उठवत नाहीं व कुठं जाण्याचं सामर्थ्य नाहीं, त्यामुळें आमचा एकेक दिवस अत्यंत संकटांत कसा चालला

आहे, हें तूं पहातच आहेस. आमच्या सुखाच्या दिवसांत ज्यांनीं ज्यांनीं काकुळतीला येऊन आमच्याकडून कर्जाऊ रुपये नेले आहेत, ते आणायला माझ्याशिवाय आतां कोण जाणार ? आणि ते मागायला गेलें तर सर्वांनीं माझं शत्रुत्व कां करावं ? ”

“ बाईसाहेब ! पैसा, स्नेह जोडतो व पैसाच स्नेह तोडतो. जें आरंभीं सौख्यकारक तें मागाहून दुःखदायक. अर्थात यावेळीं जेथें जेथें वसुलासाठीं जाल, त्या त्या प्रत्येक ठिकाणीं असंच व्हायचं. याला म्हणतात जगाची रीत. जग असेंच चाललें आहे व पुढेंहि असेंच चालणार. हकिमाच्या वर्तनावरून नाहीं का आपली खात्री पटत ? विषाची परीक्षा पहाणें चांगलें नव्हे. ”

नर्मदेच्या या बोलण्याचा इंदिरेनें बराच वेळ विचार केला व नंतर एक दीर्घ सुस्कारा सोडून ती म्हणाली, “ होय, तुझं म्हणणं खरं आहे. आम्हांला आतां तळमळून मेलं पाहिजे; पण तेंहि चांगलं. अब्रूनें मरणं चांगलं; पण बेअब्रूनं सुख नको. ईश्वराची मर्जी त्याला मनुष्याचा काय इलाज ?

“ माझंहि असंच मत आहे. शिवाय आणखीहि मी आपल्याला असें—”

बोलतां बोलतां नर्मदा मध्येंच थांबली; पण असें अर्धवट बोलणें ऐकून इंदिरेला कसें स्वस्थ बसवणार ? ती उत्सुकतेनें म्हणाली, “काय असेल तें उघड करून सांग, मी अगदीं आतां मन घट्ट केलें आहे. तें आंतल्या आंत दाबून ठेवू नकोस. ”

“ बाईसाहेब, तुम्हांला राग येणार नाहीं ना ? ”

“ नाहीं. मी तुझ्यावर कधीं तरी रागावलें आहें का नर्मदे ? ”

“ पण आपलं विचारलं. मी असं म्हणतें. नायकांचें खरं शत्रुत्व जर कोणी केलं असेल व करीत असेल, तर त्यांचें सौंदर्य आणि त्यांच्यांत नसणारी जीभ हींच होत. वारंवार संकटें येतात तींहि यामुळेंच. ”

“होय. तिकडूनहि वारंवार असंच सांगायचं होतं, आणि तूंहि आतां तेंच सांगत आहेस. ”

" पुष्कळ पाहिलें आहे, ऐकलं आहे आणि अनुभविलं आहे म्हणून सांगितलें बाईसाहेब ! आणि यामुळेंच या काजींचें बोलणें आपल्याला जितकें सरळ व न्यायाचें वाटलें तितकें तें मला वाटत नाहीं. आपल्या मनांतील खरी गोष्ट बोलायला त्याला आज योग्य अवसर मिळाला नाहीं व मिळाला असता तरी आज त्याच्यानें बोलवलं असतं का नाहीं याचा संशयच आहे; पण उद्या तुम्ही त्याच्यासमोर जातांच तो आपल्या मनांतील विष ओकल्यावांचून राहणार नाहीं. बाईसाहेब, आपल्या या स्वरूपप्राप्ती-साठीं तो नीच माणस, उद्यां त्या हकीमाकडून [illegible] रुपये वसूल करून देईल; पण त्यानंतर—त्यानंतर तो आपल्या मनांतील खरा आशय तुम्हांला सांगेल ! अरेरे !! या जगांत नीति आणि न्याय कांहींच नाहीं काय ? सज्जन माणसांचा छळ आणि दुर्जनांची प्रतिष्ठा हीच का या जगाची रीत ? "

नर्मदेचें हें भाषण इंदिरेच्या मनाला लागलें. तिला आपली कळकळ आहे हेंहि ती समजली; पण तिच्यांत लहानपणापासून—भले श्रीमंतीमुळें म्हणा, अथवा दुःखाचा किंवा मानहानीचा कोणताच प्रसंग आला नसल्या-मुळें म्हणा—आत्माभिमानाचा थोडासा दुर्गुण तिच्यांत शिरलेला होता व तो कव्हां केव्हां तिच्या तोऱ्याला कारण होत असे. नर्मदेचें बोलणें ऐकतांच आज तिच्या त्या दुर्गुणानें उचल खाल्ली [illegible] चलन मिळालें. बापूसाहेबांकडे ती हट्ट करीत असे. व ते तिचे श्रीमंती हट्ट त्यांच्याकडून पुरविलेहि जात, तरी पण ते तिची या बाबतींत कधीं कधीं चांगलीच कानउघाडणी करीत; पण प्रेमांत आणि लडिवाळपणांत तें सगळं कुठच्या कुठेंच जात असे. तो कालच तसा होता, आणि आजचा काल निराळा होता. नर्मदा अगदीं पुष्कळ वर्षें जरी त्या घरांत राहिलेली होती, इतकेंच नव्हे तर बापूसाहेबांसही जरी तिनें आंगाखांद्यावर खेळवून लहानाचा मोठें केलें होतें; तरी पण ती दासी होती. इंदिरेच्या मनाला या गोष्टीची आठवण झाली व ' आपण नेहमीं या दासीच्या हुकमाप्रमाणेंच चालावें म्हणजे काय ?' असें तिला वाटूं लागलें. सगळीं कामें जरी तिच्याच स-ल्ल्यानं चाललीं होतीं तरी या कामांतहि ती म्हणेल तेंच ऐकावें असें तिला वाटेना. कांहीं वेळ विचार केलासें दाखवून ती नर्मदेला म्हणाली, " उद्यां

काजीची भेट घ्यावी कीं नाहीं, याचा विचार करण्याला अद्याप बराच अवकाश आहे. आजची रात्र मी त्याचा विचार करीन आणि उद्यां, जावेंच असें जर वाटलें तर नर्मदे, मी तुला बरोबर घेतल्याशिवाय जाणार नाहीं बरं."

नर्मदा समजली. प्रतिकूलकालीं विपरीत बुद्धि सुचायचीच. अनेक वेळीं निःस्वार्थ–सदुपदेश बाजूला राहून व्हायचें तें होऊन जातेंच आणि आत्माभिमानी माणसांना तर असला सदुपदेश कधींच आवडत नाहीं. या बाबतींत आतां आपण बोलणें योग्य होणार नाहीं असें वाटत होतें तरी पण नर्मदा आणखी म्हणालीच, "तर मग आजचा झालेला हा सगळा प्रकार तुम्हीं मालकांना सांगणार' कीं काय ?"

इंदिरेनें चटकन उत्तर दिलें, "होय. त्यांच्याकडे मी हें सगळें सांगणार. कारण आम्हीं दोघेंहि एकच आहों. अर्थात मला माहीत असलेली कोणतीहि गोष्ट तिकडे सांगणें हें माझें कर्तव्य आहे. त्यांना न सांगतां मी कधींच कांहीं करणार नाहीं." बोलतां बोलतां गाडी दरवाजापाशीं केव्हां आली हें दोघींनाही समजलें नाहीं.

---

# प्रकरण ५ वें.

—:o:—

## दाराबाहेरचे शब्द !

तूर्त आपण इंदिरेला तिच्या घराकडे सोडून काजीसाहेब आपल्या दिवाणखान्यांत काय करीत आहेत तें पाहूं.

काजीसाहेब हुकमती स्वभावाचे व अत्यंत गंभीर वृत्तीचे बडे अधिकारी असल्यामुळें, तसेंच त्यांची नजरहि फारच तीक्ष्ण असल्यामुळें त्यांच्यापुढें कमज्यास्त बोलण्याचें साहस कुणाच्यानेंहि करवत नसे. अदालतींत हुकूम सांगण्याच्या वेळीं वादी प्रतिवादी लोक त्यांच्याकडे इतक्या व्याकूल नजरेनें पहात कीं, तशा दृष्टीची यमाला सुद्धां दया येईल. कारण काजी साहेबांचे हुकूम तसेच भयंकर असत. अर्थात् शिक्षाहि भयंकर असत हें

सांगावयास नकोच. काजीसाहेबांच्या हृदयांत दयेचा ओलावा अगर कृपेचा पाझर बिलकूल नव्हता असें म्हटलें तर अतिशयोक्तीचे होणार नाहीं. कठोर विचारांचे ते मूर्त स्वरूप होतें असें म्हटलें तरी चालेल. पण अशा तऱ्हेचें हृदय असलेल्या काजीसाहेबांना इंदिरेचें अलौकिक सौंदर्य पाहून विमोहित व्हावें लागलें. त्यांच्या हृदयांतील प्रेमवीणा निनादूं लागली आणि तिचे मृदु मधुर व मंजुळ सूर त्यांना ऐकावेसे वाटूं लागले. मदनाच्या पुष्पधनुष्यापासून सुटलेला तो कुसुमशर काजीसाहेबांचें अन्तःकरण विदीर्ण करूं शकला नाहीं असें आमच्यानें तरी निदान म्हणवणार नाहीं. असो.

काजीसाहेब आपल्या दिवाणखान्यांत नेचाची नळी तोंडाला लावून धूम्रपान करीत होते. त्या इस्तंबूली सुगंधी तंबाखूच्या धुरानें सगळा दिवाणखाना भरून गेला होता. तरी पण त्यांची दृष्टी भिंतीवर टांगलेल्या एका चित्रफलकाकडे लागली होती ती कांहीं तेथून दूर झाली नाहीं.

हें चित्र मुसिराबादेंतील एका विख्यात सौंदर्यशालीनीचें होतें; इतकेंच नव्हे, तर या सुंदरीशीं काजीसाहेबांचा एकेवेळीं विवाहहि होणार होता; पण दुर्दैवाच्या फेऱ्यामुळें ती सुंदरी त्यांना अंतरली होती. नंतर मोठ्या खटपटीनें त्यांनीं त्या रूपवतीची एक तसबीर मिळविली आणि कांहीं गहन विचार करण्याची वेळ आली कीं, तिच्याकडे पहातां यावें म्हणून त्यांनीं ती आपल्या विश्रांतीमंदिरांत लावून ठेविली. आणि खरोखरच ते विचारांत गढून गेले कीं, त्या तसबिरीकडे पहात असत.

त्या चित्रफलकावर काढलेल्या सुंदरीचें नांव जुलेखा असें असून निजामाधिपतीच्या मेहुण्याशीं तिचा विवाह झाला होता. मोठ्या घराण्याशीं संबंध जडण्याचा प्रसंग आल्यामुळेंच तिचा काजीसाहेबांशीं विवाह झाला नाहीं. विवाहा नंतर ती तीनच वर्षें जिवंत होती. स्वरूपाचा मोह हें फारच तीव्र विष आहे. इतके कालकूट विष दुसरें कोणतें असेल असें आम्हाला तरी निदान वाटत नाहीं. शिवाय या विषाची क्रिया अत्यंत मृदुमंद असल्यामुळें परिणामाकडे लक्षच जात नाहीं; पण मनुष्याचें शरीर मात्र प्रतीक्षणाला दग्ध होत असतें. आकांक्षेच्या अतृप्तीनें व काम्य वस्तूच्या अप्राप्तीनें या विषाचें कार्य, भीषणभाव धारण करून प्रेमिक व्य-

स्तीच्या अस्थिपंजरमय हृदयामध्यें पलघडी अग्नीची भीषणता वाढवीत असते. अर्थात् त्याच्या वेदना व तळमळ वाढत असते हें सांगावयास नकोच.

आपण ज्याची आशा करीत होतों, तो जिन्नस हाताजवळ येऊन हाता वेगळा झाला असें वाटून जुलेखेच्या बाबतींत काजीसाहेब अगदींच खिन्न झाले होते; पण ज्याच्या पदरीं ती पडली होती त्याचा अधिकार व दर्जा फारच मोठा असल्यामुळें दांतओंठ खाण्यापलीकडे काजीसाहेबांच्या हातून कांहींच होण्यासारखें नव्हतें. फार काय, तिच्या बाबतींत तोंडांतून एकहि शब्द काढतां येण्यासारखी स्थिति नव्हती, मग करणें कुठचें ?

जुलेखा जितके दिवस जिवंत होती तितके दिवस काजीसाहेबांनीं विवाहही केला नाहीं; पण तिच्या मृत्यूनंतर कोणत्याशा अव्यक्त कारणानें त्यांना विवाह करण्याची फारच घाई लागली. तरी पण नशिबांत होतें तसें झालें असें मानून त्या नवपरिणित पत्नीशीं जिच्याशीं त्यांचा विवाह झाला तिच्या सौंदर्याकडे लक्ष देण्याला त्यांना सवडहि मिळाली नाहीं त्यांच्या दुर्दैवानें त्यांचा विवाह एका साधारण रूपसंपन्न तरुणीशींच झाला व सुखासमाधानानें वागून ते आपला व्यवहार पाहूं लागले; पण जुलेखेची आठवण ते अगदींच विसरले नाहींत. एकटे बसले कीं, त्यांना तिची आठवण होई, ते दीर्घ सुस्कारे सोडीत, व भिंतीवर लावलेल्या तसबिरीकडेहि वारंवार पहात. नव्या बिबीनें हा प्रकार एकदां चोरून पाहिला व तिनें विचारलें, " हजरत, या तसबिरीकडे पाहून दीर्घसुस्कारे सोडतांना मी आपणाला नेहमीं पाहातें. कां बरं आपणाला असं व्हावें ?

बिबीनें आकस्मिक केलेल्या या प्रश्नानें काजीसाहेब चमकले, व आपण ही मोठी चूक केली असें त्यांना वाटलें. बेसावधपणानें तिच्या समोरें आपण त्या तसबिरीकडे पाहात राहाणें योग्य नव्हतें. आतां जास्त वेळ विचार करीत राहिल्यास आपण खरेंच अपराधी ठरूं असें लक्षांत आणून काजीसाहेब सावध होऊन म्हणाले, " काय सांगू गुलशन ! तूं माझ्या घरांत येण्यापूर्वीं हींच सुंदरी या घराची शोभा वाढविणार होती.

पण मृत्यूनें तिला अकालींच नेलें. लग्नानंतर केवळ तीनच वर्षांनीं त्या सुंदरीचा देह कबरस्थानांत पुरला गेला."

गुलशन फारच संशयित मनाची व कांहींशी दुष्ट स्वभावाची तरुणी होती. मृत स्त्रीबद्दलची आपल्या नवऱ्याची ती सहानुभूती व प्रेम पाहून तिला राग आला. तिनें आपला ओंठ चावला आणि कांहीं वेळानें म्हटलें, " तर मग माझ्यावर आपलें प्रेम नाहींच म्हणायचं ? "

" म्हणजे ? हे तुझें काय विचारणें बरें प्यारी ! तूं माझा प्राण, कलिजा सर्व कांहीं तूं ! आणि तसें नसतें तर—"

" समजलें. माझ्या तोंडापुरतें असें बोलायचें, आणि मी बाजूला झालें कीं, त्या तसबिरीकडे दृष्टी लावून सुस्कारे सोडायचे, आतां मुळीं मी ही तसबीर येथें ठेवीतच नाहीं, फोडून फेंकून देतें. कित्येक सवती जिवंतपणी छळतात तर ही मेली मला मरूनसुद्धां छळीत आहे–"

नंतर काजीसाहेबांनीं कशी तरी पत्नीची समजूत घातली आणि तिला तथून समाधानपूर्वक बाहेर काढून ती तसबीर त्यांनीं आपल्या पेटींत लपवून ठेविली.

या दिवसापासून काजीसाहेब गुलशनवर इतकें प्रेम दाखवूं लागले कीं, तिला त्यांच्याबद्दल कसलाच संशय आला नाहीं. नंतर त्यांनीं सहज म्हणून ती तसबीर पुनः भिंतीला लाविली व गुलशननेंहि त्या बाबतींत कांहीं अडथळा केला नाहीं. कारण 'आपण आतां स्वामीच्या हृदयसिंहासनावर अधिष्ठित झालों आहोंच मग ही तसबीर काय करणार ! असेना का मेली भिंतीवर ती !' असा तिनें विचार केला. गुलशनचें हृदय दुष्ट नव्हतें. पण पतीच्या प्रेमाला पारखी व्हावें असें मात्र तिला कधींहि वाटलें नाहीं, आणि म्हणूनच तिनें तसबिरीसाठीं अकांडतांडव केलें होतें; पण पतीचें पूर्ण प्रेम आपणावर आहे असें आढळून येतांच ती त्या बाबतींत निश्चित झाली.

गुलशन सुस्वरूप नव्हती, असें नाहीं. पण जुलेखा किंवा इंदिरा यांची ती दासी शोभली असती. मात्र तिचें नशीब अथवा पायगुण म्हणा पाहिजे तर, चांगलें असल्यामुळें ती घरांत आल्यापासून काजीसाहेबांची विलक्षण भरभराट झाली. शिवाय ती फार उदात्त अंतःकरणाची व दयाळ

होती. आपल्या प्रियकराला क्षणभरसुद्धां त्रास होऊं नये अशाबद्दल ती अत्यंत काळजी घेत असे आणि म्हणून बाहेरील लोकांना एवढे मगरुरी व कठोर दिसणारे काजीसाहेब गुलशनच्या बाबतींत अगदीं मवाळ होत असत. त्यांना ती देवीप्रमाणें पूज्य वाटे. ती त्यांना जसें सांगे तसें ते ऐकत ा राग येईल असें वर्तन त्यांच्याकडून सहसा होत नसे. शिवाय थोर मानाला ती पात्रहि होती.

असो; आज बराच वेळपर्यंत जुलेखेच्या तसबिरीकडे पाहून त्यांनीं दीर्घ सुस्कारा सोडला. कारण इंदिरेला पाहतांच व तिच्यासंबंधाचे विचार मनांत येतांच जुलेखेच्या स्वर्गीय लावण्याची त्यांना स्मृति झाली. इंदिरा आणि जुलेखा यांच्या सौंदर्यांत, ठसकेदारपणांत, मार्दवांत अगर सुकुमारपणांत अत्यंत सादृश्य असल्याचें काजीसाहेबांच्या लक्षांत येण्याला विलंब लागला नाहीं. कारण इंदिरेला [illegible] खालीं पडला त्या वेळीं त्यांनीं तिळ नखशिखांत [illegible] होती व त्यावेळीं जरी त्यांना तितकें कांहीं वाटलें नाहीं, तरी जुलेखेच्या तसबिरीकडे पाहतांच त्यांना 'ती हिंदु व ही यवनी' यावांचून मुळींच फरक वाटला नाहीं. आणि यामुळें तर त्यांचें मन ज्यास्तच विचलित झालें. मनुष्याचें मन एकदां अधोमार्गाला लागलें, कीं तें सारखें गडगडत खालीं खालींच जाऊं लागतें. त्याला आंवरतांच येत नाहीं. आत्मसंयमन आणि विवेक यांची लटपट उडते. अर्थात त्यांच्या सामर्थ्याच्या अभावानें तें निर्बल बनून करूं नये ती गोष्ट करायला तयार होतें.

काजीसाहेब या वेळीं अगदीं पुरे पागल बनले. इंदिरेच्या सौंदर्यासारखें सौंदर्य जगांत नाहीं असें त्यांना वाटूं लागलें व लावण्याचा आपणाला उपभोग घ्यायला न मिळाला तर आपलें जिणें व्यर्थ होय, फार काय आपल्याच्यानें जिवंतहि राहवणार नाहीं अशी त्यांची खात्री झाली. अर्थात इंदिरा आपल्याला कशी प्राप्त होईल या बाजूकडे त्यांच्या विचारांची दिशा वळली. बराच वेळ विचार केल्यावर ते आपल्याशींच पण मोठ्यानें म्हणाले, " काय ! माझ्यासारख्या मानधनसंपन्न मनुष्याला यःकश्चित एका हिंदूची स्त्री मिळवितां येणार नाहीं ! माझ्यासारख्या सुखी व श्रीमंत मनुष्याला बाजूला सारून ती सौंदर्यशालिनी त्या दरिद्री

आणि रोगी नवऱ्यालाच कवटाळून बसेल काय ? माझी—एवढ्या थोर अधिकाऱ्याची—एवढीही इच्छा पूर्ण होणार नाहीं ? ”

इतक्यांत दरवाजाबाहेरून पण त्यांना उद्देशून कुणीसें गंभीर स्वरानें म्हटलें, “ खावंदांची इच्छा पूर्ण झालीच पाहिजे. ज्या काजीसाहेबांच्या हुकुमानें हें सर्व शहर एका क्षणांत आकाशांतहि उडून जाऊं शकेल त्या महान अधिकाऱ्यांच्या मनांतील इच्छा अपूर्ण राहील हें अगदींच असंभवनीय होय, असें मी केव्हांहि सांगावयास तयार आहें.”

---

# प्रकरण ६ वें.



## सिद्धसाधकपणा.

आपल्या विश्रांतिमंदिराच्या बाहेरून आलेले ते अनपेक्षित पण मनाला चटका लावणारे शब्द ऐकून काजीसाहेब चमकले. परवानगीवांचून आपल्या खासगी जागीं अशा प्रकारें येण्याचें धाडस करणारा हा इसम कोण ? आणि आपल्या बोलण्याचा संबंध लक्षांत घेऊन उत्तर देण्याचा त्याला धीर झाला तरी कसा ? एवढा सामर्थ्यवान व उद्धट असा हा गृहस्थ कोण बरें असावा ? पण ज्यास्त विचार करण्याची काजीसाहेबांना संवयच नसल्यामुळें त्यांनीं उतावीळपणानें पण कर्कश स्वरानें विचारलें, “ कोण आहे बाहेर ? ”

बाहेरूनच उत्तर मिळालें, “ हुजूरचा दासानुदास हकीम हफीज ! ”

“ आं ? या हलकट हकीमानें लपून राहून आपल्या मनांतील गोष्ट ऐकली ? केवढा हा त्याचा उद्धटपणा ! छे माझ्यानें याला आतां क्षमा करवत नाहीं. इतका उलट्या काळजाचा मनुष्य मीं अद्याप पाहिला नव्हता. ” असा विचार करून काजीसाहेबांनीं कठोर स्वरानें त्याला हांक मारली, “ हाफीज आंत ये. ”

काजीसाहेबाच्या कुटुंबांतील सर्वांना औषध देण्याचें काम याच हकिमाकडे

होतें व त्यामुळें दोघेंहि एकमेकांना चांगले ओळखतहि. अत्यंत आर्जवानें आणि शक्य तितकें लवून सलाम केल्यानंतर हकीम स्तब्धपणानें काजी-कडे पहात उभा राहिला; पण सभ्यपणाच्या गृहस्थी बाण्याला अनु-सरून त्यांनीं त्याला एका वेत्रासनावर बसण्याची आज्ञा केली, व 'अगदीं आपल्या मनांत नसतां हुजुरासमोर बसावें लागत आहे, असा आविर्भाव शक्य तितक्या हावभावांनीं दाखवून तो एकदांचा त्या आसनावर बसला.

कांहीं वेळ स्तब्धतेंत गेल्यावर त्या भीषण शांततेचा भंग करून काजीनें आपल्या नेत्रांनीं हकीमाकडे पाहत म्हटलें, "हकीम ! तूं परवानगी वांचून कां बरें येथें आलास ?"

"पण इथें यायला मला परवानगीची काय जरूरी ! औषध वगैरे देण्यासाठीं येतो त्या वेळीं मला नाहीं कधीं परवानगी घ्यावी लागत ती ?"

"बरें; पण माझें सर्व आत्मगत बोलणें तूं ऐकलेस काय ?"

"हुजूर खोटें कशाला सांगू ? मीं सर्व ऐकलें खरें."

"तर मग तूं हा फारच मोठा अपराध केला आहेस व मला त्याची क्षमाहि करतां येणार नाहीं. या शहरांतच काय पण या जगांतहि, माझ्या हुकुमावांचून अशा रीतीनें वर्तन आणि तेंहि माझ्याशीं, करणारा मनुष्य मला आढळणार नाहीं, अतएव, तूं गुप्तपणें भाषण ऐकून माझा मोठा अपराध केलास !"

हें रागाचें बोलणें ऐकतांच हकिमानें हात जोडून केविलवाण्या स्व-रानें म्हटलें "होय, हुजूर म्हणतात ती गोष्ट सत्य आहे पण मी हुजुरचा कायमचा आश्रित असून हुजूरच्या सहाय्यासाठींच आलों आहे सरकार!"

हें भाषण ऐकताच काजीसाहेब किंचित् वरमून गुरगुरतच म्हणाले, "कसलें सहाय्य !"

"ज्या योगानें ती गुलिस्तानची परी इंदिरा खाविंदांना मिळेल त्या खटपटी करण्यालाच मी इतक्या तांतडीनें आलों. !!

काजीसाहेबाच्या प्रणयलुब्ध हृदयांत पुन्हां इंदिरेसंबंधाचा विचार उत्पन्न झाला व ते आपली लांब लचक दाढी गोंजारीत प्रसन्न स्वरानें

म्हणाले, " त्या बापूसाहेबांची पत्नी इंदिरा हिनें तुझ्या विरुद्ध फिर्याद केली आहे, हें तुला समजलें काय ? बोल त्यांत अपराधी कोण ? "

" होय. मला त्या फिर्यादीबद्दल माहीती आहे. "

" पण अपरधी कोण आणि तू असा चोरून कां आलास ? "

" चोरून कसा हुजूर !! माझें सर्वस्व कांहीं खाविंदांचे चरणरज, मग ते सोडून मी लांब कसा राहीन. मला शिक्षा करणारे व जवळ ओढणारेहि आपणच. "

अंगविक्षेप, हात जोडणें, मान वांकविणें आणि केविलवाणा स्वर काढणें हें नाटकी हावभाव यावेळीं हकिमसाहेबांनीं अगदीं पुरतेच अमलांत आणले होते.

" परवाना घेतला आहेस का ? " काजीसाहेबांनीं प्रश्न केला.

" होय, मी परवाना घेऊनच येथें आलों पण मघा आपण अतिशय रागावलेले दिसला म्हणून बोललों नाहीं. मला समजत का नाहीं ? मी परवानगीवांचून कसा बरें येईन ? " हकीमसाहेब अगदीं काकुळतीला येऊन म्हणाले.

हकिमाचीं तीं नम्रतेचीं उत्तरें ऐकून काजीसाहेब बरेच प्रसन्न झाले. जग हें असेंच आहे. बाह्य देखाव्यालाच तें भुलत असतें. खऱ्याची कुणालाच केव्हां कींव येत नाहीं. काजीसाहेब मृदु भाषणामुळें बहुतेक हकिमाला वश झाले म्हटलें तरी चालेल कारण त्यांच्या मनांतील त्याच्या बद्दलचा सगळा राग अगदीं नाहींसा झाला. हकिमाला तेंच पाहिजे होतें.

कांहीं वेळानें काजीसाहेब प्रसन्न पण सलगीच्या स्वरानें म्हणाले, " हाफीज, त्या इंदिरेनें तुझ्यावर दोन फिर्यादि लावल्या आहेत, आणि मला तर योग्य न्याय करणें भाग आहे. कारण माझ्याकडून खरा न्याय मिळतो अशाबद्दल माझी प्रसिद्धीच आहे. मग काय ? "

हकीम हात जोडून म्हणाला, " हुजूर, मी काय सांगणार आपणच काय तो हुकूम करा. पैसे न दिल्याबद्दल व अपमान केल्याबद्दल या दोन फिर्यादी आहेत नाहीं का ? "

" होय अगदीं बरोबर. तूं फार हुषार आहेस रे ! "

"हें: ! हें: ! कसला ? कसला ? हुजुरचीच मेहेरनजर दुसरें काय ? "

या वेळीं हकीमसाहेबांची रसवंती अत्यंत नम्रतेनें काजीसाहेबांच्या कानांत अमृत ओतीत होती. "

काजीसाहेबांचा राग केव्हांच शांत झाला होता, आणि म्हणूनच पहिल्याप्रथम हलकट वाटणारा हकीम आतां त्यांना आपला निकटचा दोस्त वाटूं लागला होता.

काजीसाहेबांची ही स्थिति लबाड हकीमानें ओळखली व पूर्वीचा कांहीं एक संबंध न दाखवितां तो शक्य तितक्या लीनपणानें आणि मृदु-स्वरानें म्हणाला, " पण आतां खावंदांची मर्जी काय आहे ? एकदां हुकूम ऐकला म्हणजे माझा जीव खालीं पडेल. "

" कसला हुकूम ? "

" या आतांच्या फिर्यादी संबंधाचा. "

" बापूसाहेबांकडून खरोखरच का तूं रुपये आणले होतेस ? "

" खोटें कशाला बोलूं ? आणि आपणापुढें तरी मला बोलण्याचें धाडस करवणार नाहीं. माझ्या हातांत रक्कम नसल्यामुळें मी त्यांची ती वेळेवर देऊं शकलों नाहीं; पण हुजुरकडे फिर्याद झालेली समजतांच आतां रुपये दिल्यावांचून गत्यंतर नाहीं असें वाटून बायकोचे दागिने गहाण ठेवून रुपये आणले आहेत. अपराध्याप्रमाणें अदालतींत येणें मला अगदीं कठीण वाटलें. कारण तसें केल्यानें माझा फारच अपमान होणार होता. शिवाय हुजुरच्या घरचीहि मीच हकीमगिरी करीत असल्यामुळें असें करण्यानें हुजुरलाहि खालीं पहावें लागलें असतें आणि खावंदांना तसें वाटूं नये अशी तर माझी इच्छा ! त्यामुळें तावडतोब रक्कम जमवून मी हा असा येथें आलों आहे. "

काजीसाहेब आपली दाढी गोंजारीत मनांतल्या मनांत प्रशंसा करीत म्हणाले " हें एक झालें; पण अब्रूनुकसानीच्या फिर्यादीबद्दल ? "

" आफसोस ! खावंद हें संभवेल तरी कसें ? माझ्या मित्राची ती पत्नी ! ! तिच्या बाबतींत मी कधीं तरी असें असभ्यपणाचें वर्तन करीन का ? खरोखर हुजुर, स्त्रिया म्हणजे फार भयंकर व्यक्ति असतात यांत संशय नाहीं. त्या काय पाहिजे तें करूं शकतील ! ! मी फक्त भीति दाखविण्यासाठीं तिला म्हटलें कीं, तूं अशी वारंवार तगादा कर-

ण्यासाठीं येऊं नकोस. तूं सुंदर आणि तरुण स्त्री असल्यामुळें तुझ्यावर कांहीं तरी संकटहि येण्याचा संभव आहे तेव्हां अशा तऱ्हेनें फिरणें बरोबर नव्हे. हेच काय ते माझे शब्द. यांत मीं तिचा अपमान, बेअब्रू आणि बेइज्जत ती काय केली. मी हें असें बोलतांच ती ' मी आतां काजीसाहेबांकडेसच जातें ' असें म्हणून तिथून ती जी फणकाऱ्यानें निघाली ती येथें आली."

काजीसाहेबाबरोबर, हकिमानें इतकें व अशा तऱ्हेचें भाषण कधींच केलें नव्हतें; पण इंदिरेच्या बाबतींत काजीसाहेबांचें चलबिचल झालेलें अन्तःकरण पहातांच त्याला असें चुरचुर बोलायला अवसान आलें. कारण आपलाच आतां विजय होणार अशी त्याची खात्री झाली. आणि झालेंहि तसेंच काजीसाहेब प्रसन्न चेहेऱ्यानें म्हणाले, " बरं बरं, तें मी आतां चांगलें समजलों. ती पुन्हां येथें आली, कीं, तिला दुसरी फिर्याद काढून घेण्याला सांगेन; बरें, पण तुम्हीं दोन हजार रुपये बरोबर आणले आहेत का ? "

लागलीच तो म्हणाला, "होय. माझे दोन मनुष्य ते पैसे घेऊन बाहेर उभे आहेत आपण ते सर्व रुपये आपणाजवळ ठेवून घ्यावे." असें म्हणून त्यानें बाहेर जाऊन रुपयांच्या थैल्या काजीसाहेबांपुढें आणून ठेविल्या.

त्या पाहून व त्या बाबतींत त्याची तत्परता पाहून ते हंसत म्हणाले, "तर मग तूं आजच जा. उद्यां नको; पण परवां याच वेळीं मला येऊन भेट, म्हणजे पुढें काय करावयाचें व या बाबतींत काय झालें तें मी तुला सांगेन."

हकिमानें आपला कार्यभाग झाला असें पाहून अत्यंत लीनपणानें सलामावर सलाम करीत तो तेथून बाहेर पडला, व हंसत हंसतच पुढील कार्यासंबंधानें विचार करीत घराकडे निघाला. काजीसाहेबांनींहि आपली नेचाची नळी तोंडांत धरून धूम्रपानाच्या प्राणप्रतिष्ठेला सुरवात करीत ते ' पुढें काय करावें ' या विचारांत गढून गेले. धुराच्या प्रत्येक झुरक्याबरोबर त्यांना नवी कल्पना आणि नवे विचार सुचत असत.

कांहीं वेळानें त्यांचें लक्ष जुलेखेच्या तसबिरीकडे गेलें; व ते आपल्याशींच बोलूं लागले, " जुलेखेची अनिंद्य सुंदर कांती पाहून मी एके-

काळीं अगदीं वेडा झालों होतों, आणि ठरविलें होतें कीं, जगांत हीच एक सौंदर्यशालिनी आहे; पण या इंदिरेला पाहतांच माझा तो भ्रम दूर झाला. इतकें कमनीय सौंदर्य तिलाहि नव्हतें. हिचे डोळे, केंस, गाल सगळेंच कांहीं तिच्याहिपेक्षां कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहे. हिचें बोलणें तर इतकें मंजुळ आणि मधुर आहे कीं, एकादा कुशल वादनपटु आपलें तंतुवाद्य तरी इतक्या मोहक रीतीनें वाजवील कीं नाहीं याचा संशयच वाटतो. असली ही परी इतक्या दुःखकष्टांत आणि दारिद्र्यांत पडावी याबद्दल मला फारच वाईट वाटतें, आणि असल्या परिस्थितींत असून तिचें अप्रतिम लावण्य कायम असल्याबद्दल तर अधिकच आचंबा वाटतो ! असलें दिव्य स्वरूप त्या दरिद्री आणि रोगी मनुष्याच्या भिकारड्या झोपडींतच व्यर्थ जायचें का ? हिला आपल्या स्वाधीन करून घेतां येण्याजोगा एकादा उपाय नाहीं पण प्रयत्न केल्यावर काय साध्य होणार नाहीं ? मारवाडासारख्या रुक्ष भूमीलाहि टवटवी आणतां येईल मग यांत असाध्य तें काय आहे ? सेतुबंधनानें समुद्रहि तरून जातां येतो. मी तर येथील एक बडा अधिकारी असून माझ्या अंगीं ' कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् ' सामर्थ्य आहे. प्रयत्न केल्यास माझें हें सुखस्वप्न कां बरें सफल होऊं नये ? या सुंदर गुलाबाचा मधुर सुवास मी घेणारच. "

स्वरूपानें मोहित झालेला काजी, न्यायान्यायाचा विचार करणारा न्यायाधीश मनोविकारांच्या तावडींत सांपडून मूढ बनला, 'परदारेषु मातृवत्' हें सूत्र विसरून तो इंदिरेकडे कामलोलुप दृष्टीनें पाहूं लागला, आणि अभिमानानें आणि अधिकाराच्या धुंदीनें धुंद झालेले काजीसाहेब सारासारविचार शून्य होऊन पुरे वेडे बनले.

ते एवढ्यांतच सावध होऊन जरी मागें फिरते, मनाला आवरून धरते, आणि या बाबतींत आपण केवढा अन्याय करीत आहों याचा सूक्ष्म विचार करते तर भावी अधोगतीपासून व अनर्थापासून त्यांचा पुष्कळ बचाव झाला असता; पण ' बुद्धिः कर्मानुसारिणी ' म्हणतात तें तरी खोटें ठरावें कसें ? असो.

हाफीज हकीम आपल्या उद्देशसाधनासाठींच म्हणून आला होता. इंदिरा काजीसाहेबांकडे गेली आहे हें समजतांच ती सामान्य व भित्री

बाई नव्हे हेंहि त्याला समजून चुकलेंच होतें. तेव्हां त्यानें मनांत असा विचार केला होता कीं, ' मुळची रक्कम आणि व्याज दिलें कीं,' आपण या देवघेवीच्या व्यवहारांतून मुक्त होऊं. पण तिनें केलेल्या अब्रुनुकसानी-च्या फिर्यादीपासून आपणाला बराच त्रास भोगावा लागेल त्याची आप-सांत तडजोड होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर आपला अपराध सप्रमाण सिद्ध होतांच कोरड्यांनीं आपली पाठहि चांगलीच फोडली जाईल. इंदिरा सुंदर आहे, अर्थात तिच्या नेत्रांत आलेलें पाणी काजीसाहेबांना पुराव्या-दाखल उपयोगी पडण्याला हरकत होणार नाहीं. अर्थात त्यांची सहानु-भूति तिच्याकडे वळली कीं, आपला अपराध सिद्ध होईल आणि मग— आणि मग काय—, " पण हा विचार मनांत येतांच हकिमाचें अंग थरारलें. स्त्रियांची बेइज्जत करणाऱ्याला काजीसाहेब फारच भयंकर शिक्षा करीत असत. तेव्हां पुढचा विचार करण्यासाठींच हकीम काजी-साहेबांच्या विश्रांतिमंदिराच्या दाराशीं आला होता.

पण तिथें येऊन तो कांहीं मिनिटें स्तब्ध उभा राहिल्यानंतर काजी-साहेबांच्या अंतःकरणाचा ठाव त्याला मिळाला. इंदिरेच्या सौंदर्यानें काजीसाहेबांच्या अंतःकरणांत प्रवेश केला असून ते तिच्या स्मरणांतच तळमळत आहेत हें त्यांच्या आत्मगत बोलण्यावरून हकिमाच्या लक्षांत येतांच तो आनंदित झाला. त्याला समाधान वाटलें, व ताबडतोब त्यानें मनांतल्या मनांत पुढील कारस्थानाची मांडणी करून धाडसानें पुढील नाटकाची नान्दी त्यानें दरवाजाबाहेरूनच केली, आणि तिचा परिणामहि पण त्याला हवा असाच झाला, हें पुढील कथानकावरून वाचकाच्या लक्षांत येईलच.

# प्रकरण ७ वें

———:o:———

## ' पत्नीचें कर्तव्यच तूं करीत आहेस. '

इंदिरा अत्यंत खिन्न मनानें गाडींतून खालीं उतरली आणि घरांत गेली. तिला वाटलें, " आपणाला परत येण्याला फारच विलंब झाला असें पाहून तिकडून किती तरी काळजी करायचं होईल, आणि मलाही अशी उदास चेहेऱ्यानें आलेली पाहून तर कदाचित् तिरस्कारहि करायचा होईल; ज्यांना एक घटकाहि वियोग सहन करवत नाही, त्यांना अशा आजारीपणांत, सर्वस्वी पराधीन स्थितींत किती बरें दुःख झालें असेल ? खायचं, उठायचं, बाहेर जायचं सर्व कांहीं दुसऱ्याच्या सहाय्यानें, मग मी जवळ नाहीं, आणि ती चांगली तीनचार तास ! हाय ! माझ्या हातून हा एकप्रकारचा अन्यायच झाला. मीं वेडेपणानं कांहीं तरी केलं माझ्या-वांचून तिकडची काळजी घेणारें दुसरें कोण आहे ! "

घरांत पाऊल ठेवतांच इंदिरेला सोडून नर्मदा केव्हांच दुसरीकडे निघून गेली होती. कारण बापूसाहेब रागावतील अशी तिलाहि भीति वाटत होतीच. हकिमाच्या घरून येण्याला इतका विलंब लागण्याचें कारण नव्हतें व गेल्यासारखें कामहि आलें नव्हतें; अर्थात बापूसाहेब रागावले तर त्यांना कांहीं उत्तरच देतां येणें अशक्य होतें. अर्थात नर्मदेला तोंड लपविण्यावांचून दुसरा उपाय सुचला नाहीं.

इंदिरेला बापूसाहेबांजवळ जाणें भागच होतें. अर्थात भीत भीत व पाय न वाजवितां ती त्यांच्या खोलींत गेली. तिचा चेहेरा या वेळीं अत्यंत खिन्न व शंकापूर्ण दिसत होता; पण आंत जातांच व आशापूर्ण नेत्रांनीं दरवाजाकडे पहात असलेल्या बापूसाहेबांच्या नजरेला ती पडतांच त्यांनीं आपले क्षीण हात पसरले व प्रेमळपणानें म्हटलें, " ये. ये. इंदिरे, मी तुझी किती वेळ तरी वाट पहात आहें. ये. तुझ्या वियोगांत गेलेली एक घटकाहि मला वर्षाप्रमाणें भासते ! "

तिरस्काराबद्दल पुरस्कार आणि निर्भत्सनेबद्दल प्रेमपूर्ण संभाषण, या सारख्या प्रेमाची, स्नेहाची आणि अपराधाच्या क्षमेची तुलना तरी करतां येईल काय ? खरोखर निरुपमेयच ती. क्षमा तिला कशाचीहि उपमा देतां येणार नाहीं. स्त्रिया सर्वांना असतात; पण असला प्रेमळ, दयाळू आणि क्षमाशील प्रियकर, सर्वांनाच मिळतो कीं नाहीं न कळे ! आगकाडीच्या सहाय्यानें जसा दिवा प्रज्वलीत होतो, तसेंच या वेळीं बापूसाहेबांच्या प्रेमळ वर्तनानें इंदिरेचें खिन्न झालेलें तोंड उज्वल झालें. तिचा सगळा शीण नाहींसा झाला व तिला एक प्रकारचा उत्साह आला. ती हळूच आपल्या प्रियकराजवळ बसून व त्याचे हात आपल्या हातांत घेऊन मंजुल स्वरानें म्हणाली " नाथ ! मला येण्याला आज बराच उशीर झाला गडे ! माझ्या या अपराधाबद्दल क्षमा करायची ना ? नाथ ! मी अगदीं किती भिऊन गेलें होतें पण ! आपणाला निष्कारण माझ्यासाठीं त्रास होईल व माझ्यावर रागावल्यामुळें आधींच असलेल्या दुखण्याच्या वेदना ज्यास्त होतील असं सुद्धां मनांत आलं ! पण मला कल्पनातीत क्षमा मिळाली ! खरंच माझ्यासारखी भाग्यवान मीच. खरंच गडे ! माझ्या वेळेवर न येण्यामुळें आपल्याला त्रास झाला असेल नाहीं का ? "

" झाला तर काय ! झाला थोडासा; पण तुला पहातांच माझें तें सगळें दुःख व त्रास एकदम अदृश्य झाला. जाऊंद्या, पण ज्या साठीं तू गेली होतीस त्याचें काय झालें ? तुझ्या या खिन्नतेवरून काम झालं नाहीं असंच मला वाटतं. कारण तो हकीम अत्यंत नीच व क्रूर आहे "

इंदिरेचा चेहेरा पुन्हां म्लान झाला, गेलेली खिन्नता फिरून आली, व पूर्ण चंद्राच्या षोडशकलांना मेघांनीं निस्तेज केलें पण कांहीं तरी उत्तर देण्यावांचून गत्यंतर नाहीं असं पाहून ती दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाली " नाहीं नाथ ! ज्या कामासाठीं मी गेल्यें होतें तें काम झालें नाहीं; इतकेंच नव्हे तर नवीनच एका संकटांत मी आतां सांपडलें आहे."

यावर बापूसाहेब हंसून म्हणाले " आणि तें संकट या तुझ्या अनिंद्य सुंदरतेमुळं आलें. असेंच ना ? मीं तर तुला या बाबतींत पूर्वीं सावधपणाची सूचना दिली होती ! जगांत सौंदर्याची जबाबदारी फारच मोठी आहे इंदिरे ! "

नंतर इंदिरेनें हळू हळू, झालेली सर्व हकीगत, हकिमाचा नीचपणा आणि आपण त्याबद्दल काजीकडे केलेली फिर्याद वगैरे एकूणएक प्रकार सांगितला. कांहीं सुद्धां शिल्लक ठेविलें नाहीं.

बापूसाहेबांनीं तें सगळें ऐकून घेतलें आणि एक मर्मान्तिक दीर्घ सुस्कारा सोडून क्षीण स्वरानें म्हटलें, "हें असें होणार याबद्दल मला पूर्वींच स्वप्न पडलें होतें,व त्यामुळें बाहेर न पडण्याबद्दल मी तुला पुनः पुन्हा बजावून सांगत होतों. कनक आणि कांता या दोन वस्तूमुळें जगांत जितके अनर्थ होत आहेत तितके दुसरे कशानेंहि होत नाहीं. अर्थात हें असें झालें यांत आश्चर्य वाटण्याचें व दुःख करण्याचें काय कारण ? काय सांगूं इंदिरे ! मी हा असा बिछान्यावर पडलों ग ! नाहींतर हकिमाच्या या नीचपणाबद्दल आधीं काजीकडे न जातां त्याला तेथल्या तेथेंच खेटरानें झोडपला असता. काय करूं लाडके ! दुर्बल आणि गरीब यांचें हें असेंच व्हायचें ! असो क्रमानें येणाऱ्या बऱ्यावाईट स्थितीचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य कुणालाहि नाहीं. होणार होऊन जाणार. ब्रह्मलिखीत कसें चुकेल ? पण लाडके ! त्या दयाळू ईश्वराला आपण कधींहि विसरतां कामा नये. आज त्याच्याच कृपेनें एवढ्या भयंकर संकटांतून तुझी सुटका झाली. नाहींतर हें माझें अमोलिक रत्न मला पुनरपि मिळालें नसत आणि हें मनांत अले म्हणजे इंदिरे ! " पुढें त्यांच्यानें बोलवेना. त्यांनीं इंदिरेच्या दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेतलें आणि ते पुरुषासारखे पुरुष असूनहि मुकरुदन करूं लागले.

आपल्या प्रियकराच्या अपरिमेय प्रेमाचा अनुभव इंदिरेला यापूर्वीं अनेकवार आला होता. पण आजच्या अनुभवानें ती अगदींच मुग्ध झाली. पतिप्रेमाच्या बाबतींत आपण अत्यंत भाग्यवान आहों अशी तिची खात्री पटली. विपत्तिरूपी कसोटीच्या भोंगावर मनुष्याची खरी परीक्षा होत असते. सुखाच्या दिवसांत अनेकांची सहज सहानुभूती व प्रेम आपणाला कांहींही प्रयास न करतांना मिळतात; पण दुःखाच्या दिवसांत दुःखिताचे अश्रु पुसणारे सहृदय मित्र फारच थोडे आढळतात.

कांहीं वेळानें इंदिरा एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाली,' नाथ ! मीहि आज जगाच्या चालीरीतींचें बरेंचसें महत्त्वाचें शिक्षण संपादन केलें आहे,

आणि हें अयाचित दान मी माझ्या भावी आयुष्यांत कधीं तरी विसरेन कीं काय याचा संशयच आहे. पण आपण मला या झालेल्या अपराधाबद्दल क्षमा करायची ना? ”

बापूसाहेबांनीं आपल्या सुंदर व प्रेमळ पत्नीचें चुंबन घेऊन सद्गदित स्वरानें म्हटलें “इंदिरे,क्षमा करण्याचा आणि शिक्षा करण्याचा अधिकारी मी नव्हे. माझें कर्तव्य तुला सुख कसें मिळेल आणि तूं सुखी कशानें होशील याबद्दलचा विचार करण्याचें आहे; पण लाडके, मी हें माझें कर्तव्य बजावीत नाहीं का ? पत्नीचें कर्तव्य तूं करीत आहेस याबद्दल माझी खात्री आहे. पण पतीचें महान् कर्तव्य माझ्या हातून अल्पप्रमाणानें तरी पाळलें जात आहे का ? भयंकर दारिद्य हें आपल्या कठोर आणि निर्मम नेत्रांनीं माझ्याकडे टवकारून पहात आहे. पूर्वींच्या सुखाच्या साम्राज्यांत आतां स्मशानासारखी काळजीरूपी चिता धडाडत आहे ! ! हा वाडा म्हणजे केवळ स्मशान बनला आहे ! मी इतका पंगू व रोगी बनलों आहें कीं, यांतून मी चांगला बरा होऊन उठेन, असें मला मुळींच वाटत नाहीं. या रोगांतच माझा अंत होणार ! ! आणि माझी अशी स्थिति झाली, म्हणजे तुझें कसें होईल या काळजीनें मला रात्रंदिवस चैन पडत नाहीं ग ! पुढचे तुझे हाल मला आज दिसत आहेत. तूं लहानपणापासून सुखांत वाढलेली आणि श्रीमंतींत लोळलेली आहेस. दुसऱ्याची मर्जी राखून वागण्याची तुला संवय नाहीं, दारिद्य म्हणजे कसें असतें याचाहि तुला अद्यापचांगलासा अनुभवहि आलेला नाहीं. मग अशा स्थितींत आज माझें मोडकेंतोडकें असलेलें तुजवरचें आश्रयरूपी छत्र नाहींसें होतांच व या अप्रतिम सौंदर्याला कलंकित दृष्टीचे तीव्र चटके बसूं लागतांच, माझ्या लाडक्या इंदिरे ! तूं कुठें उभी राहशील ! हाय ! माझ्यानें ती आतां कल्पनाहि करवत नाहीं—” याहि वेळीं बापूसाहेबांच्यानें पुढें बोलवेना. दारुण मर्मवेदनांनीं त्यांचा शब्दरोध झाला व पुन्हां ते अश्रु गाळूं लागले. या वेळीं त्यांची स्थिति अत्यंत शोचनीय झाली होती.

पण इंदिरेनें आपल्या लुगड्याच्या पदरानें त्यांचे डोळे पुसले व त्यांच्या तोंडाजवळ आपलें तोंड नेऊन मधुर स्वरानें म्हणाली, “असं काय बरं नाथ ! आजची चालते घडी ती आपली. पुढचं काय होईल नी

काय नाहीं याचा विचार आतां कशाला, असं आपणच ना सांगत होतां ? मी व आपण कांहीं दोन नाहींत अर्थात् आपला व माझा आत्मा एकच आहे. फार काय माझा आत्मा आपणच. अर्थात आपलें अस्तित्व असेपर्यंतच माझें अस्तित्व नाहीं का ? आपल्या मागें मी राहीन असं आपल्याला वाटतं तरी कसं ? शिवाय सुख जसं कायमचं रहात नाहीं तसंच दुःखाहि कायमचं रहात नाहीं. हे दुःखाचे दिवस निघून जातांच पुन्हां आपल्याला सुखाचे दिवस येतील; आपलं सर्वस्व जरी गेलं तरी आश्रयस्थान तरी आहेना. तर मग या शांतिनिकेतनांतच आम्हीं सर्व दुःखाला विसरून आनंदांत राहूं या. बाहेरच्या जगाशीं आपल्याला काय करावयचं आहे. आम्ही असेपर्यंतच हें जग. या जगाचा पालक आणि पोषक आम्हांलाच कसा बरें विसरेल ? आम्ही रात्रंदिवस त्याला हांक मारीत असतांहि त्याला आमची आठवण होणार नाहीं का ? होईल तो दयाळू आहे त्याच्याच चिंतनांत आम्ही दिवस घालवूं या. नाथ ! आतां आपण असं दुःख करूं नये गडे ! मी आहें ना आपल्याजवळ ! "

इंदिरेनें आपल्या नवऱ्याला अशा तऱ्हेचें भावगर्भ व्याख्यान कधींहि ऐकविलें नव्हतें; पण आज प्रसंगच तसा आल्यामुळें हृदयाच्या आवेगासरशीं ती आपल्याला सुचेल तें बोलत गेली. आपण काय बोलत आहों याचें तिला भानच राहिलें नाहीं. तिच्या हृदयांतून तो एक जोराचा आणि स्वयंभू झराच उत्पन्न झाला होता, असें म्हटलें तरी चालेल.

बापूसाहेबांनींहि आपल्या पत्नीच्या तोंडून असें भाषण कधींहि ऐकलें नव्हतें. जणूं काय आपलें समाधान करण्यासाठीं ईश्वरच तिच्या हृदयांत संचार करून बोलत आहे असेंच त्यांना वाटलें, आणि त्या भाषणानें त्यांच्या निराशापूर्ण दुःखी मनाला थोडासा उत्साह वाटला.



# प्रकरण ८ वें.



## हकीमाचें औषध.

दिवस गेला आणि रात्र आली. सुखी अगर दुःखी मनुष्याच्या तोंडा-कडे पहात काळ केव्हांहि थांबत नाहीं. तो आपला ' चक्रनेमिक्रमेण ' चाललाच आहे.

मनुष्य जेव्हां तात्पुरता मोहाला अगर हट्टाला बळी पडून एखादें कार्य करून बसतो तेव्हां कदाचित् कृतकार्याचें—अथवा कृतकर्माचें फल भोगण्याला त्याची तयारी झालेली नसते आणि अशाच स्थितींत त्याच्या कृतकर्माचें कटु फळ चाखण्याचा जर त्याला प्रसंग आला, तर तो घाबरतो आणि ' अरेरे ! मीं त्या वेळीं असें केलें नसतें तर बरें झालें असतें. ' असे उद्गार काढतो.

इंदिरेच्या बाबतींतहि कांहींसा असाच प्रकार झाला होता म्हणायला हरकत नाहीं. सुशिक्षित, हिताहितविचारक्षम आणि जगाला चांगल्या रीतीनें ओळखणारे पुरुषहि केव्हां केव्हां अशा बाबतींत फसून कधींहि सुधारतां न येणाऱ्या चुका करीत असतात. मग इंदिरेसारख्या सरल मनाच्या शठचरित्रानभिज्ञ आणि साध्या तरुणीच्या हातून अशा प्रकारची चूक झाली, यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं; पण तशी चूक तिच्या हातून झाली.अर्थात सृष्टीच्या कधींहि क्षमा न मिळणाऱ्या कायद्या-प्रमाणें शिक्षाहि मिळणारच.

नर्मदेच्याच केवळ सांगण्यानें, हकिमानें केलेल्या अपमानाबद्दल इंदिरा जर सूड उगवायला तयार झाली नसती व रुपये न मिळाल्यामुळें झालेल्या निराशायुक्त रागाचें दमन करून सरळ घराकडे आली असती तर भविष्यकाळीं होणारा अनर्थ कदाचित टळला असता, आणि तिला इतकी कठोर शिक्षा मिळालीहि नसती; पण होणारापुढें कुणाचा इलाज चालणार ? तारुण्याचा आरंभ, अंगांत खेळणाऱ्या रक्ताचा अत्यंत उष्ण-

पणा आणि त्यांतच नर्मदेसारख्या आदूरदर्शी दासीची सल्ला व उत्तेजन मग काय विचारतां ! आत्मसंयमनाचा तिथें काय पाड लागणार ? आणि पुढें काय होईल याचा तरी विचार करण्याची शुद्ध रहाते कशी ?

व्हायचें तें झालें. इंदिरेनें स्वतःच्याच कृतीनें स्वतःला शत्रु करून घेतलें. अर्थात कृतकर्माचें फळ भोगल्यावांचून सुटका कशी होणार ? दगडावर कोरलेलीं अक्षरें कधीं तरी पुसलीं जातील का ? नाहीं. अविचारानें एवढी लहानशी गोष्ट केली तरी तिचें त्यामानानें मिळणारें कटु फळ भोगावेंच लागतें, मग इंदिरा तरी या नियमाला कशी चुकविणार ? वेळ प्रतिकूळ असली म्हणजे ' करायला जावें एक तर होतें भलतेंच ' असें जें म्हणतात तें यालाच.

काजीसाहेबांना इंदिरेचें दर्शन होतांच त्यांचें मन एकदम विचलीत झालें आणि त्याच वेळीं त्यांना हकिमसाहेबानीं—प्रयत्नांतीं कांहींच असाध्य नाहीं हें—औषध चारलें. मग काय ! उल्लू बनलेले काजी हकीमाच्या या रामबाण औषधानें अगदींच पागल बनले, हें सांगावयास नकोच.

स्वरुपाचा मोह फारच भयंकर असतो व तो वणव्याप्रमाणें हां हां म्हणतां सर्वांगांतील रक्त व्यापून विजेप्रमाणें चमकत राहातो; त्यामुळें शांतपणा व तज्जनित विचार यांना अवसरच मिळत नाहीं. सौंदर्यरूपी झालेल्या वासना मनाला अन्य विचाराकडे वळूंच देत नाहीं. व सखल बाजूकडे जाणारा पाण्याचा ओघ ज्याप्रमाणें मागें परतणें अशक्य आहे त्याप्रमाणेंच या अधोमार्गाकडे वळलेलें मनहि स्वतःचें स्वतःला मागें परतणें अशक्य वाटूं लागतें.

काजीसाहेब मनांतल्यामनांत जेव्हां इंदिरेची व जुलेखेची तुलना करूं लागले तेव्हां इंदिराच त्यांना अत्यंत सुंदर वाटली व सर्व मनाचा ओघ तिकडेच वळला. इंदिरेवांचून सर्व कांहीं त्यांना त्याज्य व तिरस्करणीय वाटूं लागलें; पण अद्याप त्यांचें मन मात्र पूर्ण विवेकशून्य बनून तें पशुकोटीला पोंचलें नव्हतें. अजून त्याच्यांत मनुष्यत्व वास करीत होतें.

त्यांनीं मनांत विचार चालविला होता, ' आपणाला दुसऱ्याच्या स्त्री संबंधानें विचार करण्याचा अधिकार नाहीं. आपण न्यायाधीश आहों.

परस्त्रीसंबंधीं पापवासना धरणाऱ्याला आपण शिक्षा करतों व त्याबद्दल चोंहोंकडे माझी फार प्रसिद्धि आहे. आणि अशा स्थितींत जर मी असलें नीच कृत्य केलें तर लोक मला काय म्हणतील ? आजपर्यंत मिळविलेली सगळी कीर्ति नाहींशी होऊन नांवाला कलंक लागेल. इंदिरेच्या बाबतींत काय तो योग्य न्याय करून तिला रस्त्याला लावावी म्हणजे आपण मोकळे झालों. त्या बाबतींत जास्त विचार करण्याचें आपणाला कारणच नाहीं.

इत्याद्यनेक विचारांनीं काजींचें मलिन अंतःकरण निवळत चाललें होतें, पण याच वेळीं हकिमसाहेबांनीं आपलें जालीम औषध त्यांना पाजलें. हकिमाचें जर त्यांना दर्शन झालें नसतें तर या प्रसंगीं त्यांनीं योग्य तोच न्याय केला असता; पण दुष्ट मनुष्याच्या श्वासोच्छ्वासानेंहि ज्या ठिकाणीं वातावरण प्रक्षुब्ध होऊन प्लेगासारख्या महाभयंकर रोगांची उत्पत्ति होते, त्या ठिकाणीं मनुष्याला त्या सैतानाचेंच साहचर्य मिळालें तर मग काय ! 'न भूतो न भविष्यति ' असाच प्रकार व्हावयाचा. हकिमाचें दर्शन व कानमंत्र ऐकतांच काजीसाहेबांची नजर बदलली. त्यांचे तें औषध पोटांत जातांच पूर्वीच्या सात्विक विचारांना त्यानें पार हांकून लावलें आणि काजीसाहेब इंदिरेच्या बाबतींत पुरे वेडे बनले. त्यांना सारासार विचार राहिला नाहीं !

हकिमानें लावलेला हा गुप्त अग्नि सहज विझण्यासारखा नव्हता. उलट तो दशांशाप्रमाणें झपाट्यानें वाढणारा होता. काजीसाहेबांचें मनुष्यत्व त्यानें जाळून टाकलें व त्यांना मूर्तिमंत वासनेचें भूत बनविलें. व त्यांचे विचारहि पिशाचांना सैतानांना लाज आणणारे असेच बनत चालले. विचारांनीं लुप्त होत चाललेली इंदिरेची आठवण त्यांना आतां पुनः सतावून सोडूं लागली व क्षणभरहि विवेकाला जवळ करावें असें त्यांचें पिशाचरूपी मन त्यांना सांगेना,

स्वरूपोन्माद व्याधीचीं सर्व लक्षणें काजीसाहेबांच्या प्रकृतींत पूर्णपणें दृग्गोचर होऊं लागलीं इंदिरा आपल्या नजरेला पुनः केव्हां पडते असें त्यांना होऊन गेलें, व त्यासाठीं त्यांनीं तिला अदालतींत हजर राहण्याबद्दल पुनः समन्स काढलें. तारीख दुसऱ्या दिवशींची लावली व दुसरा

दिवस केव्हां उगवतो आणि इंदिरा आपल्याला केव्हां दिसते असें त्यांना होऊन गेलें. त्यांचा तो उतावीळपणा लहानसहान कामांतहि दिसून येऊं लागला !

---

# प्रकरण ९ वें.



## ' हजर होण्यावांचून दुसरा उपायच नाहीं. '

इंदिरा आणि बापूसाहेब तिसरे दिवशीं सायंकाळीं आपल्या भावी दुखःद स्थितीबद्दल विचार करीत बसलीं होतीं इतक्यांत बाहेरून काजिसाहेबांच्या शिपायाचा स्वर ऐकूं आला " घरांत कोण आहे ? "

समोरच्या खिडकीचीं तावदानें उघडींच होतीं. त्या शिपायाचा तो गंभीर आणि हुकमी आवाज ऐकतांच दोघांचींहि तोंडें एवढीशी झालीं. आतां आपणावर काय प्रसंग येतो आणि काय नाहीं याचाच त्यांना उलगडा पडेना. इंदिरा तर अतिशयच भ्याली.

पण ती वेळ विचार करीत बसण्याची नव्हती. बापूसाहेब एक दीर्घ सुस्कारा सोडून व इंदिरेचा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाले, " पहा इंदिरे, तुझ्या उतावळेपणाचा परिणाम आज शिपाईरुपानें दरवाजाबाहेर उभा आहे. ही मोंगलाई असल्यामुळें न्यायाचे नाटक कसें काय असतें हें तुला माहित आहेच. खरोखर या नसत्या भानगडींत पडण्यापेक्षां मी जरी उपासांत मेलों असतों तरी पुरवलें असतें ! जिवंत असतांना तरी निदान तुझे हाल पहायला नको होते ! "

इंदिरा काय उत्तर देते ? ती कांहींच बोलली नाहीं. कारण ती या बाबतींत खरोखरच अपराधिनी होती. उतावळेपणा करून काजीकडे न जातां ती सरळ घरीं येऊन बापूसाहेबांच्या विचारानेंच पुढील विचार ठरवती तर असलें भयंकर संकट आलें नसतें. अल्प चुकीचा भयंकर परिणाम म्हणतात तो हा असाच.

इंदिरा कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून त्यांनीं तिच्या मनांतील भाव जाणला. नंतर त्यांनीं दासीला हाक मारून सांगितलें, ' बाहेर आलेल्या शिपायाला सांग, मालक आजारी असून त्यांना उठण्याचें सामर्थ्य नाहीं. तुला काय सांगायचें आहे तें सांग म्हणजे मी उत्तर देतों.'

दासी बाहेर गेली व कांहीं वेळानें आंत येऊन तिनें एक ' लेख-आदेशपत्र ' बापूसाहेबांच्या हातांत दिलें. त्यांत पुढील मजकूर लिहिलेला होता. " बापूसाहेबांची पत्नी इंदिरा हिला या आदेशपत्राच्याद्वारें कळविण्यांत येत आहे कीं, तिनें आपल्या दासीला बरोबर घेऊन उदईक आमच्यापुढें हजर व्हावें. शिवाय आम्हीं एवढें सांगतों कीं, तिच्या फिर्यादीची चवकशी उघडया न्यायकचेरींत न होतां आमच्या खासगी विश्रांतिमंदिरांत केली जाईल व या योगानें तिच्या गोषाला मान दिला जाईल. तिच्या मानमान्यतेला व अब्रूला धक्का पोहोंचेल असें येथें कांहींहि होणार नाहीं. दुसरे ती न येतां तिच्याबद्दल तिच्या नवऱ्यानें जर येथें उदईक हजर राहाण्याचा प्रयत्न केला तर फिर्यादीची चवकसी करणें जड जाईल. तरी तसें करूं नये. जर कांहीं कारणानें योग्य वेळीं तिला हजर राहातां येणें शक्य नसेल तर तिनें त्या बाबतींत आगाऊ कळवावें, व तसें ती न करील तर खोटी फिर्याद केल्याबद्दल तिला जबाबदार धरून योग्य तें शासन केलें जाईल. "

आदेशपत्र वाचून झाल्यानंतर बापूसाहेब इंदिरेला म्हणाले, " आतां पुढें काय करावयाचें ? "

" मी सायंकाळीं कळवितें कीं, ' आजारी असल्यामुळें मला हजर राहातां येणार नाहीं. "

" पण या काजीसाहेबांचा स्वभाव किती कडक आहे, हें तुला माहीत नाहीं. तो तुझ्या प्रत्येक हालचालीवर लक्ष ठेवून आहे आणि तूं आजारी नाहींस हेंहि पण तो जाणतो; मग सांग पाहूं, हें तुझें पत्र पाहतांच त्याला राग नाहीं का येणार ? आणि त्याचा राग किती भयंकर असतो याची तुला कल्पनाहि नसेल ! "

" आपणाला जर जातां आलें असतं तर–"

" हो पण मी हा असा पडलेला मला ! जागच्याजागीं उठूनहि बस-

वत नाहीं शिवाय कसाबसा तेथपर्यंत गेलों तरी माझें तो कांहीं ऐकून घेणार नाहीं. जर त्याच्या मनांतून या प्रकरणाचा योग्य तो निकाल करायचा असता तर तूं गेलीस त्याच वेळेला तो तसें करूं शकता. नसत्या भानगडी उपस्थित करावयाच्या असल्यामुळें तर तो तुला तिनतिनदां बोलवीत आहे. शिवाय तो हकीम कांहीं स्वस्थ बसला आहे असेंहि तूं समजूं नकोस. त्यानेंहि काजीसाहेबांना कांहीं तरी कानमंत्र दिलाच असेल."

"तर मग आतां कसं होईल?" इंदिरा अगदींच रडकुंडीस येऊन म्हणाली.

"व्हायचं काय! तुला हजर होण्यावांचून दुसरा उपायच नाहीं. नर्मदेला बरोबर घेऊन तूं ठरल्यावेळीं तेथें जा. नशिबांत जें काय व्हायचें असेल तें कधींहि चुकत नसते. या वेळीं प्रत्येक घटकेला होणाऱ्या अकल्पित गोष्टीबद्दल रडत न बसतां आपल्यावर ईश्वराचें कृपाछत्र आहे असें मानून आलेल्या प्रसंगाला तोंड दिलें पाहिजे. तूं आतां आपला सर्व भार परमेश्वरावर ठेवून जा. तो केव्हांहि कुणाचें अकल्याण करणार नाहीं. न जाऊन चालण्यासारखें नाहीं. कारण तो काजी महाभयंकर माणूस असल्यामुळें केव्हां काय प्रसंग आणील याचा नेम सांगवत नाहीं. तेव्हां "आलीया भोगासी असावें सादर देवावरी भार घालूनीया हेंच खरें."

झालें, इंदिरेनें नाइलाजानें नर्मदेसह जाण्याचें ठरविलें; पण तो दिवस आणि ती रात्र तिला मुळींच चैन पडलें नाहीं. 'पुढें काय होईल' या एकाच विचारानें ती अस्वस्थ झाली होती.

---

# प्रकरण १० वें.



## कोळसा कितीहि धुतला तरी काळाच!

आपण आतां इंदिरेला विचार करण्याला येथेंच सोडून ज्या पिशाच्चरूपी हाकिमामुळें आज तिला इतका त्रास पडत होता व ती महासंकटांत पडली होती तो हाफीज हकीम काय करीत आहे, तें आतां पाहूं.

इंदिरेला आलेल्या आदेशपत्राप्रमाणें, काजीसाहेबांकडून हकिमालाहि एक आदेशपत्र आलें होतें व योग्य वेळीं हजर होतों म्हणून त्यानें सहीहि करून दिली होती; पण पहिल्या आदेशपत्राला पाहून जसा तो भिऊन गेला होता, तसा या पत्राला पाहून तो भ्याला नाहीं. उलट, आपलें नाटक चांगलेंच रंगाला येत आहे याबद्दल त्याला आनंद झाला.

तें आदेशपत्र आपल्या लिहिण्याच्या टेबलावर ठेवून, हकिमसाहेब त्याला पाहून वारंवार हसत होता. त्याला मनांतल्यामनांत कसल्या तरी अवर्णनीय आनंदाच्या गुदगुल्या होत असाव्यात असेंहि पहाणाराला सहज वाटलें असतें. मोठ्या प्रफुल्लित मुद्रेनें त्यानें आपल्या लहानग्या दाढीला गोंजारीत व मिशाला पीळ भरीत जवळच्या फडताळांतून पानदान आणि सुरापात्र काढून आपल्या बैठकजिवळ ठेवलें व आरशांत पाहून आंतल्याआंत हसत हकिमसाहेबांची स्वारी एक ग्लास घेऊन आपल्या गादीवर बसली व तिनें सुवासिक मदिरेचे ग्लासांवर ग्लास आणि मधुन मधून पानाचे विडे खाण्याला सुरवात केली. स्वतःच्या अपरिमित आनंदाबद्दल स्वतःलाच त्यांनीं ही अपूर्व मेजवानी दिली होती म्हटलें तरी चालेल.

मदिरेचे ग्लासावर ग्लास पोटांत जातांच आपले दिव्यनेत्रच एकदम उघडले, कीं काय, असें हकिमाला वाटू लागलें. त्यानें इंदिरेच्या सौंदर्याचे विषयलालसेच्या दृष्टीनें बरेच दिवस ध्यान चालविलें होतें, पण त्या ध्यानाची सांगता होऊन फळहि पदरांत पडण्याची वेळ आली असतां त्याला भयंकर संकटांत पडावें लागलें असल्यामुळें, आतां इंदिरा आपणाला कशी मिळेल, हा ध्यास सुटून इंदिरेचा सूड कसा उगवतां येईल याचीच त्यानें जुळवाजुळव करण्याला सुरवात केली होती. लोभपूर्ण प्रणयाचें रूपांतर सुडांतच व्हावयाचें, मात्र तसें तें न झालें तर आश्चर्य !

एकदां त्याला वाटे, ' इंदिरा साध्वी असून फारच शहाणी असल्यामुळें ती आपल्या कारस्थानाला फसावयाची नाहीं, तरी पण माझा अशा प्रकारें अपमान करणारीला मी अशी सोडणार नाहीं. मी कसेना कसें करून तिला माझ्या जाळ्यांत ओढणार, आणि मग ती पातिव्रत्याचा कसा काय टेंभा मिरवते तें पाहूं !

आज ग्लासांवर ग्लास पोटांत जातांच त्याला दिव्यज्ञान प्राप्त होऊन आपल्या मनांतलि विचार खुल्या आवाजानें आपल्या मनाशींच पण बऱ्याच मोठ्यानें बोलून दाखविण्यास त्यांनीं सुरवात केली. ते म्हणाले, " एक रुपया, म्हणजे माझ्या हृदयाजवळची एक धमनी असें मी समजतों. आणि असे दोन हजार रुपये जेव्हां तूं अप्रबुद्ध पोरी काजीमार्फत माझ्याकडून घेतले आहेस, इतकेंच नव्हे तर, मला संकटांत लोटून अब्रूलाहि महाग केलें आहेस त्याअर्थीं मी आतां तुझा पुराच हाडवैरी बनलों. या तुझ्या दांडगटपणाचा सूड उगविण्याकरतां मी कांहीं करावें लागलें तरी करीन; पण जिवंत आहें तोंपर्यंत तुझी पाठ सोडणार नाहीं. छायेप्रमाणें मागून फिरत राहून तुझा छळ करीन. हा काजीहि बराच माझ्या तावडींत सांपडला असून तोहि तुझ्या स्वरूपाला भुलून उल्लू बनला असल्यामुळें त्याला मी जसा नाचवीन तसा तो आतां नाचेल. इंदिरे, तुझ्या पाठीमागें लागलेला हा ग्रह तुला चांगलाच हात दाखवील आणि तो माघार घेऊं लागला तर मी त्याला उत्तेजन देईन. पाहूं तरी तुझा हा उसना दिमाख किती वेळ चालतो तें ! या मुनिराबादचा तो आज मालक असल्यासारखाच असल्यामुळें पाहिजे तें करूं शकेल. त्याचा हात धरण्याला प्रत्यक्ष बादशहासुद्धां तयार होणार नाहीं इतकी त्याची चहूंकडे मानमान्यता व अधिकार आहे. तुला तो हां हां ह्मणतां आपलीशी करील आणि मग त्यावेळीं त्याचवेळीं माझ्या प्रयत्नाची ओळख देऊन—"

आपल्या मदिरेच्या निशेंत येऊन स्वारी जेव्हां आपल्या भावी पराक्रमाचें मोठमोठ्यानें वर्णन करूं लागली तेव्हां त्यांची पत्नी, दिवाणखान्यांत काय प्रकार चालला आहे तो पहाण्यासाठीं तेथें आली व तिनें त्याचें बरेंचसें बोलणें ऐकलें, तेव्हां ती कांहींशा तीव्र स्वरानें ह्मणाली, " वेड्याप्रमाणें हातवारे करीत व तोंड वेडेंवांकडे करीत काय चालला हा प्रकार?"

पत्नीला पहातांच हकिमसाहेबांची धुंदी उतरली. ते आपल्या पत्नीला फारच भीत असत. प्रत्यक्ष सैतान येऊन उभा राहिला असतां तरी ते इतके भ्याले नसते; पण पत्नीला पहातांच व तिचे ते शब्द ऐकतांच त्यांनीं तोंड वासून तिच्याकडे पहाण्यास सुरवात केली, आणि हळूं हळूं

आपला सबंध चेहरा त्यांनीं तिच्याकडे वळविला. तेव्हां आपली पत्नी आपणावर फारच रागावली आहे, असें त्यांना स्पष्टपणें आढळून आलें.

हकीमसाहेब आपल्या सामर्थ्यानुरूप पत्नीला खूष ठेवण्याला चुकत नसत. ते ती मागेल त्या वेळीं व मागेल तें आणून देत; पण इतकें चाललें असतांहि ही आपणावर कां रागावते याचें त्यांना एक कोडेंच पडत असे. इंदिरा तशी कां आणि आपली पत्नी अशी कां, याचा त्यांना उलगडाच होत नसे; आणि मनुष्याचें नेहमीं असेंच आहे. त्याला स्वतः-च्या डोळ्यांतील मुसळ मुळींच दिसत नाहीं व आपला दोष कोणता हें तर त्या पेक्षांहि कळून येत नाहीं. हकीमसाहेबांचें दुष्ट वर्तन त्यांच्या पत्नीला आवडत नसे व त्यामुळेंच ती त्यांच्यावर नेहमीं रुष्ट असे; पण आपलें वर्तन वाईट आहे, हेंच मुळीं हकीमसाहेबांच्या लक्षांत येत नसे.

हाफीजनें इंदिरेला घरीं बोलवून ज्या दिवशीं तिचा अपमान केला व तिच्यावर कठीण प्रसंग आणला, त्या दिवसापासून त्याच्या पत्नीनें—माशुम बिबीनें—ओळखलें कीं, 'आपल्या पतिराजाचें गुण ज्यास्तच पाझरूं लागले असून त्यांची दुष्ट बुद्धि वाढत चालली आहे; आणि तेव्हांपासूनच ती आपल्या नवऱ्याच्या वर्तनावर अप्रत्यक्ष नजर ठेवूं लागली. आजचें आपल्या नवऱ्याचें भाषण तर तिला इतकें कटु वाटलें, कीं, ती नुसती नागिणीसारखी खवळली; कारण सहनशक्तीलाहि कांहीं तरी मर्यादा आहेच. आज तिला आपला राग आवरेनासा झाला. इंदिरेच्या बाबतींत पुन्हां हे, कारस्थानें रचूं लागले हें ऐकतांच तिला आपल्या नवऱ्याचा फारच तिटकारा आला. आपल्या प्रश्नाला त्याच्याकडून कांहींच उत्तर येत नाहीं हें पहातांच ती पूर्वींपेक्षांहि तीक्ष्ण स्वरानें म्हणाली, " कां आतां कां अगदीं तोंडाला खीळ बसली ! मघांपासून चांगलं मोठ्यानं बरळायचं आणि आतां कां बोलतां येईना ? मी जितकी म्हणून तोंड झांकून राहतें तों आपले ज्यास्तच धिंगाणे सुरू ! ती बापूसाहेबांची इंदिरा म्हणजे आपल्याला प्यारीजान वाटली कीं काय ? कुलीन व साध्वी स्त्रीबद्दल असं कांहीं तरी बरळणं चांगलं का ? एखाद्यानं ऐकलं तर तो काय म्हणेल ? "

हकीमसाहेब मंत्रानें भारलेल्या सर्पाप्रमाणें स्तब्धच होते. त्यांना काय

बोलावें तेंच सुचेना; इतकेंच नव्हे, तर त्यांना वाटलें, कीं, "एका फिर्यादीचा कसाबसा निकाल लावला; पण आतां या न्यायाधिशाला कसें वाटेला लावावें ? बरें कांहीं तरी बोलून समजूत न करावी तर हें प्रकरण ज्यास्तच वाढायचें ! " मदिरापानानें उत्पन्न झालेली धुंदी पार उतरली होतीच; पण पुढें काय बोलावें हें बराच वेळ न सुचल्यामुळें ते स्तब्ध होते. नंतर बऱ्याच वेळानें त्यांना वाचा फुटली व ते बोलूं लागले, माझी प्यारी जर कोणी असेल तर ती तूंच ! इंदिरा ही माझ्या मित्राची पत्नी आहे; पण ती इयें कां आलीस आणि तिच्याबद्दल मी असे कां उद्गार काढले हें तूं समजून घेतल्यावांचून उगाचच अकांडतांडव करतेस त्याला काय ह्मणावें बरें ? आधीं मी काय सांगतों तें ऐकून तरी घे ! "

" हं चालूं द्या. माझं आपल्या बोलण्याकडे अगदीं पूर्ण लक्ष आहे. कारण आपल्यावांचून दुसरीकडे माझं लक्ष जाणंच शक्य नाहीं. " बिबीसाहेब बेफिकीरपणानें उद्गारल्या.

" बापूसाहेबांचे मी दोन हजार रुपये देणें होतों व ते द्यावे असें माझ्या मनांत असून मी ते जमविलेहि होते; पण ' ते कां दिले नाहींत ' ह्मणून नाहीं विचारलंस ? " पत्नीला खुष करण्यासाठीं हकीमसाहेबांनीं आपलें लांब लचक चऱ्हाट वळायला सुरवात केली.

" माझं लक्ष आहे. चालूं द्या. " पत्नीचें हें बेफिकीर उत्तर ऐकून हकीमसाहेबांनीं निमूटपणें पुढें बोलण्यास सुरवात केली. ते म्हणाले, " ते रुपये खर्च करून मी तुला एक उत्तमशी मोत्यांची माळ घेणार होतों. कर्ज काय दिलें असतें मागाहून; पण ती बाई फारच निर्भीड—"

" हं तिच्यासंबंधानें असली भाषा वापरूं नका. बिचारी दारिद्र्यानें गांजली असतांहि व दुसरा कशाचा आधार नसतांहि आपलें येणें असलेलें कर्ज मागूं नये वाटतं ? तिचा नवरा आजारी असून बिछान्याला खिळून गेला आहे. हें तर आपण पाहिलंच. मग ती मागायला आली तर निर्भीड काय ? वा ! फारच छान् ! आणि आपण तिची—" नालस्ती करतां ? वा ! बरं पुढें ?

" अग पण ऐक तरी ! ती कांहीं ' अविचारी ' नाहीं. तिनें माझ्या

विरुद्ध काजीसाहेबांकडे फिर्याद केली आणि मला निमूटपणें तुझ्या मोत्यांच्या माळेसाठीं ठेवलेले रुपये—"

" द्यावे लागले. असंच ना ? कांहीं हरकत नाहीं. मला मुळीं असा दुसऱ्याला त्रास देऊन त्या माळेपासून सुखच झालं नसतं. ती फिर्यादीला गेली हें आपणाला वाईट दिसलं; पण तिला आपण घरीं बोलवून—पुरुषासारखे पुरुष असून—तिची बिचारीची बेइज्जत करण्याची पाळी आणलीत ती ? ती फिर्यादीला गेली हें दिसलं; पण आपलं तें नीच कृत्य बरोबर होतं का ? दुसऱ्याच्या बायकांवर वाईट नजर ठेविली ह्मणजेच पुरुषांना खरें पुरुषत्व येतं वाटतं ! ज्या तुमच्या मित्रानं गरजेच्या वेळीं तुह्मांला मदत केली त्याच्या बायकोशीं तुह्मी केलेलें वर्तन बरोबर होतं का? एवढ्यानं तरी आपले डोळे उघडूं देत. खोड्याच्या कपाळीं गोटाच ! कुणींहि कधीं वाईट कर्म करूं नये. वाईटापासून व नीच कृत्यापासून कधींच कुणाला सुख होत नसतं. उलट खोटीं कृत्यें करणारा माणूस भयंकर संकटांत पडतो आणि मग ' मी असं केलं नसतं तर बरं झालं असतं ' असं तो पश्चात्तापपूर्वक ह्मणतो. ह्मणून ह्मणतें, तो वाईट मार्ग आतां तरी टाकून द्यावा—"

हकीमसाहेबांना हा उपदेश कुठला रुचायला ? जसजशी त्यांची पत्नी ज्यास्त ज्यास्त उपदेश करूं लागली तसतसें त्याचं पित्त उठत चाललं. देवाचें नांव घेतलें ह्मणजे पिशाच्चांना जसा कपाळशूळ उठतो तसाच यावेळीं हकीमसाहेबांचा कपाळशूळ चाळवला आणि शेवटीं ते कंटाळून व त्रासून ह्मणाले, " जा. जा बरें तूं इथून. बायकांनीं आपले धंदे पहावे त्यांना आह्मां पुरुषांच्या धंद्यांत ढवळाढवळ करायला कोण सांगतो ? आमच्या भानगडी आह्मी पाहून घेऊं. त्यांत बायकांनीं मन घालूं नये. "

" समजलं समजलं. मला सगळं कांहीं ज्ञान आहे. पति जर अधर्मानं आचरण करूं लागला आणि नीतीपासून त्याचं पाऊल ढळूं लागलं तर पत्नीनेंच त्याला ताळ्यावर आणलें पाहिजे. पत्नीला तो अधिकार आहे. निदान मी तरी हा अधिकार बजावल्यावांचून राहणार नाहीं. पतीनं हवं तसं वागावं आणि पत्नीनें तें डोळे मिटून पहावं हें मला तरी निदान

कोळसा कितीदां धुतला तरी काळा तो काळाच. हकीमसाहेबांना त्यांच्या पत्नीनें इतका बहुमोल उपदेश केला; पण त्यांच्या मनावर त्याचा कांहींसुद्धां परिणाम झाला नाहीं. स्वभावधर्म ह्मणून प्रत्येकाला असतोच, आणि तो सहसा बदलत नाहीं. अर्थात असल्या उपदेशानें हकीमसाहेबांचें मन बदललें नाहीं यांत आश्चर्य कसचें ?

ते कांहीं वेळ स्वस्थ राहिले आणि नंतर मनाशींच ह्मणाले, " कांहीं होवो. माझ्यावर यःकश्चित् एका स्त्रीनें फिर्याद लावावी आणि मी ती निमूटपणें सोसावी ? छे. असें कधींहि होणार नाहीं. माझ्या या अपमानाचा आणि झालेल्या निराशेचा मी भयंकर सूड उगवून तिचा अभिमान कितीसा चालतो तें पहाणारच ! आणि यांत मला काजीसाहेबांसारखा सामर्थ्यवान सर्प आयताच मिळाला आहे. माझा मंत्र त्याला बरोबर लागूं पडला असल्यामुळें मीं त्याला चांगलाच भारला आहे. आतां मी नाचवीन तसाच तो नाचेल आणि मी खूण करीन त्याप्रमाणें तो दंशहि करील. बायकांच्या उपदेशाला ऐकून सूड उगविण्याची ही आलेली अमूल्य संधी मी घालवूं होय ? छे. हा हाफीज इतका मूर्ख नाहींच नाहीं.''



# प्रकरण ११ वें



## न्यायाचें नाटक !!

आजचा दिवस इंदिरेच्या दृष्टीनें फारच संकटाचा व महत्त्वाचा होता. कारण आज सायंकाळीं तिला धर्मावतार काजीसाहेबांपुढें हजर जाहलें पाहिजे होतें. त्यांच्याइतका अधिकार त्यावेळीं तेथें कुणाचाहि नव्हता. प्रत्यक्ष निजामशहानेंहि न्यायाच्या बाबतींत आपण हात घालावयाचा नाहीं असें ठरविलें होतें. कारण काजीसाहेब अत्यंत निस्पृह असून निःपक्षपातानें न्याय करणारे व खरें शोधून काढण्यांत अत्यंत कुशल असे होते.

इंदिरा कशी बशी आपल्या मनाची समजूत करीत होती. ती मनांत ह्मणाली, " नर्मदा, बरोबर असल्यामुळें मला फारशी काळजी करण्याचे कारण नाहीं. शिवाय संशय घेण्यासारखें असें, काजीसाहेबांचें कोणतेंहि वर्तन अद्याप माझ्या नजरेला पडलें नाहीं. तेव्हां निव्वळ कल्पनेनें निरनिराळीं हिडिस चित्रें काढून मीं आपली भीति ज्यास्त कां वाढवावी बरें?

इंदिरेनें असा बराचसा विचार करून, दुपारीं, काजीसाहेबांकडे जाण्याची तयारी केली. तिनें जरी साधाच पोषाख केला होता तरी तिचें नैसर्गिक सौंदर्य तेवढ्यानेंहि ज्यास्तच खुलून दिसत होतें. कारण 'जातीच्या सुंदरांना कांहींहि चालतें,' आणि तें त्यांचें सौंदर्य वाढवीत असतें. अस्तु.

पोषाख वगैरे करून झाल्यानंतर ती बापूसाहेबांचा निरोप घेण्यासाठीं त्यांच्या खोलींत आली. रुपयांसाठीं आपल्या पत्नीनें न्यायालयांत जावें असें बापूसाहेबांना वाटत नव्हतें; पण परिस्थितीच अशी बिकट आली होती, कीं, तिला 'जा' अगर 'नको' ह्मणणें त्यांच्या स्वाधीन राहिलें नव्हतें. हकिमाशीं आपलें शत्रुत्व यावें हेंहि त्यांना पसंत नव्हतें; पण आतां आपल्या पसंतीची अगर नापसंतीची वेळ राहिली नव्हती हें ते समजत होते. आपण रोगी आपला रोग वाढला तर पत्नीचें समाधान करायला अगर औषध द्यायला हकीम उपयोगीं पडला असता; पण

त्याला आपण आज आपला उघड शत्रु करीत आहों, हा विचार मनांत येतांच त्यांना फार वाईट वाटे; पण हातचा बाण सुटल्यावर तो परत घेतां येणार कसा ? आपण हकीम व काजीसाहेब यांच्यासारख्या बड्या लोकांना शत्रु करून बसलों आणि तेंहि अशा पंगू स्थितींत, तर आपलें पुढें कसें होणार ! पण हे सगळे विचार आतां सुचून काय उपयोग ? वेळ गेली.

बराच वेळ विचार करून बापूसाहेब आपल्या पत्नीला ह्मणाले, " इंदिरे ! आतां शेवटीं एक गोष्ट सांगतों ती चांगली लक्षांत ठेव. जर हकीम हे आमचे रुपये देण्याला असमर्थ आहे असें वाटलें, तर तूं मुकाट्यानें रुपयांसंबंधाची फिर्याद काढून घे. यःकश्चित पैशांसाठीं, माझ्या असल्या या रुग्णावस्थेंत त्याच्यासारख्या वैद्यकींत निष्णात असणाऱ्या मनुष्याला शत्रु बनविणें योग्य नव्हे ! "

इंदिरेनें हें कबूल केलें व ती तेथून जड अंतःकरणानें बाहेर पडली. तिच्याहि मनांतून रुपयांसंबंधाचें भांडण मिटवावें असें होतें. ती काजीसाहेबांजवळ फिर्यादीला गेली ती केवळ रुपयांसाठीं नसून त्यानें तिचा केलेल्या अपमानाबद्दल तिला अत्यंत राग आला ह्मणून त्या रागाच्या भरांत ती तिकडे गेली होती. असो.

योग्य वेळीं इंदिरा, आपल्या नर्मदेसह घरांतून बाहेर पडली आणि काजीसाहेबांच्या वाड्यांत आली. त्यांनीं या चवकशीची वेळ अशी नेमली होती, कीं, त्या वेळीं दुसऱ्या कोणाचेंहि त्यांच्याकडे काम येण्यासारखें नव्हतें; व त्यावेळीं कांहीं जरूरीचें काम आलेंच तर तें तहकूब ठेवावें अशी त्यांनीं आपल्या हाताखालच्या लोकांना आज्ञा केली होती. तसेंच दासीलाहि सांगून ठेविलें होतें, कीं, ' इंदिरा येतांच तिला फक्त एकटीला माझ्या दिवाणखान्यांत घेऊन ये. किंचितहि विलंब लावूं नकोस. ' अर्थात इंदिरा तेथें येतांच काजीसाहेबांकडे जाण्याला तिला कांहीं अडचण पडली नाहीं व खोळंबाहि झाला नाहीं. ती एकदम येऊन काजीसाहेबांकडे हजर होऊं शकली.

अवगुंठनवती इंदिरा त्यांच्या नजरेस पडतांच किंचित् स्मित करून ते तिला समोरच्या कोंचाकडे बोट दाखवून म्हणाले, " बसा तेथें बसा इंदिराबाई ! " पण तिनें बसण्याचें नाकारलें. मोठ्या माणसासमोर

आणि त्यांतहि परक्या माणसासमोर हिंदू स्त्रिया केव्हांहि उभ्याच राहा-तात. सन्मान देण्याचा तो एक गुण त्यांच्या हाडींमासींच खिळलेला असतो म्हटलें तरी चालेल. अर्थात या वेळीं इंदिरेला कोंचावर बसणें अवघड वाटणें साहजिक होतें. पण तिनें तसें उभें राहाणें काजीसाहेब यांना पसंत न पडून ते म्हणाले, " अहं, असें नाहीं. आज तुमचें काम झालें पाहिजे ना ? तर मग एकंदर काम आटपायला फारच वेळ लागेल-चट्‌कन् काम आटपणार नाहीं, आणि असें बराच वेळ उभें राहाणें योग्य नव्हे. सभ्य स्त्रियांशीं मीं कसें वागावें हें मी जाणतों. तुम्हीं अन-मान न करतां बसा कोचावर, तुम्हीं कोंचावर बसल्यावर चवकशीच्या कामाला सुरवात होईल. "

काजीसाहेबांच्या मर्जीनुरूप वागणें इंदिरेला भाग असल्यामुळें ती नाइलाज म्हणून तेथील एका लहानशा कोंचावर बसली; पण तिला अवघडल्यासारखें वाटत होतें.

कांहीं वेळानें काजीसाहेब गंभीर स्वरानें म्हणाले, " बाई ! तुमचे दोन हजार रुपये मीं वसूल केले असून ते या वेळीं माझ्या ता-ब्यांत आहेत. "

इंदिरेनें हें बोलणें ऐकतांच तिला आश्चर्य वाटलें. ती वीणाझंकृत स्वरानें म्हणाली, " जनाब मेहेरबान ! खरोखरच आपण गरीबांचे वाली आहांत. "

" पण इंदिराबाई, तुम्हीं सगळी हकीगत ऐकून घ्या. मला हे रुपये वसूल करण्यासाठीं फारसे श्रम करावे लागले नाहींत. माझें बोलावणें व नोटीस पहातांच तो हकीम भ्याला आणि त्यानें ताबडतोब ते सर्व रुपये माझ्याकडे आणून हजर केलें. " काजीसाहेब आपली दाढी गोंजारीत गंभीरपणानें म्हणाले.

इंदिरेनें हळूंच उत्तर दिलें, " आपल्या दिगंत कीर्तिपराक्रमापुढें प्रत्यक्ष काळहि थरथर कांपूं लागेल, गाई आणि वाघ एके ठिकाणीं पाणी पिऊं लागतील आणि नुसत्या खुणेनें आपण या राज्याचीहि उलथापालथ करूं शकाल! मग हा हकीम भ्याला यांत आश्चर्य कसचें ! "

या प्रशंसेनें काजीसाहेबांची कळी [illegible] खलली ते [illegible] चेहे-

त्यानें म्हणाले, " आणि असं पहा बाई ! तुमचे रुपये तुम्हांला देण्यासाठीं हे येथें पिशव्यांत ठेविलेच आहेत; पण तुमच्या दुसऱ्या फिर्यादी संबंधानें काय तो निकाल केला पाहिजे आणि ती तर मुख्य बाब आहे. एका सभ्य व प्रख्यात गृहस्थाच्या बायकोचा एका तसल्याच सभ्य गृहस्थानें बेइज्जत करण्याचा प्रयत्न करावा हें मला सहन होणारें कृत्य नव्हे.

काजीसाहेब, असल्या अपराधाला फारच भयंकर शिक्षा करतात हें इंदिरा जाणून होती, आणि त्यामुळें या पुढें होणाऱ्या प्रकाराबद्दल तिच्या अंगावर शहारे आले. पुढचा प्रकार होऊं नये, असेंच तिला वाटूं लागलें.

आणि आश्चर्य हें, कीं, इंदिरेच्या मुद्रेवरून चाणाक्ष काजीसाहेबांनीं तिच्या अंतःकरणांतील विचार ओळखले. ते कांहीं वेळानें अत्यंत गंभीरपणाचा आव आणून म्हणाले, " बाई ! हकिमाला जर क्षमा करावी असें तुम्हांला वाटत असेल, तर ती तुम्हीच करूं शकाल. मी अडथळा करणार नाहीं. तरी पण न्याय हा झालाच पाहिजे. याच दिवाणखान्याच्या मागील खोलींत, हकीम बसलेला आहे. तुम्ही त्याला क्षमा करीत असलां तर माझें बोलणें नाहीं. पण तसें जर तुमच्या मनांतून नसेल तर त्या उद्धट मनुष्याला मी चांगलीच शिक्षा करणार आहें. तसेंच त्यानें हात जोडून तुमची क्षमा मागितली तरच ती तुम्ही त्याला करा, अशी माझी तुम्हांला सुचना आहे. " असें म्हणून काजीसाहेबांनीं आपल्या एका चपराशाला हांक मारली व तो येतांच त्याला म्हटलें, " जा. हाफीज हकिमाला मी येथें बोलावीत आहें म्हणून सांग. "

हाफीज हकीम, काजीनें पूर्वीं तालीम दिल्याप्रमाणें तयारीनेंच मागच्या खोलींत बसला होता. चपराशी तेथें जातांच तो समजला व ताबडतोब काजीपुढें येऊन हजर झाला.

तो येतांच काजीसाहेब त्याला म्हणाले. " या बाईचें येणें असलेले रुपये तुम्ही माझ्या स्वाधीन केलेंतच व ती फिर्यादहि संपली आहे; पण आतां तूं तिचा अपमान केल्याबद्दल काय जाब द्यायचा तो दे. "

म्हणाले, " जनाब ! मेहेरबान धर्मावतार ! यांचा अपमान होईल असें मीं कांहीं केल्याचें मला आठवत नाहीं. मित्राची पत्नी म्हणून सलगीनें चार कमजास्त शब्द बोललों असेन इतकेंच, यांत जर त्यांना आपला अपमान झालासें वाटत असेल, तर मी क्षमा मागायला तयार आहें. "

नंतर काजीसाहेब इंदिरेच्या तोंडाकडे पाहून गंभीरतेनें म्हणाले, "बाई हा हकीम आपल्या हातून झालेल्या चुकीबद्दल पश्चात्तापयुक्त अंतःकरणानें क्षमा मागण्याला तयार आहे. जर त्याला क्षमा करावयाची असेल तर मला सांग. नसेल तर मी याला मला योग्य वाटतील तितके फटके मारण्याची शिक्षा करणार. कारण यानें माझ्या दृष्टीनें फारच मोठा गुन्हा केला आहे."

ही भयंकर शिक्षेची कल्पना तिला पूर्वीं झालीच होती, शिवाय बापूसाहेबांच्या आज्ञेचेंहि तिला स्मरण झालें. तेव्हां तिनें त्याला क्षमा करण्याचें ठरवून हात जोडून काजीसाहेबांना म्हटलें, "जनाब, आपली योग्य न्याय निवडण्याबद्दलची कीर्ति असल्याप्रमाणें आपण आज योग्य असाच खरा न्याय केला आहे, तेव्हां हकीमसाहेबांना मी आतां क्षमा करतें. "

इंदिरेच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच काजीसाहेब संतुष्ट झाले; पण आपण न्यायाचे मूर्तिमंत अवतार आहों, हें दाखविण्यासाठीं ते म्हणाले, "तुमचा आग्रहच असल्यास मी याला क्षमा करतों; पण थोडीतरी शिक्षा दिल्यावांचून माझें समाधान होणार नाहीं. कारण असें कांहीं तरी केल्यानें यापुढें तरी निदान असा अपराध करतांना त्याला विचार करावा लागेल." असें म्हणून ते रुष्ट मुद्रेनें हकिमाकडे पाहून म्हणाले, "हाफीज ! तूं एक बराच नांवाजलेला हकीम असल्यामुळें मोठमोठ्यांच्या अंतःपुरांतहि तुला नेण्यांत येतें, इतकेंच नव्हे तर माझ्या स्वतःच्या घरींहि तुझेंच औषध घेतलें जातें. अर्थात या बाईचा तूं अपमान केलास ही गोष्ट जाहीर होणें हें तुझ्या प्राप्तीच्या दृष्टीनें किती घातक आहे, याचा तूंच विचार कर. दुसरें, आपल्या मित्राचाहि तूं भयंकर अपराधी आहेस, तेव्हां या बाईनी जरी तुला क्षमा केली आहे तरी तूं बापूसाहेबांच्याहि क्षमेला पात्र झाला पाहिजेस. याकरितां त्यांच्याकडे जाऊनही क्षमा माग. ते जोंपर्यंत ' तुला क्षमा केली आहे, असें लेखी लिहून देणार नाहींत तोंपर्यंत तूं माझा कैदी आहेस हें विसरतां कामा नये. त्यांचें ' क्षमापत्र ' येथें आणून हजर कर. "

ही आज्ञा ऐकून हकीम हात जोडून म्हणाला, हुकुमाप्रमाणें मी आतांच तें 'क्षमापत्र मिळविण्याच्या तजविजीला लागतों. झालेल्या प्रकाराबद्दल मला खरोखरच पश्चात्ताप होत आहे. यासाठीं मी असाच बापूसाहेबांकडे जाऊन त्यांचें ' क्षमापत्र ' मिळवितों."

असें म्हणून बाहेर जाण्यासाठीं म्हणून तो दरवाजापर्यंत गेला; पण पुन्हां कांहीं आठवल्यासारखें करून मागें फिरला आणि लीनपणानें म्हणाला, 'जनाब ! मी माझ्या मित्राच्या ऋणांतून संपूर्णरूपानें मुक्त झालों आहें, अशा बद्दल त्यांच्या तोंडून मला दोन शब्द ऐकवाल काय ?

हें ऐकतांच काजीच्या हुकमाची वाट न पहातां इंदिरा उभी राहिली आणि हकिमाला उद्देशून म्हणाली, " हकीमसाहेब ! मनुष्य नेहमीं चुकीला पात्र आहे. आणि तुह्मीं माझ्याशीं जो गर्हणीय व्यवहार केला तोहि तसाच, चुकीनें केलेला आहे असें मी मानतें. तसेंच धर्मावतार काजीसाहेबांसमोर मी सांगतें, कीं, आमचें आतां तुम्हीं कोणत्याहि प्रकारचें कसलेंहि देणें नाहीं. तसेंच तुह्मीं आज आमच्या घरीं येऊन आपल्या उपकारकर्त्यांची क्षमा मागाल अशीहि मी आशा करतें."

इंदिरेचे हे मंजुल बोल ऐकून काजीसाहेब अगदीं खूष होऊन गेले. ते हंसतच म्हणाले " इंदिराबाई ! ईश्वरानें जशी तुम्हाला सौंदर्यवती केलें आहे तशी त्यानें तुमच्या हृदयांत अपूर्व सद्‌गुणावलीचाहि सांठा करून ठेविला आहे. हा प्रकार अशा तऱ्हेनें मिटला गेल्याचें पाहून मला फारच समाधान वाटलें आहे, आणि तुमच्यासारख्या एका सुशील, सरलहृदय तरुणीवर मी अल्पस्वल्प उपकार करूं शकलों याबद्दल मला अत्यंत सुख वाटत आहे. बरें आतां आपण हे आपले रुपये मोजून घ्या."

काजीसाहेबांच्या सूचनेप्रमाणें इंदिरेनें त्या थैल्या पहाण्यास सुरवात केली. एखादी थैली मोजावी व मग त्या सर्व नर्मदेमार्फत बाहेर नेऊन मोजाव्या असा तिनें विचार करून ती एक थैली मोजूं लागली. यावेळीं तिच्या तोंडावर बुरखा होताच. ती रुपये मोजीत असतां काजीसाहेब तिला म्हणाले, "तुम्हाला बुरखा घेऊन चांगले मोजतां येणार नाहींत, आणि रुपये तर नीट पाहिले पाहिजेत, तेव्हां तुम्हीं बुरखा काढून ते तपासा. मी येथें असतांना

बुरखा बाजूला करण्याचा कदाचित तुम्हाला संकोच वाटेल, करितां मीच कांहीं वेळ येथून बाहेर जातों. तुम्ही रुपये नीट पाहून मोजून घ्या."

इतकें बोलून काजीसाहेब बाहेर गेले व निश्चित मनानें, बुरखा बाजूला ठेवून इंदिरा ते रुपये मोजूं लागली.

पण हाय ! इंदिरे ! ! तूं कां असें आपलें आवरण बाजूला सारलेंस ? सौंदर्याला अनेक शत्रू असतात, हें तुला अजूनहि समजलें नाहीं काय ? तुला हें सौंदर्य आणि त्याला विसंगत असा तुझा हा भोळेपणा तुला वारंवार संकटांत लोटण्याला कारण होतो याचें तुला विस्मरण पडलें काय ?

इंदिरा ज्या वेळीं अगदीं लक्षपूर्वक रुपये मोजण्यांत गढून गेली होती, त्याच वेळीं मागील एका खोलींत बसून ' धर्मावतार ' काजीसाहेब, अगदीं अन्यायाचें असें एक काम करण्यांत गढून गेले होते. अत्यंत प्रयासानें प्राप्त झालेल्या द्रव्याच्या मोजदादीमुळें इंदिरेच्या चेहेऱ्यावर जेव्हां हास्याचे तरंग उमटत होते त्याच वेळीं एका अप्राप्त कामांत आपण विजयी झाल्याबद्दल समाधानतेनें व एकाग्रतेनें कसलें तरी अपूर्व निरिक्षण करण्यांत काजीसाहेब आपले भान विसरून गेले होते.

ज्या खोलींत काजीसाहेब सध्यां बसले होते, ती खोली अगदीं गुप्त असून तेथें बसल्यानें इंदिरेकडे पहाण्याला अगदीं सोपें जात असे. ' न्यायी ' म्हणून मिरविणारे धर्मावतार इंदिरेचें मुक्त सौंदर्यपान करण्यांत गढून गेले होते, व आपण हें अत्यंत नीच व धर्माविरुद्ध काम करीत आहों हें त्यांच्या गांवींहि नव्हतें. इंदिरा तर या बाबतींत अगदींच अज्ञान होती, हें सांगावयास नकोच.

रुपये मोजून झाल्यावर तिनें ते पिशवींत भरले, व आतां आपण जावें व नर्मदेला, या थैल्या गाडींत नेऊन ठेवण्यास सांगावें म्हणून ती बाहेर पडूं लागली; पण तिला पुनः वाटलें, कीं, ज्या काजीनें आपणावर एवढे उपकार केले, त्याना हें सांगितल्यावांचून व त्यांचा निरोप घेतल्यावांचून बाहेर जाणें योग्य नव्हे.

इकडे काजीसाहेबांचेंहि काम संपलें, व इंदिरा आपला निरोप घेण्यासाठींच बहुधा थांबली असावी असें वाटल्यावरून ते घाई घाईनें त्या गुप्त खोलींतून बाहेर पडून इंदिरा असलेल्या खोलींत आले. काजीसाहेब

अकस्मात आलेले पहातांच इंदिरेनें घाईघाईनें बुरखा घेतला, व आपल्या या असावधतेबद्दल ती थोडीशी खिन्नहि झाली.

पूर्णचंद्र मेघाआड झांकला गेला असें पहातांच काजीसाहेब चमकले. त्यांच्या हृदयांतहि काळोख पडला. त्यांना भ्रांति उत्पन्न झाली व आपण आतां कांहीं तरी बोलावें म्हणून ते इंदिरेला म्हणाले " इंदिराबाई ! तुमचे मनोरथ आतां पूर्ण झाले ना ? तुम्ही जर त्या हकिमावर दया करून त्याला क्षमा केली नसती, तर मी त्याला होता, कीं, नव्हतासा करून टाकणार होतों. जाऊं द्या. तुम्हांला ज्या योगानें आनंद होईल तेंच मला करावयाचें होतें. "

काजीसाहेबांचें हें अप्रासंगिक व असंबद्ध बोलणें ऐकून इंदिरा थोडीशी चमकली; पण आपणाला कांहीं संशय आला आहे, असें दिसूं न देतां ती अशाच स्वरानें म्हणाली, " जनाब ! वाईट विचारानेंच मनुष्य आपल्या स्वभावाला मुकतो. हे रुपये म्हणजे, आमच्या फारतर आठदिवसांच्या खर्चाचे आहेत. पूर्वींचा प्रत्येक आठवडा जगड्व्याळ खर्चांत चालला होता. आज दैवप्रातिकूलतेमुळें आम्हीं दारिद्र्य भोगीत आहों, ' तरी पण हाकिमानें, जर सभ्यपणानें, ' मी पैसा देण्याला असमर्थ आहें, असें आम्हांला जाणविलें असतें तर आम्हीं कधींहि त्याच्याकडे पैशांची मागणी केली नसती; पण तो एक सभ्य मनुष्य त्यानें माझा जो आपमान केला तो अगदीं असह्य झाला, आणि काजीसाहेब, तुम्ही माझा न्याय करण्याच्या बाबतींत जें उदार धोरण दाखविलेंत त्याबद्दल मी आपले फारच आभार मानतें. आतां घरीं जाण्याची मी परवानगी घेते. कारण मी लवकर घरीं गेलें नाहीं तर ते फारच काळजी करूं लागतील."

तिचे ते मधुर बोल ऐकून काजीसाहेबांची स्थिति अत्यंत चमत्कारिक झाली व ही आतां गेल्यावर सर्व मनोरथ जागचे जागीं राहातील या विचारांनीं ते बेभान होऊन एकदम तिचा हात धरून म्हणाले " तुमचें आपल्या नवऱ्यावर फारच प्रेम असतें नाहीं का ? "

पण काजीसाहेबांचा हस्तस्पर्श होतांच इंदिरेच्या आंगावर शहारे आले. रागानें आणि भीतीनें तिचें सर्वांग कांपूं लागलें; पण या वेळीं ती अगदींच असहाय होती. तरी पण तिनें प्रसंगावधानानें आत्मसंयमन केलें आणि ती

शक्य तितक्या शांत स्वरानें म्हणाली, " जनाब ! आर्य नारी आपलें सर्वस्व पतीलाच समर्पण करीत असतात. पतीवांचून आपलें निराळें अस्तित्व आहे असें त्या मानीतच नाहींत. हिंदुस्त्रियांची पतिभक्ती फारच जाज्वल्य असते व ईश्वर त्यांचा नेहमींच पाठिराखा असतो. आणि प्रभु पाठिराखा असल्यामुळें आर्य स्त्रियांना केव्हाच कसलीहि भीति वाटत नाहीं. पतिभक्ति हेंच पत्नीचें कर्तव्य असा आम्हां आर्य स्त्रियांचा नियम असल्यामुळें आम्हीं प्रत्यहि याबद्दल मोठा अभिमान बाळगित असतों. पतीच्या मागें आमचें जिवन क्षणभरहि राहात नाहीं. "

काजीसाहेबांची समजूत होती कीं, ' इंदिरा साधारण स्त्रियांप्रमाणें पैशाला भुलणारी असेल ' पण आतांचें तिचें भाषण ऐकून त्यांची खात्रीच झाली, कीं, ' हि साधारण स्त्री नसून हिच्यांत अनन्य साधारण असें पतिव्रतेचें तेज झळकत आहे. अर्थात आपणाला वाटलें होतें, तितकें हें काम सोपें नाहीं. नवऱ्याला व स्वतांला इतकी हीन व असहाय्य स्थिती आली असताहि हिनें आपलें तेज कायम ठेवलें आहे अर्थात या बाबतींत आपणाला बराच त्रास सोसावा लागणार—'

इंदिरा बरीच रागावली आहे, हें काजीसाहेबांनीं तिच्या तीव्र स्वरावरूनच ताडलें व तूर्त आपला हेतु व्यक्त करतां नये असा विचार करून ते सौम्य स्वरानें तिला म्हणाले, "इंदिराबाई ! तुमची परीक्षा पाहण्यासाठींच मी असें बोललों. आतां मला कळून आलें, कीं, ईश्वरानें तुम्हांला अंतरबाह्य तेजस्वी बनविलें असून तें आपलें तेज सूर्यासारखें तीव्र व पवित्र आहे. आणि हें लक्षांत आल्यावरून तुमच्या बाबतींत मी अगदीं मुग्ध झालों आहें; पण सध्यांची तुमची घरगुती स्थिती लक्षांत येतांच मला फार दुःख वाटतें. आणि पुढें आपली स्थिती काय होईल; याचा विचारहि मनांत आणवत नाहीं. कारण बापू ज्या रोगानें आजारी आहेत असें मी ऐकतों, तो रोग केव्हां कसा बळावेल तें सांगतां येणार नाहीं. ईश्वरानें तसा प्रसंग तुमच्यावर आणूं नये; पण इंदिराबाई, तसा प्रसंग आलाच तर तुम्हीं काय कराल बरें ! "

पतीशीं एकतानतां पावलेली इंदिरा काजीसाहेबांच्या या प्रश्नानें चमकली. असा प्रश्न त्यांनीं कां विचारला, हें तिच्या लक्षांत आलें नाहीं.

अशुभ भवितव्य वर्तवून सहानुभूति दाखविण्याच्या या नवीन पद्धतीला ती अगदीं अपरिचित होती. त्यामुळें तिला थोडासा रागहि आला.

तरी पण पुन्हां तिनें बोलण्याचें साहस केलें व ती स्वाभिमानपूर्ण पण किंचित् तीव्र स्वरानें म्हणाली, "ईश्वराच्या कृपेनेंच मी आज सौभाग्याचे दिवस अत्यंत आनंदांत घालवित आहें. मी एक सच्चरित् सद्गुणी आणि उदात्त अंतःकरणाच्या व्यक्तीची पत्नी असून, तो मान मला मिळाल्याबद्दल मी मोठी भाग्यवान् आहें, असें मला वाटत आहे. माझे हृदयेश्वर, सौंदर्य, सत्गुण आणि पत्नीवत्सलता या तीन्ही बाबतींत अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे असून त्यांची बरोबरी कोणाच्यानेंहि करावावयाची नाहीं. या भयंकर दारिद्र्यांतहि आम्हीं दोघे आनंदानें व अत्यंत प्रेमानें असतों. त्यांची सेवा करणें व त्यांच्यावर एकनिष्ठ प्रेम करणें हेंच माझें खरें सुख असल्याबद्दल माझी खात्री आहे. कारण, इतर कोणत्याहि गोष्टीपासून मला तितका आनंद होत नाहीं. ही निष्कंटक, स्वार्थहीन, आणि सौख्यकारक अशी मीलनशृंखला विच्छिन्न करावी, असें त्या दयाळू जगन्नाथाला वाटलें, आणि होऊं नये अशी गोष्ट झाली तर मी आनंदानें पति मागून जाईन, एक पळभरहि मागें राहणार नाहीं. फार काय काजीसाहेब, ज्या दिवशीं त्यांचें मृत्युवृत्त तुम्हीं ऐकाल, त्याच दिवशीं माझाहि देह तुंगभद्रेच्या अथांग डोहांत बुडाल्याची बातमी तुम्हांला ऐकावी लागेल! त्यांच्या मागें माझे प्राण या मृत्युलोकांत राहण्याला लायक नाहींत. असाच याचा अर्थ! समजलें ना!"

काजीसाहेब थक्कच झाले. त्यांना काय बोलावें तेंच सुचेना. इंदिरेनें एकवार तिरस्कारानें त्यांच्या तोंडाकडे पाहिलें, आणि ती तेथून बाहेर पडली. आपणाला बराच विलंब लागल्याचें पाहून तिला फार काळजी वाटू लागली कारण 'घरीं काय अवस्था झाली असेल' ही तिला चिंता होतीच. 'नर्मदेला पाठवून रुपये न्यावे' असा विचार करून घाई घाईनें ती नर्मदा होती त्या खोलींत गेली.

* * *

इंदिरेची दृश्यमूर्ति निघून गेली; पण काजीसाहेबांना तिची अदृश्य मूर्ति दिसतच होती. कारण, दृश्य विषय नाहींसा झाला तरी त्याच्या बाब-

तींत मनावर उठलेले निरनिराळे तरंग कांहीं नाहींसे होत नाहींत. विण्याचा झंकार थांबला तरी त्याचा मधुर प्रतिध्वनी ऐकणाऱ्याच्या कानांला बराच वेळ आनंदवीत असतो.

मनुष्याच्या मनामध्यें ' विवेक ' नांवाची एक महाशक्ति आहे. जर ही विवेकवाणी नसती, तर जगांतलि कोणतेंहि पापकार्य इतकें कष्ट-कारक व अनुतापदायक झालें नसतें. पहावें तिकडे मनुष्य नरकांत जाण्याची धडपड करीत असतो, चोंहोंकडे लालसेचा विकटाग्नी प्रज्ज्वलीत झालेला असतो; पण ' विवेक सुधा ' ही त्या प्रत्येक अविचाराला शांत करीत असते.

काजीसाहेब, आज तर भयंकर लालसावन्हीच्या ज्वालांनीं होरपळत होते. इंदिरेच्या सौंदर्यदर्शनानें क्रमशः ते आत्मत्वाला विसरत चालले होते. त्यांना पुन्हां पुन्हां वाटे, कीं, त्या सुरसुंदरीला या हृदयाशीं धरल्या-वांचून आपल्या या यातना कमी होणार नाहींत. ज्या वेळीं इंदिरा तेथें होती त्याच वेळीं त्याना असें वाटत होतें, जर त्यांनीं या विचारांना कृतीचें स्वरूप देण्याचें मनांत आणलें असतें तर तसें करण्याला कोणीहि त्यांना अडथळा केला नसता. कारण, जागा त्याची आणि पूर्ण एकांत, मग त्यानें मनांत आणलें असतें, तर तो तसें कां न करूं शकता पण 'विवेक' ! आडवा पडला. विवेकानें त्याला सांगितलें, "नको. नको. न्याय करणाऱ्या माणसा ! तूं हें नीच काम करूं नकोस. अबलेवर बलात्कार करून तिला भ्रष्ट करणें हें अत्यंत नीच काम आहे. यापासून केव्हांहि सुख होणार नाहींच; पण पश्चात्तापानें मात्र नेहमीं अंतःकरण जळत राहील, आणि परिणाम तर इतका भयंकर होईल, कीं, त्याची आज तुला कल्पनाहि होणार नाहीं. सावध हो. सावध हो. पतिव्रतेचा अपमान करूं नकोस ! क्षणिक मोहाला बळी पडून आपलें नुकसान करून घेऊं नकोस. आजची तुझी स्थिति कायम हवी असली तर या पापापासून दूर हो ! इंदिरेला स्पर्श नकोच, पण तिच्या संबंधाचा विचारहि मनांत आणूं नकोस. स्वतांच्या पत्नीवांचून सर्व स्त्रिया आईसारख्या मान—,,

अर्थात विवेकाच्या उपदेशाचा काजीसाहेबांच्यानें अतिक्रम करवेना. आणि त्यामुळेंच इंदिराबाई सुरक्षित अशी त्या खोलींतून बाहेर

पडली. जरी काजीसाहेबाचें मन विवेकाच्या बंधनांत राहिलें होतें, तरी तें ज्यास्त वेळ त्या स्थितींत राहिलें नाहीं. पुन्हां त्यांच्या मनांत इंदिरेच्या सौंदर्यानें चंचलता उत्पन्न केली. या चंचलतेच्या लाटा या वेळीं बऱ्याच तीव्र होत्या. ते मनांतल्या मनांत म्हणाले, "छे ! या सुंदरीला आपलीशी केल्यावांचून मला चैनच पडणार नाहीं. कोणत्या न कोणत्या उपायानें तरी ती माझी झालीच पाहिजे. माझा हा उच्चाधिकार, मान व अतुल ऐश्वर्य यांचा मोबदला म्हणून मला या सुंदरीची एका दिवसापुरती देखील जरी प्राप्ती झाली तरी चालेल; पण तिच्या प्राप्तीवांचून मात्र माझें जिणें माझा अधिकार, व्यर्थ होय !"

झालें. काजीसाहेबांच्या मनानें पुन्हां अधोगतीला जाण्याला सुरवात केली. वास्तवीक ते अत्यंत गंभीर वृत्तीचे न्यायाधीश ! त्यांची निष्ठा, न्यायकौशल्य, आणि भयंकर शिक्षा, या गोष्टी बहुतेक अपराध्यांला अपराधापासून पराङ्मुख करायला कारणीभूत होणाऱ्या; पण रमणीसौंदर्य हें, अत्यंत मोह उत्पन्न करणारी मदिरा असल्यामुळें व त्या सौंदर्यरूपी मदिरेचें प्राशन त्यांनीं केलेंच, असल्यामुळें ते सरळ कसे चालेणार ! अशा स्थितींत सरळ मार्गानें चालणारे फारच थोडे. वांकड्या मार्गानें जाऊन जन्माचें नुकसान करून घेणारे पढेच अधिक आढतील !

काजीसाहेब एकदां अधोगतीच्या विचारांकडे झुकले ते झुकलेच. मागें फिरण्याचें त्यांना भानच राहिलें नाहीं. ते आपल्या सर्वस्वाला विसरले. आणि इंदिरेच्या प्राप्तीसाठीं काय केलें पाहिजे तेंहि करण्याला तयार झाले. तिचेशिवाय त्यांच्या अन्तःकरणाला दुसरा विचारच सुचेना.

काजीसाहेबांना आत्मत्वशून्य व्हायला दुसरें एक कारण होतें. जुलेखेच्या स्वरूपाची स्मृति त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हती. जुलेखा न मिळाल्यामुळें त्यांचें सौंदर्यरसपिपासू हृदय तसेंच आ वांसून राहिलें होतें. जुलेखेच्या आकस्मिक मृत्यूनें तर त्यांची ती सौंदर्यअतृप्ती फारच वाढली होती. आणि अशा अतृप्तींत असतांनांच त्यांना इंदिरेचें सौंदर्यदर्शन झालेलें. मग काय विचारतां ! त्यांना मग इंदिरेचें नुसतें वेडच लागलें.

शिवाय मृत जुलेखेच्या व इंदिरेच्या सौंदर्यांत त्यांना साम्य दिसूं लागलें. अर्थात जुलेखाच आपणाला समाधान देण्यासाठीं या रूपानें येथें

अवतरली आहे असेंच त्यांना वाटूं लागलें; पण जुलेखेच्या स्वरूपचिंतनांत मग्न झालेल्या काजींना इंदिरा तशी दिसली यांत आश्चर्य कसचें ! ती तशी त्यांना दिसावयाचीच. कारण, रात्रंदिवस मनांत वागत असलेलें स्वरूप अल्पशा साम्यानेंहि तसेंच वाटतें.

भरतीच्या लाटांच्या तोंडीं सांपडलेली लहानगी होडी ज्याप्रमाणें वर खालीं होत असते, त्याप्रमाळें नियामतखान–काजीसाहेब अधिर होऊन आतां पुढें काय करावें हें न सुचल्यामुळें इंदिरेच्या प्रबल सौंदर्यप्रवाहांत गटंगळ्या खाऊं लागला. सद्सद्विवेकबुद्धि तर त्याना केव्हांच सोडून गेली होती. ' इंदिरेची प्राप्ति कशी होईल ' या एका प्रश्नावांचून त्याना कांहींच सुचत नव्हतें.

त्यानें मनांतल्यामनांत प्रतिज्ञा केली, " कोणत्याही प्रकारें प्रयत्न करावे लागले तरी इंदिरेला म्हणून सोडायची नाहीं. ती माझ्या स्वाधीन झालीच पाहिजे. तिच्या प्राप्तीसाठीं जगाची उलथापालथ जरी करावी लागली तरी ती मी करीन. पण या वेळीं मीं काय करावें, हें कोण सुचवील बरें ? या प्रसंगीं उत्तम सल्ला कोणाला विचारावी ? हो आहे ! या बाबतींत योग्य सल्ला देणारा एक मनुष्य आहे. तो अगदीं मनापासून मला सहाय्य करूं शकेल. सैतानी कृत्याला सैतानी मनुष्याचेंच सहाय्य असावें लागतें. आजच्या रात्रींच याबद्दल कायतें निश्चित ठरवून टाकूं. आतां जाणारी एकेक घटका म्हणजे मला वर्षाप्रमाणें भासत आहे." असें म्हणून लागलीच त्यांनीं आपल्या नोकराला हांक मारून ' हाफीज हकिमाला तावडतोब बोलवून आणण्याचा ' त्यांनीं त्याला हुकूम केला, पण हकीम येईपर्यंत इंदिरेची हालहवाल कशी काय आहे तें पाहूं.

# प्रकरण १२ वें.



## अखेरची निरवानिरव.

इंदिरेला यायला बराच विलंब झाला असें पाहून बापूसाहेबांच्या मनांत नाहीं नाहीं ते वाईट विचार येऊं लागले; पण त्यांना उठून बसण्याचेंहि सामर्थ्य नसल्यामुळें काळजी करण्यापलीकडे व या कुशीवरून त्या कुशीवर फिरण्यापलीकडे ते काय करणार ! आणि स्वतःला उठण्याचें जर सामर्थ्य असतें तर त्यांनीं अशी सरकारदरबार करण्याला इंदिरेला पाठविली तरी असती का ! शिवाय चालू दिवस तर फारच हलाखीचे आले होते. जवळ असलेला सर्व पैसा संपल्यामुळें पुढें काय करावें, हा विचार पडला होता; अशा वेळीं सध्यांच्या चालू भानगडी करणें भागच होतें. आणि त्यांत इंदिरेला प्रमुखपणानें भाग घेणें तितकेंच आवश्यक होतें.

आज बापूसाहेबांना मागील गोष्टी आठवूं लागल्या. आपल्या जवळचा पैसा संपल्यानंतर इंदिरेनें गुप्तपणानें स्वतःचे दागिने विकून कुटुंबाचा खर्च चालविला होता, बापूसाहेबांना हें समजत होतें, पण या वेळीं आपण जर तिला अडथळा केला तर संसार चालविण्याला दुसरें कांहींच साधन नव्हतें, आणि कदाचित् तिला वाईट वाटेल. या दोन्ही गोष्टी बापूसाहेबांना एकदमच त्रास देऊं लागल्या आणि त्यामुळें ते मनांतल्यामनांत कुढत राहण्यापलीकडे कांहीं करूं शकले नाहींत.

दागिनें तरी किती दिवस पुरणार ! तेंहि कांहीं दिवसांनीं संपले, आणि संसार चालवून औषध कसें मिळतें ही इंदिरेला काळजी पडली. अर्थात दोघांच्या विचारानें हकिमाकडील दोन हजार रुपायांवर भरंवसा ठेवण्यावांचून त्यांना गत्यंतर नव्हतें व तो पैसा मिळविण्याची शक्य ती खटपट केल्यावांचून घरखर्च चालणें अशक्य होतें, आणि यामुळें अगदीं नाइलाज होऊन बापूसाहेबांनीं आपल्या लाडक्या पत्नीला पैशांच्या वसुलीकरितां हकिमाकडे पाठविलें.

ज्या दिवशीं ती हकिमाकडे गेली त्या दिवशीं तिचा झालेला अपमान आतां त्यांना डोळ्यांसमोर दिसूं लागला, आणि आज आणखी विशेष काय होतें हें समजून घेण्यासाठीं त्यांचे कान आतुर झाले; इंदिरेच्या वाटेकडे ते : जे डोळे लावून बसले होते त्याचें कारण तरी हेंच. आपली वेळ फिरलेली आहे, अर्थात केव्हां काय प्रसंग येईल याचा नेम नाहीं हें ते जाणून होते.

बराच वेळ झाला तरी इंदिरेचा कुठें पत्ता नाहीं, हें लक्षांत येतांच बापूसाहेब अधिर झाले आणि त्यांनीं गोविंदाला हाक मारून त्याला सगळी हकिगत समजावून दिली व त्यांनीं त्याला काजीसाहेबांकडे पाठविलें. थोड्याच वेळांत तो परत येऊन म्हणाला, "बाईसाहेब तिथून इकडे येण्यासाठीं बाहेर पडल्याचें त्यांनीं सांगितलें आहे."

होय. गोविंदानें सांगितलें तें कांहीं खोटें नव्हतें. इंदिरा तेथून निघाली होती; पण सरळ रस्त्यानें घरीं न येतां ती बाजाराकडे वळली होती. हातीं पैसा असतांना बापूसाहेब आपल्या आवडीचें म्हणून जे जिन्नस घेत असत ते त्यांना हल्लीं बरेच दिवसांत मिळाले नव्हते. तसेंच त्यांना आवडणारे खाण्याचे पदार्थहि पैसा नसल्यामुळें करतां येत नसत, अर्थातच आज हातांत भरपूर पैसा असल्यामुळें ती आपल्या नर्मदेला बरोबर घेऊन प्रथम बाजारांत गेली !

इंदिरेनें आपल्या प्रियकराला आवडणारे लहान मोठे सगळे पदार्थ घेण्यांत मुळींच कसूर केली नाहीं. स्वयंपाकाचेंहि चांगलें चांगलें सामान, भाज्या, फळफळावळ वगैरे तिनें खरेदी केले व ती ते सगळे पदार्थ हमालाच्या डोक्यावर देऊन घाईघाईनें घरीं येण्याला निघाली.

जस जसा जास्त वेळ लागत होता तसतसें बापूसाहेबांचें मन अगदीं अस्थिर होत चाललें होतें. पण बिछान्यावर तळमळण्यापलीकडे ते काय करणार ! ते मधून मधून दीर्घ सुस्कारेहि सोडीत होते. इतक्यांत हंसत हंसतच इंदिरा आंत आली व त्यांच्या जवळ बसून लडिवाळपणानें म्हणाली "नाथ ! मला बराच उशीर लागला, क्षमा करायची गडे ! अगदीं माझ्याकडे डोळे लावून राहायचं झालं होतं ना ?"

"खरंच इंदिरे ! मी तुला एक पळभरहि विसंबूं शकत नाहीं. तूं

लांब गेलीस म्हणजे प्राणच कोणी तरी नेलेसे वाटतात. बरें पण तूं गेलीस त्याचें काय झालें ? "

इंदिरेनें काजीसाहेबांकडे झालेला सगळा प्रकार अगदीं थोडक्यांत बापूसाहेबांना सांगितला व एक दीर्घ सुस्कारा सोडून ती म्हणाली " बरेच दिवस ज्यानें सुखांत व आनंदांत घालविले आहेत त्याला हें दारिद्र्य व त्यास होणारें दुःख किती भयंकर वाटतें हें आतां चांगलेंच समजलें आहे नाथ ! "

बापूसाहेब कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं फक्त एक दीर्घ सुस्कारा मात्र सोडला.

कांहीं वेळ थांबून इंदिरा बोलूं लागली, " जोंपर्यंत आपल्या हातांत भरपूर पैसा नव्हता तोंपर्यंत खाण्याजेवण्याच्या बाबतींत आपले बरेच हाल झाले व नाइलाज असल्यामुळें निमूटपणें ते पहावे लागले. मळक्या बिछान्यावर नुसती कधीं नजरहि फिरविली नाहीं, इतकेंच नव्हे, तर नोकरांचाकरांनीं मळके कपडे वापरले तर आपणाला त्यांचा रागहि येत असे; पण आज आपण किती बरें मळलेल्या बिछान्यावर पडून तळमळत असायचं ! तसेंच आपणाला जे पदार्थ नेहेमीं खाण्याला आवडत असत ते आज किती दिवसांत तरी नुसते पाहायलाहि मिळाले नसतील, मी तरी आपणाला ते कसे खाऊं घालणार ! खरोखर नाथ ही एकंदर स्थिती पाहून माझ्या हृदयाला नुसते चटके बसत असत. व त्यासाठीं एकीकडे जाऊन मी कितीदां तरी रडत असें; पण प्रियकर ! आज माझ्या हातांत पैसा आला आहे, हा असेपर्यंत तरी निदान खाण्यापिण्याच्या बाबतींत, कपड्यांच्या बाबतींत, आणि औषधाच्या बाबतींत मी आपले हाल होऊं देणार नाहीं, आणि म्हणूनच ही मनाची हौस फेडण्यासाठीं मी मुद्दाम बाजारांत जाऊन सगळें विकत आणलें आहे. आणि मला क्षमा करायची गडे ! यावला उशीर झाला तो या मुळेंच. "

आपल्या पत्नीचा उत्साह पाहून बापूसाहेबांनींहि स्मित हास्य केलें. ते म्हणाले, " तुला क्षमा कसली करावयाची इंदिरे ! आणि यांत तुझा अपराध तरी काय ? छे ! या बाबतींत मी तुला क्षमा वगैरे कांहीं करणार नाहीं

कारण, माझ्या भांडणांत शिल्लकच राहिलेली नाहीं. तेव्हां तुला आतां शिक्षाच केली पाहिजे. ”

इंदिरा हंसतच म्हणाली, “कसली शिक्षा !”

“इतका वेळ मीं त्याचा चांगलाच विचार करून ठेविला आहे. ये. माझ्या जवळ ये अगदीं माझ्या जवळ बैस. माझें तळमळणारें हृदय शांत करण्यासाठीं मी तुला माझ्या हृदयाजवळ ठेवणार आहें. आणि हीच तुला शिक्षा. तूं जितका वेळ इथें नव्हतीस तितका माझा वेळ एकाद्या युगाप्रमाणें गेला; पण आतां मला अत्यंत सुख, उत्साह आणि आनंद वाटत आहे ! ”

“आणि नाथ ! मला उद्यांच मरण आलें तर ! ! ,,

बापूसाहेबांनीं तिच्या तोंडावर हात ठेविला आणि कंपित स्वरानें म्हणाले “नको नको इंदिरे ! लाडके ! ते शब्द उच्चारूं नकोस. तुझ्यावांचून माझ्या या असहाय स्थितींत मला कोण आहे बरें ? जर ईश्वराच्या मनांत माझ्या अगोदर तुला नेण्याचें आलें तर मला तें वियोगदुःख असह्य होऊन मी तुझ्या मागोमाग येईन बरं ! मला इथें क्षणहि चैन पडणार नाहीं. सूर्यप्रकाशानें जसें झाडाचें पोषण होतें व त्याला टवटवी येते त्याचप्रमाणें तुझ्या दर्शनानें माझी सध्यां स्थिति होत आहे. मग तुझा अस्त होतांच माझा कां होऊं नये बरें ? तुझ्या विरहाची मीं केव्हांहि इच्छा करीत नाहीं व केली नाहीं. ”

आपल्या प्रियकराच्या तोंडचे ते निस्सीम प्रेमाचे उद्गार ऐकून इंदिरेला आपल्या सौभाग्याचा अत्यंत अभिमान वाटला, व पतिप्रेमाच्या बाबतींत आपल्या इतकी भाग्यवती जगांत कोणीहि नाहीं असें वाटून ती फारच अनंदित झाली. तिनें आपल्या प्रियकराला आलिंगन दिलें व अशा तऱ्हेचे मुके अभार मानून ती कांहीं वेळ त्या अनंदाचा उपभोग घेत स्तब्ध राहिली आणि नंतर म्हणाली. “ माझ्या अपराधाबद्दल मला योग्य शिक्षा मिळाली. आतां मला जाऊं द्या गडे. बाजारांतून चांगले चांगले पदार्थ आणले आहेत, त्यांचा रुचकर स्वयंपाक करून आणतें.”

आज बापूसाहेबांना, जेवण फारच गोड लागलें व त्यांनीं रोजच्यापेक्षां थोडें ज्यास्त खाल्लेंहि. इंदिरेलाहि समाधान वाटलें. जेवणें झाल्यानंतर

मागचा सगळा उद्योग नर्मदेवर सोंपवून इंदिरा विडा घेऊन बापूसाहेबां-जवळ आली. तेव्हां ते तिच्याकडे प्रेमानें पहात म्हणाले, "ये लाडके! माझ्या जवळ बैस. आज मला बरीच हुषारी वाटत आहे. तेव्हां तुला चार दोन प्रश्न विचारतों. आज किती दिवस तरी माझ्या मनांत हेच विचार येत आहेत. आज ते बोलून दाखविण्याला चांगली संधी आहे."

इंदिरेला भीति वाटली. तिला कांहींच कल्पना होईना; पण त्यांनीं आज्ञा केल्याप्रमाणें ती त्यांच्या जवळ बसली आणि एक सुस्कारा सोडून प्रेमानें म्हणाली, "नाथ! काय सांगायचंय आपणाला!!" हा प्रश्न विचार-तांना इंदिरेच्या हृदयाचे ठोके जोरानें बसत होते हें सांगावयास नकोच.

तिचा भीतियुक्त चेहरा पाहून बापूसाहेब तिला आश्वासनपूर्वक म्हणाले. "इंदिरे! माझें बोलणें ऐकून तूं भिऊं नकोस. जें सरळ आणि सत्य असेल तें लपवून काय उपयोग? अशा लपवालपवीनें पुढें होणारा अनर्थ थोडाच लपत असतो? लाडके! मला वाटतें मी आतां जास्त दिवस वांचणार नाहीं. तुझे जिवापलीकडे होत असलेले प्रयत्न, नर्मदेची एकनिष्ठ सेवा, गोविंदाची स्वानिष्ठा यांचा मला आतां ज्यास्त दिवस उपभोग घेतां येणार नाहीं. मी जाणार—"

आतां इंदिरा पूर्वीपेक्षांहि ज्यास्त भ्याली, तिचें हृदयच नव्हे तर आतां सगळें आंग थरथर कांपूं लागलें. आतां पुढें आपणास अणखी काय काय ऐकावें लागणार याची तिला नुस्ती अटकळ सुद्धां होईना. तरी पण ती पुढील शब्द ऐकण्याला उत्कंठित झाली; तिनें त्यांचे दोन्ही हात आपल्या गळ्याभोंवतीं घेऊन करुणस्वरानें म्हटलें, "नाथ! आपण आज काय चालविलें आहे हें!"

इंदिरेच्या खिन्न चेहऱ्यावरून हात फिरवीत बापूसाहेब विषण्णतेनें म्हणाले, "इंदिरे! तुझा हा असा दुःखी चेहरा पाहण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून मी अजूनपर्यंत तुझ्याकडे बोलण्याचें टाळीत होतों; पण आतां अशी टाळाटाळ केल्यास तुझा विश्वासघात केलासें होईल म्हणून बोलतों. माझ्या या अन्धकारमय संसारांतील तूं उज्वल दीपिका आहेस हें मी जाणतों. माझ्या या असह्य व दीन स्थितीला माझी आई, बाप, भाऊ, बहिण, मुलगा आणि पत्नी या सर्वांची कर्तव्यें तूं एकटीच बजावित आहेस

आणि मित्राप्रमाणें वेळोवेळीं सल्ला देत आहेस हेंहि पण मी विसरलों नाहीं. तुझें प्रेम, तुझें श्रम, तुझी सहिष्णुता, निस्वार्थ आत्मत्याग वाखाणण्यासारखा आहे. मी आज एकदीड वर्ष या रोगानें बिछान्याला खिळून गेलों आहें आणि हल्लींच दोन चार दिवसांत मला एका नवीन रोगानें पछाडलें आहे, असें मला वाटत आहे. मी तुझ्याजवळ कबूल करतों, कीं, पैसा नसल्यामुळें माझ्यारोगावर योग्य उपचार झाले नाहींत त्यामुळें रोग वाढत जाऊन आतां त्याची परमावधी झाली आहे. तूं आपले दागिने विकून संसार चालवूं लागलीस त्या वेळीं मी कांहीं बोललों नाहीं व बोलून उपयोगहि नव्हता; पण त्या दिवशीं हाकिमाच्या घरीं जातांना तुझ्या आंगावर दागिना नाहीं तो नाहींच; पण धडवस्त्रहि नाहीं, हें पाहून माझ्या हृदयाला भयंकर धक्का बसला आणि त्यानंतर तेथें झालेला तुझा अपमान ऐकून तर त्यापेक्षांहि जास्त जोराचा आघात झाला. या दोन्ही आघातांनीं माझा लांबलेला मृत्यू जवळ आला आणि--आणि इंदिरे--"

बापूसाहेबांना दम लागला. पुढें शब्द उमटेना. त्यांनीं इंदिरेला आपल्या हृदयाशीं धरलें व दीर्घ सुस्कारा सोडला; पण त्यांच्या चेहऱ्यावरून त्यांना या वेळीं कसल्या तरी तीव्र वेदना होत असाव्यात असें कोणालाहि वाटलें असतें

त्यांची तशी ती स्थिति पाहून इंदिरा आपले डोळे पुसून रुद्ध स्वरानें म्हणाली, "नाथ! असं काय बरं! आतां आपल्याजवळ पैसा आहे. आपण चांगल्या वैद्याला प्रकृती दाखवून योग्य औषध घेण्याची तजवीज करूं या. आपणच असा धीर सोडला तर--" पण पुढें तिला अनावर हुंदका आल्यामुळें तिच्यानें बोलवलें नाहीं. ती त्यांच्या छातीवर तोंड ठेवून मूक रुदन करूं लागली.

कांहीं वेळ अशा स्थितींत गेल्यावर बापूसाहेब आपल्या कांपऱ्या हातांनीं तिचें तोंड पुसून म्हणाले, "रडूं नकोस. थोडें धैर्य धर. तूं म्हणतेस औषध घ्यावें; पण मला या ठिकाणीं औषध देणारा चांगला वैद्य कोण आहे बरें! या शहरांत अगदीं खात्रीचें योग्य औषध देणारा फक्त एक तो हाफीज हाकीम मात्र आहे; पण आपण त्याच्या विरुद्ध काजीकडे फिर्याद केलेली तो इतक्यांत विसरेल असें मला नाहीं वाटत. तो आमचा आतां कट्टा

वैरी बनला आहे. मग त्याला आपण बोलावयाला गेलों तर तो कसा बरें येईल ?"

इंदिरा कांहीं वेळ विचार करून म्हणाली, "चला आपण गुलबुर्गा किंवा हैद्राबाद या शहरीं जाऊं. तिथें आपणाला या हाफीजपेक्षांहि उत्तम हकीम मिळतील. !"

बापूसाहेबांनीं एक दीर्घ सुस्करा सोडून म्हटलें, "छे. तसें होणेंच शक्य नाहीं. मला अतां येथून जागचें हालवतसुद्धां नाहीं. मग मी तिकडे जाणार कसा ? आणि एवढा प्रवास मला सहन तरी करवेल का ? तसेंच इथें हें घर तर कुणावर सोंपवून जायचं ! घराचें एक कांहीं तरी केलें असतें; पण वडलांनीं ज्या ठिकाणीं चार पिढ्या घालविल्या तें ठिकाण सोडून जावें असें कांहीं मला वाटत नाहीं. कारण घराचा शास्ता राहिला नाहीं कीं, तेथें मग कांहींच राहात नाहीं. मला तर हालचाल करण्याचेंहि सामर्थ्य नाहीं हें तूं पहातेसच. माझ्या छातींत क्षणोक्षणीं हल्लींच एक भयंकर कळ उठूं लागली आहे. मला त्या वेदना अगदीं सहन करवत नाहींत. मोठ्यानें बोलवत नाहीं, खोकवत नाहीं, दीर्घ सुस्कारा टाकवत नाहीं आणि अशा स्थितींत मला प्रवास कर म्हणतेस तें कसें बरें साधावें ? आतां मला बरें होण्याची आशा राहिलेली नाहीं. इंदिरे ! भिऊं नकोस. जो जन्माला आ । त्याला मृत्यूनें सोडलें नाहीं. आधीं आणि मग हा ज्याचा त्याचा आयुष्याचा प्रश्न आहे. पूर्व जन्मार्जित पापपुण्याप्रमाणें सुखदुःख मिळत असतें. वाईट वाटतें तें एवढेंच कीं, मी तुझ्यासारख्या स्त्रीरत्नाच्या जन्माची राखरांगोळी केली. माझ्याकडून तुला म्हणावें तसें सुख मिळालें नाहीं. मीं पूर्व जन्मीचा तुझा कोणीतरी शत्रू असून सूड उगविण्यासाठींच तुझ्याशीं लग्न केलें असावें असें मला वाटतें. नाहीं तर अशा तारुण्यांत व हालअपेष्टांत तुला सोडून मी का लवकर निघून जाण्याची तयारी केली असती ? इंदिरे, मला तूं आपला शत्रू मान. माझा तिरस्कार करें म्हणजे मला दुःख होणार नाहीं ! तुझें माझ्यावरील हें अप्रातिम प्रेमच मला आज रडवीत आहे; पण लाडके ! मृत्यूनंतर मला जो लोक प्राप्त होईल तो शोकतापहीन असणार. तेथें दुःख नाहीं. तेव्हां मी मरण पावलों तरी तूं—" छे बापूसाहेबांच्यानें या विषयाची पुढें चर्चा

करवेना. त्यांचा शब्दच बाहेर फुटेना. आपण जन्माला येऊन कांहीं केले नाहीं तें नाहींच; पण लग्न करून साध्वी स्त्रीला मात्र रडत ठेवून चाललों याचेंच त्यांना फार वाईट वाटलें व छाती दाबून धरून ते मूक रूदन करूं लागले.

इंदिरा काय बोलणार. असलें हें तापदायक बोलणें जास्त वाढवावें असें तिलाहि वाटेना. ती मनांत म्हणाली, " प्राणेश्वर ! नाथ, मी आपल्या देहाची छाया आहें. आपला देह दिसेनासा होतांच ही त्याची छायाहि अदृश्य होईल. मी आपली सहचारिणी आहें, तेव्हां आपण ज्या धर्माचे व्हाल आणि जें सुख भोगाल तें मला मिळालेंच पाहिजे. आपल्या मागें या जगांत राहाण्यासारखें, मनाला मागें ओढणारें असें माझें काय आहे ? कांहीं नाहीं. नाथ ! खरोखर आपण दोघेंहि शोकतापहीन अशा दुसऱ्या लोकांतच जाऊं. या मृत्युलोकाचा व त्यांतील गुंतागुंतीचा मलाहि आतां कंटाळा आला आला आहे. " इंदिरेनें बापूसाहेबांकडे पाहिलें तों त्यांना झोंप लागलेली आहे असें तिला वाटलें. तेव्हां ती हळुच त्याच्या जवळून उठली व त्यांना पांघरूण वगैरे नीट घालून आपले डोळे पुशीत ती बाहेरच्या गच्चीवर आली.

---

# प्रकरण १३ वें.



## कारस्थानाचा पूर्व रंग.

"आतां करावें काय ? आपल्या नेत्रकटाक्षांच्या तीव्रतेनें त्या सुंदरीनें जो या माझ्या हृदयास चटका लावला आहे तो अग्नीच्या तीव्र ज्वालांप्रमाणें माझें अन्तःकरण जाळीत आहे. माझ्या हृदयाची शीर तुटत आहे आणि अस्थी जळत आहेत असेंच मला वाटतें. त्या सुंदरीच्या प्राप्तीवांचून या धडाडणाऱ्या अग्नीची शांतता होणार नाहीं. मला त्या सौंदर्याची भयंकर तहान लागली आहे. हाय ! इंदिरे ! माझ्या हृदयावर असा आघात करून जाणें तुझ्यासारख्या सौंदर्यवती तरुणीला शोभतें का ?"

खानसाहेबांचे असे आत्मगत विचार चालूंच होते. मधून मधून ते खोलीं-तल्या खोलींतच इकडे तिकडे फिरत, मध्येंच थांबत आणि मध्येंच दरवाजाकडे पाहून एखादा सुस्कारा सोडीत. केव्हां मधल्या चवरंगावर असलेल्या मदिरापात्रांतून एक लहानसा ग्लास भरून पीत. केव्हां नेचाची नळी तोंडांत धरून छताकडेच पहात रहात. एवंच या त्यांच्या एकंदर हाल-चालीचे सूक्ष्म रीतीनें निरिक्षण करणाराला सहज आज वाटलें असतें, कीं, खानसाहेब अस्वस्थ असून ते कुणाची तरी वाट आहेत.' आणि हें खरेंहि होतें. कारण ते आपल्या एका मदतगाराची वाट पहात दरवाजाकडे पाहून दीर्घ सुस्कारे सोडीत होते.

इतक्यांत त्यांचे मदतगार हफीज हकीम तेथें येऊन पोंचले व अत्यंत नम्रतेनें सलाम करून ते म्हणाले. "हुजूरनीं कशाला बरें या गुलामाचें स्मरण केलें होतें ?" खानसाहेबांनीं किंचित स्मितपूर्वक त्या सलामाचा मानेनेंच स्वीकार केलासें दाखवून त्यांनां कोचावर बसण्याला खूण केली व म्हणाले, "हाफीज! मला बुवा हा फारच भयंकर प्रसंग वाटतो!"

" कसला प्रसंग हुजूर!! " हकिमानें घाबऱ्या स्वरानें विचारिलें.

" इंदिरा तुला असा थोडक्यांत मोकळा सोडूं इच्छित नाहीं. ती आपल्या अब्रुनुकसानीच्या फिर्यादीबद्दल योग्य तो न्याय मागत आहे आणि मी कसा आहें व माझें कर्तव्य कोणतें आहे, हें तूं जाणतच आहेस! अर्थात् मला आतां या बाबतींत शक्य तितकें लक्ष घातलें पाहिजे असें नाहीं का ? हाफीजच्या चेहेऱ्याचें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करीत काजी-साहेब एकेक शब्द बोलत होते.

काजीसाहेबांचें बोलणें ऐकून हाकिमाला चांगलासा उलगडा पडेना. तो विचार करूं लागला. कारण त्याला पूर्वीं वाटलें होतें, कीं, फिर्यादीसंबंधानें आतां सर्व निकाल झाला आहे; पण आतां जर तो न्यायाचा अग्नी पुन्हां धुमसूं लागला व त्याची उघड चवकशी होण्याची वेळ आली तर आपणाला येथून लवकरच गाशा गुंडाळावा लागेल असें हाकिमाला वाटलें. तेव्हां तो काकुळतीच्या स्वरानें म्हणाला, " हुजूर! या फिर्यादीबद्दल मला किती दंड द्यावा लागेल ? " हा प्रश्न विचारण्याचा हाकिमाचा हेतू अस

होता, कीं, कांहीं पैसे दिल्यानें हा मामला मिटेल कीं काय? आणि अशा रीतीनें तो मिटत असल्यास फारच उत्तम होईल.

नियामतखानांचा उद्देश होता, कीं हाफिजला अत्यंत भीति दाखवून आपला आज्ञांकित हस्तक बनवावयाचें आणि मग आपली कामगिरी त्यांच्या कडून करून घ्यायची. त्यांच्या अंदाजाप्रमाणें तो भ्यालेला पाहून शिक्षेचे व कायद्याचे जनक काजीसाहेब आनंदित झाले. त्यांनीं, त्यांच्या वरील प्रश्नाचा हेतू ओळखला आणि ते गंभीर; पण अधिकारदर्शक स्वरानें म्हणाले "अशा तऱ्हेच्या अपराधाला, न्यायाधिशाच्या नजरेनुरूप देहांत शिक्षासुद्धां केली जाते; पण न्यायाधिशानें जर अगदीं दयाळू होऊन शिक्षा दिली तर "जन्मभर कैद" भोगलीच पाहिजे. कारण अशा आपराधाला यापेक्षां कमी शिक्षा देतांच येणार नाहीं."

ही भयंकर शिक्षा ऐकून हाफीजच्या आंगावर शहारे आले. तो हात जोडून करुण स्वरानें म्हणाला, "मी हुजूरचा आश्रित आहें, अर्थात हुजुरांनीं जर माझें संरक्षण केलें नाहीं तर कोण बरें करील? आज येथें सरकारच्या खालोखाल आपलाच अधिकार आहे."

"तुला देहांत शिक्षा व्हावी असा माझा हेतु नाहीं, कारण तूं माझ्या परिवारांतील बऱ्याचशा मंडळीचे योग्य वेळीं योग्य औषध देऊन प्राण वांचविले आहेस. तसेंच मलाहि एका भयंकर दुखण्यांतून तूं मला वांचविलें आहेस. तेव्हां माझी एक गोष्ट जर तूं मनापासून ऐकून मला त्यांत सहाय्य करशील तर–पण मी ती गोष्ट आधीं सांगत नाहीं. गोष्ट बरीच भयंकर आहे. सैतान ज्याप्रमाणें मनुष्याला बिनमोल विकत घेतो त्याप्रमाणें या बाबतींत तूं मला आपलें सर्वस्व—तूं स्वतः—माझ्या स्वाधीन झाला पाहिजेस, म्हणजे झालें. इंदिरा अत्यंत सौंदर्यसंपन्न असल्यामुळें तिला आपल्या स्वरूपाचा इतका गर्व झाला आहे कीं, तिनें माझाहि अपमान करण्याला कमी केलें नाहीं."

"म्हणजे! आपण बोलतां काय हें हुजुर!!" हाफीजनें आश्चर्यानें मध्येंच प्रश्न केला.

"अरे बोलायचें काय! झालें तेंच सांगतों. काहीं बनवून नाहीं सांगत!" ते गंभीरपणानें बोलले.

"वाः! तर मग त्या बाईचा उद्धटपणा आपल्याहि चांगला अनुभवाला आला. म्हणायचा!"

" तेंच सांगतों ना, त्याचीच मला चीड आली आहे, आणि म्हणूनच तिचा अभिमान नाहींसा करावा असें मीं मनांत ठरविलें आहे. मी एवढा मोठ्या योग्यतेचा माणूस आणि तिच्यावर इतके उपकार, तर तिनें माझ्याशीं असें वागावें, म्हणजे मला कां राग येऊं नये? मी केवळ प्रजावत्सलतेनें नव्हे, प्रेमानें कां म्हणेनास—तिचा हात धरला तर तो तिनें झिडकारला. मला तिनें क्षुद्र मनुष्याप्रमाणें मानलें आणि खरोखर तोच अपमान माझ्या मानी हृदयाला टोंचत आहे. या वेळीं तुला येथें बोलाविण्याचेंहि कारण तेंच. मित्रत्वाच्या नात्यानें या बाबतींत तूं मला सहाय्य केलेंच पाहिजे. मी राजदंडांतून तुला सोडवीन; पण यांत मात्र तूं मला मनापासून सहाय्य केलें पाहिजे. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे, इंदिरा माझ्या स्वाधीन होईल असें तुला करणें जरूर आहे, आणि मला सहाय्य पाहिजे तें हेंच."

हें ऐकून हाफीजला थोडें सुद्धां आश्चर्य वाटलें नाहीं. कारण काजीसाहेबांचा मनोदय त्यानें या पूर्वींच जाणला होता, आणि असें कांहीं तरी होणार हें भविष्यहि त्यानें पण करून ठेवलेंच होतें; पण तसा कांहींच प्रकार मात्र त्यानें आपल्या चेहेऱ्यावर व्यक्त केला नाहीं. कारण दोघेहि 'ठकाला महाठक' अशा पैकींच होते. हकीम अगदीं लीनपणानें म्हणाला, " हुजुरांना माझें सहाय्य पाहिजे आहे, तर मी तें करायला तयार आहें. फार काय हुजुरसाठीं मी आपलें सर्वस्व अर्पण करायलाहि तयार आहें."

हाफीजचे हे उत्साहयुक्त शब्द ऐकून नियामतखान हंसून म्हणाले, " जीवनदान करण्यापर्यंत पाळी येणार नाहीं हाफीज! पण डोकें शांत करून मी काय सांगतों तें नीट ऐकून घे, "

" हुजुरची आज्ञा व्हावी! "

या इंदिरेनें तुम्हाहि पुष्कळ अपमान केला आहे, खरें कीं नाहीं?" खानींना प्रश्न केला.

" म्हणजे! हें काय विचारलें पाहिजे! इंदिरेला तर मी आपला

शत्रू मानतों. आपल्या सारख्या दयाळू आणि धर्मावतार न्यायाधिशाजवळ तिनें फिर्याद केली म्हणून मी बचावलों; पण तीच जर का एकाद्या आपल्या हाताखालच्या माणसाकडे केली असती तर त्यानें मला कैद करून आणण्याचाच हुकूम केला असता ! आणि मग माझी प्रतिष्ठा ती काय राहिली असती ! या बाबतींत इंदिरेनें माझा केवढा अपमान केला आहे बरें ! मी तो कधींहि—जन्म असेपर्यंत—विसणार नाहीं. ”

“ अगदीं बरोबर बोललास; पण झालेली गोष्ठ कांहीं परत येत नाहीं तेव्हां तो विषय तूर्त बाजूला ठेवू या. तूर्त आम्हाला एका नवीनच; पण कांहींशा भानगडीच्या प्रकारांत थोडेसें मन घातलें पाहिजे. तुझ्याजवळ आंता कांहींहि गुप्त ठेवीत नाहीं. ही स्वरूपाच्या गर्वानें फुगून गेलेली इंदिरा माझ्या सारख्याचा अपमान करते, याबद्दल आधीं विचार झाला पाहिजे. मी तिच्याशीं किती उत्तम प्रकारानें वागलों आणि अशा संकटावस्थेमध्यें किती उपयोगीं पडलों, हें एका खुदालाच माहीत; पण तिच्या तें गांवींहि नाहीं. तिच्या कोमल व सुंदर हाताचें केवळ मी चुंबन घेणार होतों पण तेंहि तिनें मला घेऊं दिलें नाहीं. उलट तिनें माझा हात झिडकारून नसत्या उपदेशाच्या हजार गोष्टी मला ती सांगूं लागली. हाफीज ! मी हा तिनें केलेला अपमान केव्हांहि सहन करणार नाहीं. तिचा तो अभिमान चूर्णविचूर्ण झालाच पाहिजे. तुझ्याहि मनांत असेंच असलें पाहिजे. तेव्हां आमच्या दोघांच्याहि मनांत जर एकच उद्देश आहे, तर तूं मला आपले उद्दिष्ट सिद्धीला नेण्यासाठीं सहाय्य करायला नको का ? ”

“ होय. त्या अभिमानी व दुराग्रहि स्त्रीनें माझा कधीं न विसरण्या-सारखाच अपमान केला आहे. खरा मी त्याबद्दल सूड घेणारच” हाजीफनें दुजोरा दिला. इष्टकार्य सिद्धतेबद्दल त्याला मनांतल्या मनांत आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या.

“ सुडाची इतकी उत्कट भावना तुझ्याहि मनांत असली तर! तूं एक आमचें काम केलें पाहिजे. ”

हाफीज अधिरपणानें म्हणाला “ कोणतें काम हुजूर ? ”

“ माझ्या येथील दासीची आणि इंदिरेच्या मोलकरणीची फारच घनदाट मैत्री आहे, त्यावरून मला समजलें आहे कीं, बापूसाहेब आज

फारच आजारी आहेत, आणि इतकी कठीण स्थिति आहे. अर्थात तुला तिकडून बोलावणें येईलच. "

" पण हुजूर ती इंदिरा आतां माझ्या घरीं यायचीच नाहीं. कारण आमच्या या मनोमालिन्याला अजून तीन चार दिवस सुद्धां झाले नाहींत. ! ! " हाफीजनें आपली शंका पुढें मांडली.

" बाबा, गरज ही मनुष्याला नको असलेलें प्रत्येक कृत्य हट्टानेंच जणूं काय करायला लावते. गरजेला मान, अपमान, सुष्ट, दुष्ट, कांहीं नाहीं. वेळीं शत्रूशीं सुद्धां मैत्री करावी लागते, फार काय विपत्तीच्या वेळीं शत्रूलाहि मदतीला बोलावणें भाग पडतें. शिवाय या शहरांत उत्तम हकीम म्हणून तुमची ख्याती आहे. अर्थात बापूसाहेबांचा आजार वाढतांच इंदिरेला मुठींत नाक घेऊन तुमच्याकडेसच येणें जरूर आहे, व ती बहुधा येईलच. शिवाय मी आणखी माझ्या दासीकडून बातमी आणवितांच; पण आज ना उद्यां मदतीसाठीं म्हणून इंदिरा तुमच्याकडे येईल. तिला यावेंच लागेल. तेव्हां हें लक्षांत ठेवावयाचें कीं, ती येतांच नाहीं होय न म्हणतां व दुसरी कांहीं सबब न सांगतां तिच्या सहाय्याला तयार व्हा. त्या नंतर काय केलें पाहिजे, तें सगळें मी त्या त्या वेळीं तुम्हाला सुचवीन. मात्र फी घेतल्यावांचून येऊं नका. फी घ्याच. म्हणजे अशा रीतीनें तरी तुमच्याकडील गेलेले रुपये परत येतील. तसेंच आणखी एक सांगून ठेवतों. आतां ज्या कामाला पुढें सरावयाचें आहे त्या कामांत मागें सरावयाचें नाहीं. तें काम मनापासून तडीस न्यायला झटावयाचें. तहान पाण्याकडे जाते. पाणी तहानेकडे येत नाहीं हें लक्षांत ठेवा. इंदिरा नाइलाज होऊन आज किंवा उद्यां तुझ्या दवाखान्यांत येईलच. तेव्हां फारच सावधपणानें आतां कार्याला पाऊल टाक. काम सिद्धीला जातांच तुला मी चांगलाच खूष करीन. "

हाफीजला खरोखरच इंदिरेवर सूड उगवावयाला पाहिजे होता; आणि त्यांत अशा रीतीनें काजीसाहेबांचें सहाय्य मिळालेलें, मग काय विचारतां! इंदिरा आपल्या घरीं येणार याबद्दल तर त्याला खात्रीच वाटूं लागली, आणि तसें झालें, कीं, फी म्हणून आपण बरेचसे रुपये उपटूं अशीहि त्यानें आपल्या मनांत खूण गांठ मारून ठेवली आणि तो काजीसाहेबांना

सलामामागून सलाम करीत निरोप घेऊन घराकडे वळला. काजीसाहेबहि पुढच्या योजनेंत मग्न झाले.

---

# प्रकरण १४ वें.

—:०:—

## गरीब बिचारी इंदिरा !

"इंदिरे ! लाडके इंदिरे ! !"

"नाथ ! मी जवळ आहेना ! कशाला बरें हाक मारायची ?

"हो. तूं माझ्या जवळच आहेस नव्हे का ! अहाहा ! मला आतां समाधान वाटलं !"

"आपण इतकं व्याकूळपणानं कां बरं बोलायचं ! कसल्या वेदना होताहेत इकडं कपाळ का दुखतय् ?"

"नाहीं ग. मी एक अगदीं भयंकर--नाहीं--पण अद्‌भुत असं एक स्वप्न पाहिलं ! !"

"अं: स्वप्नच ना ! त्यांत काय मोठसं ! स्वप्नं का कधीं खरीं होत असतात ?"

"तें मला समजत का नाहीं लाडके ? स्वप्नं खरीं नसतात हें माहित आहे; आणि ज्या वेळीं मला सामर्थ्य होतं, माझ्या जवळ भरपूर पैसा होता, त्या वेळीं जर मला असलीं स्वप्नं पडलीं असतीं तर तीं मी कधींहि विश्वासिलीं नसतीं; पण आतां ! आतां जें असंभवनीय तेंच संभवनीय होईल अशी खात्री वाटते. हा दुर्बलतेचा परिणाम म्हण अथवा प्रतिकूल कालाचा तडाखा म्हण; पण असें होतें खरें. प्रतिकूल काल असला कीं, पुढें होणारें भविष्य अशा तऱ्हेनें दाखविलें जातें आणि त्यानंतर ते सत्यांत परिणत होतें."

"आपण आपलं स्वप्न मला सांगायचं होईल का ?"

"हो. न सांगायला काय झालें ? तुझ्याजवळ मी कधींहि कांहीं

लपवून ठेवणार नाहीं आणि आजपर्यंत ठेवलेंहि नाहीं; पण माझें आजचें स्वप्न सांगायला मला भीति वाटते. कारण, माझ्यासारखीच तूं भ्यालीस आणि दीर्घ सुस्कारे टाकीत बसलीस तर ! तुला होत असलेलें तें दुःख माझ्यानें पहावणार नाहीं. ”

“ मी आतां सहनशील बनल्यें आहें. माझें हृदय तर आतां अगदीं दगडासारखें घट्ट झालें आहे. प्रसंगानं मला सहनशलि बनविलें आहे. तेव्हां आपणाला त्या संबंधानें भिण्याचें मुळींच कारण नाहीं. अगदीं मन मोकळं करून जें कांहीं सांगायचं तें खुशाल सांगावं. ”

“ बरं तर, लाडके ! मी आतां तें तुला सांगतोंच. ऐकः—माझा हा रोग फारच वाढला असून तूं अगदीं त्यामुळें घाबरून वेडी झाली आहेस व इकडे तिकडे धांवपळ करीत आहेस. अशाच वेळीं एक भयंकर रोगाची सांथ उत्पन्न झाली आणि त्यामुळें सर्व लोकांनीं शहर सोडलें. नाहीं म्हणायला राहिलों काय तीं आम्हीं दोघेंच. आम्हांला कांहीं बाहेर जातां आलें नाहीं— ”

हें ऐकतांच इंदिरेला थोडी भिती वाटली; पण लागलीच तिनें आत्मसंयमन केलें आणि म्हटलें, “ बरं, मग पुढें काय झालं ? ”

बापूसाहेब थोडा वेळ थांबून बोलूं लागले, “ पुढें काय ? रोगाची सांथ आली, त्या सांथीनें सगळें शहर उध्वस्त झालें, व चोंहोंकडे नुसतीं स्मशानें दिसूं लागलीं, शेवटीं मलाहि त्या रोगानें पछाडलें; आणि तूं माझा प्राण वांचविण्यासाठीं कोणी वैद्य मिळतो का पाहावें म्हणून शहरांत गेलीस पण तुला कोणीहि वैद्य मिळाला नाहीं; इतकेंच नव्हे, सहाय्यालाहि कोणी धांवून आलें नाहीं. तूं खिन्न चेहेऱ्यानें घरीं आलेली पहातांच मी विचारांत पडलों; पण माझ्या त्या वेळच्या वेदना पाहून तुला चैन पडेना. तूं पुन्हां वैद्याच्या शोधासाठीं म्हणून बाहेर पडलीसच ! ”

इंदिरा अगदीं स्वस्थ राहून आपल्या प्रियकराच्या तोंडून तें स्वप्न ऐकत होती. ती कांहीं बोलली नाहीं; पण तिचा चेहेरा मात्र ज्यास्त ज्यास्त फिक्कट होत चालला होता. बापूसाहेब तिच्या चेहेऱ्याकडे पाहून मध्येंच म्हणाले, “ भ्यालीस कीं काय तूं इंदिरे ? ”

“ नाहीं. नाहीं. आपलें स्वप्न कांहींसें अद्‌भूत वाटलें म्हणून माझें

तिकडे अगदीं लक्ष वेधून गेलें आहे, त्यामुळें आपणाला कदाचित् तसें वाटलें असेल. मग काय झालें ? ”

बापूसाहेबांनीं एक दीर्घ सुस्कारा सोडून पुन्हां बोलण्याला सुरवात केली, “मग काय झालें हें तुझी ऐकण्याची इच्छा आहे तर; पण पुढचा प्रकार तर फारच रहस्यमय आहे ! ऐक. तूं घर सोडून निघून गेल्यानंतर एक मनुष्य घरांत आला आणि माझ्या या बिछान्याजवळ उभा राहिला. त्या मनुष्याइतका काळा कुट्ट चेहेरा मीं यापूर्वीं केव्हांहि पाहिला नव्हता. तो काळा मनुष्य माझ्याजवळ येऊन म्हणाला, मी या देशावर उपकार करण्यासाठीं सुधारलेल्या देशांतून आलों असून मी किमया करण्यांत फारच कुशल आहें. ज्या रोगानें आज या प्रांतांतील लोक मरत आहेत त्या रोगावर योग्य औषध कोणतें तें मला माहित आहे. मी मोठ्या रात्रीं गुप्त वेषानें प्रत्येकाच्या घरीं जात असतों, आणि त्यांना औषधहि पण देत असतों. जे खातात त्यांना आराम मिळतो, आणि ज्यांना माझें औषध घ्यावेंसें वाटत नाहीं, इतकेंच नव्हे तर जे त्याचा उपहासपूर्वक त्याग करतात, व माझा तिरस्कार करतात त्यांना शेवटीं मृत्यु येतो. मी तरी त्यांचा तो मृत्यु कसा दूर करणार ? ”

“ किती आश्चर्यकारक आपलं स्वप्न हें ? ” इंदिरा मध्येंच आश्चर्यानें म्हणाली.

“ जें पाहिलें तेंच मी सांगत आहें. इंदिरे ! या माझ्या सांगण्यांत अतिशयोक्ति मुळींच नाहीं. नंतर बोलतां बोलतां त्या माणसानें आपला काळा चेहेरा बदलला आणि म्हणाला, ‘ पहा आतां माझी किमया कशी आहे ती ! ’ याच वेळीं माझ्या रोगजनित वेदनाहि वाढल्या, तेव्हां मीं त्याला म्हटलें, ‘ एर्वी तेर्वी मला आतां मृत्यु येणारच. कारण हा रोग मला विदेहि केल्यावांचून कांहीं राहात नाहीं, तेव्हां तूं मला औषध दे. जें औषध तूं मला देशील तें मी खाईन. माझें हें बोलणें ऐकतांच त्या गृहस्थानें विकट हास्य केलें व म्हटलें, “ या जगांत लोक हे असे तुमच्यासारखे अकृतज्ञ आणि सैतानवृत्तीचे आहेत. निस्वार्थीपणानें आपोआप कुणावर उपकार करायला जावें तर तो म्हणतो, यांतहि याचा कांहीं तरी स्वार्थ आहेच. ”

" त्याचें हें तिरस्काराचें बोलणें ऐकून मी थोडासा खट्टू झालों आणि त्याला म्हणालों, " आपलें औषध द्या. " लागलींच त्यानें मला दोन तीन गोळ्या दिल्या आणि त्या त्यानें एकदम घेण्याला सांगितल्या. त्यानें सांगितल्याप्रमाणें मीं त्या घेतल्या. लागलींच त्या योगानें मला पूर्वींपेक्षांहि ज्यास्त भयंकर वेदना होऊं लागल्या. माझें हृदयच कोणी तरी चरचर कापीत आहे असें मला वाटूं लागलें. कुणी तर माझ्या तोंडावर हात ठेवून मृत्यूला मदत करीत असल्याचेंहि मला आढळून आलें. शेवटीं माझा नाइलाज होऊन मी निश्चलपणानें बिछान्यावर पडून राहिलों.

" ऐक इंदिरे पुढें ऐक. आणखीहि आश्चर्यच !! मला वाटलें मी मेलों आहें. माझ्या ज्ञानशक्तीचा तर केव्हांच लोप झाला होता. बोलून आपला मनोभाव व्यक्त करण्याची वाचाशक्ति तर केव्हांच लुप्त झाली होती, तरी पण मी जागा होतों. मला सर्व दिसत होतें. बाह्य जगाशीं संवेदनारूप असलेला माझा संबंध सुटला नव्हता. माझ्या आसपास काय होत आहे हें सर्व मला दिसत होतें; पण मला बोलायला मात्र येत नव्हतें. जीभच कोणीतरी दाबून धरली असावी असें मला वाटत होतें; पण त्यामुळें माझ्या मनावर विलक्षण परिणाम होऊन माझी छाती फुटते कीं काय असें मला वाटूं लागलें.

" इतका प्रकार होत आहे इतक्यांत तूं घरीं आलीस, आणि मी असा अचेतनावस्थेंत पडलेला पाहून तूं रडूं लागलीस. तुझा तो रडण्याचा केविलवाणा स्वर ऐकून शेजारीपाजारी गोळा झाले व माझ्यासंबंधानें प्रत्येकाचे निरनिराळे तर्क सुरू झाले. कोणी म्हटलें ही मूर्च्छा आहे तर कोणीं म्हटलें हा मेलाच असला पाहिजे. उगाच कसले संशय काढतां ? त्याचें प्रेत घेऊन चला असेंहि एकानें अधिकारयुक्त वाणीनें सुचविलें.

" आणि खरोखरच त्याचा तो हुकूम अमलांतहि आला. माझी ती मूर्च्छा नाहींशी झाली नाहीं; पण ज्ञान मात्र चांगलें होतें. मीं पाहिलें तों तूं रडत रडत माझ्या उत्तर कार्याची तयारी करीत आहेस व शेजारी तुला सहाय्य करीत आहेत, असेंहि मला दिसलें.

" त्यानंतर माझा देह रीतिप्रमाणें बांधून स्मशानांत नेण्यांत आला व सर्वांनीं मिळून चिता रचून व त्या देहाला त्यावर ठेवून अग्नीहि ला-

विला. मला कांहींच अडथळा करतां आला नाहीं. मी मात्र हा तुमचा कारभार सर्व कांहीं पहात स्तब्ध होतो. ! ”

हें विलक्षण स्वप्न ऐकून तिनें एकवार बापूसाहेबांना मिठी मारली. जणूं काय ते आहेत कीं नाहींत हेंच तिनें पाहिलें असावें. नंतर कांहीं वेळानें तिनें आपल्या मनाला शांत केलें व कांहींसें उसनें अवसान आणून ती म्हणाली, “ हं संपवा तें एकदां तें स्वप्न गडे !! ”

बापूसाहेब क्षीण स्वरानें बोलूं लागले, “ त्यानंतर माझा देह पुरा जळलेला पाहून सर्व मंडळीसह आपले डोळे पुशीत तूं घरीं आलीस. इंदिरे ! लाडके ! ! तुझें तें दुःख पाहून व तुझा तो अत्यंत कोमेजलेला चेहरा पाहून मला फारच वाइट वाटलें. मी तो केव्हांहि विसरणार नाहीं. पण मला त्या वेळीं कांहींच बोलतां येत नसल्यामुळें माझा नाइलाज झाला होता, मी मेलों असें समजून सर्वांनीं मला जाळलें खरें; पण खरें पाहिलें असतां मी जिवंतच होतों. ”

इंदिरेला पुढें ऐकवेना. अजूनपर्यंत कसें बसें ओढून ताणून आणलेलें धैर्य एकदम नाहींसें झालें आणि ती केविलवाण्या स्वरानें म्हणाली, “ नको गडे आतां सांगूंच नये तें स्वप्न ! माझ्यानें ऐकवत नाहीं. ”

पण इंदिरेच्या या विनवणीचें बराच वेळपर्यंत कांहीं उत्तर मिळालें नाहीं व तिला सुस्काराहि ऐकूं आला नाहीं तेव्हां तिनें संदिग्धपणानें आपल्या प्रियकराच्या तोंडाकडे पाहिलें तों तिला निराळाच संशय आला, व भीति वाटली, कारण त्यांना या वेळीं चेतनावस्था मुळींच नव्हती आणि मूर्च्छा कशी असते हेंहि इंदिरेला माहीत नव्हतें. त्यांचा तो प्रकार पाहून इंदिरा डोळ्यांची उघडझाप करायलाहि विसरली कांहीं वेळानें तिनें आपण होऊनच बापूसाहेबांना हालविलें. हांका मारल्या पण कांहीं नाहीं.

आपल्या नवऱ्याजी ही शोचनीय स्थिति पहातांच इंदिरा ज्ञानशून्य झाली. तिच्या हृदयानें ठाव सोडला. आपणाला सुचणार सर्व उपचार तिनें करून पाहिले; पण कशाचाच कांहीं उपयोग होईना. तेव्हां ती तसेंच सगळें तिथें टाकून व दासीला अगर नोकराला हांक न मारतां वितच रस्त्यांत आली. या वेळीं बाहेर रात्र होती; पण तिला कशाचीच द नसल्यामुळें ती रस्त्यांतून धांवूं लागली; पण कांहीं वेळानें ती

तोंडावर हात धरून रस्त्यांतच उभी राहिली आणि आपल्याशींच म्हणाली, " पण आतां जायचं कुठं ? " तितक्याच घाईनें तिला तिच्या अस्वस्थ हृदयानें उत्तर दिलें, " जा. या वेळीं हाफीज हकिमाकडे जा. त्याच्या-वांचून तुझ्या सौभाग्याला सुरक्षित ठेवणारा दुसरा कोणीहि नाही. कारण, त्याच्याइतका हुषार हकीम या शहरांतच काय; पण आसपासच्या प्रांतांतहि मिळावयाचा नाहीं ! "

झाले. वेड्या झालेल्या इंदिरेनें हाफीजच्या घराचा रस्ता धरला. तिला तो रस्ता कुणीं सांगितला आणि काळोख्या रात्रीं एकट्यानें बुरख्याशिवाय जाण्याला तिला कसा धीर आला तें एक ईश्वरच जाणें; पण ती धांवत धांवत जी आली ती थेट हकिमाच्या दरवाजाशीं येऊन उभी राहिली.

या वेळीं पूर्ण रात्रींचा पहिला प्रहर संपून दुसऱ्या प्रहराला सुरुवात झाली होती. अर्थात राजरस्त्यावर म्हणण्यासारखी वर्दळ नव्हती म्हटलें तरी चालेल. इंदिरेनें दरवाजाला जोराचा धक्का दिला व ' लवकर दार उघडा ' म्हणून ती मोठ्यानें ओरडली.

या वेळीं ती भानावर आली. आपला शब्द तिला स्पष्टपणें ऐकूं आला. कुठें आलों आहों हें तिला आतां कळून आले व काळोखी रात्र, आपण एकटी आणि आपल्या तोंडावर बुरखासुद्धां नाहीं हा सर्व प्रकार तिच्या आतां लक्षांत आला. तेव्हां ती आपल्या धडधडणाऱ्या छातीला दोन्ही हातांनीं दाबून धरीत मनांत म्हणाली, " या हकिमानें आमच्याशीं पूर्वीं कांहीं शत्रुत्व केलें नव्हतें. आमचे इतरांकडेहि बरेच पैसे येणें आहेत, तेव्हां याच्याशीं इतका प्रसग न आणतां इतरांना जर पैसे द्यायला भाग पाडलें असतें तर बरें झाले असतें; पण आमच्या [illegible] गरजांमुळें होऊं नये ती गोष्ट हातून होऊन गेली. [illegible]कडून किती किती प्रकारांनीं मला सांगितलं पण न ऐकतां मी वेड्यासारखी हट्टाला पेटून हा प्रसंग आणला प्रसंगाचे वेळीं मान अपमान सगळें कांहीं विसरावें लागतें. हाय ! मी कां बरें इतकी सुंदर झालें ! मला ईश्वरानें इतकें सौंदर्य दिलें नसतें तर ! खरोखर सौंदर्य हेंच स्त्रीला वारंवार संकटांत लोटण्याला कारण होतें. आतां या हाकीमाला नेल्यावांचून गत्यंतरच नाहीं. इतकेंच नव्हे, तर ज्यास्त विलंबहि लावतां नये. मी कुणाला सांगितल्यावांचून

त्यांना तशा स्थितींत सोडून व दारहि उघडें टाकून आल्यें आहें, अर्थात कसेंहि करून या हाकीमाला तर नेलेंच पाहिजे. झालेल्या चुकीबद्दल मी त्याचे पाय झाले तरी धरीन. मीं घेतलेली सगळी रक्कमसुद्धां परत देईन; पण त्याला, नेणार ! मी इतकें केल्यानें तो क्षमा करणार नाहीं काय ? "

भवितव्य, स्वतःचें कार्य तडीला नेण्यासाठीं इंदिरेच्या मनांत अशा विचारांनीं जागृति उत्पन्न करीत होतें. हाय ! होणाऱ्यापासून कधीं कोणी चुकला आहे काय ? विधिलिपी केव्हांहि असत्य होणार नाहीं. ' होणारा-सारखी बुद्धी ' व्हावयाचीच.

इंदिरा विचारांत गढून गेली आहे इतक्यांत कुणीसा दरवाजा उघडला. दोघांचीहि नजरानजर झाली. दरवाजा उघडणारा इसम स्वतः हाफीजच होता; पण आपल्या दरवाजांत इंदिरा उभी असेल असा मात्र त्याचा अजमास नव्हता. अगदींच अकल्पित भेट. त्याला वाटलें होतें औषधासाठीं कोणी तरी आलें असेल, व त्या धोरणानेंच दार उघडल्याबरोबर त्यानें ' कोण आहे ? ' म्हणून प्रश्न केला; पण 'मी इंदिरा ! ' असें जेव्हां उत्तर मिळालें व प्रत्यक्ष नजरानजर झल्यामुळें ओळखहि पटली, तेव्हां तो चमकला आणि आश्चर्यानें म्हणाला, " इतक्या रात्रीं एकट्या आणि अशा उघड्या तुम्हीं आलां कशा ? आहे काय प्रकार ? "

" हाफीज साहेब ! मी अपराधीनी आहें, मला आपण क्षमा करा. आणि असेंच घरीं चला. मी या वेळीं अगदीं भयंकर संकटांत आहें. ही वेळ उपेक्षा करण्याची नव्हे. " इंदिरा रडकुंडीस येऊन म्हणाली.

हाफीजसाहेबांच्या हृदयांत प्रकाश पडला. नियामतखानांनीं त्यांना जें सांगितलें होतें तें इतक्या लवकर प्रत्ययाला येईल अशी त्यांची मनो-देवता त्यांना सांगत नव्हती; पण दोघांच्याहि दैवानुकूलतेनें प्रसंग आला. मनांतील आनंद बाहेर न दाखवितां हकीम इंदिरेला म्हणाला, "या आंत तरी या. उघड्या रस्त्यावर असें बोलत राहाणें बरें नव्हे. सगळें काय तें मला स्पष्ट सांगा. "

# प्रकरण १५ वें.

——:o:——

## शत्रू कीं मित्र. ?

हाफीज हकीम इंदिरेला बरोबर घेऊन आपल्या दवाखान्यांत गेला. ती उज्वलदीपकप्रकाशानें चांगली प्रकाशित झालेली होती.

तिथें गेल्यावर इंदिरा पुन्हां हात जोडून हाफीजला म्हणाली, " मला क्षमा करा. आपण तिकडचे मित्र आहां, आणि मी एक अविचारी अबला आहें. तिकडून नको म्हणून सांगितलें असतांहि मी तुमच्याकडे रुपयांच्या तगाद्यासाठीं आल्यें. यांत झालेला सगळा अपराध माझाच आहे. तेव्हां लवकर चला. ते आज अकस्मात् बेशुद्ध होऊन अचेतनावस्थेत बिछान्यावर पडले आहेत. आपण मागें एकदां आपल्या दिव्य औषधानें त्यांना जिवदान दिलें होतें, तसेंच आताहि करा. मी जे रुपये तुमच्या जवळून नेले आहेत ते सगळे झालें तरी तुम्हांला देतें. " इंदिरेच्या नेत्रांतून सारखा अश्रुप्रवाह चालला होता. तिचा जीव तळमळत होता.

तें पाहून हकीम बोलला, "रडूं नका इंदिराबाई ! जीवांचें संरक्षण करणारा खुदा आहे. मी बापूसाहेबांना औषध देतों. त्यांच्या बाबतींत शक्य ती मेहनत घ्यायला मी थोडीसुद्धां माघार घेणार नाहीं मनुष्याच्या हातून कधींना कधीं तरी चूक ही होतेंच. मनुष्य चुकीला पात्र आहे. त्यामुळें त्याच्या हातून केव्हां केव्हां होऊं नये त्या चुका होत असतात; एकं पश्चात्ताप हेंच त्याचें खरें प्रायश्चित्त होय. आतां झाल्या गेल्या गोष्टी विसरून जाऊन चालू प्रसंगाकडे लक्ष देणें भाग आहे. पुरुष चुकतात मग तुमच्यासारख्या स्त्रियांची चूक झाली तर आश्चर्य कसचें ! "

हाफीजच्या बोलण्याचा खोल अर्थ लक्षांत न घेतां इंदिरेनें आपलें तात्पुरतें समाधान करून घेतलें, आणि त्यामुळें पुढें बोलण्याला तिला थोडेंसें धाडसहि आलें. या वेळीं तिचें सर्व लक्ष घराकडे लागलें होतें त्यामुळें ती हाकीमाला म्हणाली, "मग आतां बोलण्यांत वेळ न घालवितां उठा, एकदमच जाऊं. "

" पण बाई ! त्यांची सध्यांची स्थिति व असें आकस्मिक बेशुद्ध होण्याचें कारण मला स्पष्ट करून सांगा म्हणजे त्याप्रमाणें मी औषधें वगैरे बरोबर घेईन. "

इंदिरेलाहि त्याचें म्हणणें खरें वाटलें व तिनें झालेली सर्व हकीगत त्याला सांगितली. तें सगळें ऐकून घेतल्यावर तो म्हणाला, " झालेल्या प्रकारावरून लक्षण कांहीं बरोबर दिसत नाहीं; पण तुम्हीं भिऊं नका इंदिराबाई ! तुम्हीं आतां सांगितलेल्या स्थितीवर आमच्या दवाखान्यांत उत्तम युनानी औषधें आहेत. बापूसाहेब माझे अभिन्नहृदयी मित्र असल्यामुळें होईल ती खटपट करून त्यांना आराम पडेल असेंच केलें पाहिजे आणि त्यासाठीं आजची सर्व रात्र त्यांच्या जवळहि बसून काढायला मी अगदीं तयार आहें. तुम्हीं अगदीं भिऊं नका. "

हकीमाच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच इंदिरेला बरेंच अवसान आलें. हकीमानें आपणाला हवीं असलेलीं औषधें घेतलीं व तो पोषाख वगैरे करून इंदिरेला ' चला ' म्हणाला.

दोघेंहि बाहेर रस्त्यावर आलीं आणि चालतच निघालीं. रहदारी अगदीं नव्हती म्हटली तरी चालेल. काळोख तर मी म्हणत होता; पण दोघेंहि चिंताक्रांत असल्यामुळें त्या काळोखाची कोणालाच भीति वाटली नाहीं. तीं झपाट्यानें चालत होतीं.

थोड्याच वेळांत इंदिरा हकिमासह आपल्या घरीं आली व त्याला घेऊन ती बापूसाहेबांच्या खोलींत गेली. बापूसाहेब अचेतनावस्थेंत तसेच बिछान्यावर पडून होते. त्यांचा श्वासोच्छ्वास चालत होता, कीं, नाहीं हें सांगणें कठीणच आहे. चेहेरा मात्र प्रेताप्रमाणें पांढरा शुभ्र झाला होता. इंदिरा तिथें येतांच घाबरली व ती टक लावून त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागली.

हकीमानें रोग्याला उत्तम तऱ्हेनें पाहिल्यावर गंभीरतेनें म्हटलें, "इंदिराबाई ! या स्थितीचें पर्यवसान कशांत होईल हें जरी आतां सांगतां येत नाहीं तरी आज सगळ्या रात्रभर यांना औषध पाजीत राहिलें पाहिजे. आणि असें केलें तरच पहांटेच्या सुमारास हे शुद्धीवर येतील. " इंदिरेला इतकें सांगून त्यांनीं तीचें कांहींसें समाधान केलें व आपण स्वतां औषध तयार करून त्यांनीं तें बापूसाहेबांना पाजलें. असा प्रकार दोन तीन तास

चालला होता; पण म्हणण्यासारखा कांहीं गुण दिसेना. या वेळीं मध्यरात्रीचा सुमार होता. इंदिरा स्थिरनेत्रांनीं औषधाकडे व बापूसाहेबांच्या चेहेऱ्याकडे पहात होती. तिचा चेहेरा श्रमानें व काळजीनें अगदीं सुकून गेला होता. व ती घटकेघटला खालीं पडते कीं काय असें वाटूं लागलें होतें. हाफीजच्या नजरेला ही स्थिती आली व तो म्हणाला, " इंदिराबाई ! अशा तऱ्हेनें आम्हीं दोघेंहि जागत बसलों तर पहाटेपर्यंत टिकाव धरवणार नाहीं. या वेळीं कोणी सावध मनुष्य त्यांच्याजवळ पाहिजे. तेव्हां यावेळीं तुम्हीं जाऊन झोंपा. शिवाय तुम्हांला श्रमहि फारच पडले आहेत मला तर इथें बसणेंच भाग आहे. आणि मला या अशा जागरणाची संवय आहे. जा झोंपा. " हकीमानें पुनः पुन्हां केलेल्या आग्रहामुळें इंदिरेला जाणें भाग पडलें. तीहि दमलेलीच होती, त्यामुळें बिछान्यावर जाऊन पडतांच तिला अगदीं मेल्यासारखी झोंप लागली. हाफीज, बापूसाहेबांच्या बिछान्याजवळ बसून राहिला.

बापूसाहेबांच्या बेशुद्धावस्थेमुळें इंदिरेची उडालेली तारंबळ व विपन्न स्थिती पाहून कठोर अंतःकरणाच्या हकीमाच्या हृदयांत सहानुभूती व दया उत्पन्न झाली होती. अर्थातच तो तिला झोंपायला सांगून आपण बापूसाहेबांजवळ बसला यांत आश्चर्य मानावयाला नको. मनुष्यत्वाची जाणीव असल्यावांचून परोपकारांत आनंद वाटावयाचा नाहीं. असो.

त्या गंभीर रात्रीं चोहोंकडे भिषण शांतता पसरली असतां त्या प्रेताप्रमाणें पडलेल्या आजाऱ्याजवळ—बापूसाहेबांजवळ—हाफीजच काय तो एकटा जागत बसला होता.

हकीम एकांतीं आणि निरुद्योगी असल्यामुळें त्याच्या मनांत या वेळीं सैतानानें हृदयवीणा वाजविण्याला सुरवात केली. आणि त्या वीणचे सूर त्याच्या कानांत निनादूं लागले. सैतान म्हणाला, "हा सुवर्णदर्शनयोग पुन्हां येणार नाहीं. इंदिरेचें उघडें सौंदर्य पहाण्याची जर तुला इच्छा झाली असेल, तर हाच त्या इच्छापूर्तीचा योग्य समय आहे. पहाण्यांत अपराध कसला ? आणि तुला अडथळा करायलाहि इथें कोणी नाहीं. जा. आपला अनेक दिवसांचा हेतु पूर्ण करून घे. या वेळीं मागें पुढें पाहिल्यास जन्मभर पश्चात्ताप करीत बसशील—"

हकिमाच्या आशातुर व कामविव्हल हृदयावर, असल्या गोडगोड सुरांचे आलाप वाजवून त्या दुष्ट सैतानानें हकिमाला आपलासा केला. हकीम बेफाम झाला. त्याचीहि खात्री पटली. हीच योग्य वेळ आहे, असें त्याला वाटूं लागलें. बापूसाहेब तर अचेतनावस्थेंत त्याच्या पुढें तोंड वासून पडलेच होते. म्हातारी नर्मदा सगळ्या दिवसाच्या श्रमानें श्रांत होऊन गाढ झोपेंत घोरत होती.

मनुष्य किती चंचल वृत्तीचा असतो पहा. हाफीज, कांहीं वेळापूर्वी मनुष्य झाला होता; पण आतां पुन्हां विषयवासनेच्या ताब्यांत जाऊन पशू बनला आहे. त्यानें आपल्या औषधाच्या पेटींतून एक लहानशी बाटली कढली आणि हलक्या पावलांनीं तो त्या खोलींतून बाहेर येऊन त्या निजलेल्या दासींजवळ गेला व तिच्या नाकाजवळ त्यानें ती बाटली धरली. नंतर कांहीं वेळानें पिशाच्याप्रमाणें भीषण चेहरा करून हळू हळू इंदिरेच्या खोलीच्या दारांत गेला.

दाराला आंतून खिळी नव्हती, त्यामुळें थोडासा धक्का लागतांच तें उघडलें गेलें व हकीमसाहेब हळूच आंत घुसले. त्या ठिकाणीं त्यांनां आपल्या कल्पनेप्रमाणें मनोरम दृश्य दिसलें हें सांगावयास नकोच.

हाफीजनें पाहिलें, खोलींत भरपूर प्रकाश असून शुभ्र शय्येवर गाढ झोंपेंत असलेली इंदिरा अस्ताव्यस्त पडली आहे. तिच्या नेत्ररूपी कमलांच्या पाकळ्या जरी मिटलेल्या होत्या, तरी त्यामुळें तिच्या सौंदर्याला बिलकुल कमीपणा आला नव्हता. तिचे काळे केंस अस्ताव्यस्तपणें तिच्या आंगावरच विहार करीत असल्यामुळें तिच्या गौर देहाला शोभाच येत होती. मृदु मन्द निश्वासानें अधरोष्ट कंपित होत होता. गालांवर गुलाबी छटा पसरली होती. भालप्रदेशावर चमकणारे घर्मबिंदू मोत्यांप्रमाणें दिसत होते आपल्या कोमल बाहुलतांनीं तिनें आपलें सुकुमार व उन्नत वक्षस्थल दाबून धरलें होतें खरें; पण तिचे निशक्त हात ती कामगिरी बरोबर करीत नसल्यामुळें बराचसा भाग उघडा पडला असून श्वासोच्छ्वासाबरोबर तो वर खालीं होत होता. अहाहा! इंदिरेचें काय तें स्वरूप! हकिमाला वाटलें, 'बापूसाहेबांनां हें सौंदर्यरत्न मिळालें, यावरून ते फारच भाग्य-

वान् होत; इथें कोणीहि नाहीं. मी इला एकवार स्पर्श करूं काय ? हिचा अंगस्पर्श किती कोमल, आणि मधुर असेल बरें!!'

नको. नको. हाफीज, इतक्या नीचतेस तूं पोंचूं नकोस. क्षणिक सुखासाठीं, क्षणस्थायी स्वार्थासाठीं तूं इतका सैतान बनूं नको. जिनें तुला विश्वासानें आपल्या घरांत एकटा ठेविलें, तिला तूं स्पर्श करून अपवित्र करूं नको. तूं आपल्या सर्व आयुष्यांत असें नीचपणाचें काम अद्याप केलेलें नाहीं.

विवेकाचा विजय झाला. आणि हकीमसाहेब जितक्या खबरदारीनें त्या खोलींत आले होते तितक्याच खबरदारीनें फिरून बाहेर आले. त्यांची पापवासना जागच्याजागींच नाहींशी झाली, व या प्रसंगीं मोठ्या कौशल्यानें ईश्वरानें इंदिरेवरचा प्रसंग निभावला.

नर्मदेला ज्या मादक पदार्थाच्या वासानें बेशुद्ध करून हाफीज इंदिरेच्या खोलींत गेला होता, तो वास तिला आणखी तीन चार तास तरी बेशुद्धींत ठेवायला पुरेसा होता. हकीम बापूसाहेबांजवळ आल्यानंतर त्यानें त्यांची नाडी वगैरे पाहिली, त्यावरून तो समजला कीं, देहावर औषधाचा परिणाम होत आहे. अर्थात् आतां विशेष काळजी करण्याचें कारण नाहीं. पहाटेपूर्वीहि कदाचित् ते शुद्धीवर येण्याचा संभव आहे, असेंहि त्याला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

नंतर हकीमसाहेबांनीं निश्चितमनानें त्यांना आणखी औषध पाजलें आणि आपण जवळच्याच खोलींत जाऊन आडवे झाले. आतां त्या ठिकाणीं बसण्याचें विशेष कारण नव्हतें व इंदिराहि तितक्यांत उठून येईल अशी त्यांना खात्री होती; त्यामुळें ते बिछान्यावर पडले; पण झालेल्या शारीरिक व मानसिक श्रमांनींहि त्यांना इतकी ग्लानी आलेली होती कीं, ते बिछान्यावर पडतांच त्यांना झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ज्या वेळीं ते जागे झाले, त्या वेळीं त्यांना आढळून आलें कीं, इंदिरा आपल्या बिछान्याजवळ उभी असून आपणाला हांक मारीत आहे. ती त्यांना उठलेले पाहून म्हणाली, " हकीम साहेब ! उठा दिवस बराच आला. रात्रीं तुम्हांला फारच जाग्रण झाले असेल नाहीं ? "

हकिमसाहेबांना रात्रीचा सगळा प्रकार आठवला, व आपल्या पुढें इंदिरा उभी आहे हें पाहून त्यांना आपल्या वर्तनाची एक प्रकारची लाज वाटली व हृदयहि थरारलें.

ते कांहींच बोलत नाहींत असें पाहून इंदिराच बोलूं लागली, " खरोखर हकिमसाहेब, आपल्या औषधाची वाखाणणी करावी तितकी थोडीच आहे. आपल्या उदार अंतःकरणाची मला यापूर्वीं चांगलीशी कल्पना झाली नव्हती. तुमच्या औषधानें तिकडे आतां बराच आराम वाटत आहे. तुमचे हे उपकार मी केव्हांच फेडूं शकणार नाहीं. मीं सगळी हकीकत तिकडे सांगितली आहे, आणि म्हणूनच तुम्हांला केव्हां भेटेन असें त्यांना झालें आहे. चला लवकर. "

लागलींच हकीमसाहेब आपल्या अंतरुणावरून उठले, आणि बापूसाहेबांच्या खोलींत आले. आपल्या औषधाचा बापूसाहेबांच्या प्रकृतीवर झालेला परिणाम पाहून खरोखरच त्यांना समाधान वाटलें. ते म्हणाले, " बापूसाहेब ! खुदा तुम्हांला दीर्घायुषि करो. त्याच्याच कृपेनें आज तुम्हीं वांचला. "

बापूसाहेब बिछान्यावरून अर्धवट उठून समाधानपूर्ण स्वरानें हकिमसाहेबांना म्हणाले, " मित्रा ! तुझें हें ऋण मी या जन्मांत तरी फेडूं शकेन कीं नाहीं याचा संशयच आहे. मी माझ्या पत्नीच्या तोंडून मागील सर्व प्रकार ऐकला आहे. मोहवश होऊन मनुष्य केव्हां केव्हां आपल्याला विसरतो, आणि त्या वेळीं त्याच्या हातून कांहीं कांहीं, होऊं नये अशा चुका होतात. इंदिरेनेंहि पण त्या वेळीं विचार न करतां घाईनेंच काजीकडे फिर्याद केली; पण मित्रा, तूं तें सगळें विसरून रात्रभर माझ्या बिछान्याजवळ बसून मला बरें केलेंस ! अहाहा ! हे तुझे उपकार मी कुठें ठेवूं ? आतां असेंच आणखी एक माझें सांगणें ऐक. कारण हें तूं न ऐकलेंस तर त्यापासून मला फारच वाईट वाटेल. इंदिरे ! तूं ते आणलेले रुपये त्याचे त्याला देऊन टाक. मी माझ्या मित्राला ऋणमुक्त केलें आहे. रुपयाचें आम्हाला कारण नाहीं. रुपये असले म्हणजेच सुख मिळतें असें नाहीं, ईश्वराची कृपा असली तरच सुख मिळेल. त्यानें एके-

काळीं माझ्यावर कृपा करून मला चांगली स्थिति दिली होती. आताहि तशी वेळ आणण्याला तोच समर्थ आहे."

इंदिरेनें आनंदानें आंत जाऊन रुपये आणले; पण हकीमसाहेबांनीं ते घेण्याचें नाकारलें व म्हटलें, " मित्रा, तूं आणि मी लहानपणापासूनचे मित्र आहों. तुझी उदारता मी जाणून आहे. पण यावेळीं हे रुपये नेणें मला योग्य वाटत नाहीं व असला आग्रह तूं मला करूं नये. आता औषधाची किंमत व येण्याची फी जी तूं देशील ती मी घेईन. ती घेण्यांत आनमान करणार नाहीं. कारण तो माझा धंदा आहे; पण ती फी सुद्धां आज घेणार नाहीं. तुला चांगला बरा केल्यानंतरच काय घेणें तें घेईन. अजून तुला चांगलें बरें वाटलेलें नाहीं. ही आतांची तात्पुरती हुषारी आहे. हयगय केल्यास हें दुखणें वाढेल आणि मग आराम करणें अशक्य होईल. तुमच्या बाबतींत जीं नवीन औषधें बनवावीं लागतील त्याबद्दलचा पैसा मी अवश्य घेईन; पण आज मात्र कांहीं घेणार नाहीं. चांगलें बरें वाटल्यावर जें घ्यावयाचें तें घेईन. शिवाय इंदिरेच्या बाबतींत माझ्या हातून झालेल्या अपराधाबद्दल मला अत्यन्त पश्चात्ताप होत आहे. मी तुमच्याकडे व तुमच्या साध्वीपत्नीकडे या बाबतींत हात जोडून क्षमा मागतों. एवढी क्षमा तुम्हीं कराल अशी मला आशा वाटते." असें म्हणून खरोखरच हकीमानें हात जोडले.

पण बापूसाहेबांनीं त्याचे ते हात आपल्या हातांत घेऊन कळवळ्यानें म्हटलें, " मित्रा ! झाल्यागेल्या गोष्टीबद्दल आतां चर्चा करण्याचें कारण नाहीं. तें सगळें आपण विसरून जाऊं. तुम्हीं औषधाची मात्र किंमत घेतली पाहिजे." असें म्हणून बापूसाहेबांनीं त्याच्या हातांत कांहीं रुपये दिले.

पण हकिमानें ते रुपये घेतले नाहींत जशाच्या तसेच जमीनीवर ठेवले इंदिरेनें व बापुसाहेबांनीं पुष्कळ आग्रह केला; पण त्या रुपयांना हात न लावतां औषध केव्हां घ्यावयाचे व पथ्य काय करावयाची तें सांगून तो घराबाहेर पडला.

हाफीजच्या या उदार वर्तनानें बापूसाहेबांना व इंदिरेला समाधान वाटलें. हकीमाचा स्वभाव अगदीं निवळला याबद्दल त्यांची खात्री झाली.

इंदिरा इतकें सुद्धां ह्मणाली, " आजच्या या वर्तनानें त्यानें मागील सगळी अपकीर्ति धुवून काढली. मी त्याला अगदीं भावाप्रमाणेंच मानणार आतां ! "

---

## प्रकरण १६ वें.



### औषधाबरोबर विष.

अंधकारमय दरींत जर कधीं क्षणभर सूर्यप्रकाश पडला तर ती जशी भीषणतेनें प्रकाशित होते, त्याचप्रमाणें हाफीजच्या अन्तःकरणांत, बापूसाहेब व इंदिरा यांच्या अमानुष उदारपणानें क्षणभर प्रकाश पडला व तें उज्ज्वल झालें; पण त्या पवित्र जागेंतून बाहेर पडतांच पुन्हां तें सैतानाच्या ताब्यांत पूर्णपणें गेलें, आणि तो पुर्वीप्रमाणेंच निष्ठुर अंतःकरणाचा बनला. आपलें हृदय पवित्र व्हावें, त्यांत चांगले विचार उत्पन्न व्हावे अशाबद्दल त्याचे प्रयत्न चालले होते; पण मानसिक दौर्बल्यामुळें तें सगळें व्यर्थ जाऊन तो पूर्वीप्रमाणेंच सैतान बनला. त्याची विवेकशक्ती कुंठित झाली.

इकडे बापूसाहेबांच्या आकस्मिक आजाराची बातमी व रातोरात हाफीजनें येऊन त्यांच्या प्रकृतीला आणलेलें आरोग्य काजीसाहेबांनां श्रुत झालें, तेव्हां क्रुद्ध होऊन नियामतखान मनांत ह्मणाला, " यांत हाकिमाचाच बहुतेक अपराध दिसतो. इंदिरेच्या निकट सहवासाचें सुख मिळावे ह्मणूनच त्यानें हा व्यूह रचला असावा. नेहमीं औषधाच्या निमित्तानें त्यांच्या घरीं जातां यावें हाच त्याचा हेतू दिसतो. प्रत्यक्ष नाहीं तर नाहीं पण दर्शनसुख तरीं घ्यावें, असा त्यानें बेत केलेला दिसतो; पण मी तो तुझा बेत तडीला जाऊं देणार नाहीं. मी जिवंत असेपर्यंत, हा चालता बोलतां देह माझ्या ताब्यांत असेपर्यंत मी इंदिरेला मिळविल्यावांचून राहणार नाहीं. तिच्या सौंदर्याची स्मृति माझ्या हृदयांत जागृत आहे तो पर्यंत मी तिला विसरणेंच शक्य नाहीं. मी तिच्यासाठीं इकडे तळ-

मळावे आणि हाफीजनें तिचें सुख घ्यावें हें मी कधींच सहन करणार नाहीं. मी तिला मिळविणार आणि तीहि या हकीमाच्याच मार्फत. बस्स. ठरला विचार ! ”

नियामतखानानें लागलीच आपल्या एका शिपायाला बोलाविलें आणि त्याला हुकूम केला, कीं, “ फार जरुरीचें काम आहे. हकीमाला ताबडतोब बोलाविलें आहे ह्मणून सांग. तूं त्याला बरोबर घेऊन ये. ”

शिपाई निघून गेल्यानंतर खानाची विचारमालिका पुन्हां सुरू झाली, “ मी या प्रांतांत करीन तें होईल इतका माझा अधिकार आहे. निजामशहाच्या खालोखाल माझी योग्यता मानली जाते, व तितकें मला सामर्थ्य आहे. मग माझ्याशीं स्पर्धा आणि प्रतिकूलता करण्याचें सामर्थ्य कुणाला आहे बरें ! या हकीमाला मी पाहिजे तसा मुठींत आणीन. इतकेंच नव्हे, तर केवळ कुत्र्याप्रमाणें मी त्याला माझी आज्ञा मानावयास लावीन. आणि त्याच्या सहाय्यतेवरूच मी इंदिरेवर अधिकार गाजवीन. मी जर इतकें न करीन तर माझें नांव नियामतखानच नव्हे. ”

नियामतखान अशा प्रकारच्या चिंतनांत गढून गेला आहे अशा वेळीं हाफीज हकीम तेथें आला आणि अत्यन्त नम्रतेनें सलाम करून विनीत स्वरानें ह्मणाला, “ हुजूरांना या दासाची कां बरें आठवण झाली ? ”

नियामतखान कोणत्याहि प्रकारचा प्रस्ताव न करतां एकदमच तीव्र स्वरानें ह्मणाला, “ हकीम ! बापूसाहेबांकडची काय बातमी आहे ? ”

खानाची ती बोलण्याची पद्धत आणि तो तीव्र स्वर पाहून हाफीजच्या रक्ताचें पाणी झालें. तो भीतभीतच ह्मणाला, “ हुजूर साक्षात धर्मावतारच आहेत ! आपण त्या दिवशीं अनुमानानें सांगितलें होतें तें खरें झालें. खरोखरच मला स्वतः इंदिरा बोलवावयाला आली होती, ”

खान पुन्हां रागानें उसळून ह्मणाला, “ इंदिरा आली ह्मणून तूं अगदीं हुरळून जाऊन तिच्या मागून कुत्र्याप्रमाणें गेलास नाहीं का ? आणि सगळ्या रात्रभर जाग्रण करून तिच्या नवऱ्याला वांचविलेंस ? जो मनुष्य मरावा अशी मी इच्छा करतों, त्याला तूं जिवंत ठेवण्याचा प्रयत्न करतोस काय ? हाफीज ! या नियामतखानाबरोबर वैर संपादून तूं आपल्या पराक्रमाची प्रौढी मिरविणार काय ? माझें सामर्थ्य केवढें आहे याचें

अजून तुला ज्ञान झालें नाहीं वाटतें ! तुझी संपत्ती लुटून आणि घरादाराला आग लावून जेव्हां मी तुला कैदेंत घालीन तेव्हांच तुला माझी ओळख पटेल असें वाटतें. लोकशक्ती माझ्याकडे असून चांगल्या बरोबर कृष्णबुद्धीकौशल्यहि माझ्या हृदयांत वास्तव्य करीत आहे. या इंदिरेकडूनच पुन्हां तुझ्यावर फिर्याद करवून तुझी काय स्थिति होते हें मग दाखविता. आपल्या स्त्रीच्या अंगावर हात टाकल्याबद्दल बापूकडून पाहिजे तर तुझ्यावर फिर्याद आणतों, आणि उघड्या राजरस्त्यावर तुला मोकळा उभा करून फटके मारण्याची शिक्षा देतों ! फार काय, मी मनांत आणलें तर तुझें मांस तूं जिवंत असतांना कुत्र्याकडून खाववीन ! काय, माझ्याशीं स्पर्धा करायला तूं तयार आहेस का ? नसेल तर मी सांगतों तें गुरुमंत्राप्रमाणें मान्य करून त्याप्रमाणें वाग. ”

या प्रांतांत ‘ कर्तुमन्यथाकर्तुं ’ अशा सामर्थ्याच्या नियामतखानाच्या तोंडून हें भाषण ऐकतांच हाफीज अगदीं भेदरूनच गेला. कांहीं वेळपर्यंत त्याला काय बोलावें तेंच सुचेना. कारण काजीसाहेबांचें अचाट सामर्थ्य त्याला पुरें माहीत होतें. सगळे लोकहि त्याला विलक्षण मान देत होते; त्यामुळें त्यानें कांहीं केलें तरी पचून जाण्यासारखी त्याची परिस्थिति होती. हें सगळें मनांत येतांच हाफीजला फारच भीति वाटली. तो हात जोडून काकुळतीच्या स्वरानें म्हणाला, “ हुजूर आपल्या मनांतील भाव न ओळखल्यामुळें या सेवकाच्या हातून जर खावंदाचा कांहीं अपराध झाला असेल, तर एकवार कृपाळू होऊन त्याला क्षमा करा. आतां या घटकेपासून हुजूरचा हा गुलाम आपणाला न विचारतां कांहींहि करणार नाहीं.”

हाफीजच्या या एकंदर बोलण्यावरून व हावभावावरून खान समजला कीं, ‘ हकीम आपणाला अत्यंत भ्याला आहे, अर्थात आतां मी सांगेन तसें तो ऐकेल. ’ असा विचार करून खान शक्य तितक्या शांततेचा आव आणून म्हणाला, “ तुला केलेल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला आहे यास्तव मी तुला त्याबद्दल क्षमा करतों. पण आजपासून तूं माझें मत घेतल्यावांचून असलीं महत्वाचीं कामें करीत जाऊं नकोस. बरें. आज बापूसाहेबांच्या ज्या रोगाचें तूं निदान ठरवून त्यांना औषध देऊन बरें केलेंस तो रोग त्यांनां पुन्हां होणें संभवनीय आहे काय ! ”

" आहे. औषध योग्य न पोंचल्यास तो रोग होईल आणि मग मात्र त्यांची वांचण्याची आशा करायला नको. कारण तो रोगच भयंकर आहे."

"ठीक आहे. तो मेलाच पाहिजे. त्याच्या मरणावांचून माझा कार्यभाग साधणार नाहीं. कारण तो नाहींसा झाल्यावांचून इंदिरा मला मिळणार नाहीं. इंदिरा फक्त एकच दिवस पाहिजे. तिनें माझ्या केलेल्या आपमानाचा मी तिच्यावर सूड उगवीन आणि मग कुत्रीप्रमाणे लाथाडून लावीन. जी माझ्या--पराक्रमी मनुष्याच्या--मनांतील इच्छा ओळखूनही ती पूर्ण केल्याशिवाय मला झिडकारून गेली तिला कोणत्यांना कोणत्या रीतीनें मी भ्रष्ट करणार--तिला झालेला गर्व नाहिसा करणार--आणि नंतर ती मग तू घे. मला तिची मुळींच जरूर नाहीं." खानाचा प्रत्येक शब्द जणूं काय कालकूटाचा वर्षावच करीत होता म्हटलं तरी चालेल. खानाला वाटलें, अशा तऱ्हेनें इंदिरेच्या लाभाचें त्याला मधाचें बोट लावलें म्हणजे तो हें काम ज्यास्त आस्थेनें आणि मनापासून करील. इतकेंच नव्हे तर तो आपण सांगूं तें ऐकेल.

इकडे हाफीज मनांत म्हणत होता, " मी मनाचा दुष्ट असें आजून पर्यंत मानीत होतों; पण या खानसाहेबांची मजल माझ्याही पुढें गेली आहे. मी तर त्यांच्या हातांत पुरा सांपडलों आहे. त्यांच्या कक्षेतून आतां मला बाहेर निसटतांच येत नाहीं. मी जर त्यांच्या या नीच हेतूला कांहीं अडथळा करायला गेलों तर त्यांत उलट माझाच नाश होईल." असा पोक्त विचार करून तो हात जोडून खानसाहेबास म्हणाला, " हुजूरच्या दासाचाही मी दास आहें. अर्थात आपण जो हुकूम कराल तो मी विनहरकत मान्य करीन."

हाफीजच्या तोंडचे इतके शब्द ऐकल्यावर खानाचा चेहरा प्रफुल्लित झाला. ते हंसतच म्हणाले, " ठीक. तुला लवकरच चांगली बुद्धि सुचली व तूं लवकरच ताळ्यावर आलास हें पाहून मला फारच आनंद वाटत आहे. मी सांगतों तसा तूं वागलास कीं ही सौंदर्यशालिनी इंदिरा तुझीसुद्धां झाली असें तूं समज. तिचा अभिमान घालविण्यापुरती फक्त एकच दिवस ती मला पाहिजे आहे. असो; पण तुला मी एक प्रश्न

विचारतों, मात्र खरें काय तें सांग. तुला कोणतीही भीति बाळगण्याचें कारण नाहीं. इथें केवळ तूं आणि मी दोघेच आहों, आणि तुझी व माझी शिकारही एकच आहे. पण मला आधीं स्पष्ट समजलें पाहिजे कीं, तुला काय आवडतें ? संपत्ति आवडतें, कीं सौंदर्यवती आवडते ? "

खानाचें हास्यप्रफुल्लित तोंड पहातांच, हाफीज हकीमाला कांहींसें समाधान वाटलें. जें वादळ आणि मेघडंबर जमलें होतें त्याचा अशा रीतीनें नाश झालेला पाहून हकिमाला पुढें पाऊल टाकण्याला थोडासा धीर आला, त्याच्या मनांत ज्या आशंकाजनित संकोचाचा उदय झाला होता; त्याचा अशा रीतीनें शेवट झाला हें बरें झालें असें त्याला वाटणें सहाजिक होतें. कारण खानाची त्याला फारच भीति वाटत असे.

कांहीं वेळानें लोचटपणानें आपलें दंतप्रदर्शन करून हकीम ह्मणाला, जनाब ! आपण अभय दिलें आहे, तेव्हां मी आतां अगदीं मन मोकळें करून बोलतों. मला पैसा आणि रूपवती दोन्हींहि पाहिजेत. जगांत दोहोंवरही प्रेम करणारा कोणी आहे का नांहीं हें मी जाणत नाहीं, पण माझी इच्छा मीं सांगितली."

लागलाच नियामतखान उठून एका मोठ्या पेटीजवळ गेला, आणि त्यांतून मोहरांनीं भरलेली एक पिशवी काढून त्यानें ती हफीजपुढें ठेऊन ह्मटलें, " इंदिरेनें आपल्या कुशलतेनें तुझ्याकडून दोन हजार रुपये काढले, त्यामुळें तुझे प्राण अगदीं व्याकूळ झाले आहेत हें मी जाणतों या थैलींत एक हजार मोहरा आहेत. ही मी तुला बक्षिस देतों. कारण तूं पैशांवर प्रेम करतोस असें आतांच सांगितलेंस ! ही थैली घेण्याला तूं कोणत्याहि प्रकारचा संकोच करण्याचें कारण नाहीं. इतकेंच नव्हे तर तूं जर हे घेतलें नाहींस तर मला फार राग येईल. तसेंच तूं ह्मटलेंस, कीं, ' मला सौंदर्यवतीही पाहिजे.' तर त्याची व्यवस्था मी लवकरच करीन; पण आधीं कामासंबंधीं बोलूं."

" हुजूरनीं मला काय ती आज्ञा करावी." आपली लोलुप दृष्टि थैलीकडे लावून हाफीज उद्गारला.

" हं ! मोठ्यानें ओरडूं नको. भिंतीला कान असतात आणि मी जें आतां तुला सांगणार आहें तें फारच जोखमीचें व जबाबदारीचें कृत्य

असल्यामुळें फारच खबरदारी घ्यावी लागणार आहे. शिवाय या कामगिरीच्या मानानें मी तुला अगाऊ बक्षीस बरेंच दिलें आहे व आणखींहि देईन; पण या मानानें कामगिरीचें स्वरूप तुझ्या लक्षांत आलें काय ? ”

“ प्रथम माझ्या मठ्ठ डोक्यांत चांगलासा प्रकाश पडला नव्हता; पण आतां समजलों.”

“ साग पाहूं तर माझ्या मनांत काय आहे तें ? ”

“ बापूसाहेबांना या जगांतून कायमचें दृष्टीआड करावें असा तुमचा हेतू दिसतो, आणि तो हेतू माझ्याकडून तडीस जावा असाही पण मानस आहे.”

“ हो. बरोबर ओळखलेंस. बरें, पण मी असें विचारतों, बापूसाहेबांना योग्य औषधोपचार झाल्यास या दुखण्यांतून उठूं शकतील का ? ”

“ होय. त्यांचा आजार फारसा विकोपास गेलेला नाहीं.”

“ पण अयोग्य औषधानें तो विकोपास जाऊं शकेल.”

“ असें मला वाटतें. ” हाफीजचें अन्तकरण थरथर कांपूं लागलें.”

“ तर मग तो विकोपास जाऊनहि उपयोग नाहीं व योग्य औषधहि पोंचतां नये; पण त्याला चटकन् मृत्यू आला पाहिजे. तूं स्वतःची काळजी करूं नकोस. मी तुझा रक्षणकर्ता आहे. तुला भिण्याचें कारण नाहीं. मी स्वतःचा प्राणहि देऊन तुला वांचवीन. आधीं त्याला मारण्याचा विचार कर. नंतर काय करावयाचें तें मागाहून सांगेन. ”

“ पण त्याला मारावयाचें कसें ? ” हाफीजनें भीतभीतच प्रश्न केला.

“ विषानें—जहाल विषानें. मूर्खा ! तुला इतकी अक्कल नाहीं ? मला राग आणल्यावांचून तुला कांहीं बरेंच वाटत नाहीं आणि कांहीं अक्कलहि सुचत नाहीं असें वाटतें ! ”

“ पण—पण—काजीसाहेब, आपण काय बोल—- ”

“ चूप. चूप. एक अक्षर बोलूं नको. तूं असें न करशील तर आपला नाश करून घेशील. ”

हाफीजहाकीम नियामतखानाचा पराक्रम जाणून होता. अर्थात या वेळीं त्याच्या म्हणण्याप्रमाणें न वागल्यास तो आपली फारच भयंकर स्थिति करण्यालाहि मागें पुढें पहाणार नाहीं. नाइलाज झाल्यामुळें हाफीज

म्हणाला, " हुजूर ! आपलें म्हणणें मला मान्य आहे. हुकुमाप्रमाणें तजवीज होईल. "

" लवकरच उमजलास म्हणून बरें झालें, नाहीं तर तुला माझा परिचय द्यावा लागला असतां ! तूं इतका भितोस कशाला ! औषधाबरोबर वीष द्यावयाचें आणि मृताच्या शरीराची तपासणी करणारा तूंच. वेडा नाहीं तर. इंदिरेला कांहीं संशय आला तरी ती फिर्याद करणार माझ्याकडेसच. तसेंच ती तिची फिर्याद घेणें हें माझ्याच स्वाधीन असणार. आतां स्पष्टच सांगतों, हाफीज, तूं मी सांगतों त्याप्रमाणें बिनबोभाट काम पार पाड, कीं बक्षिस चांगलें मिळेल, नाहींतर तुझी मी किती दुर्दशा करीन ती तूं कल्पनेनेंच जाणावीस हे उत्तम ! तूं हें काम केलें नाहींस तर मी कोणाकडून तरी विषप्रयोग करीनच व इंदिरेलाहि माझीशी करीन; पण इंदिरेच्या लाभासाठीं तो विषप्रयोग तूं केला आहेस असें सिद्ध करायला मात्र मी विसरणार नाहीं. यांत काय तें समज. " असें म्हणून नियामतखान विजयीमुद्रेनें हाफीजकडे पाहूं लागला.

हाफीजची खात्री झाली कीं, आपण या सैतानाच्या कपटजालांत पूर्णपणें गुतलों असून त्याच्याविरुद्ध वागलों कीं, आपली वाटच लागणार. त्याच्या हुकुमाप्रमाणेंच चाललें पाहिजे. असा विचार करून लागलींच तो तें भीषण कार्य करण्याला तयार झाला. जो एकदां सैतानाच्या ताब्यांत गेला व त्याच्या निगरगट्ट श्रृंखलेनें बांधला गेला, तो सहसा मुक्त होऊं शकत नाहीं. असो. आणखी इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी झाल्यावर हाफीज हकीम आपल्या घरीं निघून गेला.

योगायोग कसा विलक्षण पहा. हाफीज आणि नियामतखान यांचें हें कुभांडकारस्थान ज्या दिवशीं निश्चित ठरलें, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं सायंकाळीं बापूसाहेबांचें दुखणें विकोपास गेलें, व त्यामुळें पूर्वींच्याप्रमाणेंच घाबरलेल्या स्थितींत इंदिरा हकिमाच्या घरीं येऊन त्याला घेऊन गेली.

आणि जातांना त्या सैतानजाया हकिमानें खानाच्या सूचनेप्रमाणें आपल्याबरोबर जहाल विषाची कुपी घेतली, पण दुर्दैवी इंदिरेला यापैकीं कांहींच दाद नव्हती. हाफीज आला आहे, आतां आपल्या नवऱ्याला लवकरच गुण पडेल व नंतर त्याचेंच कायमचें औषध घेऊन

आपल्या प्रियकराला पूर्णपणें बरें करतां येईल.' गरीब बिचारी इंदिरा ! आपल्या नवऱ्याला आतां विषप्रयोग होणार आहे, आणि तो आपण विश्वासू म्हणून मानलेल्या हाफीजच्या हातून ' असें जर तिला समजलें असतें तर तिची काय बरें स्थिति झाली असती ! ! पण हें तिला समजणार कसें ?

---

# प्रकरण १७ वें



## खानाचें खरें स्वरूप.

हाफिजनें त्या दिवशीं रात्रीं ज्याप्रमाणें रात्रभर बापुसाहेबांजवळ बसून त्यांना ठरलेल्या वेळीं औषध देण्याची कामगिरी बजावली होती त्याप्रमाणेंच आज रात्रींहि---कुणाला संशय येऊं नये म्हणून त्यानें करण्याचें ठरविलें. इंदिरेचा त्याच्यावर पूर्ण विश्वास होताच.

तरी पण आजचें तें विषपूर्ण औषध देतांना त्याचा हात थरथर कांपत होता व हृदय धडधडत होतें. तसेंच त्याचें तोंड तर एखाद्या प्रेताप्रमाणें पांढरें फटफटीत दिसत होतें. त्याच्या या हालचालीकडे व फिकट चेहऱ्याकडे लक्ष जातांच इंदिरा त्याला म्हणाली, " का, हाफीज साहेब ! आज आपण असें काय करतां ? "

हाफीज चमकला; पण लवकरच भानावर येऊन मृदुस्वरानें म्हणाला, " मी असें कां करीत आहें, हें तुम्हांला कसें सांगू इंदिराताई ! तें सांगितल्यावर तुमच्या अंगावर शहारे येतील व तुम्ही घाबरून जाल काय सांगू ताईसाहेब ! तुमचें सौभाग्य संपलें! आज मी माझ्या मित्राला वांचवूं शकत नाहीं. आजच्या उत्तर रात्रीं यांना जर शुद्धी आली नाहीं तर आशा सोडणें भाग आहे. मी हें कठोर सत्य तुम्हांला सांगणार नव्हतों. पण पुढें येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्यासाठीं तुम्हाला तयारी करतां यावी म्हणून बोलावें लागत आहे. तरी पण मृत्यु आणि जिवन

हीं ईश्वराच्या स्वाधीन असल्यामुळें नक्की अमुकच होईल म्हणून सांगतां येत नाहीं. आज मृत्यूचीं चिन्हें दिसत आहेत; पण खात्रीनें तसेंच होईल हें कांहीं—"

पण पुढचे शब्द ऐकायला इंदिरा उभी होती कुठें ? 'मृत्यूचीं चिन्हें दिसत आहेत' म्हणण्याबरोबरच ती मूर्च्छित होऊन खालीं पडली, आणि हें पहातांच हकिमाचें कठोर हृदयहि द्रवलें. लागलीच त्यानें नर्मदेला हाक मारली व तिच्याकडून इंदिरेला त्यानें नजीकच्या खोलींतील बिछान्यावर नेऊन निजवायला सांगितलें, व आपण एका नवीन औषधाचें मिश्रण तिला पाजवून त्यानें नर्मदेला तिच्या जवळून हालूं नको म्हणून सांगितलें.

हाफीज जरी दुष्ट होता, तरी खानाइतकें त्याचें राक्षसी अंतःकरण नव्हतें. दुर्दैवी इंदिरेची ती विपन्नावस्था पाहून तिच्याबद्दल त्याला सहानुभूति वाटूं लागली. इंदिरेनें त्याच्या केलेल्या अपमानाचा त्याला विसर पडला. त्यानें मनांत म्हटलें, " बापूसाहेबांना विष दिल्यावांचून माझी सुटका होणें शक्य नसल्यामुळें त्यांना वीष देणेंच भाग आहे; पण प्राणघातक वीष मी त्यांना देत नाहीं, ज्या गुंगीच्या औषधानें चोवीस तासपर्यंत ते मृताप्रमाणें राहतील असें औषध त्यांना मी देतों व अशा रीतीनें त्यांना कृत्रिम मरण आणतों. नंतर काजीकडून मिळणारी बक्षिसाची रक्कम माझ्या पदरांत पडतांच मी बापूसाहेबांचें प्रेत अग्निसंस्कारासाठीं म्हणून नेऊन त्यांना शुद्धीवर आणीन आणि त्यांची दुसरीकडे रवानगी करीन. त्यानंतर पुढें मग सुचेल तसें ते करतील. " हाफीजनें आपल्या या भावी हेतूस अनुसरूनच बापूसाहेबांना औषध दिलें.

ती रात्रच अतिशय भयंकर होती. बापूसाहेब मरणार म्हणून, किंवा सैतानाची हृदयाविष्करण क्रिया होणार होती म्हणून म्हणा, अगर एक सरळ व उदात्त मनाचा निरपराधी गृहस्थ अकाल मृत्यूच्या जबड्यांत पडणार म्हणून म्हणा, प्रकृतीदेवीनेंहि आपलें स्वरूप फारच भयंकर केलें होतें. मध्यरात्रीपासून तर मुसळधार पावसाला सुरुवात झाली होती. विजेचें चमकणें प्रत्येकाला जितकें भीतिप्रद वाटत होतें तितकाच आका-

शांत होणारा गडगडाट हृदयाचा थरकांप करीत होता. हें प्रळयकाळचें पूर्व चिन्ह आहे कीं काय असाहि प्रत्येकास भास झाला. पावसाला तर बिलकूल विराम नव्हता.

इंदिरेला औषधाची योजना योग्य तीच झाली असल्यामुळें तिच्यांत थोडीशी चलनवलन करण्याची शक्ति आली होती; पण शुद्धी कांहीं आली नाहीं. ती मधून मधून कांहीं तरी असंबद्ध भाषण करीत होती. ती म्हणाली, " नाथ ! मला सोडून आपण कुठें चालला ! जाऊं नका ! माझ्यावर कां बरं इतकं निष्ठुर व्हायचं ? मी इतकी का दुर्दैवी आहे ! कसं कां असेना; पण आपणाला सोडून माझ्यानं राहवणार नाहीं— "

या वेळीं हाफीजला आणखी एक जबाबदारीचें काम तडीस न्यावयाचें होतें, तें काम म्हणजे, झालेल्या यशस्वी कामागिरीची बातमी खानाला देणें. लागलीच घाई घाईनें त्यानें एक पत्र खरडलें, आणि त्यानें तें बंद करून गोविंदाकडे दिलें; व नर्मदेला हाक मारून ती येतांच दोघांना उद्देशून म्हटलें, " पहा, तुमच्या उपकारकर्त्या व दयाळु धन्याचा आतां अंतसमय जवळ आला आहे. तसेंच तुमची मालकीण बेशुद्धावस्थेंत आहे. बापूसाहेबांच्या सुखाच्या दिवसांत त्यांना अनेक मित्र होते; पण आतां या भयंकर प्रसंगीं कोणीहि नाहीं. तेव्हां आतां तुम्हीं आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावलें पाहिजे. येथील काजी आपणाला बापूसाहेबांचा हित-चिंतक म्हणवीत असतो तेव्हां या प्रसंगीं त्याची परीक्षा पाहिली पाहिजे. तसेंच अकस्मात मृत्यु आल्यास पंचनामावगैरे करावा लागल्यासहि त्याचा उपयोग होईल. आणि ते येथें आले म्हणजे मलाहि जरा मोकळीक मिळेल. मी इथें एकटा असल्यामुळे मला कांहीं सुचेनासें झालें आहे, तेव्हां गोविंदा ! हें एवढें पत्र काजीसाहेबांकडे दे. या एवढ्या रात्रीं काजी-साहेबांचा निद्राभंग करणें म्हणजे फारच भयंकर काम आहे; पण हें पत्र हातांत असल्यावर तुला भिण्याचें कारण नाहीं. हकिमाजवळून हें पत्र आणलें आहे. असें ऐकतांच पहाऱ्यावरचा शिपायी तुला ताबडतोब त्यां-च्याकडे नेईल. जा. मनांत कोणत्याहि प्रकारचा किंतु आणण्याचें कारण नाहीं. "

आपला दयाळू धनी आतां आपणाला अंतरणार हें समजतांच तो

स्वामिभक्त नोकर ढळढळां रडूं लागला. त्याचें आपल्या धन्यावर मनापासून प्रेम होतें.पोटाची खळगी भरण्यासाठीं जरी त्याला दुसऱ्याच्या घरीं नोकरी करावी लागत असे तरी त्यानें आपल्या मालकाचें घर सोडलें नव्हतें. तो पगार घेतल्यावांचून व पोटालाहि न घेतां बापूसाहेबांच्या घरचें काम करीत असे. गोविंदा तिथेंच रडत राहिलेला पाहून कर्तव्यतत्पर हकीम त्याला धमकावून म्हणाला, " ही रडण्याची वेळ नव्हे. मालकाचें अन्न इतके दिवस तूं खाल्लें आहेस. तेव्हा त्यांच्या बाबतींत तूं शेवटचें कर्तव्य करण्यास हयगय करूं नकोस. "

हाफीजच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच बिचारा गोविंद एवढेंसें तोंड करून तें पत्र घेऊन काजीसाहेबांच्या घराकडे निघाला. हकिमाकडून इष्ट बातमी येण्याची वाट पहात नियामतखान जागतच आपल्या विश्रांति मंदिरांत बसला होता, आणि मधून मधून बापूसाहेबांचें पिशाच्च तर आपल्याला दिसत नाहींना अशी शंका काढून ते तिथल्या तिथेंच कांपत होते. मात्र हकीमाकडून कोणी मनुष्य आल्यास त्याला तावडतोब आपल्याकडे आणण्याबद्दल त्यानें आपल्या पहारेकऱ्याला बजावून ठेवण्याला तो विसरला नव्हता. अर्थात गोविंदा दरवाजाशां येतांच त्याला आंत जायला फारसे श्रम पडले नाहींत. तावडतोब काजीसाहेबांपुढें त्याला हजर करण्यांत आलें.

पत्र वाचतांच खानाला सर्व हकीगत समजली. या बाबतींत काय तयारी करावयाची ती त्यानें पूर्वींच करून ठेविली असल्यामुळें आपल्या खासगीकडच्या चार माणसांना बरोबर घेऊन तो बापूसाहेबांच्या घराकडे निघाला. त्याला आंता एक प्रकारचा उत्साह वाटूं लागला होता.

इकडे, इंदिरेला अझूनहि शुद्धी आली नव्हती. खान येतांच दोघांच्या मतानें ठरलें, कीं, बापूसाहेबांच्या देहांत आतां जीवन राहिलें नाहीं, तेव्हां त्याची पुढील व्यवस्था करावी. प्रेत न जाळतां पुरून टाकल्यास बरें असें काजीचें मत पडलें. तसेंच हें काम घाईनें उरकण्याचें कारण त्यानें. असें सांगितलें, कीं इंदिरा बेशुद्ध आहे तोंपर्यंत हें काम उरकलें म्हणजे तिची रडारडहि आपणाला पाहायला नको. ती शुद्धीवर आल्यानंतर ही व्यवस्था करण्याला बरेंच जड जाईल. नर्मदेलाहि हें योग्य दिसलें.

लागलीच बरोबर आणलेल्या चौघांच्या खांद्यावरून तें प्रेत बाहेर काढलें व काजी आणि हकीम हे दोघेहि सिद्धसाधक त्या प्रेतवाहकामागून चालले. झालेला प्रकार फारच भयंकर व त्यांतून रात्रीची शांत वेळ, त्यामुळें दोघांच्याहि अन्तःकरणांत परस्परविरोधी विचार चालू होते. हकीम विचार करीत होता, " बापूसाहेबांना चोवीस तासांपुरती बेशुद्धि आणली असल्यामुळें, यांचा त्याला पुरण्याचा बेत आहे तो कांहीं मला वावगा दिसत नाहीं; पण त्या पुरलेल्या जागेतून बाहेर काढणें कांहीं मला वाटतें तितकें सोपें नाहीं. खड्यांतून प्रेत काढतांना जर कुणीं पाहिलें तर माझी काय अवस्था होईल बरें ? आत्मसंरक्षणासाठीं, खानासारखा नीच अन्तःकरणाचा मनुष्य सर्व अपराध माझ्यावर लोटण्यासहि कमी करणार नाहीं. कारण त्याला असाध्य असें कांहींच नाहीं. विश्वास म्हणजे काय हें त्याच्या गांवींहि नसावें. शिवाय तो मानधनवान असून मी एक सामान्य मनुष्य आहें. अर्थात माझ्या बोलण्यावर कोण विश्वास ठेवणार ? शिवाय इंदिरेनें माझ्या विरुद्ध केलेल्या फिर्यादीचे कागद त्याच्याच जवळ आहेत. अर्थात ' इंदिरेच्या लोभानें मीच बापूसाहेबांचा खून केला. ' असं लोक म्हणायला कमी करणार नाहींत. आणि इंदिरा ! हाय !! बिचाऱ्या त्या सरळ मनाच्या पतिव्रतेचें आतां पुढें काय होणार बरें ! ! "

नियामतखानाच्या मनांत या वेळीं निराळेच विचार चालले होते, तो म्हणत होता, " आतां माझा हेतू बराचसा सिद्धीला गेला आहे. हकीमजनें पैसा आणि सुंदरी या दोघांच्या लोभानें मला सहाय्य केलें असून त्याला मी पैसा तर भरपूर दिलाच आहे; पण इंदिरा मात्र त्याला मिळणार नाहीं. मी तिच्याशीं शादी लावणार ! आणि या अशा निराधार स्थितींत ती माझें म्हणणें खात्रीनें अमान्य करणार नाहीं. उलट ती आनंदच मानील."

बराचसा रस्ता चालल्यावर नियामतखान हकीमाला म्हणाला, " हां मी आतां काम सांगतों तें ऐक. मला वाटतें हें प्रेत त्यांच्या पद्धतीप्रमाणें जाळावयाचें नाहींच; पण पुरूंहि नये आज अनायासें पाऊस लागला असून तुंगभद्रेला पूरहि आला आहे. तेव्हां त्यांत हें प्रेत टाकतांच तिच्या

जोराच्या प्रवाहांत हें कुठच्या कुठें वाहून जाईल. कुणाला त्याचा पत्ता सुद्धां लागणार नाहीं. ”

खानाचा हा नवीन विचार ऐकतांच हाफीजचें हृदय थरारलें. कारण, आपली युक्ति आतां साध्य होणें अशक्य अशी त्याची मनोदेवता त्याला सांगूं लागली. अजूनपर्यंत काजीनें चालविलेला प्रत्येक अत्याचार तो निमूटपणें ऐकत होता; पण या आणीबाणीच्या वेळीं स्वस्थ बसल्यास आपल्या हातून निष्कारण एक खून झाल्यासारखें होईल तेव्हां आतां बोलणें भाग आहे. असा पोक्त विचार करून हाफीज म्हणाला, “ हें काय बरें काजीसाहेब ! त्यांच्या धर्मांप्रमाणें तें प्रेत जाळूं नये असें तुम्हीं सांगितलें तें मीं कबूल केलें. आतां समाधीहि बांधूं देत नाहीं ? प्रेताचे असे हाल केल्यानें धर्माचरणांत अडथळा नाहीं का येत ? ”

हाफिजला आणखी ज्यास्त बोलूं न देतां खान अस्पष्ट स्वरानें म्हणाला, “ मी न्याय आणि धर्म जाणतों. या बाबतींत तुला आतां विचार करण्याचें कारण नाहीं. तुझें काम तूं केलें आहेस, अर्थात आतां मी आपलें काम कसें करतों हें फक्त पहाण्याचें काम तूं कर. आतां कोणत्याहि बाबतींत तुला बोलण्याचा अधिकारच नाहीं. ”

इतकें बोलणें झाल्यावर, ज्या ठिकाणीं तें प्रेत पुरण्याचें ठरलें होतें तिकडे न वळतां खान आपल्या हस्तकांना म्हणाला, “या वेळीं तुंगभद्रेला बराच पूर आलेला असेल; तेव्हां हें प्रेत असेंच न्या आणि तींत फेंकून द्या. या बाबतींत तुम्हांला पूर्वीं एक दोन वेळ प्रसंग आलाच आहे. तेव्हां विशेष सांगण्याचें कारणच नाहीं. पूर्वीप्रमाणेंच हेंहि काम पार पाडा. ”

विजेचा चकचकाट, मेघांचा गडगडाट आणि वाऱ्याचा सों सों शब्द हा पंचभूतात्मक प्रलय चालू असतांच धन्याच्या हुकुमानें त्या हस्तकांनीं तें प्रेत नदीकडे चालविलें. नदी कांहीं तेथून फारशी लांब नव्हती. अर्ध्या-घटकेचा रस्ता असेल नसेल. ते तिकडे निघून जातांच खानानें हकिमाच्या हाताला धरलें व अनुचरांची वाट पहात तो त्यासह एका झाडाखालीं उभा राहिला. हकिमाच्या मनांतील या वेळचे विचार जाणणें अशक्य होतें. तें कल्पनेनेंच जाणलें पाहिजे. थोड्याच वेळांत आपली कामगिरी

ओटोपून त्याचे हस्तक तेथें आले, तेव्हां तो त्यांना म्हणाला, " आतां काम संपलेंच नाहीं का ? "

आलेल्या पैकीं एकानें उत्तर दिलें, " आम्हीं किती विश्वासू गुलाम आहों हें आपण जाणतच आहां. आपण सांगितल्याप्रमाणें आम्हीं बिनचूक काम केलें."

इतकें झाल्यानंतर खान हकिमाकडे वळून म्हणाला, " या जगांत ' दोस्त ' या नांवानें मीं कुणालाहि हांक मारली नाहीं व माझा कोणी दोस्तहि नाहीं. पण आतां मीं तुला माझा दोस्त केलें आहे. आतां इंदिरा माझ्या हातांत आलीच म्हणायची; पण यांत झालेलें तुझें सहाय्य मात्र मी कधींच विसरणार नाहीं. तुला जें मी आणखी कांहीं तरी बक्षिस देतो म्हणून सांगितलें आहे तें आतां देणारच. "

आपल्या मर्जीविरुद्ध झालेला सगळा प्रकार पाहून हकीम खानावर मनांतल्या मनांत खूपच रागावला होता. आपल्या हातून बापूसाहेबांसारख्या दिलदार मित्राचा खून यानेंच करविला. जर त्याला पुरलें असतें तर मीं थोड्याच वेळांत त्याला जिवंत केलें असतें; पण माझा तो मार्ग या नराधमानें आतां नाहींसा केला आहे. खरोखर मी फारच भयंकर पापी आहें. या पापाचें घोर प्रायश्चित्त मला भोगलेंच पाहिजे. केवळ पश्चात्तापानें हें पाप नाहींसें होणारें नाहीं. मीं आजन्म सांठविलेलें सर्व द्रव्य जरी इंदिरेला दिलें तरी या पापांतून मी मुक्त होणार नाहीं. आतां आणखी या पिशाच्याचें द्रव्य घेऊन मला माझा खुनाचा खजिना वाढवावा लागणार ! हाय ! हाय ! ! मला ही दुष्ट बुद्धि कां बरें झाली ! ! इंदिरेचा प्रथम मींच अपराध केला नाहीं का ? अरेरे ! अवनतीची एक पायरी ओलांडली कीं, खालीं पडावेंच लागतें. हाय ! माझें आतां पुढें काय होणार ! हकीम कांहीं बोलत नाहीं आपल्याच विचारांत गढून गेला आहे असें पाहून खानानें त्याला प्रश्न, केला, " कां हकीम, कसला विचार चालला आहे ? "

हकिमानें उत्तर केलें, " हुजूरांनीं मला आपल्या मित्राप्रमाणें मानलें हेंच पुष्कळ झालें. मला पैसा नको. आपणच तो आपल्या इच्छेनें द्यायला तयार झाला होतां पण मी आतां त्याची इच्छा करीत नाहीं. "

हकिमाच्या मनाचें हें झालेलें भावपरिवर्तन खानाला फारसें पसंत पडलें नाहीं. जारिणीला ज्याप्रमाणें पतिव्रतेचा मत्सर वाटतो त्याप्रमाणेंच येथेंहि झालें. खानाच्या मनांत हकिमाबद्दल एक सैतानी विचार आला व त्या धोरणानें त्यानें पुढील भाषणास सुरवात केली. तो म्हणाला, " मला वाटतें, तुला केलेल्या कृत्याबद्दल आतां भीति वाटत असावी. बरें, तूं रुपये घेणार नाहींस तर नको घेऊं; पण आजची रात्र तूं माझा पाहुणा म्हणून माझ्या आतिथ्याचा स्वीकार करशील काय ? आतां मध्य-रात्र होऊन गेली आहे. आतां अशा या थंडींत कुडकुडत इथें बोलत उभें राहाणें बरें नव्हे. शिवाय तुझ्याशींहि मला अनेक विषयासंबंधानें बोलायचें आहे, तेव्हां माझ्या घरीं चल. "

सैतान ज्याप्रमाणें पापी मनुष्याला ओढून घेऊन जातो, त्याप्रमाणें खानानें हकिमाला ओढून नेलें व हकीम यांत्रिक पुतळ्याप्रमाणें त्याच्या घरांत गेला. या वेळीं त्याचें मस्तकच ठिकाणावर नव्हतें. आपल्या विश्रांतिमंदिरांत येतांच खान एका कोचावर बसला; पण हकिमाला त्यानें बसावयास न सांगितल्यामुळें तो उभाच राहिला.

कांहीं वेळ गंभीर निस्तब्धतेंत गेल्यावर खानानें हकिमाला हांक मा रली. " हाफीज ! " हांक मारण्याच्या तीव्र स्वरावरून हाफीज दचकला; पण आवसान धरून नम्रतेनें म्हणाला, " आज्ञा हुजूर ! "

" ज्याच्या हुकुमानें मनुष्यहत्त्या झाली तो ज्यास्त पापी, कीं, ज्यानें त्या हुकुमाच्या आधीन होऊन साक्षात खून केला तो जास्त पापी ? तोंड मिटून राहुं नकोस उत्तर दे. "

खानाचा हा अपूर्व प्रश्न ऐकून हकिमानें संदिग्धपणानें एकवार खा-नाकडे पाहिलें. व मनांत म्हटलें. " खात्रीनें या पिशाचानें कांहीं तरी सैतानी कावा मनांत रचला असावा. नाहींतर त्यानें मला असा प्रश्न कधींच केला नसता. तरी पण उत्तर दिलें पाहिजे अस ठरवून तो गंभीर-पणानें म्हणाला, " जो हुकूम देतो तो तितका पापी नाहीं, पण ज्यानें स्वतः खून केला तो जास्त पापी. खरोखरच मी महापापी आहे. "

" तर मग तूं स्वतःच आपल्या तोंडानें आपला अपराध कबूल करीत आहेस ! मी न्यायाधीश आहें हें तूं जाणत असशीलच. तेव्हां मी

आतां योग्य तो न्याय करायला बांधला गेलों आहें, हेंहि पण तुला सांगण्याचें कारण नाहीं ! मी हुकूम करतों आजपासून तूं कैदी आहेस. जोंपर्यंत ही चालू बावटळ व गडबड शांत होणार नाहीं, तोंपर्यंत अंधाऱ्या तळघरांतच तुला राहावें लागणार. ज्या दिवशीं इंदिरा येथें येईल व माझ्याशीं प्रणयविनोद करूं लागेल त्याच दिवशीं मी तुला मोकळा करीन. तूं आज रात्रीं त्या गोविंदाबरोबर जें पत्र मला पाठविलें आहेस तेंच तुझ्यावर खुनाची शाबिती करूं शकेल; पण कारण पडल्यास मी त्याचा उपयोग करीन हें मात्र तूं लक्षांत ठेव. " बोलतां बोलतां त्यानें तीनदां टाळी वाजविली त्याबरोबर दोन भीमकाय काळेकुट्ट खोजे आंत आले. त्यांचा तो भयंकर व उग्र चेहरा पहातांच हकिमानें चटकन् आपले डोळे मिटून घेतले.

खानानें त्यांना हुकूम केला, " तुम्हांला जसें सांगितलें आहे, त्या प्रमाणें याची व्यवस्था ठेवा. "

हुकूम होतांच वाघ ज्याप्रमाणें आपल्या भक्ष्यावर झडप घालतो, त्याप्रमाणें त्या दोघांनीं त्याला पकडून ओढीतच बाहेर नेलें. हकिमानें कांहींच ओढाताण केली नाहीं. फक्त एकवार त्यानें आपल्या कपाळाला हात लावून म्हटलें, " कृतकर्माची शिक्षा भोगलीच पाहिजे "

---

# प्रकरण १८ वें.



## निजामसरकारच्या राजभवनांत.

ज्याचें स्वतः परमेश्वर संरक्षण करीत असतो त्याला कोण मारणार ?

तुंगभद्रेंत जरी पुष्कळ खडक व तिचा प्रवाह जोराचा आहे तरी पुराचें पाणी पुष्कळ असल्यामुळें बापूसाहेबांचा मर्छित; पण अक्षत देह तुंगेच्या एका मोठ्या कालव्यांतून वहात वहात तीरावर असलेल्या निजामसरकाराच्या एका उद्यानांत आला. तुंगेच्या तीरीं शाहांनीं एक टोलेजंग वाडा

बांधला होता व त्या ठिकाणीं ते केव्हां केव्हां येऊन राहात असत. त्यांचें तें राहाणें अत्यंत गुप्त असल्यामुळें सेनापती व प्रधान यांच्याशिवाय इतर कोणालाहि माहीत नसे. असो.

ईश्वराचा करुणस्वभाव कोण वर्णन करूं शकेल; ज्या निःसहाय्य जिवाला वांचवावें असें त्याच्या मनांत येतें त्याला तो कसें पाहिजे तसें वांचवितो. त्याच्या सामर्थ्याला पारखया झालेल्या लोकांना मात्र तें एक आश्चर्य वाटतें. 'प्रभुपाठिराखा असला म्हणजे कशाचीहि भीति नाहीं हें तत्व साधु जनांना पूर्णपणें कळून चुकलेलें असतें. आज त्याची प्रचिती आली. पुराचें पाणी केव्हांच ओसरलें असल्यामुळें तीरावरील गाळांत असलेलें प्रेत उद्यानांतील पहारेकऱ्यांना तेव्हांच आढळून आलें, व ती बातमी त्यांनीं सर्व शिपायांना ताबडतोब दिली. बापूसाहेबांच्या सुदैवानें स्वतः शहा या वेळीं त्या उद्यानांतच होते, व रात्रीच्या वादळी पावसानें काय काय अनर्थ केले तें निरिक्षण करीत आपल्या एकदोन अंगरक्षकांसह ते तेथेंच फिरत होते. इतक्यांत ही गडबड त्यांची कांनीं गेली व ते तिथें आले. यावेळीं पहारेकऱ्यांनीं ते प्रेत चांगल्या मोकळया जागीं आणलें होतें. शहाची दृष्टी तिकडे जातांच त्यांनीं आश्चर्यानें प्रश्न केला, " काय आहे हा प्रकार ! "

मुख्य पहारेकरी तिथेंच होता. तो म्हणाला, " जहांपना ! हा निर्जीव देह या कालव्यांतून येथें येऊन पडला आहे, पण आम्हीं परिक्षा करून पाहिली त्यावरून अद्याप कांहीं प्रयत्न केल्यास हा मनुष्य जिवंत होण्याचा संभव आहे असें मला वाटतें. "

शहांनीं आपल्या एका अंगरक्षकाला हुकूम केला, " जा ताबडतोब हकिमाला बोलावून आण " नंतर त्यांनीं पहारेकऱ्याला हुकूम दिला, " या माणसाला कपड्यांनीं चोळून पुसा आणि दुसरे योग्य कपडे घालून माझ्या दवाखान्यांत याला नेऊन ठेवा. मी हकिमाला बरोबर घेऊन तेथें येतों. सभोंवार उबदार शेगड्या ठेवण्याला मात्र विसरूं नका. "

थोड्याच वेळांत बापूसाहेबांच्या देहाला उपचार सुरू झाले, व सेवा, शुश्रूषा, आणि काळजीपूर्वक योग्य औषध या त्रयीचा मारा सुरू झाल्यामुळें त्यांना नवजीवन प्राप्त झालें. नियामतखानाच्या सांगण्यावरून हकिमानें दिलेलें विष हें प्राणघातक नसून गुंगीचें असल्यामुळें यावेळीं त्यांचा

बचाव झाला. हाफीज हकीम आपल्या मित्राची हत्या करायला कबूल नव्हता, पण पेंचांत सांपडल्यामुळें त्याला असें करणें भाग झालें होतें. पहांटेच्या वेळीं तो पुनः त्या प्रेतरूप देहाला जीवंत करणार होता; पण नदींत फेंकून दिल्यामुळें 'हाय! हाय! करण्यापलीकडे त्याला कांहीं करतां आलें नाहीं पण इकडे बापूसाहेबांना नवजीवन मिळालें हें त्याला समजलें नव्हतें आणि समजणार तरी कसें?

शहाच्या व हकिमाच्या मनापासूनच्या प्रयत्नांनीं त्या प्रेतरूपी शरिरांत आत्म्याचा संचार झाला. बापूसाहेब शहांना अपरिचित नव्हते, व्यापारा-निमित्त वारंवार त्यांना हैदराबादेला जावें लागे व त्या वेळीं मोठ्या किंमतीचे हिरे व इतर जवाहीर ते राजवाड्यांतहि नेत असत. अर्थात रत्नांचा व्यापारी म्हणून, शहा त्याला ओळखत असत. शिवाय बापू-साहेबांच्या मधुर स्वभावालाहि ते पारखे नव्हते, आणि शहांचा स्वभाव उदार असल्यामुळें त्यांना गुणी मनुष्यांची चांगली पारख असे.

बऱ्याच वेळानें बापूसाहेब हळू हळू चलनवलन करूं लागले व थोड्या वेळानें त्यांनीं आपले डोळे अर्धवट उघडून इंदिरेला हांक मारली आपण आपल्या बिछान्यावर आहों असेंच त्यांना वाटत होतें.

पुनः त्यांनीं चांगले डोळे उघडून पाहिलें तों त्यांना आपली लाडकी इंदिरा कुठेंच दिसेना. उलट आपल्या भोंवती बरीच पुरुष मंडळी कांहीं उभी असून कांहीं बसलेली अशी त्यांना आढळली तेव्हां ते विस्मयानें म्हणाले. "मी कुठें आहें आणि तुम्ही कोण?"

निजामसरकारनीं स्मित हास्ययुक्त मधुर स्वरानें उत्तर दिलें, "तुम्हीं सुरक्षित ठिकाणीं आहांत बरं!"

बापूसाहेबांनीं पुनः एकवार चोहोंकडे निरीक्षण करून पाहिलें व क्षीण स्वरानें म्हटलें, "मला माझ्या घराकडून येथें कुणीं आणिलें? आणि माझी इंदिरा कुठें आहे?"

सरकारनीं पुनः प्रेमपूर्ण स्वरानें प्रश्न केला, "तुमचें घर कुठें?"

बापूसाहेबांनीं क्षीणस्वरानें उत्तर दिलें, "मुनिराबादेला."

"तुमचें नांव काय?"

"बापूसाहेब—"

" म्हणजे, बापूसाहेब रत्नांचे व्यापारी कीं काय ? "

" होय. आणि इंदिरा ही माझी पत्नी. ती आतां कुठें असेल बरें ?"

" तुम्हीं अगदीं काळजी करूं नका. मी आतांच एक स्वार पाठवून तुमच्या पत्नीला आणण्याची व्यवस्था करतों. "

" पण मी सध्यां कुठें आहें हें समजेल काय ? "

" निजामसरकारच्या राजभुवनांत " एका अंगरक्षकानें चटकन् उत्तर दिले; पण ज्यास्त न बोलण्याबद्दल हकिमानें त्याला खूण करीत म्हटलें.

" बराच वेळ बोलणें झालें आतां मी तुम्हांला बोलूं देणार नाहीं. तुम्हीं आजारी आहां स्वस्थ पडून राहा. "

" तर मग हाफीज हकीम कुठें आहे ? "

या वेळीं खुद्द सरकार म्हणाले, " बापूसाहेब हे एक राजवैद्य आहेत. तुम्ही आतां स्वस्थ डोळे मिटून पडा. तुम्हांला आतां कोणत्याहि प्रकारची काळजी करण्याचे कारण नाहीं. "

त्याच वेळीं इंदिरेला आणण्यासाठीं एक घोडेस्वार मुनिराबादेस रवाना झाला, वाचक हो, आपणहि आतां त्या घोडेस्वाराबरोबर पुनः मुनिराबादेंतील हाफीजला ठेवलेल्या अंधाऱ्या तळघरांत जाऊं या.

---

# प्रकरण १९ वें.



## हाफीजची मुक्तता.

आपला असा परिणाम होईल याची हाफीजला स्वप्नांतही कल्पना झाली नव्हती. त्यानें मनांतल्या मनांत खानाला भरपूर शिव्या दिल्या, आपण केलेल्या अघोर पापाबद्दल पश्चात्ताप केला, आणि या अनुतापाच्या तीव्र वेदना असह्य होऊन त्याच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें त्यानें मनांत म्हटलें, "मला असा कैदेंत टाकून त्या नीच खानानें मूर्छित झालेल्या इंदिरेला आपल्या घराकडे नेलें असेल. हाय ! हाय ! आः गरीब बिचाऱ्या इंदिरेचें काय बरें होणार ? "

याच वेळीं कोणींसें त्याच्या त्या खोलीचें दार उघडलें. ही खोली म्हणजे काळोखानें भरलेली एक गुहा होती म्हटलें तरी चालेल. त्या ठिकाणीं कांहीं निरुपयोगी जिन्नस टाकून ठेवण्यांत येत असत; पण एक-दोन दिवसांपुरती म्हणून हाफीजची त्यांतच रवानगी करण्यांत आली होती. असो.

या वेळीं जो मनुष्य आंत आला होता, तो हाफीजच्या कानांत म्हणाला. " जा इथून पळून जा. उद्यां तुला काजी ठार मारणार आहे."

" पण तूं कोण " हाफीजनें संशयित मनानें विचारलें.

" मी तुझ्याच पहाऱ्यावर असतों. मी या सैतानाचा एक शिपायी आहें. एके दिवशीं माझ्या मुलाची अगदीं प्राणांतिक अवस्था झाली असतां त्यांतून तूं त्याला वांचविलें होतेंस, आणि म्हणूनच ते उपकार स्मरून मी आज—"

" बरें, पण इंदिरा कोठें आहे. " हाफीजनें घाईघाईनें प्रश्न केला.

" त्या या स्वानाच्या बागेंतील विश्राममंदिरांत आहेत; पण अद्याप त्यांची मूर्छा गेली नाहीं. औषधोपचार चालूच आहेत. "

" मला सोडून दिल्याबद्दल तुझा धनी, तुझे प्राण घेणार नाहीं का?"

" त्याचा विचार करण्याचेंच कारण नाहीं. कारण, मीहि तुझ्याबरोबरच येणार आहें. मलाहि आतां या सैतानाची नोकरी करावयाची नाहीं.

" पण अशानें तुझी नोकरी जाईल ना ? "

" अन्नदाता परमेश्वर मला टाकणार नाहीं. असन्मार्गानें मिळणाऱ्या सुग्रास अन्नापेक्षां सन्मार्गानें चालून उपाशी राहिलेलें पत्करलें. आतां रात्र संपत आली आहे, तेव्हां लवकर बाहेर पड. घरांतील सर्व मंडळी झोंपली आहे. भिण्याचें कारण नाहीं. " लागलींच तो शिपायी पुढें व हाफीज मागें अशा तऱ्हेनें ते त्या कारागृहांतून वर आले. रस्त्यांत येतांच हाफीज म्हणाला, " मला जातां येणार नाहीं ! "

" कां ? " शिपायानें आश्चर्यानें प्रश्न केला.

" मी गेलों तर तो काजी माझ्या पत्नीची काय दशा करील बरें! "

" त्या बाबतींतहि अगदीं भिऊं नका. ईश्वर सर्वांचें रक्षण करण्याला समर्थ आहे. तुझ्या नाहींसा होण्यामुळें हा सैतान अगदीं भिऊन

जाईल आणि इंदिरेच्या बाबतींत काय तजवीज करावी याच विचारांत पडेल. त्यामुळें तुझ्या पत्नीकडे वांकडा डोळा करून पहाण्यालाहि त्याला फुरसत होणार नाहीं; आणि तसें कांहीं केल्यास लोकांना आपला संशय येईल, अशी त्याला भीति आहेच. शिवाय मी माझ्या भावाला तुझ्या पत्नीवर नजर ठेवायला सांगितलें आहे तेव्हां तसाच कांहीं बरावाईट प्रसंग येणार असें वाटल्यास तो तिला सुरक्षित जागीं पोंचवील."

इतकें सांगतांच हाफीजची खात्री झाली व तो आपल्या त्या नव्या मित्राला मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन म्हणाला, "खरोखर तूं माझ्या-वर केवढे तरी उपकार केले आहेत. खुदा तुझें कल्याण करील; पण तूं आतां जाणार कुठें ?"

"हैदराबादला आपल्या मायबाप हुजूर निजामसरकाकडे जाणार. कारण ही सगळी हकीकत त्यांच्या कानावर घातली पाहिजे नाहीं तर खानाच्या अत्याचाराला इंदिरा बळी पडेल आणि बिचारी तसा प्रसंग आल्यास आत्महत्त्या केल्यावांचून राहणार नाहीं."

नंतर दोघांनींहि हैदराबादेला जायचें ठरविलें व दुसऱ्या दिवशीं ते मार्गाला लागलेहि पण, रस्त्यांतच त्यांना बातमी लागली कीं 'हुजूरची स्वारी आपल्या विलासोद्यानांत असून त्या ठिकाणीं कसलीसी मोठी गडबड उडाली आहे. तेव्हां ते तिकडे वळले व ब्ऱ्याच दऱ्या खोऱ्या मागें टाकून ते एकदांचे तिथें येऊन पोंचलेहि. नंतर लवकरच त्यांनीं शहांची भेट घेतली. शहा फारच दयाळू अंतःकरणाचे असल्यामुळें त्यांना भीति वाटली नाहीं. अनुतप्त हाफीज आपलें मस्तक शहांच्या पायांवर ठेवून म्हणाला; "जहापनाह ! आपल्या राज्यांत माझ्यासारखा पापी आणि अधम मनुष्य दुसरा कोणीहि नसेल. मीं माझ्या हातानें मित्राचा खून केला आहे. मला जी आपणाला योग्य वाटेल ती शिक्षा द्यावी."

हात जोडून जवळच उभा असलेल्या व हाफीज बरोबर नुकताच आलेल्या शिपायाकडे शहानें पाहिलें. तेव्हां तो गुडघे टेंकून म्हणाला, "शहानशहा ! जनाब ! ही व्यक्ति म्हणजे मुनिराबादचा प्रख्यात हकीम होय. याचें नांव हाफीज. तेथील काजीनें याला जीव घेण्याची

भीति दाखवून, तिथच्याच बापूसाहेब नांवाच्या रत्नांच्या व्यापाऱ्याचा खून करण्याला भाग पाडलें. "

शहाला ज्यास्तच आश्चर्य वाटून त्यानें पुनः प्रश्न केला "पण धर्माधिकाऱ्यानें असें करण्याचें कारण ? "

" बापूसाहेबांची पत्नी इंदिरा अत्यंत सुंदर असल्यामुळें ती त्यांना आपल्या हस्तगत करावयाची होती. इंदिरा त्या वेळीं बेशुद्धावस्थेंत असून तिला त्यानें आपल्या उद्यानांतील विश्राम मंदिरांत ठेविली होती. आलेल्या शिपायानें खानाच्या रहस्याचा सर्व उलगडा केला.

इतक्यांत शहानें पाठविलेले स्वार येऊन सांगूं लागले कीं, ' आम्हीं इंदिरेच्या घरीं गेलों; पण ती घरांत नसून कुठें गेली तें कुणालाही माहीत नाहीं. "

इतका प्रकार पाहून व ऐकून हाफीजला थोडा धीर आला व त्यानें अथपासून इतीपर्यंत झालेली सर्व हकीकत हुज़ूरला सांगितली. आतां मात्र शहांचा नेहमीं प्रशांत असणारा चेहेरा अत्यंत आरक्त झाला, व त्यांनीं हाफीजचा हात जोरानें धरून त्याला ओढीतच बापुसाहेबांच्या बिछान्याजवळ नेलें. त्या ठिकाणीं बापुसाहेब सुखरूप आहेत हें पहातांच तो एकदम उद्गारला, " हें मी काय पहात आहें ! तुम्ही अद्याप जिवंत अहां ! खुदाची कृपा फारच मोठी आहे. "

हाफीजला पहातांच बापूसाहेबांचीही तशीच स्थिति झाली. ते आश्चर्यानें म्हणाले, "हें काय हकीमसाहेब ! तुम्हीं इथें केव्हां आलां ? आणि मला नदींत कुणीं टाकलें ? इंदिरा कुठें आहे ? "

हाफीजला कांहीं उत्तरच देतां येईना. तो तोंड झांकून घेऊन रडूं लागला. अशानें बापूसाहेबांच्या अस्वस्थ मनाचें थोडेंच समाधान होणार ! ते अधिरतेनें म्हणाले, "हाफीज ! माझा जीव तळमळत आहे. तोंड मिटून राहूं नको. इंदिरा खुशाल आहेना ? "

आतां आपण बोललेंच पाहिजे असें वाटून शहांनीं गंभीरपणानें उत्तर दिलें, " बापूसाहेब तुम्हीं निश्चिंत व्हा. तुमच्या पत्नीला आणण्यासाठीं मी योग्य अधिकाऱ्याला पाठवीत आहें. "

" पण हा हकीम कां रडत आहे जहापनां ! " बापूसाहेब कळवळून म्हणाले.

" तें सगळें मी तुम्हांला मागून सांगेन. तें ऐकण्याइतकें तुम्हांला अद्याप सामर्थ्य आलें नाहीं. " शहानें उत्तर दिलें.

पण हें ऐकतांच बापूसाहेब उठून बसले आणि म्हणाले, " जहांपना ! मी आपणाला वाटतों तितका दुर्बल नाहीं. पूर्वी मला उठून बसण्याची शक्ति नव्हती हें खरें; पण आतां उठून बसवत आहे, इतकेंच नव्हे, तर चालण्याचेंहि सामर्थ्य आलें आहे. खावंदांनींच पहावें. "

असें म्हणून बापूसाहेब उभे राहिले व त्यांनीं थोडेंसें चालूनहि दाखविलें. शहांना आश्चर्य वाटलें. हाफीला मात्र तितकें आश्चर्य वाटलें नाहीं. कारण त्याच्या बेशुद्धीच्या अत्युग्र औषधाचा तसाच परिणाम होणार होता. शुद्धीवर आल्यावर त्यांना हुषारी यावी व एकदम बरें वाटावें, अशीच त्या औषधाची योजना त्यानें केली होती. असो.

शहांनीं एकंदर हकीगत समजावून देऊन तावडतोब आपल्या मुख्य सेनापतीकडे काजीला पकडून आणण्याचा हुकूम दिला. कारण हें काम करण्याला तोच याप्रसंगीं लायक होता.

---

# प्रकरण २० वें



## " सैतानाच्या हातून सोडीव. "

हाफीजला तळघरांत कोंडून ठेवल्यावर खानाला थोडेंसें मोकळें वाटलें; पण इंदिरा जोंपर्यंत आपल्या स्वाधीन झाली नाहीं तोंपर्यंत मन स्वस्थ होणार नाहीं असेंच त्याला वाटत होतें.

त्याच रात्रीं त्यानें आपल्या मुख्य दासीला बरोबर देऊन व तिला योग्य तो उपदेश देऊन त्यानें बापूसाहेबांच्या घरीं मेणा पाठविला. घरीं जातांच त्या दासीनें नर्मदा व गोविंदा यास समजाविलें, कीं, " काजीसाहेबांना इंदिराबाईची ही असह्य अवस्था पाहून फारच वाईट वाटत

आहे. व बापूसाहेबांच्या मृत्यूनंतर तिची व्यवस्था पाहणारा तर कोणीच नाहीं. तसेंच इथें राहून तिला योग्य औषधोपचारहि होणार नाहीं. तेव्हां तिला बरें वाटेपर्यंत योग्य वैद्याच्या देखरेखीखालीं आपल्या वाड्यांत ठेवावी असा त्यांचा विचार आहे. चांगला आराम वाटल्यानंतर पुन्हां ती येथें येईल. घराबद्दल काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं.

नर्मदा व गोविंदा दोघांनांहि दुसरा कांहींच उपाय न सुचल्यामुळें त्यांनीं हें मान्य केलें; पण नर्मदेला दुसराच एक संशय उत्पन्न झाल्यामुळें तिला थोडी भीति वाटली. ती मनांत म्हणाली, " इंदिराबाई, या शहरांत अत्यंत सौंदर्यवान् असून हिंदू आहेत. शिवाय आतां तर ती असाह्य आहे. तेव्हा या काजीच्या मनांत कांहीं बरें वाईट आल्यास तिचा घात नाहीं का होणार ! हा विचार मनांत येतांच ती लागलींच त्या दासीकडे वळली व म्हणाली, " मी माझ्या मालकिणीबरोबर येण्याचा विचार केला आहे. तुझी कांहीं हरकत नाहीं ना ? "

नियामतखान फार चतुर असल्यामुळें आपल्या दासीला त्यानें सांगूनच ठेवलें होतें कीं, इंदिरेची दासी व नोकर यांनाहि बरोबर आण. म्हणजे मागें पुढें त्यांच्या हातून कांहीं गडबड होण्याची भीति नाहीं.

अर्थात त्या दोघांना बरोबर घेऊन व इंदिरेला मेण्यांत बसवून दासी परत आली. गोविंदाला योग्य ठिकाणीं बंदोबस्तात ठेविल्यावर काजीनें नर्मदेला इंदिरेबरोबरच राहूं दिलें व त्यांना वाड्यांतील पिछाडीस असलेल्या आपल्या दुमजली विश्रांतीमंदिरांतील दुसऱ्या मजल्यावर राहावयास जागा दिली.

मुनिराबाद शहरांत हाफीजशिवाय आणखीहि एक दोन हकीम होते; पण हाफीजपुढें त्यांचें तेज पडत नसें; तरी पण काजीनें त्यांपैकीं एकाला बोलावून आणलें व इंदिरेला योग्य औषधोपचार करण्यास बजावलें. बऱ्याच वेळानें त्या हकीमाच्या हाताला यश आलें व इंदिरा शुद्धीवरहि आली.

थोड्या वेळानें तिनें डोळे उघडून नर्मदेला प्रश्न केला, " ते कुठें आहेत ? "

नर्मदा जवळच निजली होती. तिनें मृदु स्वरानें उत्तर दिलें, "आपण अगदीं चांगल्या ठिकाणीं आहां."

" पण ते कुठें आहेत ? कां, तूं बोलत कां नाहींस. सांग. सांग ग नर्मदे–" इंदिरा उदास दृष्टीनें पहात कळवळून म्हणाली. नर्मदा आतां मोठ्याच संकटांत पडली. ' अशा स्थितींत नवऱ्याच्या मृत्यूची बातमी तिला सांगावी तर भलताच परिणाम होईल. इतकेंच नव्हे, तर ती जीवंत राहाणेंच अशक्य. थोडा वेळ थांबून नर्मदेनें उत्तर दिलें. " भिऊं नका बाईसाहेब ! हाकीजच्या औषधानें त्यांना चांगला गुण पडत चालला आहे. त्यांना या वेळीं झोंप लागली असून याच वाड्यांतील दुसऱ्या खोलींत ते आहेत."

इंदिरेनें कांहीं वेळ स्तब्ध राहून पुन्हां प्रश्न केला, " हा वाडा कोणाचा ?"

" काजीसाहेबांचा ."

मग आम्हांला दोघांनाहि इथं कुणीं आणलं ?"

" काजीसाहेबांनींच आणलं. आमची अगदीं भयंकर स्थिति पाहून त्यांना दया आली व या विपन्नावस्थेंत त्यांनीं आश्रय दिला असून स्वतःच्या खर्चानें औषधोपचार सुरू केले आहेत."

इंदिरा एकदम उसळून म्हणाली. " नाहीं. नाहीं. नर्मदे तूं खोटें सांगतेस. मला संशय वाटतो. यांत कांहीं तरी दगा आहे. माझे प्रियकर मला सोडून गेले ! हाय !" इंदिरा कपाळावर हात मारून घेऊन रडूं लागली. आपण सौभाग्यहीन आहों ही कल्पना तिला अगदींच असह्य वाटली.

आपल्या मालकिणीची ही स्थिति पाहून नर्मदेला फारच वाईट वाटलें, आणि एकदां खोटें बोललें कीं त्याच्या साठीं हजार खोटीं करावीं लागतात, या म्हणीप्रमाणें तिला इंदिरेची समजुत घालण्याला पुष्कळसे खोटें बोलावें लागले, व इतके सांगूनहि तिची समजूत पटेना. तेव्हां ती कांहींशी रागावून म्हणाली, " बाईसाहेब ! माझं बोलणं आतां आपल्याला खोटं वाटूं लागलं होय !"

इंदिरा कांहीं बोलली नाहीं. ती चुप राहिली असेल. कदाचित खरीह असेल, असें तिला वाटलें.

अशा स्थितींत तीन दिवस गेल्यानंतर इंदिरेला बरें वाटूं लागलें. तेव्हां आतां इंदिरेची भेट घ्यायला कांहीं हरकत नाहीं असें वाटून काजी साहेब तिच्या खोलींत आले. रोजच्यारोज ते तिचा समाचार घेत असत. त्यांना पहातांच इंदिरेनें एक लहानसा सलाम केला व म्हटलें, "जनाब! आपण मला व माझ्या सौभाग्यदेवतेला या विपन्नावस्थेंत आश्रय देऊन फारच चांगलें सहाय्य केलें आहे याबद्दल मी आपले आभार मानतें. आपल्या ऋणांतून आम्हीं केव्हांहि मुक्त होणार नाहीं. आतां मला पुष्कळ बरं वाटत आहे. तेव्हां परवानगी असेल तर त्यांना घेऊन मी घरीं जातें!"

इंदिरेचें बोलणें ऐकून काजीसाहेब समजले कीं, नर्मदेनें हिला बापूसाहेबांच्या मृत्युबद्दल कांहींच कळविलें नाहीं. पण हें नर्मदेचें कृत्य त्यांना फार पसंत पडलें व त्यांनीं अर्थपूर्ण दृष्टीनें नर्मदेकडे पाहून सुचविलें कीं, तूं सांगितलेंस तसेंच मी सांगतों. भिऊ नको.

काजीसाहेब विचार करीत असून आपल्या प्रश्नाला उत्तर देण्याची ते टाळाटाळ करीत आहेत असें तिला वाटल्यावरून पुन्हां तिचें मन संशयित झालें. तिनें त्यांना अधिरतेनें प्रश्न केला, "बरं पण, ते कसे आहेत सांगा पाहूं. जनाब!"

काजीसाहेबांनीं शांतपणानें उत्तर दिलें, "मी हाफीजकडून त्यांना औषधोपचार चालविले आहेत. अजूनहि त्यांना बरें वाटलें नाहीं. ते शुद्धीवर आले आहेत खरे; पण तुमची व त्यांची भेट होणें इष्ट नाहीं असें हकिमाचें म्हणणें आहे. कारण आकस्मिक आनंदानें त्यांना मृत्यू येण्याचा संभव आहे. तेव्हां मी त्यांना भेटण्याची तुम्हांला कशी परवानगी देऊं!"

हाफीजकडून बापूसाहेबांच्या रोगासंबंधीं घेतलेल्या माहितीचा या आपल्या थापबाजीच्या कामीं त्यांनीं चांगलाच उपयोग करून घेतला. अर्थात् इंदिरा काय बोलते! आपल्या भेटीमुळें आपल्या नवऱ्याला मृत्यु येईल असें समजल्यावर कोणती कुलस्त्री त्याची भेट घेण्याचा हट्ट

धरील ? तरी पण काजीसाहेबांच्या या गंभीर भाषणानें इंदिरेला थोडें समाधान वाटलें. मात्र तिचा संशय पूर्णपणें नाहींसा झाला नाहीं.

काजीसाहेब याप्रमाणें रोज इंदिरेचा समाचार घेत असत; पण त्या दिवसापासून नर्मदा मात्र तिला आढळली नाहीं. कारण नवीनच एक दासी तिच्या तैनातीला देण्यांत आली होती. इंदिरेनें त्या आपल्या नव्या परिचारिकेला उत्सुकतेनें प्रश्न केला, " नर्मदा कोठें आहे ? "

काजीसाहेबांनीं आपल्या कार्यांत अडथळा येऊं नये व इंदिरेची एकांतीं भेट घेतां यावी म्हणून हाफीजप्रमाणेंच नर्मदेलाहि त्यांनीं कैदेंत ठेविलें होतें. कारण इंदिरेची आपल्या मनाप्रमाणें भेट घ्यायला याच नर्मदेचा मध्यें अडथळा होणार हें त्यांना माहीत होतें. नवी दासीहि त्यांच्याच तालमींतली होती. त्यांनीं तिला सांगितलें होतें कीं, ' इंदिरेनें विचारल्यास तिला सांग, रात्रभर झालेल्या अनेक जागरणांनीं नर्मदा आजारी पडल्यामुळें मी येथें राहिलें आहें. तिला बरें वाटतांच मी जाईन." नव्या दासीनें हें इंदिरेला ठरलेलें उत्तर दिलें.

काजीसाहेबांना आतां धीर धरवत नव्हता. विलंबानें कार्यहानी होते हें त्यांचें तत्त्व असल्यामुळें तें घाईघाईनें प्रत्येक गोष्ट निकालांत काढीत असत. शिवाय पहारेकऱ्यासह हाफीज पळून गेला आहे, तेव्हां तो केव्हां काय करील याचा नेम नाहीं. तो कुठें गेला याचा तर अद्याप पत्ताच नाहीं. काजीसाहेबांनीं शहाणपणानें त्याच्यावर वारंट काढलें होतें. शिवाय इतकेंच नव्हे, तर त्याला पकडून आणणारास भरपूर बक्षिस देण्याचेंहि त्यांनीं जाहीर केलें होतें. त्याच्या अपराधाबद्दल त्यानें दवंडी पिटविली ती अशी—" बापूसाहेब जवाहिरे यांचा खून करून व त्यांच्या पत्नीवर बलात्कार करून तो पळून जात असतां मी त्याला पकडून कैदेंत ठेवलें. पण शिपायाला लांच देऊन तो पळाला आहे. त्याला कोणींहि आश्रय देऊं नये. आश्रय दिल्यास तो अपराधी ठरेल. "

कांहीं झालें तरी पाप्याचें मन पाप्याला टोंचीत असतेंच. काजीसाहेबांनाहि तसेंच कांहींसें होत होतें. तेव्हां त्यांनीं ठरविलें कीं, इतक्या सायासानें प्राप्त झालेल्या इंदिरेला आतां आपण चटकन् आपलीशीं करून टाकावी. मग पाहिजे तें झालें तरी हरकत नाहीं. "

नव्या परिचारिकेचें बोलणें चालणें व रीतरिवाज इंदिरेला आवडत नव्हते; पण बिचारी करते काय ! तीहि एका कैद्याप्रमाणेंच होती. दुसरी एखादी कच्चा दिलाची स्त्री असती तर काय झालें असतें कुणाला ठाऊक; पण इंदिरेला मात्र प्रसंगामुळें बरेंच धैर्य आलें होतें. प्रथम ती तर अगदीं दुबळी होती, तरी आपलें संरक्षण आतां आपल्यालाच केलें पाहिजे हें ती समजून चुकली. काजीसाहेबांचा साधारण हेतू तिच्या लक्षांत हळू हळू येत चालला होता; पण आपल्या नवऱ्याची एकदां भेट झाली असती तर बरें झालें असतें असें तिला वारंवार वाटत असे. हाफीज हकीमहि या सैतानाला मिळाला कीं काय ? अशीहि तिला वारंवार शंका येई. कांहीं असलें तरी या वेळीं आपणाला स्वतःचें संरक्षण करणें जरूर आहे, असें तिचें मन तिला सांगूं लागलें. नंतर तिनें हात जोडून अश्रु-भाराक्रांत नेत्रांनीं वर पहात ईश्वराची प्रार्थना करण्याला सुरवात केली. " ईश्वरा ! तुझी काय इच्छा आहे तें मला समजत नाहीं. या असहाय आणि दीन इंदिरेची तूं आणखी किती कसोटी पहाणार ? माझें सामर्थ्य तें किती आणि माझी परीक्षा तरी किती भयंकर ! प्रभू, नको आतां माझी जास्त परीक्षा पाहूं ! माझ्या प्रियकराला मला एकदां भेटूं दे. मी तुला अनन्य भावानें शरण आहें. मला सैतानाच्या हातून सोडीव, माझ्या संरक्षणाचा सर्व भार मी तुझ्यावरच सोपवितें. कारण तूं सर्व सामर्थ्यवान् व सर्वसाक्षी आहेस. तुझ्यावांचून माझी ही दीन स्थिति दुसऱ्या कुणालाहि समजणार नाहीं. तुझ्या या मुलीचें संरक्षण करायला आतां तूंच समर्थ आहेस—"

---

## प्रकरण २१ वें.



### मातोश्री तुम्ही कसोटीस उतरलांत.

' नीचा ! तुझ्या ऐश्वर्यावर व अधिकारावर ही इंदिरा लाथ मारते जा—'

इंदिरेच्या प्रार्थनेनंतरचा दुसरा दिवस उजाडला आणि रात्रहि आली. या रात्रीं चंद्राचा प्रकाश फारच स्वच्छ पडलेला होता. इंदिरा आपल्या खोलींत बसून गतगोष्टींचा विचार करीत होती. तिनें आपलें मस्तक डाव्या तळहातावर ठेविलें होतें. चंद्रिकाधौत उद्यानस्थ वृक्षलतांकडे तिची नजर लागली होती. काळजीनें किंचित् पांडुरता आलेल्या भालप्रदेशावर तिचे कित्येक कुरलकुंतल मृदु मंद वाऱ्याच्या झुळकीबरोबर डोलत होते. इतक्यात भपकेबाज पोषाख करून आपल्या अंगच्या सुवासानें चोहोंकडचें वातावरण दरवळून सोडत खानाची स्वारी तेथें आली आणि कांहीं वेळ त्या चिंतामग्न सुरसुंदरीकडे पाहून आपल्या नेत्रांची तृप्तता झाल्यावर त्यानें तिला हांक मारली. " इंदिरे, तुला आतां कसें काय वाटतें ? "

इंदिरा दचकली. तिच्या अंगावर शहारे आले. कारण मागें पाहिल्याबरोबर नटून थटून आलेल्या खानाकडेसच तिची दृष्टि गेली त्याच्या बोलण्याचा तो झोंक व डोळ्यांवरची धुंदी पाहून इंदिरेला फारच चमत्कारिक वाटलें. तिनें चटकन् बुरखा घेतला आणि उभी राहून ती त्याच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात तीव्र स्वरानें म्हणाली, "इथें कोणी परिचारिका नाहीं हें तुम्ही पहातच आहां. अशा एकाकी स्थितींत कुलस्त्रीच्या एकांत जागीं येण्याचें तुम्हीं कां धाडस केलेंत बरं ? आगाऊ सूचना तरी द्यावी कीं नाहीं ? जा, आपण या वेळीं बाहेर जा. "

काजीसाहेबांनीं आज आकंठ मदिरापान केलें होतें. आणि त्यामुळें त्यांच्या सारासारबुद्धीचा पार लोप झाला होता. तरी पण मद्यपानाची चांगलीच संवय असल्यामुळें त्याचे पाय लटपटत नव्हते, किंवा त्याच्या बोलण्यांत असंबद्धताहि नव्हती.

इंदिरेचें तें कठोर भाषण ऐकून खानानें उत्तर केलें, " इंदिरे ! तुझ्यासाठीं मीं किती त्रास आणि कष्ट सहन केले आहेत हें एक माझें मलाच माहीत; पण तुझ्यासाठीं मी जें केलें त्याबद्दल तूं कृतज्ञता दाखविणार नाहींस का ? तुझ्या नवऱ्यावर जें तुझें प्रेम, भक्ति व निष्ठा आहे त्यापैकीं एक शतांश तरी जर मला अर्पण करशील तर–"

इंदिरा त्याला पुरतें बोलूं न देतां म्हणाली, " अहं ! पुढं बोलूं नका

काजीसाहिब । जर मूर्छितावस्थेंमध्यें तुम्हीं मला येथें आणलें नसतें तर या पापपुरीच्या छायेलाहि मी उभी राहिलें नसतें. माझ्यानें जास्त बोलवत नाहीं आणि तुम्हीहि बोलू नका. जा. ''

" इंदिरे ! तूं जगत्सुंदरी आहेस. नूरजहान बिबी जगत्सौंदर्यलतिका असेल; पण तुझ्यापुढें तिचा तोरा चालणार नाहीं. तुझ्या स्वरूपानें मी अगदीं वेडा झालों आहें. तुझ्या विरहाग्नीनें माझें हृदय पोळत असल्यामुळें मला आतां या वेदना सहन करवत नाहीं. तूं आपल्या नवऱ्याची भीति बाळगीत असशील तर तो भयंकर दुखण्यानें आजारी असल्यामुळें त्याची जगण्याची आशा करायला नको; पण इतका पैसा खर्च करून जी मीं तुला जगविली त्याची कृतज्ञताहि तूं दाखवूं नये म्हणजे आश्चर्यच आहे. बरें समज, उद्यां बापूसाहेब मरण पावले—"

इंदिरा मध्येंच दृढ स्वरानें म्हणाली, " तसं व्हायचं जर माझ्या नशिबांत असलं आणि तसं झालं तर मी वीष घेऊन आत्महत्या करीन."

" मात्र ते प्राण मला अर्पण करणार नाहींस इतकी का तूं कठोर हृदयाची आहेस ? तुझ्यासाठीं मीं इतकें केलें तरी तूं माझी होणार नाहींस ? पहा, तूं माझी हो. मी तुझा गुलाम होऊन राहीन. मग हा अधिकार, मान, ऐश्वर्य, उंच हवेल्या हें सर्व कांहीं तुझें होईल. या नियामतखानानें अद्याप आपलें मस्तक कुणाच्या पायीं नम्र केलें नाहीं; पण मी तें तुझ्या पायांवर ठेवितों. सुंदरी आतां विलंब करूं नकोस ! मला या यातना सहन होत नाहींत. ये. मला शांत कर. ''

तो सैतान इतकें बोलूनच थांबला नाहीं. इंदिरेला आलिंगन देण्यासाठीं पुढें पुढें येऊं लागला. इंदिरा एकदम बरीचशी लांब जाऊन उभी राहिली आणि आपल्या निऱ्यांतून एक तीक्ष्ण धारेचा खंजीर बाहेर काढून त्याची मूठ आपल्या हातानें घट्ट धरून कर्कश स्वरानें दांत ओठ चावीत म्हणाली, " थांब, पिशाच्चा राक्षसा थांब. एकहि पाऊल पुढें टाकूं नकोस. ह्या वेळीं मी माझ्या स्वाधीन नाहीं. एक तुझा तरी मी प्राण घेईन, नाहीं तर मी तरी मरेन. निष्कारण आपला नाश करून घेऊं नकोस. पापी कुत्र्या ! तुझें हें मोहजाल पतिव्रता स्त्रियांवर टाकण्याला योग्य नाहीं. तू निर्बल आणि अविचारी असल्यामुळेंच एका असहाय्य अबलेवर

आपलें शौर्य गाजविण्याला तयार झालास. नीचा ! तुझ्या ऐश्वर्यावर व अधिकारावर ही इंदिरा लाथ मारते. जा आपलें तोंड काळें कर, धर्म, आचार, विचार, अधिकार या सर्वांची ओळख तूं विसरला आहेस. तेव्हां इथें क्षणभरहि न थांबतां बाहेर जा."

तो तीक्ष्ण खंजीर आणि तितकेंच उग्र असें इंदिरेचें स्वरूप पाहून खान मागें सरला आणि धिक्कारपूर्ण नजरेनें तिच्याकडे पहात म्हणाला, "ऐक, इंदिरे, आतां तुला कधीं ऐकायला न आलेले शब्द ऐक. तूं त्याच योग्यतेची आहेस. तुझ्या स्वरूपानें मी मोहित होऊन हाफीजला हाताशीं धरलें आणि त्याच्याकडून तुझ्या पतीचा खून करविला आणि त्या तुझ्या भिकारड्या नवऱ्याचें प्रेत कोणताहि संस्कार न करतां नदींत फेंकून दिलें. झालें आतां तूं कोण—"

पण इंदिरा पुढें शब्द ऐकण्याला ठिकाणावर होती कुठें ! ती केव्हांच मूर्छित होऊन पडली होती. खान आतां पुढें सरणार इतक्यांत पाठीमागचा दरवाजा उघडून चारपांच सशस्त्र पुरुष आंत आले व त्यांपैकीं एक मनुष्य तीव्र स्वरानें म्हणाला, "नाहीं. बापूसाहेब मेला नाहीं. तुझ्यासारख्या नीचाच्या हातून त्याला मृत्यु येणार नाहीं. पहा, हा मी मूर्तिमंत येथें उभा आहे."

खानानें मागें वळून पाहिले, तों, खरोखरच बापूसाहेब उभे. त्याला तिथें पहातांच खान तटस्थच झाला. जो मेला, ज्याचा देह मी स्वतः माझ्या नोकरांकडून तुंगभद्रेंत फेंकून दिला, तो जिवंत कसाचा राहतो ? खरोखरच हें त्याचें पिशाचच असलें पाहिजे. खानाचे असे विचार चालले आहेत तोंच शहांचा मुख्य सेनापती तेथें आला, आणि त्यानें बापूसाहेबांना एकीकडे होण्यास सांगून म्हटलें, "बापूसाहेब तुम्ही बाजूला व्हा. मला आतां माझें कर्तव्य बजाऊं द्या. या सैतानानें आतांच आपल्या तोंडून कबुली जबाब दिला आहे व तो येथील सर्व मंडळीनें ऐकलाहि आहे. अर्थात एवढ्या प्रमाणावरच मी माहामान्य शहांच्या हुकुमाच्या आधारानें माझ्या शिपायांना हुकूम करतों कीं, या नियामतखानाला ताबडतोब कैद करा. आतां जास्त बाटाघाट करण्याचें कारण नाहीं."

शहांच्या मुख्य सेनापतींना, नियामतखान ओळखीत होता. पूर्वी

अनेकवार व्यवसायानिमित्त एकमेकांच्या भेटी झालेल्या होत्या. सेनापतीचा हा हुकूम ऐकून खान भ्याला नाहीं; पण उलट त्यानें त्याला असा प्रश्न केला, " बहादुरजंग ! तूं मुख्य सेनापती असशील; पण मी कोण हें तूं ओळखलेंस का ? "

" होय. इतकें दिवस धर्माधिकारी व न्यायाधीश, पण आतां कैदी. "

" सेनापतीसाहेब ! थट्टा करण्याची वेळ ही नव्हे. शहानशहांच्या एका एकनिष्ठ व थोर नोकराचा निष्कारण अपमान केल्याबद्दल मीच तुला कैद करतों. कोण आहेरे नजीब ! "

पण त्याच्या हांकेला कुणींहि उत्तर दिलें नाहीं. व कोणी आलाहि नाहीं; बहादुरजंग म्हणाला, " नियामत ! ही तुझी वेडगळ बडबड बंद कर. मी शहांचा नोकर आहें व त्यांच्याच हुकुमानें येथें आलों आहें. तुला विश्वास वाटत नसेल तर हा हुकूम पहा. "

हुकूम वाचतांच नियामतखानाची मदिरा साफ उतरली व तो थरथर कांपूं लागला, व फार वेळ उभें न राहवल्यामुळें मटकन् खालीं बसलाहि. आपला पापाचा पेला आतां कांठोकांठ भरला असून प्रायश्चित्ताची वेळ नजीक आली आहे. आतां रक्षण होणें कठीण असें त्यास वाटलें.

कांहीं वेळ थांबून सेनापति म्हणाला, "पापाचें शासन असेंच होतें. तूं सर्व शक्तिमान खुदाच्या अचाट सामर्थ्यावर विश्वास न ठेवतां स्वतःचेंच सामर्थ्य मोठें मानल्यामुळें तूं जें महापाप केलें आहेस त्याबद्दल आतां होणारी शिक्षा निमूटपणें सहन कर. "

नंतर नियामतखान शृंखलाबद्ध होऊन हुजूरकडे रवाना झाला. इंदिरेच्या शुश्रूषेची व्यवस्था हाफीजनें फारच उत्तम ठेविली असल्यामुळें ती लवकरच पूर्वींप्रमाणें सावध झाली. व बापूसाहेबांच्या सुखरूपपणामुळें तर तिला पूर्वींचेंच सामर्थ्य प्राप्त झालें.

* * *

शहांच्या आज्ञेनें नियामतखानाला जन्मभर कैदेची शिक्षा झाली व तो आपलीं कृतकर्में आठवीत अंधार कोठडींत दिवस घालवूं लागला.

पण यामुळें बापूसाहेबांच्या भाग्याला मात्र चढती कळा लागली. शहांनीं त्याची ती शोचनीय जीवनकाहणी ऐकून त्याला आपला दोस्त

केलें व नियामतखानाची रिकामी झालेली जागा त्याला देऊन हिंदु-प्रजेचा गौरव केला. बापूसाहेबांना पुन्हां सुखाचे दिवस आले. इंदिरेच्या आनंदाला तर सीमाच राहिली नव्हती.

पुढें बापूसाहेबांच्या अत्यंत आग्रहानें शहांनीं हाफीजला क्षमा केली; पण त्याला आतां संसाराचा वीट आला असल्यामुळें त्यानें फकिरी-बाणा स्वीकारला. बापूसाहेबांनीं व इंदिरेनें त्याला तसें न करण्याबद्दल पुष्कळ सांगून पाहिलें; पण त्याचा निश्चय बदलला नाहीं. आपल्या आयु-ष्यांत कृपणपणानें सांठविलेलें द्रव्य खर्चून तुंगभद्रेच्या तीरीं त्यानें एक भव्य मशीद उभारली व सर्वांना फुकट औषध देण्याला व अगदीं कड-कडीत धर्माचरणानें वागण्याला सुरवात केली. चैन आणि विलास यांचा तर त्यानें अगदींच त्याग केला. बापूसाहेबांनीं व इंदिरेनें त्याला आण-खीहि द्रव्याची मदत करून मोफत दवाखाना ठेवण्याला उत्तेजन दिलें. तेव्हां डोळयांत पाणी आणून तो इंदिरेला म्हणाला, "ताईसाहेब ! इतके दिवस मीं सैतानाचें दास्यत्व केलें पण त्या वेळीं मला एक क्षणभरहि सुख मिळालें नाहीं; पण आज सर्व जीवन खुदाला अर्पण करून मी जेव्हां त्याचा परिचारक बनलों तेव्हां मला शांतीचा लाभ झाला आहे. आणि ताईसाहेब ! तुम्हांला खुदानें इतका त्रास देऊन काय पाहिलें तें समजलें ?"

" नाहीं हकीमसाहेब, मला तें कसें समजणार. सांगा पाहूं, काय पाहिलें तें ? " इंदिरेनें हंसत हंसत प्रश्न केला. पण हाफीजनें अगदीं गंभीरपणानें उत्तर दिलें.—

समाप्त.